# ज्ञानेश्वरीचें शब्द-भांडार

* * * * * * * * * * * * * * * * * *

रामचंद्र नारायण वेलिंगकर




**मराठी संशोधन मंडळ**

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालय

भाई जीवनजी लेन, ठाकुरद्वार, मुंबई २

१९५९

# पुरस्कार

वेद, उपनिषदें व रामायण-महाभारतादि आपले धर्मग्रंथ संस्कृत भाषेमध्यें आहेत. या भाषेशीं परिचय नसलेल्या सर्वसामान्य लोकांमध्यें ब्रह्मविद्येचा प्रसार व्हावा म्हणून आपल्या कनवाळू महाराष्ट्र-संतांनीं मराठीमध्यें ग्रंथरचना आरंभिली. परंपरागत समजुतीप्रमाणें मुकुंदराज हे मराठीचे आद्यकवि मानले जातात. ते आपल्या 'विवेकसिंधू'मध्यें म्हणतात,

जयां नाहीं शास्त्र-प्रतिती । नेणती तर्कमुद्रेची स्थिति ।
तयांलागीं मऱ्हाठिया उक्तीं । केली ग्रंथरचना ॥
उपार्जनेचा सिणु नेणे बाळु । तयाचिया मुखीं मिष्टान्नकवळु ।
सूये जननी जेवीं कृपाळु । अपत्यविषईं ॥

स्वतः ज्ञानेश्वरमहाराजांच्या मराठी ग्रंथरचनेचें उद्दिष्ट काय होतें तें आपणास ज्ञानेश्वरीच्या अकराव्या अध्यायाच्या आरंभीं शांत व अद्भुत रसांचें जें विवरण आलें आहे त्यावरून कळून येतें :

तीरें संस्कृताचीं गहनें । तोडूनि मऱ्हाटिया केलीं शब्दसोपानें ।
रचिलीं धर्मनिधानें । निवृत्तिदेवें ॥
म्हणौनि भलेतेणें एथ न्हावें । प्रयागीं माधवीं विश्वरूपातें पाहावें ।
एतुलेनि संसारा देयावें । तिलोदक ॥

ज्ञानेश्वरांच्या काळीं 'भलेतेणें' जाणावी अशी ज्ञानेश्वरीची भाषा सोपी होती, असें यावरून म्हणण्यास हरकत नाहीं. असें जर नसेल तर,

माझा मऱ्हाटा चि बोलु कवतिकें । परि अमृतातें हीं पैजेंसीं जींके ।
ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन ॥

या पैजेंत अर्थच राहाणार नाहीं.

ज्ञानेश्वरी ज्या काळीं लिहिली गेली त्यावेळीं जरी तिची भाषा सर्वांना सुबोध होती तरी कालांतरानें तिच्यामध्यें बदल होऊन तिचा अर्थ लोकांना कळेनासा झाला. अलीकडे तर कांहीं विद्वानांनीं 'ज्ञानेश्वरी'-लाच संस्कृताचीं शब्दसोपानें रचण्याचा प्रयत्न केला आहे!

ज्ञानेश्वरीचा अर्थ पुढील लोकांना कळेनासा झाला याला दोन कारणें होतीं. एक तर नक्कलकारांच्या अज्ञानामुळें किंवा निष्काळजीपणामुळें ती दूषित झाली, किंवा तिच्या भाषेमध्यें कालांतरानें बदल झाला. पहिल्या कारणामुळें ज्ञानेश्वरीला प्राप्त झालेला दुर्बोधपणा घालविण्यासाठीं एकनाथांनीं तिची पाठशुद्धि केली हें प्रसिद्धच आहे; परंतु त्याचबरोबर शब्दांना आलेला दुर्बोधपणा दूर करण्याकरितां कठिण शब्दांचा अर्थ देणारी 'ज्ञानेश्वरी-परिभाषा'ही त्यांनीं तयार केली होती, असा शोध नुकताच पुढें आला असून 'प्रतिष्ठान' (नोवेंबर १९५८ पहा) मध्यें ती क्रमशः प्रसिद्ध होत आहे. हा ग्रंथ छापून पुरा झाल्यावर निश्चितपणें तो एकनाथांचाच आहे कीं नाहीं हें विद्वान लोक ठरवितीलच; परंतु अशा प्रकारचे ग्रंथ जुन्या काळीं आणखीही पुष्कळ लिहिले जात होते, असें म्हणावयास जागा आहे.

तंजावरच्या सरस्वतीमहालमध्यें ज्ञानेश्वरी-शब्दांचें विवरण केलेल्या एका ज्ञानेश्वरी-टिप्पणाच्या पांच प्रती आढळल्या. या टिप्पणाचा रचनाकाल शके १६६९ (इ. स. १७४७) असल्याचें नमूद आहे.

धुळ्याच्या श्रीसमर्थवाग्देवतामंदिरामध्यें ज्ञानेश्वरीपरिभाषेच्या तीन प्रती असून (क्र. १३४, २१०, ५५८) एक ज्ञानेश्वरीकोश-शब्दपर्याय आहे (क्र. १७०३); परंतु या एकावरही लेखनकाल दिलेला नाहीं.

पुण्याच्या भारतइतिहाससंशोधनमंडळामध्यें ज्ञानदेवी-भाषा-पर्याय, श. १७२६ (५२, ६८०,) ज्ञानदेवी-भाषा-पर्याय (अ. ४ ते १८; २९,३३०-३३१) आणि परिभाषाज्ञानदीपिका (अ. १-१७; ३६,९३३) अशीं हस्तलिखितें आहेत.

मुंबई मराठी संशोधनमंडळामध्यें ज्ञानेश्वरीपरिभाषेच्या तीन प्रती असून त्यांचा लेखनकाल अनुक्रमें श. १६८२ (क्र. ३७७), श. १७१८ (क्र. १८९) व श. १७४१ (क्र. १९१) आहे.

वि. का. राजवाडे यांनीं 'सरस्वतीमंदिरां'त (वर्ष ५, अं. ३, श्रावण श. १८२७) 'प्राचीन मराठी कोश' या विषयावर लेख लिहिला होता. त्यामध्यें ते म्हणतात, "महानुभावांच्या कोशाहून किंचित अलीकडचा असा एक कोश मला मिळाला आहे. ह्यांत ज्ञानेश्वरींतील दुर्बोध म्हणजे यादवकालीन शब्दांस अकारविल्ह्यानें अर्वाचीन मराठी प्रतिशब्द दिले आहेत. हा कोश सुमारें तीनशें वर्षांचा जुना असून हा दोनचार स्थलीं याहून प्राचीन कोशांचा हवाला देतो."

ज्ञानेश्वरीच्या कांहीं हस्तलिखितांमध्येंही मधूनमधून शब्दार्थविवरण केलेलें व दुर्बोध ओव्यांना अर्थ दिलेला आढळून येतो. उदाहरणार्थ निरंजन रघुनाथांची प्रत. कांहीं सार्वजनिक व खासगी संग्रहांमध्येंही ज्ञानेश्वरी परिभाषेच्या व टांचणांच्या आणखी हस्तलिखित प्रती सांपडण्याचा संभव आहे. यावरून ज्ञानेश्वरीचींही 'तीरें' फार जुन्या काळापासून लोकांना हळुहळू 'गहने' कशीं होऊं लागलीं होतीं याची कल्पना करतां येते.

ज्ञानेश्वरीवर मुद्रणाचा संस्कार होऊं लागल्यापासून तिच्या अर्थविवरणाचे कसकसे प्रयत्न झाले तेही पाहण्यासारखे आहेत :

पहिली मुद्रित ज्ञानेश्वरी 'प्रभाकर' प्रेसमध्यें श. १७६७ (इ. स. १८४५) मध्यें छापण्यांत आली. दुसरी श. १७८६ (इ. स. १८६४) मध्यें गणेश बापूजी शास्त्री मालवणकर यांच्या छापखान्यांत मुद्रित झाली. या दोनही प्रतींमध्यें शब्दार्थ दिलेले नाहींत. केवळ पाठभेद आहेत.

ज्ञानेश्वरीमुद्रणाचा तिसरा महत्त्वाचा प्रयत्न गणपत कृष्णाजींचा. ही ज्ञानेश्वरी श. १७९६ (इ. स. १८७४) मध्यें प्रसिद्ध झाली. हिला शेवटीं १०४ पृष्ठांचा 'ज्ञानेश्वरी-कोश' जोडण्यांत आला आहे. ज्ञानेश्वरीचें शब्दभांडार खोलण्याचा हा पहिलाच मुद्रित प्रयत्न होय. या कोशाची योजना कर्त्यांच्या पुढील शब्दांत सांपडेल :

"...यांत (ज्ञानेश्वरी ग्रंथांत) लेखकप्रमादानें बहुतेक ठिकाणीं अपभ्रंश शब्द आहेत व असे दुर्बोध शब्दही पुष्कळ आहेत यामुळें अर्थ समजण्यास फार अडचण पडते. ती दूर व्हावी म्हणून प्रथमतः शिष्यपरंपरेनें याचा अर्थ जाणणाऱ्यांकडे हा ग्रंथ समजून घेऊन नंतर या ग्रंथाच्या निरनिराळ्या देशांतील पुष्कळ प्रती जमवून या ग्रंथाचा सतत दोन वर्षे अभ्यास केला. मग एक शुद्ध प्रत यथामति तयार करून त्या प्रतीस हा दुर्बोध शब्दांचा कोश करून जोडला. विवेकसिंधु, परमामृत, तुकारामाची गाथा, एकनाथी भागवत, रामविजय, रुक्मिणीस्वयंवर, पांडवप्रताप, दासबोध आणि मोरोपंतांच्या आर्या इतके ग्रंथ वाचून ज्ञानेश्वरींतील कठिण शब्द ज्या ज्या स्थळीं आढळले त्या त्या स्थळाचा हवाला या कोशांत दिला आहे. जे शब्द वर सांगितलेल्या ग्रंथांत मिळाले नाहींत त्यांचा अर्थ ज्ञानेश्वरीवर कित्येकांनीं टिपणें केलीं आहेत तीं मिळवून व मार्मिक ज्ञानेश्वरीवेत्त्यांचे साह्यानें त्यांचा सूक्ष्मदृष्टीनें विचार करून लिहिला आहे. आणि ग्रंथांतरीं सांपडत नाहींत व टिपणांतही उल्लेख नाहीं अशा शब्दांचा अर्थ ज्ञानेश्वरींत जितके ठिकाणीं त्यांचा उपयोग केला आहे तितके ठिकाणीं सम्यक् लागावा असे अर्थाची योजना केली आहे. या दुर्घट कृत्याविषयीं हा पहिलाच यत्न आहे..."

अशा प्रकारचे शब्दकोश पुढील निरनिराळ्या ज्ञानेश्वरींना शेवटीं जोडलेले आढळतात : ना. श. सोहनी (मुंबई १८९०), रा. वि. माडगांवकर (मुंबई १९०७), वि. का. राजवाडे (पुणें १९०९), व्यं. त्र्यं. चाफेकर (पुणें १९२४), बंकटस्वामी (पुणें १९२७), शं. वा. दांडेकर (पुणें १९५३).

ज्ञानेश्वरीमुद्रणाचा चौथा प्रयत्न रावजी श्रीधर गोंधळेकर यांचा दिसतो. पण ही प्रत मला मुंबई व पुणें येथील प्रमुख ग्रंथालयें धुंडूनही पाहावयास मिळाली नाहीं. इतकेंच नव्हे तर रा. शंकर गणेश दाते यांच्या मराठी ग्रंथसूचींत व डॉ. मु. ग. पानसे यांच्या *Linguistic Peculiarities of Jñānesvarī* या ग्रंथामधील ज्ञानेश्वरवाङ्मयाच्या यादींत तिची नोंद नाहीं. विष्णुशास्त्री चिपळूणकरांनीं 'निबंधमाले'-

च्या ५१ व्या अंकांत (पृ. १०–१५) 'ज्ञानेश्वरी-परिभाषा' या ग्रंथावर जो अभिप्राय दिला आहे त्याच्यामध्यें या प्रतीचा निर्देश वाचून तिचें अस्तित्व मला प्रथम कळून आलें. पुढें इंडिया ऑफिसच्या मराठी कॅटलॉगांत (Vol. II, Pt. V, J. F. Blumhart, London 1908) या प्रतीची नोंद सांपडली. ती अशी :—

"Edited with a glossary at the end of each chapter by Rāvajī Śrīdhara Gondhaḷekar, 4 to, Poona 1878."

यांत वर्णन केल्याप्रमाणें प्रत्येक अध्यायाच्या शेवटीं जीं त्या त्या अध्यायाच्या शब्दकोशाचीं पानें दिलीं होतीं तींच पुढें एकत्र करून या 'ज्ञानेश्वरी-परिभाषे' ची निराळी स्वतंत्र प्रत काढली, आणि तिच्यावरच '**निबंधमाले**'मध्यें उपरिनिर्दिष्ट अभिप्राय प्रसिद्ध झाला आहे. गोंधळेकरांची ही मूळ ज्ञानेश्वरी जरी हिंदुस्थानांत मला उपलब्ध झाली नसली, तरी या परिभाषेची एक प्रत प्रस्तुत लेखकाच्या संग्रहीं असून इतरत्रही तिच्या कांहीं प्रती पाहावयास मिळाल्या. या परिभाषेच्या प्रस्तावनेंत पुढील मजकूर आढळतो :—

"...पुढें भाषेंत फारच अंतर पडल्यामुळें तो ज्ञानदेवाचा लेख (ज्ञानेश्वरी) लोकांस दुर्बोध झाला. नंतर रामेश्वरभट्ट म्हणून एक विद्वान् ब्राह्मण होता. त्यानें आपले मतें लोकांस दुर्बोध अशा शब्दांवर पर्यायशब्द घालून परिभाषा केली; परंतु तेवढ्या पर्यायांनीं सर्व ज्ञानेश्वरी समजण्यास कठिण पडूं लागलें, त्यावर कांहीं विद्वानांनीं विल्हेवारीनें शब्दांचे कोश केले तथापि वाचकांचें व्य(अ ?)वधान ग्रंथ वाचण्याकडे असतें. मध्येंच शब्द अडला म्हणजे त्याचा अर्थ पाहावयाचा तो कोशाचे विल्हेवारीप्रमाणें काढून पाहण्याकडे व ग्रंथसंबंधाचे योगानें एका शब्दाचे वेगवेगळे अर्थ होतात त्यांपैकीं कोणता अर्थ कोणते स्थळीं घ्यावा याचा विचार करण्याकडे बराच वेळ मोडतो त्यामुळें वक्तयास जसा उपयोग व्हावा तसा होत नाहीं."

गणपत कृष्णाजींचा कोश वर्णानुक्रमानें होता, तर रघुनाथ भास्कर गोडबोले यांच्याकडून गोंधळेकर यांनीं तयार करविलेली प्रस्तुत परिभाषा अध्याय व ओवी यांच्या क्रमानें आहे. 'जुन्या परिभाषा मिळवून ही तयार केली असाही प्रस्तावनेंत निर्देश आहे. या परिभाषेची १८९० सालची दुसरी आवृत्ति भारत-इतिहाससंशोधनमंडळ, पुणें येथें पाहावयास मिळाली. कठिण शब्दांचे अर्थ तळटीपांत देणें हें उपरिनिर्दिष्ट परिभाषेपेक्षांही वाचकांच्या दृष्टीनें जास्त सोयीचें असतें. अशा प्रकारचा पहिला प्रयत्न करण्याचें श्रेय माझ्या माहितीप्रमाणें पांडुरंग विठ्ठल रानडे यांना आहे. 'परिभाषायुक्त ज्ञानेश्वरी' हा ग्रंथ त्यांनीं श. १८०८ (इ. स. १८८६) मध्यें पुणें येथें बुद्धिप्रकाश छापखान्यांत मुद्रित केला. याची एक प्रत पुणें विद्यापीठाच्या ग्रंथालयांत आढळली; इतर कुठेंही पाहावयास सांपडली नाहीं. इतकेंच नव्हे तर रा. शं. ग. दाते व डॉ. पानसे यांच्या ग्रंथांतही तिचा नामनिर्देश नाहीं. ज्ञानेश्वरीमुद्रणाचा हा पांचवा प्रयत्न असावा. यानंतर अशा प्रकारचे ज्ञानेश्वरींतील शब्दांचे तळटीपांत अर्थ देण्याचे प्रयत्न पुष्कळांनीं केले : अण्णा मोरेश्वर कुंटे (मुंबई १८९४), कृ. ना. आठल्ये (मुंबई १९००), व्यं. त्र्यं. चाफेकर (पुणें १९२४), बंकटस्वामी (पुणें १९२७), बा. अ. भिडे (मुंबई १९२८), रंगनाथ महाराज व रामभाऊ यादव (कोल्हापूर १९४८), शं. वा. दांडेकर (पुणें १९५३).

कठिण शब्दांचे केवळ अर्थ देऊन ज्ञानेश्वरी समजणें कठिण आहे. प्रत्येक ओवीचा सबंध अर्थ म्हणजे ज्ञानेश्वरीचें गद्य रूपांतर किंवा अनुवाद करण्याची त्यामुळें आवश्यकता निर्माण झाली. ही गरज भागविण्याचें काम प्रथम कोल्हापूरचे विनायक सखाराम भावे यांनीं केलें. त्यांचा 'ज्ञानेश्वरी-अर्थचंद्रिका' हा ग्रंथ इ. स. १८९५ सालीं मुद्रित झाला. अनुक्रम लावावयाचा झाला तर ज्ञानेश्वरीमुद्रणाचा हा सातवा प्रयत्न दिसतो. कारण सहावी मुद्रित ज्ञानेश्वरी (इ. स. १८९०) ना. रा. सोहनी यांची होय.

समग्र अर्थासह ज्ञानेश्वरी प्रसिद्ध करण्याचा दुसरा प्रयत्न कृ. ना. आठल्ये यांचा. इ. स. १९०० त मुंबईमध्यें ही ज्ञानेश्वरी निघाली. याच पद्धतीनें पुढें नानामहाराज साखरे (पुणें १९०५. ही प्रत कै. कृष्णाजी परशराम भिडे यांनीं नानामहाराज साखरे हे ज्ञानेश्वरीवर प्रवचन करीत असतांना त्यांच्या अर्थाप्रमाणें प्रथम लिहून काढली, व १९०५ सालीं आवटे यांनीं ती प्रसिद्ध केली; परंतु पुढें १९०६

सालीं भिडे निधन पावल्यावर नानामहाराजांचे चिरंजीव विनायकबुवा यांनीं त्यांत अल्प बदल करून ती आपल्या नांवावर ओढली, व तिच्या अनेक आवृत्त्या प्रसिद्ध झाल्या. मूळ भिडेलिखित ज्ञानेश्वरीची दुसरी आवृत्ति नानामहाराज साखरे यांचे तृतीय चिरंजीव भिक्षु कृष्णानंद सरस्वती यांनीं १९४८ सालीं प्रसिद्ध केली आहे.), बंकटस्वामी (पुणें १९२७), बा. अ. भिडे (मुंबई १९२८), रंगनाथ महाराज व राम-भाऊ यादव (कोल्हापूर १९४८), शं. वा. दांडेकर (पुणें १९५३, बंकटस्वामींच्या प्रतीवर आधारलेली) असे गद्य अर्थ देणारे प्रयत्न झाले.

ज्ञानेश्वरीचा ओवीबद्ध पद्यात्मक अर्थ देण्याचा प्रयत्न गो. ग. मोघे यांचा, (मुंबई १९१६; आवृत्ति २ री १९२६).

ज्ञानेश्वरीवर मराठी टीका लिहिण्याचा उद्योग मिरजेचे कै. गणेश कृष्ण आगाशे यांनीं केला व यशस्वीपणें तडीस नेला. त्यांची ही 'श्रीज्ञानेश्वरी टीका' सहा भागांत क्रमशः प्रसिद्ध झाली (कोल्हापूर-सातारा १९२४-१९३३). राजवाड्यांनीं प्रसिद्ध केलेल्या ज्ञानेश्वरीच्या संहितेसहित ही टीका आहे. हा त्यांचा प्रयत्न अपूर्व म्हणावा लागतो.

जिचीं तीरें गहनें बनलीं, ती ज्ञानेश्वरी सुगम होण्याकरितां जीं येथवर वर्णन केलेलीं बहुविध सोपानें रचिलीं गेलीं, तीं सर्व ज्ञानेश्वरीला जोडूनच होतीं; परंतु ज्ञानेश्वरीचा स्वतंत्र असा कोश तयार करण्याची पहिली कल्पना रा. शिवाजीराव भावे यांची आहे. त्यांनीं आपला 'श्री ज्ञानेश्वरी शब्दार्थ कोश' राजवाड्यांची ज्ञानेश्वरीच मूळ धरून केलेला आहे (वर्धा, १९५१). आरंभींच्या 'दोन शब्दांत' त्यांचे बंधु आचार्य विनोबा भावे "ज्ञानेश्वरींतील यच्चयावत् शब्दांचे अर्थ देणारा हा कोश" असें त्याचें जें वर्णन करतात तें यथार्थ म्हणवत नाहीं. कांहीं सोपे शब्द त्यांनीं गाळलेले दिसतात. उदाहरणार्थ तो-ती तें, जो जी जें.

रा. भाव्यांच्याही पुढें जाऊन डॉ. मु. ग. पानसे यांनीं *Index Verborum of Jñāneśvarī* म्हणजे ज्ञानेश्वरीची शब्दसूचि तयार केली. (*Linguistic Peculiarities of Jñāneśvarī*, Poona, 1953) या ग्रंथांत शब्दांचे इंग्रजींत अर्थ तर दिले आहेतच, शिवाय तो शब्द कोठें कोठें आला आहे तेंही नमूद आहे. परंतु यांत अगदीं सोप्या शब्दांच्या बाबतींत जी काटकसर त्यांनीं केलेली आहे: याचा खुलासा त्यांच्या Preface मध्यें सांपडेल. डॉ. पानसे यांचा प्रयत्न जरी चांगला असला तरी ज्या ज्ञानेश्वरीच्या मूळ हस्तलिखितावरून ही शब्दसूचि बनविलेली आहे तेंच सबंध मुद्रित होऊन लोकांपुढें आलेलें नसल्यामुळें ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांना या सूचीचा व्हावा तसा उपयोग होत नाहीं.

प्रा. रा. ना. वेलिंगकर यांचा प्रस्तुत "ज्ञानेश्वरांचें शब्द-भांडार" हा ग्रंथ लोकांपुढें असलेल्या राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीवर आधारलेला आहे. डॉ. पानसे यांच्या Index Verborum प्रमाणेंच प्रा. वेलिंगकरांची ही ज्ञानेश्वरीची शब्दार्थसूचि आहे. प्रा. वेलिंगकर यांनीं आपल्या ग्रंथाची योजना आपल्या 'निवेदना'त मांडिली असल्यामुळें या ग्रंथाच्या रचनेसंबंधीं येथें विशेष लिहिण्याचें कारण दिसत नाहीं. प्रा. वेलिंगकर यांच्या अभ्यासाचा मुंबई विद्यापीठांतील बी. ए. चा मुख्य विषय संस्कृत हा होता व पुढें ऑक्सफर्ड येथें इंग्रजीची पदवी घेतल्यावर इंग्रजी शिकविण्यांत त्यांचें बहुतेक आयुष्य गेलें. या दोन्ही भाषांच्या ज्ञानाची बैठक त्यांच्या या ग्रंथाला मिळालेली आहे. या ग्रंथाची एकंदर योजना व मांडणी पद्धतशीर असून कर्त्याची मार्मिक व सूक्ष्म दृष्टि हा ग्रंथ वाचला असतां ठिकठिकाणीं पाहावयास सांपडते. या ग्रंथाला जोडलेलीं परिशिष्टें हीं तर ज्ञानेश्वरीच्या अभ्यासकांना त्यांची अपूर्व व मोलाची देणगी आहे. आतांपर्यंत या विषयावर जे प्रयत्न झाले त्यांच्यापुढें प्रा. वेलिंगकर यांनीं चार पाउलें मजल मारलेली आहे, असें म्हणावयास हरकत नाहीं. याच्याही पुढें जाऊन सोपा व कठिण असा विचार न करतां ज्ञानेश्वरींतील प्रत्येक शब्द व त्याचा प्रत्येक संदर्भ देणारी सूचि एखाद्याला करतां येण्यासारखी आहे. पण असा प्रयत्न नजिकच्या भविष्यकालांत होईल असें वाटत नाहीं.

प्रस्तुत 'शब्द-भांडार' राजवाडे यांनीं प्रसिद्ध केलेल्या ज्ञानेश्वरीवर आधारलेलें आहे. अलीकडे मुंबई सरकार राजवाड्यांची ज्ञानेश्वरी शुद्ध करून मुद्रित करीत आहे. तिच्या आधारावर जर प्रस्तुत

कोश तयार झाला असता तर जास्त बरें झालें असतें; परंतु हा कोश लिहून झाल्यावर त्याच्या प्रकाशनाच्या उद्योगांतूनच सरकारच्या शुद्ध ज्ञानेश्वरीची कल्पना निघाली हें लक्षांत ठेवलें पाहिजे. तरीपण या शुद्ध प्रतीचे व जुन्या राजवाड्यांच्या ज्ञानेश्वरीच्या ओव्यांचे क्रमांक एकच असल्यामुळें एकादी पुरवणी प्रसिद्ध करून या 'शब्द-भांडाराचा' शुद्ध प्रतीलाही उपयोग होईल अशी व्यवस्था करतां येण्यासारखी आहे. वर ज्या मुद्रित ज्ञानेश्वरींचा उल्लेख आला त्यांशिवाय तुकाराम तात्या (१८९७), हिंद एजन्सी (१९०८) व ल. वि. पांगारकर (१९३५) यांच्या कांहीं ज्ञानेश्वऱ्या मुद्रित झाल्याचें कळतें. संस्कृत, हिंदी, गुजराती, कानडी व इंग्रजी भाषांमध्येंही ज्ञानेश्वरीचीं शब्दसोपानें रचण्याचे प्रयत्न झाले आहेत.

मराठी संशोधनमंडळामार्फत आतांपर्यंत त्याच्या डायरेक्टरांचे संशोधनात्मक ग्रंथ प्रसिद्ध होत. त्यामुळें 'मंडळा'ला एकखांबी तंबू म्हणून हिणविण्यास कांहीं लोकांना जागा झाली होती; परंतु या ग्रंथाच्या प्रकाशनामुळें या तंबूला दुसरा एक खांब लाभलेला आहे हें त्यांना कळून येईल व त्यांचें समाधान होईल. 'मंडळा'चे इतर सभासदही प्रा. वेलिंगकरांचें अनुकरण करून या तंबूला आणखी खांबांची जोड देतील अशी आशा आहे. प्रा. वेलिंगकर हे मंडळाचे सभासद असल्यामुळें त्यांनीं हा ग्रंथ मंडळाला प्रकाशनार्थ दिल्याबद्दल त्यांचे आभार मानण्याचें कारण नाहीं; परंतु ज्यांच्या उदार देणग्यांमुळें हा ग्रंथ प्रकाशित करणें व तोही इतक्या अल्प किंमतीला वाचकांना देणें मंडळाला शक्य झालें त्या मुंबई सरकारचे व मुंबई विद्यापीठाचे कृतज्ञतापूर्वक आभार मानणें आमचें कर्तव्य आहे.

ज्ञानेश्वरांचें हें जें 'शब्द-भांडार' प्रा. वेलिंगकरांनीं खुलें केलें आहे त्याचा अभ्यासक भरपूर उपयोग करून घेतील व ज्ञानेश्वरीच्या अध्ययनाला या ग्रंथामुळें नवी चालना मिळेल अशी आशा आहे.

मराठी संशोधन मंडळ, मुंबई २<br>
ता. १२ फेब्रुवारी १९५९

**अ. का. प्रियोळकर**<br>
डायरेक्टर

# अनुक्रमणिका

# निवेदन

ज्ञानेश्वरीचे जुने व नवे कोश, गद्यरूपांतरें, टीकात्मक लेख व प्रबंध ज्ञानेश्वरी वाचणाराला मिळत असतांहि हें एक नवें **शब्द-भांडार** कां उघडण्यांत आलें, आणि तेंही आपल्या नांवानें मराठींत एकहि पुस्तक प्रसिद्ध न करणाऱ्या, इंग्रजीचाच अभ्यास करून इंग्रजी शिकवून सेवानिवृत्त झालेल्या एका अज्ञात अध्यापकानें उघडावें याचा आधीं उलगडा करतों.

कांहीं वर्षांपूर्वीं श्री. चिंतामणराव देशमुख रिझर्व बँकेंत असतांना क्रिकेट क्लब ऑफ् इंडियामध्यें राहात होते. माझे शाळकरी स्नेही म्हणून—तो स्नेह त्यांनीं आज इतकीं वर्षें तसाच कायम ठेवला आहे—त्यांना भेटण्याकरतां, कित्येकदां टेनिस खेळण्याकरतां, मी त्यांच्याकडे जात असें. एकदां त्यांनीं एक ग्रंथ माझ्या हातीं दिला. मुंबईतील सुप्रसिद्ध नागरिक श्री. मनु सुभेदार यांनीं लिहिलेला ज्ञानेश्वरीचा हा सारांश होता. ज्ञानेश्वरीचें महत्त्व जाणून, मराठीचा अभ्यास करून, श्री. सुभेदारांनीं हा ग्रंथ मराठी न समजणारांकरतां 'आनंदाचें आवारु मांडूं जगा' या उदात्त हेतूनें इंग्रजींत लिहिला होता. उभ्या जन्मांत नवनीतांतील दोन उताऱ्यांपलीकडे न गेलेल्या माझ्यासारख्या इंग्रजीलाच वाहून घेणाऱ्या शिक्षकाला हा ग्रंथ पाहून काय वाटलें असेल याची कल्पना करावी. 'आतां ज्ञानेश्वरी पाहा' एवढेंच चिंतामणराव म्हणाले. यावर प्रथम कुंटयांची ज्ञानेश्वरी वाचली, नंतर माडगांवकरांची ज्ञानदेवी पाहिली. जे शब्द कठीण वाटले त्यांची अर्थ व पत्त्यांसह एक यादी तयार केली व सुमारें दोन-अडीचशें शब्द अकारविल्हे लावून ती यादी चिंतामणरावांना दाखविली. 'इतर ज्ञानेश्वरीच्या प्रती पाहून हें काम असेंच करीत राहिलां तर एक मोठा कोश तयार होईल,' असें त्यांनीं उत्तेजन दिलें. यावर साखरे व भिडे पाहिले. कांहीं विद्वान मित्रांनीं राजवाडे प्रत हातीं दिली. यांतील कांहीं शब्द व शब्दरूपें अधिक जुनीं वाटलीं. पण ळ या अक्षराऐवजीं दोन-चार मुद्रणदोष सोडून सर्व ठिकाणीं ल हें अक्षर कां आलें आहे याचा उकल झाला नाहीं. ज्ञानेश्वरकाळीं ळ अक्षर तर होतें, कदाचित् राजवाड्यांना मिळालेल्या पोथीचें हें एक वैशिष्ट्य असावें असें वाटलें. यावर एकदोन प्रश्न टोंचूं लागले. ज्ञानेश्वरांपुढें गीतेची पोथी कोणती होती व त्यांत पाठ कोणते होते? उदाहरणार्थ, पहिल्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकांत '**रथोपस्थ उपाविशत्**' हा पाठ होता कीं '**रथोपस्थमुपाविशत्**' हा होता? यावर राजवाडे प्रतींतील १·२६७ व १·२७० ओव्या पाहा. तसेंच राजवाडे प्रतींत कांहीं संस्कृत पाठ अशुद्ध वाटले व कांहीं ठिकाणीं ओव्या श्लोकांच्या वरखालीं व मागेंपुढें झाल्या असाव्या असेंहि वाटलें. हे सर्व लेखकाचे व मुद्रणाचे दोष असावे असें समाधान करून घेतलें. सहाशें वर्षांत निरनिराळ्या लेखकांच्या हातीं ज्ञानेश्वरी गेल्यामुळें हें असें होणें अपरिहार्य होतें. पण हे प्रश्न कोश-काराच्या मर्यादेंत येत नसल्यामुळें त्यांचा विशेष विचार केला नाहीं. ज्या उपलब्ध मुद्रित प्रती पाहिल्या त्या सर्वांत राजवाडे प्रतच जुनी वाटली व याच प्रतीचा कोश तयार करण्याचा निर्णय घेतला. आधीं काढलेले शब्द पुनः या प्रतींतून काढले व याच प्रतीचा अभ्यास करून शब्द काढण्याचें काम चालू ठेवलें. तयार होत चाललेला शब्दसंग्रह मी मधून मधून चिंतामणरावांना दाखवीत असें. तेहि वेळ मिळे तेव्हां येऊन शब्द पाहात. हा प्रसिद्ध होत असलेला शब्दकोश चिंतामणरावांच्या प्रेरणेचें व स्नेहभावानें दिलेल्या प्रोत्साहनाचें फळ आहे. याचें श्रेय मोठ्या आनंदानें मी त्यांना देतों.

एका विशिष्ट पद्धतीनें शब्दांची मांडणी करावी या उद्देशानें शब्दांची निवड करीत होतों. योजलेल्या सविस्तर मांडणींत ज्ञानेश्वरींतील सर्व शब्द घालण्याची स्थलकालाभावीं शक्यता नव्हती, म्हणून शब्दांची निवड करण्यासाठीं आरंभीं कांहीं ढोकळ नियमांची चौकट केली. प्रचारांत नसलेले जुने कठीण मराठी शब्द घ्यावे, संस्कृत शब्द संस्कृतकोशांत वाचक पाहीलच असें ठरविलें. यावर जुने मराठी शब्द कोणते, कोणाला कठीण वाटणारे शब्द काढावे, बरेचसे मराठी शब्द संस्कृतांत जसे आहेत

तसेच मराठीनें घेतले आहेत, त्यांचें काय? कांहीं संस्कृत शब्द वेष बदलून मराठींत आले आहेत या संस्कृत शब्दांच्या मराठी रूपांचें काय? असे प्रश्न उभे राहिले. अबुझं, अव्हें, अवक्लाऊ, अव्हामिरा यासारखे प्रचारांत नसलेले शब्द निवडणें सोपें वाटलें. पण नेहमीं उपयोगांत असलेल्या साध्यासोप्या मराठी शब्दांचे सर्वच अर्थ कांहीं सोपे दिसले नाहींत. उदाहरणार्थ, आणिक शब्द सर्वांच्या तोंडीं आहे, पण आणिकी म्हणजे सवत, आणिकेंसि म्हणजे परपुरुषाशीं, हे अर्थ सर्वांनाच सहसा कळतात असें नाहीं; आवड व भला या शब्दांचेंहि तसेंच; मज आवडे म्हणजे मला वाटेल, भले म्हणजे कोणीहि हे अर्थ, करणें शब्दाचा काम करणें हा एक व इंद्रियें हा दुसरा अर्थ, गुण व स्नेह शब्दांचे एकाच संदर्भात प्रत्येकीं दोन अर्थ सर्वांना कळण्यासारखे नसल्यामुळें कोशांत देणें इष्ट वाटलें. त्याचप्रमाणें साधींसोपीं नामें साध्यासोप्या पण निरनिराळ्या क्रियापदांबरोबर आल्यानें त्यांचे अर्थ कसे बदलतात तेंहि दिसून आलें. आंग घे, आंग जाले यांचे अर्थ, पार्थु द्रोणाचा केला म्हणजे द्रोणानें शस्त्रास्त्रविद्या शिकवून नांवारूपाला आणला, तृणा एकासाठीं न सरे एथ किंवा त्याहि मेरु सांगातें सरणें या क्रियापदांचे अर्थ देणें भाग पडलें. हें झालें मराठी शब्दांचें.

आतां संस्कृत शब्दांचें पाहा. आरंभीं कांहीं संस्कृत शब्द बाजूला ठेवले. मस्तक, शीर्ष, भाल, नेत्र, नयन, जिव्हा, नासिका, कर्ण हे शब्द रोजच्या प्रचारांत नाहींत म्हणून डोकें, माथा, कपाळ, डोळा, जीभ, नाक, कान हे शब्द घेतले. पण या वगळलेल्या शब्दांचे इतर शब्दांबरोबर केलेले उपयोग पाहून हेहि शब्द पुरवणींत घालावे लागले. संस्कृत शब्दांचे अर्थ संस्कृतकोशांत सांपडतील हें खरें. पण समासांचें काय? उदाहरणार्थ, दहाव्या व अठराव्या अध्यायांतील वंदनांत आलेल्या मोठमोठ्या समासांचे अर्थ संस्कृतकोश पाहून कळणार नाहींत. ते कळायला थोडें संस्कृत, निदान समासांचे विग्रह करण्याइतकें तरी संस्कृत, आलें पाहिजे. ज्ञानेश्वरींतील मराठी कळण्यासाठीं थोडें तरी संस्कृताचें ज्ञान आवश्यक आहे असें माझें प्रांजल मत आहे; 'माझा मऱ्हाटा चि बोलु' हें ज्ञानेश्वरांच्या वाणींत बहुतांशीं खरें आहे, पण सर्वांशीं नाहीं. बरें, एकवेळ मोठमोठे समास बाजूला ठेवले व साधे संस्कृत शब्द, जे मराठींत आले आहेत, ते घेऊन पाहिले. उदाहरणार्थ, बुद्धि व भेद घ्या. हे संस्कृतांतच राहिले नाहींत. ज्ञानेश्वरींतील आत्मबुद्धि, परबुद्धि व सत्वबुद्धि यांचे अर्थ, सर्पबुद्धि म्हणजे सर्प आहे या समजुतीनें किंवा अगदीं साधा शब्द अजुही म्हणजे मी जन्म घेणारा नसलों तरीहि, हे अर्थ संस्कृतकोशांत सांपडणार नाहींत. हें सर्व पाहिल्यावर संस्कृत शब्द व संस्कृत समासांच्या अर्थांबरच्या शब्दांनीं मराठी रूपें जेथें आलीं आहेत तेथें त्यांचे अर्थ कोशांत देणें भाग पडलें. एवंरूपु, कथिलेयादारभ्य यांचेंहि असेंच झालें. वेवसाऊ व वेव्हार या शब्दांकरतां व्यवसाय व व्यवहार हे शब्द कोशांत येणें अपरिहार्य आहे. तद्भव व तत्सम या शब्दांच्या व्याख्या व वर्गीकरणें व्याकरणांत शोभतात, ज्ञानेश्वरींत यांचीं क्षेत्रें मर्यादित करतां येत नाहींत. सांगावयाचें इतकेंच कीं, शब्दांच्या निवडीसाठीं आरंभीं बसवलेली नियमांची चौकट ढिली पडली व मनाशीं बांधलेली गांठ सैल झाली, निसटलीहि. माझ्या मतें अमके शब्द असावे, तमके नकोत, असे निर्बंध ज्ञानेश्वरीच्या कोशाला घालतां येणार नाहींत. शिवाय हा कोश एकाच व्यक्तीनें तयार केला असल्यामुळें व्यक्तीच्या आवडीनिवडीचे गुणदोष कोशांत राहणें अपरिहार्य आहे. बरें, अपरिहार्य दोष राहणें एकवेळ क्षम्य मानलें तरीहि काढून टाकतां येण्यासारखे दोष राहिले याबद्दल काय? ही जाणीव मला कोश तयार झाल्यावर व बराचसा छापून झाल्यावर झाली व पुनः एकदां कोश लिहावा असेंहि वाटलें; पण पुनः प्रयत्न केला असता तर पुनः तसेंच झालें असतें असेंहि वाटलें, म्हणून जें काम इतकीं वर्षे केलें व जें छापायला सुमारें तीन वर्षे लागलीं तें वाचकांपुढें 'उपसाहिजो जी' म्हणून सादर करण्याचें साहस केलें आहे. सांपडलेल्या चुकांचे निर्देश शुद्धिपत्रांत केले आहेत. त्या सोडून जितक्या चुका वाचकांना दिसतील किंवा ज्या सुधारणा केल्या पाहिजेत असें त्यांना वाटेल त्या सर्व कृपा करून वाचक मला कळवतील तर दुसरी आवृत्ति काढण्याची वेळ आलीच तर त्या आवृत्तींत हे दोष राहणार नाहींत.

या कोशांत विशिष्ट प्रकारची मांडणी कां केली आहे व ती कशी केली आहे हें सांगतों. ज्ञानेश्वरी वाचतांना शब्दांचे अर्थ पाहून ओव्यांचे अर्थ लावतां येतीलच असें नाहीं. ज्ञानेश्वरींत कांहीं शब्द निर-निराळ्या अर्थी आले आहेत. यासाठीं हे निरनिराळ्या संदर्भांत आलेले शब्द जर एकत्र केले व ते संदर्भ देऊन, कित्येक ठिकाणीं अन्वय लावून, अर्थ दिले तर ओव्यांचे अर्थ लावणें सोपें होईल. या उद्देशानें शब्दांची मांडणी केली आहे. क्रियापद मुख्य धरलें आहे. यांत मतभेद होण्याचा संभव आहे, पण ओव्यांचे अर्थ लावायला क्रियापदांचीं रूपेंच अधिक महत्त्वाचीं वाटलीं म्हणून क्रियापदें मुख्य धरलीं आहेत व त्यांचे अर्थ पुढें दिले आहेत. हे अर्थ पाहाण्यासाठीं कांहीं उतारे दिले आहेत, व ज्या ज्या संदर्भांत तीं आढळलीं ते ते पत्ते त्यांपुढें दिले आहेत. क्रियापदांचीं बहुतेक सर्व रूपें दिलीं आहेत व कोणत्या संदर्भांत तीं कशीं आलीं आहेत तें अन्वयार्थासह पुढें दिलें आहे. क्रियापदांवरून आलेलीं नामें, विशेषणें, क्रियाविशेषणें त्यानंतर दिलीं आहेत. ज्या शब्दांत नामावरून क्रियापद बनलें आहे, त्या शब्दांचीं नामें आधीं देऊन त्यांपुढें त्यांचीं क्रियापदें दिलीं आहेत. नकारार्थीं आलेले शब्द, उदाहरणार्थ **नादरी** व **नोलखे** हे शब्द **आदरणें** व **ओलखणें** पुढें, **अज्ञान** व **असुर** यांसारखे शब्द **ज्ञान** व **सुर** अशा मुख्य शब्दांच्या शेवटीं दिले आहेत. शब्दांचा क्रम अकारविल्हे लावला आहे. नजरचुकीनें कांहीं ठिकाणीं हा क्रम ढळला आहे. अकारविल्हे शब्द लावतांना अनुस्वार असलेल्या शब्दांचा क्रम अनुस्वारयुक्त अक्षराच्या पुढच्या अक्षरावरून ठरविला आहे. उदाहरणार्थ, **अइल** पुढें **अंक, अकार, अंकुरणें** असे शब्द आले आहेत. शब्द चटकन् सांपडावा हा या क्रमाचा उद्देश आहे. **क्ष** व **ज्ञ** हीं अक्षरें कवर्ग व जवर्गांत घातलीं आहेत. राजवाडेप्रतीचाच हा कोश आहे म्हणून ळ हें अक्षर कोशांत तसेंच ठेवलें आहे. जे मुद्रणदोष किंवा व्याकरणदोष आढळले—हे बहुतेक मुद्रणाचे किंवा लेखकाचे असावे—ते सुधारून त्याऐवजीं घातलेलीं अक्षरें किंवा शब्द कंसांत दिले आहेत. राजवाडेप्रतींतला पाठ दूषित असला तरी तसाच दिला आहे. फक्त राजवाडेप्रतींतील जर्व, तर्व, **धावंणें** यांचे व यासारख्या शब्दांचे अनुस्वार आदल्या अक्षरांवर मुळांतच दिले आहेत. इतर कोठेंहि राजवाडे पाठ बदलला नाहीं. कांहीं ठिकाणीं अर्थबोधाकरतां किंवा अर्थांतराकरतां निराळे पाठ ज्ञानदेवींतून व कुंटेप्रतींतून घेतले आहेत व त्यांचे पत्तेहि दिले आहेत.

कोश तयार होत असतां परिशिष्टेंहि तयार होत गेलीं. कोशाला अकरा परिशिष्टें जोडलीं आहेत व एक पुरवणीहि दिली आहे. ज्ञानेश्वरांची शब्दसृष्टि किती अमर्याद होती व त्यांची शब्दयोजना किती समर्पक होती तें दाखविण्याकरतां पहिलीं पांच परिशिष्टें दिलीं आहेत. ज्ञानेश्वरींतील कितीतरी शब्द मराठी भाषेंतून गेले आहेत, तें कोशांत दिसेलच; पण यासाठीं चौथ्या परिशिष्टांतलें (ऐ) हें सदर पाहा. सहाव्या परिशिष्टांत विशेषनामें, सातव्यांत स्त्रिया, मुलें व धंदेवाईक लोक, आठव्यांत पशुपक्ष्यादि, नवव्यांत झाडें, फळें व फुलें यांचे संदर्भ दिले आहेत. दहाव्यांत संख्यावाचक शब्द व अकराव्यांत इतर संकीर्ण माहिती दिली आहे. कोशांत व परिशिष्टांत न दिलेले, पूर्वीं आंखलेल्या मर्यादेंत न आलेले, शब्द शेवटीं पुरवणींत दिले आहेत.

ज्यांना मी गुरुसमान मानतों त्या प्राध्यापक न. र. फाटकांच्या साहाय्याशिवाय हा कोश व परिशिष्टें आहेत त्या रूपांत वाचकांच्या हातीं पडलीं नसतीं. मी या गुरुवर्यांच्या साहाय्यानें शब्दांची अखेरची निवड केली व परिशिष्टांचा मजकूर व क्रम ठरविला. या कामाकरतां त्यांनीं मला मुक्तद्वार ठेवलें होतें; म्हणून वेळींअवेळीं, बहुतेक अवेळींच, त्यांच्या येथें जाऊन, चर्चा करून, त्यांच्या ज्ञानाचा लाभ घेत असें. तेहि अत्यंत प्रसन्न अंतःकरणानें व आस्थेनें मला अर्थ समजावून सांगत. यावर माझ्या विनंतीचा स्वीकार करून त्यांनीं आपलें मनोगत लिहिलें. याबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतों. या विद्वद्वर्यांशीं चर्चा करीत असतां त्यांची उपस्थिति पाहून आपल्याला अजून किती वाचायचें राहिलें आहे व तें आत्मसात् कसें करावें याचा मला प्रत्यय आला.

अडीच वर्षांपूर्वीं मुंबईसरकारच्या शिक्षणखात्यानें राजवाड्यांची ज्ञानेश्वरी सुधारून छापविण्यासाठीं पांचजणांची एक समिति नेमली. या समितीनें शक्य ते प्रयत्न करून एकनाथपूर्वकालीन ज्ञानेश्वरीचीं

हस्तलिखितें मिळविलीं. त्यांत प्राध्यापक न. र. फाटकांकडे असलेल्या माडगांवकरांच्या हस्तलिखिताची राजवाडेप्रतीशीं तुलना करून पाहातां, राजवाडेप्रतीची नष्ट झालेली मूळ प्रत व या प्रतीची मूळ प्रत या दोन्ही एकाच प्रकारच्या असाव्या याबद्दल संशय राहिला नाहीं. फाटकप्रतींत ळ अक्षर आहे, पण जेथें ळ असायला पाहिजे तेथें तें आलें आहे; कांहीं ठिकाणीं ळ चा अतिरेक झाला आहे, म्हणजे अग्नितो देंवळो अशा ठिकाणींहि तें आलें आहे. इतर शालिग्राम, गोपाळाश्रम, निरंजन रघुनाथ व वर्तक यांच्या हस्तलिखितांशीं राजवाडेप्रतीचें बरेंच साद्दश्य दिसून आलें. या सर्व प्रतींवरून सुधारलेली राजवाडेप्रत सरकारी समितीनें तयार केली आहे. जुन्या राजवाडेप्रतीवरून हा कोश आहे म्हणून नव्या राजवाडे-प्रतीच्या अभ्यासाला तो उपयोगी पडेल असा भरवसा वाटतो.

मुंबईत सरकारी समिति राजवाडे प्रत तपाशीत असतां हा कोश मुद्रित होत होता. समितीचें काम पाहात असतां मी कोशाचीं कच्चीं मुद्रितें तपासीत होतों. त्यावेळीं निरनिराळ्या हस्तलिखितांतील पाठांतरांवरील सभासदांनीं केलेल्या चर्चेचा मला लाभ मिळाला. याबद्दल मी समितीच्या सभासदांचा आभारी आहें.

समितीचे अध्यक्ष प्राध्यापक सोनोपंत दांडेकर यांनीं उदार अंतःकरणानें व कळकळीनें ऐन वेळीं उभ्या राहिलेल्या अडचणींतून मला मार्ग दाखविला. मी 'बाळ मुमुक्षु' त्यांच्याकडे जात असें. तेहि अत्यंत प्रेमानें माझें शंकानिरसन करीत. कांहीं कच्चीं मुद्रितेंहि त्यांनीं पाहिलीं होतीं. ग्रंथाचें काम संपल्यावर माझ्या या कामाबद्दल आपणांस काय वाटतें तें चार शब्दांत लिहा अशी मी त्यांना विनंति केली. त्यावर त्यांनीं आपला अभिप्राय लिहून दिला. याबद्दल या गुरुवर्यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. हा कोश तयार होत असतां ज्या ग्रंथांचें मला साहाय्य झालें, त्यांचीं नांवें दिलीं आहेत. या सर्व ग्रंथकारांचा मी आभारी आहें.

मुंबई मराठी ग्रंथसंग्रहालयाचें मराठी संशोधन मंडळ या शब्द-भांडाराचें प्रकाशन करीत आहे, त्याबद्दल मंडळाचे, व मंडळाचे डिरेक्टर प्राध्यापक अ. का. प्रियोळकर यांनीं पुरस्कार लिहिल्याबद्दल त्यांचे, मी आभार मानतों. मराठी संशोधन मंडळाच्या द्वारें मुंबई सरकारच्या शिक्षणखात्यानें सहा हजार रुपये व मुंबई विश्वविद्यालयानें एक हजार रुपये कोश छापण्यासाठीं मदत म्हणून दिले. याबद्दल मुंबई सरकारचे व मुंबई विश्वविद्यालयाचे मी आभार मानतों.

ज्ञानेश्वरीचा कोश आपण आपल्या छापखान्यांत छापावा या ज्ञानेश्वरांबद्दल वाटणाऱ्या प्रेमादरानें छपाईचें काम हातीं घेऊन मौज प्रिंटिंग ब्यूरोनें आपुलकीनें हें शब्द-भांडार छापलें आहे. शब्दांच्या आंकड्यांचें किचकट काम त्यांनीं न कंटाळतां केलें, इतकेंच नव्हे तर पहिल्या कच्च्या मुद्रणापासून शेवटचा कागद यंत्रावर चढेपर्यंत ऐन वेळीं केलेले फेरफार आनंदानें केले. छपाईचें काम मौज प्रिंटिंग ब्यूरोच्या लौकिकाला साजेल असेंच सुबक झालें आहे. याकरितां मौजेचे भागवत बंधु यांचे, विशेषतः श्री. विष्णुपंत भागवत व श्री. शंकरराव दामले यांचे मी मनःपूर्वक आभार मानतों. श्री. दामले यांनीं शुद्धिपत्रहि तपासलें आहे.

सुप्रसिद्ध चित्रकार श्री. द. ग. गोडसे यांनीं माझ्या विनंतीला मान देऊन ग्रंथाचें सुंदर वेष्टन तयार करून दिलें. ज्ञानेश्वरीवरील त्यांची निष्ठा कोणत्याहि प्रकारें त्यांना मोबदला घेऊं देईना. या त्यांच्या कामाबद्दल मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

या शब्द-भांडारांतील माल धन्याचा आहे. धनी कोण आहे व त्या धन्याच्या मालाचें मोल केवढें मोठें आहे याची दखल गेलीं सहा शतकें महाराष्ट्रानें सतत घेतली आहे. तसें नसतें तर या एकाच ग्रंथाच्या इतक्या प्रती कोणीं लिहिल्या नसत्या व त्यावर इतकें वाङ्मय तयार झालें नसतें. ज्ञानेश्वरीच्या उपलब्ध हस्तलिखितांची व प्रसिद्ध झालेल्या वाङ्मयाची नुसती यादीच करून पाहा. या यादींत या शब्द-भांडाराची भर पडत आहे. ही भर टाकतांना मन साशंक होतें. 'पीकें सारस्वत गुंझां पाउलीं' अशा या महाराष्ट्रकविकुलगुरूच्या ग्रंथांत सगळींच रत्नें आहेत व तीं अमोलिक आहेत. त्यांचा

पारख करणाराची मात्र पारख होते. गीतार्थ सांगतांना **कां टिटिभु चांचुवेन्हीं। माप सूये सागरीं।** असें या आदिकवीला वाटलें, हा त्याचा विनय होता. त्याच्या ग्रंथांतील रत्नांच्या खेवणांची निवड करून अर्थ सांगण्याचें धाडस करणारा **मी नेणतु तिया परीं। प्रवर्तें एथ॥** हें मात्र खरें आहे. मग अशा नेणत्यानें हें **शब्द-भांडार** कां उघडावें? उद्देश दोन आहेत. भांडाराकरतां रत्नें निवडतांना जसा व जितका आनंद मला झाला तसा व त्याहून जास्त आनंद वाचकाला व्हावा हा एक उद्देश व या ग्रंथाचा अभ्यास उत्तरोत्तर वाढत जावा हा दुसरा. ग्रंथाच्या शेवटीं फलश्रुति ग्रंथकारानें केली आहे. या ग्रंथाची पुण्यसंपत्ति सर्वभूतीं सर्वसुखीं संपूर्ण व्हावी हाच ग्रंथकाराचा उद्देश होता. गीताशास्त्रनिर्मात्यानें सांगितलेलें गीताशास्त्र या मानवधर्मशास्त्रकारानें सर्वांकरतां, सर्वांच्या सुखाकरतां, कसें सांगितलें आहे याचा अभ्यास जितका होईल तितका थोडा वाटतो. गीतेंतील जीवनतत्त्वें सर्वांना समजतील व पटतील अशीं 'कवतिकें' काव्यांत सांगतांना ग्रंथकारानें **साहित्यसोनेयांचिया खाणी** कशा उघडल्या आहेत व मराठी भाषेंत पुढें व्यक्त झालेलें विविध साहित्य बीजरूपानें जागजागीं ग्रंथांत कसें पेरलें आहे याचा अभ्यास व्हावा तितका झालेला नाहीं. हें **शब्द-भांडार** या महाकवीच्या काव्याच्या व त्यांनीं केलेल्या गीतेवरील टीकेच्या अभ्यासाला अल्पांशानें तरी उपयोगी पडावें या उद्देशानें वाचकांच्या हातीं देत आहें.

मुंबई<br>
२६ जानेवारी १९५९

**रा. ना. वेलिंगकर**

# अभिप्राय

शिक्षणक्षेत्रांत असतांनाच या कामाकरतां फुरसत काढून आणि विशेषतः सेवानिवृत्त झाल्यावर मिळालेल्या निवान्ततेचा उपयोग करून प्रा. रा. ना. वेलिंगकर यांनीं 'ज्ञानेश्वरीचें शब्द-भांडार' हा कोश तयार करून ज्ञानेश्वरीविषयक ग्रंथांत एक अमोलिक भर घातली आहे असें म्हटलें असतां वावगें होणार नाहीं.

हंस, राजवाडे, वेंकटस्वामी, भावे प्रभृतींचे ज्ञानेश्वरीचे छापलेले व न छापलेले असे पुष्कळ शब्दकोश आहेत. पण प्रा. वेलिंगकरांच्यासारखा एवढा साक्षेपी प्रयत्न ज्ञानेश्वरीबाबत आजवर कोणीं केलेला दिसत नाहीं. एक तर ही संपूर्ण शब्दसूची (concordance) आहे. 'पैं' सारखाही शब्द न वगळतां सर्व शब्दांची यांत पुरी नोंद आहे. शब्दांचे वेगवेगळे अर्थ होत असले तर तेहि नुसते संदर्भाचे आंकडे देऊन नव्हे तर संबंधित ओव्या उद्धृत करून दिले आहेत. एवढें काम केलें असतें तरीहि ज्ञानेश्वरीचा भाषा या दृष्टीनें अभ्यास करणाऱ्याची मोठी सोय झाली असती. पण याशिवाय या कोशाचा विशेष असा आहे कीं मूळ शब्द देऊन त्यांचीं ज्ञानेश्वरींत आढळणारीं वेगवेगळीं रूपें दिलीं आहेत. शब्द देऊन नाम व विशेषण असल्यास विभक्तींचीं, क्रियापद असल्यास वेगवेगळ्या काळांचीं व लिंगांचीं रूपें दिलीं आहेत. येथेंसुद्धां नुसतीं रूपें अथवा संदर्भांचे आंकडे दिले आहेत एवढेंच नाहीं तर मुळांतील भाग जशाचा तसा उद्धृत केला आहे. यापेक्षां अभ्यासूची आणखी कोणती सोय करणें शिल्लक राहिली आहे ?

असा हा शब्दकोश तयार केल्यावर त्याला जोडलेलीं परिशिष्टेंहि ज्ञानेश्वरीच्या अभ्यासूस उपयोगी पडतील अशींच आहेत. उदाहरणार्थ, ज्ञानेश्वरांनीं श्रीकृष्णांना वेळोवेळीं लावलेलीं विशेषणें, त्यांचीं वर्णनें एकत्र केलीं आहेत. त्यायोगें ज्ञानेश्वरांना अभिप्रेत असें श्रीकृष्णचरित्र तयार करतां येईल अशी सोय केली आहे. तसेंच अर्जुन, संजय व धृतराष्ट्र यांच्या बाबतींतहि तसा प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वरींतील प्रमुख व्यक्तींचीं वर्णनें तर एकत्र केलीं आहेतच पण या कोशाचा विशेष असा आहे कीं ज्ञानेश्वरींत आढळून येणारे पशू, पक्षी व झाडें इत्यादि पदार्थांच्या याद्या तयार करून त्यांचीहि माहिती दिली आहे.

तात्पर्य, ज्ञानेश्वरीचा आपण ज्याला बाह्य भाग म्हणून म्हणूं त्याचा सर्वांगांनीं मोठा अभ्यास करून अभ्यासूंच्या समोर प्रा. वेलिंगकरांनीं ठेवला आहे.

असा कोश तयार करणें किती कष्टाचें, जिकिरीचें काम आहे, हें ज्यांनीं नुसता शब्दकोश तयार करण्याचा तरी प्रयत्न केला आहे त्यांनाच येईल. हें काम अत्यंत किचकट, वर्षानुवर्षें चालणारें असें आहे. वेगवेगळ्या शास्त्रांच्या ज्ञानाची त्याला आवश्यकता आहे. एका शब्दाचा अर्थ ठरवितांना कोण प्रयास पडतात ! अशा स्थितींत येथें शेकडों शब्दांचे अर्थ ठरविण्याचा प्रयत्न केला गेला आहे. हें करीत असतांना आपणांस तर श्रम करावे लागतातच, पण इतरांचें साहाय्य घेऊन त्यांच्याकडून अनेक बारकींसारकीं कामें करवून घ्यावीं लागतात. या सर्वांची लेखी प्रत तयार झाल्यावर ती शुद्ध छापून काढावयाची म्हणजे तर जबरदस्तच काम आहे ! सुदैवानें मौज छापखान्यासारखा छापखाना प्रा. वेलिंगकरांना मिळाला म्हणून काम इतक्या लवकर व शुद्ध स्वरूपांत होऊं शकलें.

असा ग्रंथ तयार झाला तरी तो प्रसिद्ध कोण करणार ? कारण या 'शब्द-भांडाराला' गिऱ्हाइक तें किती असणार ? त्यास शासनसंस्थेची व शिक्षणसंस्थेची मोठ्या प्रमाणांत मदत हवी. आनंदाची गोष्ट आहे कीं मुंबई सरकार व मुंबई विश्वविद्यालय यांनीं द्रव्य देऊन यांस साहाय्य केलें आहे. या साहाय्याबद्दल त्या संस्थांना धन्यवाद देणें अवश्य वाटतें.

जातांजातां वाचकांसमोर एक गोष्ट मांडणें अवश्य वाटतें. प्रा. वेलिंगकरांनीं दिलेले सर्वच

अर्थ सर्वांना पटतील असें नाहीं. पण सर्व ज्ञानेश्वरी आपणाला समजली असा कोणीं आग्रह धरूं नये. तसेंच सर्व शब्दांचे आपण केलेलेच अर्थ बरोबर आहेत असें कोणीं म्हणूं नये. प्रा. वेलिंगकरांचाहि तसा दावा नाहीं. त्यांनीं अर्थ ठरविण्याचा मोठ्या साक्षेपानें प्रयत्न केला आहे. पण ज्ञानेश्वरीची भाषा जुनी असल्यानें व त्यांत विविध भाषांतील शब्द असल्यानें कोशास पूर्णता येणें कठिणच आहे.

असें म्हणण्यास हरकत नाहीं कीं कांहीं वर्षें तरी प्रा. वेलिंगकरांनीं हें 'शब्द भांडार' ज्ञानेश्वरीच्या या क्षेत्रांतील अभ्यासाचा आधारभूत संदर्भग्रंथ म्हणून राहील. ज्ञानेश्वरीच्या अभ्यासूंनी एवढी सोय केल्याबद्दल प्रा. वेलिंगकरांना धन्यवाद देणें अवश्य आहे. ज्ञानेश्वरीचे अभ्यासू प्रा. वेलिंगकरांनीं घेतलेल्या श्रमांचें चीज करतील अशी आशा आहे.

पुणें
१० जानेवारी १९५९

शं. वा. दांडेकर

# माझें मनोगत

श्री एकनाथांनीं ज्ञानेश्वरी हा ग्रंथ शुद्ध करून महाराष्ट्रांतील भाविक जिज्ञासूंच्या पारायणांत आणून सोडल्यानंतर ग्रंथांतील कठिण शब्दांचा अर्थ सांगणारे कोश तयार करण्याची प्रथा सुरू झाली. यामुळें 'ज्ञानेश्वरी परिभाषा' या संज्ञेचे अनेक हस्तलिखित व मुद्रित कोश महाराष्ट्रामध्यें पाहायला सांपडतात. स्वतंत्र कोशांप्रमाणेंच महाराष्ट्रांत मुद्रणकला अवतरल्यापासून छापलेल्या ज्ञानेश्वरीच्या प्रतींमध्यें तळटीपांच्या रूपानें किंवा कित्येक प्रतींच्या शेवटीं या ग्रंथांतील कठिण शब्दांचे अर्थ दाखविणाऱ्या व्यवस्थेची पुष्कळ उदाहरणें नमूद करणें शक्य आहे. ज्ञानेश्वरीच्या वाचकांना अशीं उदाहरणें सहज आठवतील.

श्री. रा. ना. वेलिंगकर यांचा प्रस्तुत कोश हा फक्त कै. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं प्रकाशांत आणलेल्या ज्ञानेश्वरींतील शब्दांचा कोश असून यासारखा अनेक प्रकारें परिपूर्ण असलेला कोश निदान आज तरी दुसरा नाहीं. यांत केवळ कठिण शब्दांचा अर्थ सादर केलेला नसून त्या प्रतींतील सारे शब्द अकारानुक्रमें एकत्र केलेले आहेत. पण नुसत्या शब्दार्थांचा हा कोश नाहीं. प्रस्तुत कोशाच्या परिशिष्टांकडे दृष्टिक्षेप केल्यास त्यांत ज्ञानेश्वरांच्या प्रतिभेची आणि अवलोकनाची झेप केवढी मोठी होती व या गुणांनीं ज्ञानेश्वरांची गीताटीका कशी नटलेली आहे, इतकेंच नव्हे तर ज्ञानेश्वरकाळीं मराठी भाषा किती प्रौढावस्थेला जाऊन पोंचली होती याचाही योग्य परिचय करून देण्याला सदर परिशिष्टें उपयोगी पडणारीं आहेत. हा कोश ज्ञानेश्वरींतील शब्दांचा अर्थ तर विशद करतोच, परंतु ज्ञानेश्वरांच्या बहुविध अंतरंगसमृद्धीची देखील उत्तम प्रकारें ओळख करून देणारा आहे. श्री. वेलिंगकरांचा हा कोश म्हणजे कोशरचनेचा आदर्श म्हटल्यास अतिशयोक्ति होणार नाहीं. या कोशाच्या द्वारें त्यांनीं मराठीच्या कोश-भांडारांत बहुमोल भर टाकली आहे.

श्री. वेलिंगकर हे सरकारी महाविद्यालयांत इंग्रजी भाषा शिकविणारे प्राध्यापक असतांहि त्यांचें लक्ष ज्ञानेश्वरीसारख्या गुणानें व कालानें आद्य गणल्या जाणाऱ्या प्राचीन मराठी ग्रंथाकडे वेधलें जाण्याचा योग आल्यानंतर त्यांनीं या ग्रंथाचा अभ्यास दृढ मूलग्राही तत्परतेनें आजतागायत कित्येक वर्षें चालू ठेवला, आणि ज्ञानेश्वरांच्या शब्दांचा स्वसंतोपार्थ अर्थबोध करून घेण्यासाठीं कोशरचनेचा उद्योग आरंभला, हे श्री. वेलिंगकरांचे दोन्ही गुण ज्ञानेश्वरीच्या भक्तांनीं ध्यानांत ठेवण्याजोगे आहेत. कोशरचनेचें कार्य हें अतिशय क्लेशाचें व दीर्घकालावधीचें असतें, तसेंच तें चिकित्सक बुद्धीचेंही असतें. राजवाडेप्रतींतील शब्द चुकीचे वाटल्यास तसा निर्देश करून अर्थ सांगितले आहेत. राजवाडेप्रतींत चूक असणें शक्य नाहीं असा दुराग्रह त्यांनीं बाळगलेला नाहीं. श्री. वेलिंगकरांच्या स्वभावांतील बारीक चौकसपणाचा प्रभाव या कोशांत अनेक स्थळीं व्यक्त झालेला आहे. श्री. वेलिंगकरांनीं इंग्लंडच्या ऑक्सफर्ड विद्यापीठांत आपल्या गुरूंच्या अध्यापनपद्धतींतून जे गुण उचलून आपल्या बुद्धींत रुजविले त्यांचा त्यांनीं प्रस्तुत कोशरचनेच्या कामीं भरपूर उपयोग केलेला आहे. त्यांचें एकट्या इंग्रजी भाषेवर गाढ प्रभुत्व आहे इतकेंच नसून भारतांतील हिंदी, गुजराती व इतर कांहीं प्रांतीय भाषांचेंही त्यांना ज्ञान आहे. संस्कृत भाषेंतील त्यांची गति वाखाणण्याजोगी आहे. शिवाय ते अभ्यासजड नसून अत्यंत रसिक आहेत. कोशरचनेच्या रुक्षतेमध्यें हे त्यांच्या स्वभावाचे व बुद्धीचे गुण उठून दिसणारे नसले तरी त्या गुणांच्या अभावीं—दुसरीं सार्वजनिक सेवेचीं बहुविध कर्तव्यें संभाळून—कोशरचनेची कामगिरी त्यांच्या हातून पार पडली नसती हें विसरून चालणार नाहीं. या कोशरचनेचें श्रेय त्यांनीं वर्षानुवर्षें धीर टिकवून जे श्रम केले त्या श्रमाचें आहे. तथापि आपला कोश सिद्ध झाल्यावरही अनेकांशीं ते शब्दार्थचर्चा करीत होते. परंतु येथें हें सांगणें अवश्य आहे कीं त्यांनीं साह्यकर्ते या नात्यानें ज्यांचा निर्देश केला आहे तो बहुतांशीं त्यांच्या सौजन्याचा भाग आहे.

मुंबई
२० जानेवारी १९५९

**न. र. फाटक**

**अक्षौहिणी**—विविध सेनासमूह : हत्ती २१८७०, रथ २१८७०, घोडदळ ६५६१०, पायदळ १०९३५०, मिळून २१८७००. **क्षोणी** पहा.

**अखर**—(१) खोटें, भ्रम. ह्मणौनि स्वप्निचिया अखरा। संतोषें सीणे॥ ८·३४. **अखरें**, भ्रम, ८·२४०; **अखरें पडे** १७·३९२. (२) **अक्षर** (२) पहा. देखिला अखरांचा नि मेळावा। ७·१९४. **पांचाखरी**, पंचाक्षरी, मांत्रिक, ज्योतिषी, २·८५.

**अखोभें**—न क्षोभतां. हें गीता पढतां अखोभें। १८·१५०७. **क्षोभणें** पहा.

**अंग**—शरीर, अवयव, भाग, बाजू, प्रकार, स्वरूप. परि एकाधेनि अंगें। हीणावति जें॥ १७·३८५. **अंगनाअंग** १·४२; **अंगानील** ९·४८०; **अंगछाया** १७·४६; **अंगप्रकाश** १८·१३२१; **अंगप्रभा** ११·२३३, ११·२३६, ११·२९४, ११·४३२; **अंगसंग** ९·२६८; **अंतरंग** पहा; **अनंग** पहा; **आकाशअंग** १७·४८; **निजांग** ७·१५; **प्रत्यंग**, प्रत्येक अवयव, ६·२३२; **सांग**, यथार्थ, १७·४१०; **सांगोपांग** ९·२६५; **अंगिक** ६·११०, ११·३२२, १६·१४५, १६·२९८, १७·२२८, १८·५२१; **अंगिकभाव** १·४; **अंगी**, अंग असलेला-ली-लें, **तन्वंगी**, तरुण स्त्री, १३·४७९; **तरुणांगी** १५·८५, १८·११४१. **आंग** पहा.

**अंगण**—**आंगण** पहा.

**अगत्या**—निरुपायानें. ह्मणौनि अगत्या सेवणें घडे। ५·१२०.

**अंगना**—स्त्री. कामिकु जैसा अंगना। आपैता कीजे॥ ११·१६९. १७·२४५. **अंगनाअंग** १·४२; **पण्यांगना** ८·१४४, १३·२०४, १८·६६९.

**अगरु**—सुगंधित पदार्थ. कर्पुरु चंदनु अगरु। १·३८७.

**अगस्तिगौवण**—अगस्तीची गवसणी, कुंभ, मृत्पिंडबुद्धीचे मूढ. ९·१८२. '**अंगस्ति(स्थि)-गौवण**' असा पाठ घेतला तर, आंग, अस्थि-चर्मादि शरीर (गौवण) हेंच सर्वस्व मानणारे मूढ, असा अर्थ घेतां येईल. '**त्वगस्थिगौवण**' हा पाठ अधिक चांगला आहे.

**अगा**—अरे. ८·५८, ९·३७५, ९·५०८, १३·१०२३, १६·४६०, १८·६८४, १८·६८९, १८·९३३, १८·१२२१. **आगा** पहा.

**अगाध**—खोल, गूढ, पुष्कळ, मोठें. १·७३, २·४०, ३·२५८, ११·७३, ११·८६, ११·११९, ११·१२६, ११·३३३, ११·४८०, १२·२४०, १६·२३९, १७·३१९, १८·१६९३. **अगाधा डोहा** १३·७३७; **अगाधें पद्में** १६·४०; **अगाधें सरोवरिं** १३·२४०; **दुर्लभ आणि अगाध** ८·१०५; **अगाधपण** २·२१७.

**अगार**—अग्र, अंकुर. जन्म वीर अगारीं। वाढनी नि असे॥ १५·१७१. १५·९१. **आगार** पहा.

**अंगार**—विस्तव, स्फुलिंग. **अंगारकण** १३·१०५७; **खदिरांगार** ९·१४८, १६·३७१.

**अंगिकरणें**—स्वीकार करणें. मी निजप्रकृतिनें अंगिकरीं। ९·११६. ४·१९६, १०·८. **अंगिकारणें**, तैसा नव्हीं मी अंगिकारिलों। १·६५, १२·२८; **अज्ञानांगिकारें** १४·१४२; **अंगीकारु करिति** १५·२४.

**अंगुल**—बोट. ६·१९६. **बारा अंगुलें** ६·२३६. **आंगुल** पहा.

**अग्र**—टोंक, पुढचा भाग. **एकाग्र** ६·१८६; **गुणाग्र**, वातीचें टोंक, १८·१६३९; **जिव्हाग्र** ११·४२८; **नखाग्र** १·२५५; **नासाग्रपीठ**, नाकाच्या अग्राचें स्थान, ६·२०४; **समग्र** ७·१७१, ९·४०५; **अग्रवण**, फांदीची कोंवळी हिरी, १५·१५७; **बुडिं...अग्रिं** १५·१९६.

**अग्रहार**—नजराणा, इनामी जमीन, देणगी. मग वर्णी माझि छत्रचामर। स्वर्ग जयानें अग्रहार। ९·४७१. वापी कूप आराम। अग्रहारें दान ग्राम। १८·९८. **अग्राहार** १६·२०५; **अग्रार** १७·३३७.

**अचर**—**चरणें** पहा.

**अचल**—स्थिर, पर्वत. अचळ हा आत्मा। २·१५०. अचलु मी अचलु। १८·११८८. २·३३७, ४·९६. **अर्जुनाचल** २·७९; **अहंकाराचल** ५·१३१; **उदयाचल** १८·१५२२; **ऐक्याचल** ६·३९८; **कुलाचल** १८·१७५५; **निगमाचल** १७·२२०; **निगमरत्नाचल** १८·३५; **ब्रह्माचल** ७·६७; **मंदराचल** १०·१७८, ११·२५३, ११·४७९, १३·४९६, १७·२२५; **योगाचल** ६·५४; **लोकाचल** ८·१५२; **हिमाचल** १४·३८२.

**अंचल**—पदर. **पुलकांचल**, रोमांच, ११·२४२.

**अचाट**—मोठें, अफाट, विलक्षण. ते दोन्ही शब्द अचाट। मीनले एकावट। १·१४७. माझि कैसा ऐसीं अचाटें। १०·२६८. १४·२३०, १५·१५३, १५·१९०, १८·३६६, १८·१३६५, १८·१५२४.

**अज**—जन्मास न येणारा. १८·११८७. **अजत्व** ४·४९, १०·७३; **अजुही**, अजन्मा असूनही, ४·४३.

**अंजन**—काजळ, गुप्त धन दिसण्यासाठीं डोळ्यांत घालण्याचें काजळ. जैसें डोलेयां अंजन भेटे। तेव्हलि दृष्टीसि पाटा फुटे। १·२३. जेविं पातालिंचें धन। दावी फिर अंजन। १५·३४. ४·१५८, १६·८७, १८·५८४, १८·१३२१. **दिव्यांजन** ६·४५६, १८·९००; **अंजनवर्ण**, काळें, ११·१३४.

**अंजलि**—ओंजळ. **पुण्यांजलि** १५·२ (२); **अंजुलि**, परि शांताद्भुत बरवें। जेथ डोलेयांचा अंजुलिं घेयावें। ११·४; **आंजुलि-ली** ७·१८०, ११·६६९, ११·६९८, १५·२ (१); **तिलांजुली** ८·१२२.

**अजा**—बकरी. ३·१४२, १३·१००९.

**अजात**—स्वयंभू, कोणाचाही नसलेला. **अजातशतृतरुवर**, कोणाचें वैर नसलेला मोठा वृक्ष, १३·२२८; **अजातपक्ष**, पंख न फुटलेला, ९·३३५, ११·६२४.

**अज्ञान**—ज्ञान पहा.

**अझुइं**—अजूनही. परि अझुइंवरि त्रास नुपजे। १·२६१. तूं अझुइं हित। विचारि पां। २·२२. २·१८०, १३·१६. **अझुनि** ११·१०५; **आझुइं** २·१७, ६·१५३, १३·११४२, १४·४०, १८·२९१; **आझुई** १३·६८; **आझूं** ७·७९, ९·४७७, ११·६२१; **आझइं** ११·१५४.

**अटक**—प्रतिबंध, अडथळा. बोला बुद्धी ही अटक। १८·१४११. १३·११६१.

**अटवी**—रान. अटवियें माझि जैसा। वन्हि रिगतां सहसा। १८·१५२१. **पातकांची अटवी** ७·१६८. **अडव** पहा.

**अटाटा**—धांदल, गडबड. **प्रथमदर्शेचिये अटाटे** माझि १०·२६८.

**अड**—आड, विहीर. १३·७८२.

**अडणें**—अटकाव होणें, बद्ध होणें. जो मूलबंधें अडला। ६·२१४. जें इंद्रियांचीं दारें अडी। १३·१६९. जीवत्वदुर्गीं अडिला। १७·२. ६·४००, ९·११, १३·६१६. **अडौनि ठेलें** १८·४१६; **अडलेपणें** ८·१२६.

**अडचणें**—अडचणींत सांपडणें, कुंठित होणें. आणि सुखाचिया आर्त्ती। अडाचिजेना।। २·२९४.

**अडदरणें**—धाक, भय दाखवणें, हादरणें. आकाश असे अडदरत। १·१५६. **अडदर**, धाक, २·३३९, १६·३१४; **आडदर** १·१०७.

**अडव**—(१) अडथळा, रान. कां सुपंथु जाणौनि अडविं। रिगत असे।। ८·२३८. तरि वाघाचिये अडवे। येक्रोल चरौनि आला दैवें। १३·७६२. ७·१६६, १३·६३, १३·२०५, १३·६७६, १६·४०६, १७·३४२, १७·३५६, १८·७७६, १८·१०५०. **संसारअडव** १८·१२१५; **आडव**, **जीविताचां आडवीं** १६·३४, **आडवें लंघी** १५·३२७. (२) आडवें, अडविणारें. सेवंतिये अडव आंग। १८·१८५. **आडव**, रुंद, पसरलेलें, जैसा आडवेन आंगें फांके। २·३०६.

**अडवंताव**—अडथळा. आणि राजा जिया वाटा जाए। तें चोरांसि अडवंतावो होये। १८·७२१.

**अडिनांव**—अयथार्थ नांव, आडनांव. अस्तमानाचें जेयासि। अडिनांव हीं नाहीं।। ८·८९. तेया अडिनांव पुरुषु। एन्हविं स्त्री ना नपुंसकु। १३·९७६. १८·५७७.

**अढंच**—वरचें, थोर. ऐसें नाममात्रें जेणें। धात्रेया अढंच करणें। १७·३३८. **अढंचें** ६·२०५.

**अणगट**—मूळ, अंकुर. १५·१४८, १५·१८९. **ब्रह्मेशान्तअणगटिं** १५·१९७.

**अणि**—टोंक, अंकुर. १५·९२. **नाराजांचियां अणियां** १७·४२२; **रोमेचिया अणियां** ६·२६४. **आणि** पहा.

**अणिमा**—आठ सिद्धींपैकीं सूक्ष्म होण्याची सिद्धि. **अणिमादिक** ६·२९७; **अणिमादिकी दासी** १८·१६२०.

**अणु**—सूक्ष्म कण, रजःकण. १६·३२९. **अणुआर**, बारीक कण, चुरा, १८·३६; **अणुमाणियां**, अणुइतक्या बारीक, ६·२६४; **अणणू** (अन्+अणु),

अणुइतकाही नसणारा, १८·११९१.

**अणुसट**—अनुच्छिष्ट, ज्यांचा अर्थ कळत नाहीं अशीं. ७·१९२.

**अतप**—प्रखर ऊन, ताप. ६·१७५. **आताप** पहा.

**अंत**—(१) शेवट, मरण, नाश. नाहिं अंतु माझेया विस्तारा। १०·१९६. १·१५९, ७·३९, ८·११८, ९·९९, ११·३३७, १५·२९, १५·२१९, १५·२२०, १५·२२१, १५·२५५. **आंतीं**, शेवटीं, ८·२०६; **अंतक**, यम, १·१५०, (अंतकु) ११·४३६; **अंतकाल** ८·६७; **अंतवंत** २·१५२, ७·१४३, १३·११२७; **अंतिचीया मती**, मरणकाळीं झालेली इच्छा, ९·४१३; **अत्यंतणें** पहा; **अध्यायांतश्लोक** १६·४९; **अनंत** ११·२६९; **अनंतकाल**, **काल** पहा; **आजन्ममरणांतीं** १४·१४५; **ऊर्ध्वमूलांतीं** १८·१४३९; **एकांत**, **येकांत**, **एक** पहा; **ककारांत** १२·५२; **कलियुगांत**, **युग** पहा; **कल्पांत**, **कल्प** पहा; **कृतांत** पहा; **ग्रीष्मांत** ८·१६०, १४·१६८; **जन्मांत** १३·५४२; **दिगंत**, **दिक्** पहा; **देहांत** २·३६८, ८·१३२, ८·१३५, ८·२११, ८·२३१, ८·२४१, ८·२४४, १३·४२९; **पृष्टांत** ६·१९७; **प्रलयांत**, **प्रलय** पहा; **युगांत**, **युग** पहा; **वरिषांत** १४·३०४; **वर्षांत** १४·१९६; **शिखांत** १·२५५; **सस्यांत**, कापणीनंतर, १४·३४९; **स्थावरांत** १३·१५९; **आदि... अंत**, **आद्यंत**, **साद्यंत**, —**आदि** पहा. (२) आंत. ७·७०.

**अंतर्**—आंतील, अंतःकरण. **अंतरंग** पहा; **अंतरात्मा** ११·३६४; **अंतर्ज्योति** ६·२५४.

**अंतर**—(१) अंतःकरण. अमृताची धार। तैसें उजू अंतर। १३·३६६. तें आइक हो अंतरें। जिवाचेनि जीवें॥ १८·७६७. ११·३६, १३·११५, १३·२९६, १३·३९१, १३·४०२, १३·४६५, १३·४७१, १३·४७२, १३·५०८, १३·६९१, १३·१०३०, १३·११२८, १३·११४३, १४·२४४, १४·३०९, १५·२६९, १६·४२५ (२), १६·४३६, १७·११५, १८·७३४, १८·१२९०, १८·१३२९. **अंतरबाह्य** १३·४७३; **बाह्यांतर**, आंत व बाहेर, १८·१३४४; **अभ्यंतर** १३·३८४. (२) भेद, फरक. बाहीरि नांवाची चि अंतरें। ९·४०७. एथां दोहिंचें अंतर। १३·११२४. १३·११२९. **अपटांतरीं**, प्रत्यक्ष, १६·४२५ (१). (३) इतर, दुसरें. **अर्थांतर** ९·७४; **अवस्थांतर** १३·१३५; **एकांतर** १७·२६१; **क्रियांतर** १२·९०; **गत्यंतर** ९·४८४; **गुणां तराये** (**गुणांतरा ये** असा पाठ घ्यावा) १३·९६७; **जन्मांतर**, **जन्मणें** पहा; **ठाणांतर** १३·५०६, —**रिया** १६·३३८; **देवतांतर**, **देवता** पहा; **देहांतर** १५·९१; **नगरांतर** १·४१; **नाद्वांतर** १५·३८४; **पदांतर** १५·१५७; **फलांतर** १८·२५२; **भेदांतर** १८·१०९३; **मतांतर** १३·२१७, १३·२४०; **मन्वंतर** १५·१२७; **मिषांतर** १८·१३६८; **मुखांतर** १८·२८०; **रसांतर**, **रस** पहा; **वासनांतर** ४·१३४, ५·१५४; **विकारांतर** ७·१०३; **शरीरांतर** २·११०; **शास्त्रांतर** ६·५२; **स्वर्गांतर** १०·२३०. (४) स्थलावकाश दाखविणारा शब्द. **आधंतर**, मध्येंच, ७·१९५; **निरंतर**, **पुढें** पहा; **हस्तांतर**, हातभर अंतरावर, १८·११२२.

**अंतरंग**—अंतःकरण, अंतर्मुख, जिवलग. तर्‍हीं काय आथिलांहूनि अंतरंगु। ११·३२. १७·३८२, १८·१०७, १८·१७२८.

**अंतरणें**—दूर होणें. तरि मोक्षगुरवाड्। अंतरला॥ १८·९२२. २·२७.

**अंतराऊ**—अडथळा, वियोग. १·२३४, २·२९१.

**अंतराल**—पोकळी, आकाश. कां भूमि दिशा अंतराळ। ११·२६७. ११·२९७, ११·३५४, ११·६२४, १२·१११, १६·१६७, १६·३६२, १८·१५२२. **पृथिवी हान अंतराळ** ११·३१०.

**अंतरिक्ष**—आकाश. १३·५५.

**अंतःकरण**—हृदय, चित्त, मन. ४·१६६, ५·२०, १३·७००. **बुद्धि इंद्रियें अंतःकरण** १३·९६१; **अंतष्करण**, साद हि अंतष्करणें। धरवे चि ना॥ १२·५७७, तरि बुद्धि आणि मन। चित्त अहंकार हान। हें चतुर्विध चिन्ह। अंतष्करणाचें॥ १८·४०५, १·१८९, २·१११, २·२५८, २·२९२, २·३४२, ३·५९, ३·२०४, ६·६४, ६·७४, ६·१४२, ६·३९३, ८·५, ८·९,

**उजरी**—तेज, उत्कर्ष, स्पष्टपणा, सरळपणा. उन्मेखु लाहे उजरि । १५·१०, माझ्या ज्ञानांत भर पडेल. **वालभाचिया उजरिया,** आपल्या प्रियकराच्या उत्कर्षासाठीं, १६·३७५; **साम्याची उजरी होए** ६·९७; **उजरिया होमीति** १६·३८६; **उजिरी**— तैसी आहारानिद्रेची उजिरी । रोग निवांत जंव वेऱ्हीं ॥ १३·७६६; **अनुभवाची उजिरी** ६·१९०; **आग्रहाचिया उजिरिया,** १७·९७, आग्रह पहा; **उपायाची उजिरी** १८·१३७३; **ज्ञानाची**– १८·९९०, **प्रभेची**– १४·३८८, **प्रमेयाची**– १८·५४, **प्राणायामाची**– १८·३३४, **बलाची**– १८·४२३, **मूलडाहालांची**– १५·२१५. **उजिरी नोहे विखम पडे,** अशा भक्तीचा उत्कर्ष न होतां बाध येतो, ९·३४१; **उजिरी पांति लाभली** १५·५५७; **कलशें उजिरी होये,** अठराव्या अध्यायाच्या कळसामुळें पूर्णता येते, १८·४३; **राहाटिची उजिरी पडे** १७·२१२.

**उजलणें**—प्रकाशित होणें, करणें, उदयास येणें, पेटवणें. जैसें त्रैलोक्य दीसे उजललें । १·३९. उजळूं दिव्यतेजा हाथेवा । १६·२३.१५·२७६, १५·३३७, १८·१२१. **उजलिजति,** पेटवले जातात, १३·४३२; **आरती उजळूनि** १६·२०८; **रत्न आरिसा उजली** १३·४६४; **गुरुकृपा उखा उजलली** ७·१२८; **ग्रंथार्थुदीप उजालिं** ५·१४१; **ज्ञानें उजलला** १३·४६२; **वागतृता उजल्ली** १४·६३; **विवेकुदीपु उजलीं** ४·५३; **आत्मबोधु नुजले** १५·४७५. **उजल**—तेजें सूर्यु तेसं उजल । ९·२०३, १·६, १८·१७०५; **आंगें उजलु** १६·१७०; **गद्गद नां उजल** ८·२२७; **उजलिता,** प्रकाशविणारा, १८·१४६१; **उजाळ** ११·२०९, ११·२९८, १३·१७३; **कुळाचा उजालु** १६·३५६; **रविं उजालु** १८·११७८; **सहोजलें,** साहजिकपणेंच लखलखीत, ११·१३४.

**उजितें**—तेजोवलय, आगीचा भडका. पेटलें प्रलयाग्निचें उजितें । ११·३०७. **उजितीं आबुथिलीं** ११·३३७.

**उजियड**—उजेड, प्रकाश. उजियडा आंधारेया । जो पाडु मृता उभेया । १३·२०१५. ९·१३२. **उजियडलेपणें** ७·११४. **उजियेड**— घरिंचिया उजियेड करावा । पारखेया आंधारु होआवा । १२·१४७, १३·९२३; **उल्हाटशक्तिचेनि उजियेडें** ९·२१३; **निवृत्तिकृपाउजियेडें** ६·३२.

**उजिवडणें**—प्रकाश पडणें, प्रकाशित होणें. आणि ऐक्यतेजें उजिवडेल । त्रैलोक्य हें ॥ ६·३८३. १३·१०७७. **उजिवड**—उजिवडें, प्रकाशानें, १८·११०९, **उजीवडें** ४·१६७.

**उजु**—सरळ. आणिमां तरि अंगें । उजु नि असमि ॥ १७·४. **उजुकार** ६·१५५, १८·८४०; **उजू**— उजू आडव नें माणिनें । लोभु नी ॥ १५·२२, लोभ सरळमार्गानें जाणाऱ्या आयुष्याचा नाश करतो. १·२४६, ७·१६८, १७·३८; **उजू अंतर,** सरळ अंतःकरण, १३·३६६; **उजू मार्ग** ८·२२०; **उजू वस्तू** १३·१०५६ (२); **उजू वाट** ७·१२५, ८·१९३, ८·२३९, १८·९३३; **उजू अव्हांटा** ८·२३६, १२·१२१; **उजू अव्हांटनि** ८·२३९; **उजू असतां पाटिमोरें** १३·८९२; **वांकुडें व उजू यांचा विरोध दाखविणारें,** १३·८९२, १३·१०५६ (१), १५·३०६, १८·८३९; **चिपायें उजू होए** १८·६६. **ऊर्ध्वा उजू**—ऊर्ध्वा पहा.

**उज्जीवन**—नवचैतन्य, वाढ. जें उज्जीवन जालें । ज्ञानाशीं ॥ ८·१३१. **हूगें बुद्धी उज्जीवन नव्हे** २·६८.

**उटकणें**—दूर करणें, उच्चाटण करणें. आंगींचा उटकलें । १४·३६०.

**उटणें**—लेप लावणें, चोळून स्वच्छ करणें. श्रीमत्‌ारेकेआंगींपुरें उटिला । ११·२१८. १८·१०२६. **आरिसा उटिजे** १८·३९५,—**उटूनि** १८·११३३, **आरिसे उटूनि** १८·१५८०; **उटणें,** आंगीं उटणें । आवरणें ॥ १०·१०; **ऊटणें** पहा.

**उठणें**—उभें राहणें, उद्भवणें, फुटणें, उत्पन्न होणें, तयार होणें, उत्सुक होणें. पढीन पनाऱ्हे । नानावर्णी ॥ ८·१०. जैसा गंगेचा अवतारूनि आंठला । ११·४२३. २·१८, २·२२१, ४·३६, ४·२०७, ५·१३१, ६·१६४, ६·२२७, ८·७७, ९·२७५, ११·४०, ११·३८५, ११·३९८, ११·४४१, ११·४७२, १२·१८, १३·११३, १३·१२०, १३·१२३, १३·२४४, १४·९९, १४·१२९, १४·१८०, १४·२००, १४·२३०, १४·३००, १५·९१, १५·१२५, १५·१४७,

१५·३०२, १५·३०४, १५·४८१, १५·४९९, १६·१९२, १६·२३६, १६·२४५, १७·६५, १७·१५०, १७·२३३, १८·४९, १८·९४, १८·२४३, १८·२५१, १८·३२५, १८·३६८, १८·४२६, १८·४३८, १८·४५४, १८·४५७, १८·४८५,१८·६२१, १८·७७९, १८·१५५०. **उठणें** १२·२, १५·२३६; **उठावें** १४·१८२; **उठितसे** १८·१३०६; **उठिलेनि** १५·२३३; **उठिलेयां** १८·७३४; **उठिलेपणें** १३·१२४; **उठूनियां** १८·४९८; **उठिति पडति** १५·१३०; **अंकुरीं उठी** १३·१०४८; **अहंकारा उठूं नेदूनि** १६·६९; **अंतरीं उठीति** १६·४२५; **आत्मप्रथा उठितिया** १८·१०९२; **उमाले उठिति,** कोंब फुटतात, १५·१२३; **क्रिया जे उठी** १३·१२०, १८·१७३; **गंधानीळीं नीलोत्पलीं उठिलीं,** (मदाच्या) गंधवायूनें दरवळलेल्या कमळांनीं, १७·६; **टके उठिति,** शेंडे फुटतात, १५·१८६; **डाहाळिया उठिति** १५·१८८; **देखणें जें जें उठी** १४·८४; **पांति उठी,** पंगत तयार होते, ८·१५३; **बैसला उठूं न शके,** आळस करतो, १८·५९४; **मती उठिती जाली** १०·३०६; **मनौनि उठी,** मनांतून उद्भवते, १३·२९८; **वस्तु होउनि उठी** १८·९८५; **वेगां उठिं उठिं** ११·४६३; **श्रद्धे जें उठिलें असे** १७·७३; **संवादफळेंसिं उठिलें** १०·१४७; **हांवे उठूं नेदावें** १७·२७६; **उठाउठी,** घाईनें, जलद, १८·१५२०; **उठाउठी पाये देंत,** जलद वर जाते, ६·३०३, योगांतील हा कुंडलिनीचा मार्ग ६·३०१ ते ६·३०५ मध्यें सांगितला आहे; **उठाउठी शून्य घेंति,** लगेच आपण स्वतः शून्यरूप होतात, १२·५८; **नुठिं ह्मणसि,** युद्धास तयार होणार नाहीं असें म्हणशील तर, १८·१२८१; **कंदर्पें शुकें नुठिजे** १६·१२६; **नुठिति** १८·९३; **नुठी** ३·२६७, १६·७७. **उठवणें**—**तीर्थें ठाया-वरौनि उठविलीं,** तीर्थांचें महत्त्व मानलें नाहीं, ९·१९७; **मनातें उठवी,** मनास चालना देतें, १३·९६५; **उठविलेयां,** जागें केलें असतां, १३·२४२; **उठिविजसी** १८·१२८१; **ऊठणें** पहा.

**उठावणें**—चाल करून जाणें, हल्ला करणें. कालरात्रीचीं कटकें। उठावलीं जैसीं ॥ ११·१९६. **एकावट उठावलें** १·८९; **सरिसेपणें उठावले** १·१६५; **उठावती** १२·६२.

**उठावा**—वर आलेला भाग, विस्तार. **संसारतरुचा उठावा** १५·२००.

**उडणें**—आकाशांत जाणें, हवेंत वर जाणें. हें विषाचें आगी पडे। तरि भस्म होनि उडे। १३·१०९९. २·१३०, १३·७०४. **उडत दीसति** ११·१४९; **उडैल** १३·२६५; **उडों ये** ७·१५१; **उडौनि जाये** ११·६२४; **उडवा,** बारीक कण उडून जमलेला ढीग, **कोलिसेयाचा उडवा** १८·७२२. **उडी**—**उडी घातली** १·२६७, **—न घलवे** १३·५१४; **उडाण,** **उड्डाण,** झेंप; **येकें चि उडाणें** १०·२३०; **नुडावें** ६·७६; **नुडे**—**गगनीं नुडे** १८·१६९१, **बैसली नुडे** १३·७८१; **उडावणें**—उडवून देणें, काढून टाकणें. **आंगावरिलें उडावीं** १३·२८२.

**उंडी**—घांस, गोळा, आमिष, बळी. जैसें मीनाचां तोंडीं। पडे ना जंव उंडी। १४·१४६. नवसिये देंत उंडी। बाळकांची ॥ १७·९६. **लोणियांची उंडी** १३·१०९८; **उंडी गीळी** १३·७३८; **उंडी घाली** १८·७३६.

**उणखुण**—इच्छा, संकेत. तैसी पाली उणखुण। क्रियेची जो ॥ १३·७९९.

**उणा-णी-णें**—(१) कमी, अयोग्य, दोष. आथिलेपण मिरवी तें चि उणें। ९·३६४. दोष या अर्थी : परि तें तुमचें उणें न बोलावें। ११·१६०. ११·१५६, ११·४५३, १६·२१, १६·३५६, १७·३८६, १८·१७१९, १८·१७५२. **उणेनि सुधाकरु उमचला,** चंद्र (ग्रहणादि) कमीपणांतून मुक्त झालेला पाहून, १८·१५६१; **मारें उणें कालकूट,** मारकपणांत कालकूट सुद्धां कमी पडेल, १७·१३८. **उणा पुरा** १३·१११३, **उणें का पुरें** १३·७१३, **उणेया पुरेयाचें** १२·११९, **—पुरेयां** १३·५३५, **उणेयापुरेया-चिया** १७·४०५; **पुरें उणें** १८·१७४५; **उणी नोहे,** कमी नाहीं, १६·२५४, **—हो न ये,** कमी पडूं देत नाहीं, १३·७९३; **उणीं नव्हति** १८·१७१९; **उणें आणणें**—**उणें न आणिती** १८·१७१६, **—आणिलें** ९·४४६, **—आणी** १३·१६८, **कवण उणें आलें,** काय

कमी पडलें १, २·७; उणें न पडे १३·६०१; उणें फेडावेया १८·१४४९, —फेडूनियां १६·१४८; उणें यंतसे, कमीपणा येतो, १८·१६२९; उणें वाहे, वैर मनांत धरतो, १३·५३६. उणाव तरि उणावो साह्याजें उपसाहला । प्राधुं काइ ॥ १·६५. उणिवे १५·४८३, उणीव ११·२७६, १८·९६४, जें उणीवांसि ठाके उभें । १८·१७४९, जें कमी पडत असेल. उणेपण ११·४२२, १८·१०८१. (२) तितका कमीपणा ठेवून, त्या शिवाय. ज्ञाना उणें १५·४८९; निम्न भरलेयां उणें, खोलगट भाग भरल्याखेरीज, १६·१५७; रांधितिए उणे (णें), रांधण्याचे श्रम घेतल्या शिवाय, १८·१४१; राबाउणें (राबा उणें) मेहनत केल्याशिवाय १८·९४; रोविलेयां उणें १३·६८९; वाती उणं, दिव्या शिवाय, ९·२९९; सीगलेयां हिं उणें १८·९४०. ऊणें, पहा.

**उत्**—वर, उंच, बाहेर, श्रेष्ठ या अर्थीः शब्दास जोडून.

**उतणें**—(१) गर्वानें फुगणें, उकळून वर येणें, उसळणें. जेव्हांलि उतत होंति दायाद । ११·४७५. जैसें उतलें आगी पडे । परि होमीं न लगे ॥ १८·१९१, उतास येऊन आगींत पडलेलें द्रव्य होम केल्याचें श्रेय देत नाहीं. प्रतीतिरसाचा भाञ्ज उते ७·१३३; दर्पसागरु उते १६·३९१; सागर उततांती १६·३७१. (२) धातु ओतून मूर्ति वगैरे तयार करणें. ते पेयाची आंठ उतली । ८·६३.

**उतटणें**—ताण वसून उसवणें, उकलणें. मग (मग) सिवणि जैसी उतटे । शुक्तिपल्लवांची ॥ ६·२६६.

**उतरडी**—खालीं मोठी, वर त्यापेक्षां लहान वस्तु ठेवून केलेली निमुळती रचना. मनोरथांचिया उतरडी । उतरी रची ॥ १३·११४, लहान मोठे मनोरथ मनांत आणतो (रची) व पुनः बदलतो (उतरी).

**उतरणें**—वरून खालीं येणें, ओलांडून पलीकडे जाणें, योग्य वाटणें, ओवाळून टाकणें. उतरलें उदक पर्वतु वलघे । १०·६८. द्वैताचां पैली तीरीं (रीं) । उतरों सरला ॥ १२·१८५. ९·२२४, ९·३२५. कर्में उतरला, कर्मांतून पार पडला, ९·४१९; कसीं उतरली १८·९०८; ग्रंथसागरु उतरौनि १८·१७५९; पाउटीं उतरनु १६·२६०; बाहिं उतरलां ११·६४८, १३·१८६, बाहीं उतरौनि १०·१६२; भांडारें उतरलीं, आणून रचलीं, ११·१६४; महानदी हे माया उतरौनियां ७·६६; रसोपत्र...आपण हिं उतरे, औषधाच्या परिणाम रोगनिवारणानंतर आपोआप नाहींसा होतो, १८·१०७३; लोण उतरिजे ९·३७७; उतरी रची, उतरवतो, रचतो १३·११४; उतरणं, मायानदींचें उतरणें ७·८९; तुनरणं, महत्त्वा वरौनि तुतरे १३·६५६; मशका सिंधु तुतरवे १३·२५९.

**उतराई**—केलेल्या उपकाराच्या आणिगतें फेड करण्याची इच्छा करणारा. उतराई होउनियां १५·५५२; उतरायिया होइजे, ऋणमुक्त व्हावें, १७·२७५.

**उतल**—उथळ. थोल्ह उतल्ह १८·१६५७.

**उताणा**—वर तोंड करून, गर्वानें फुगून. [illegible] । [illegible] ॥ १३·७१४.

**उतान्ही**—फार तहान, तीव्र इच्छा. मुनीश्वरां उतान्ही १३·१६६; उतान्ही वाढविजे १७·१६२, —वाढविनु असे १३·११४२.

**उतार**—पलीकडे जातां येईल असा उथळ प्रवाह. उतारालेनें [illegible] । [illegible] ॥ १८·२५३. ऐक्याचिये उतारां ७·९६; पायें उतारा ५·१६४.

**उत्कट**—अतिशयित, भरपूर. आपत्त्याउत्कटें १४·१००.

**उत्कंठा**—उत्सुकता. १२·२३१, १८·९४८. उत्कंठा भंगों नेदीं १४·२६; उत्कंठा वाहे २·१४७; उत्कंठें ११·११४; उत्कंठानिर्भर ११·६७०; ग्रंथउत्कंठा १३·६३२.

**उत्कलिन**—कलह, युद्ध. [illegible] । १८·१६०८.

**उत्तम**—अतिशय चांगलें, श्रेष्ठ लोक. [illegible] उत्तम । १·४९. उत्तम [illegible] । १·२४९. ४·१७७, १५·४९७, १६·१५०, १८·११२६. उत्तम कुल ९·४३७, उत्तमें कुलिंविया १·१८६; उत्तमु पुरुखु, —पुरुषु, पुरुख, पुरुष पहा. उत्तमें पुण्यें १०·१५०, उत्तमीं प्रसंसिजे २·२७२, उत्तमाचें उत्तम ९·४८; उत्तम

**अधम** १८·१४५४; **उत्तमासि मस्तक खालविजे** १२·२१३; **उत्तमांगिं**, मस्तकांपैकीं, ११·४१३; **उत्तमातें अधमातें** १२·१४४, **उत्तमाधम** १६·१५४, **उत्तमाधमभेदाचें** १०·१०४; **उत्तमहीन**, बरा वाईट, १६·१४२; **उत्तममध्यमनिकृष्ट** १८·६९४; **अधमोत्तम** ४·६९, ६·९६, १३·८७, १३·१०१४; **अधमोत्तमप्रकाशा माझि** २·२९७; **क्षराक्षरोत्तम** १५·५२४; **देवदेवोत्तम**, श्रीकृष्णास उद्देशून, ३·२८; **द्विजोत्तम** १७·२८८; **धीरोत्तम** १७·३३३; **पुरुषोत्तम**, पुरुष पहा; **प्रियोत्तम**, प्रिय पहा; **वीरोत्तम**, वीर पहा; **सर्वोत्तम** सर्व पहा; **उत्तमत्व** ९·२२२, ९·४५१.

**उत्तर**—(१) जबाब, शब्द, वाक्य. **उत्तर घे** १३·७६१; **येकां दों उत्तरांसवें** ११·३९; **प्रत्युत्तरें** ९·७७, १८·७३; **प्रतिज्ञोत्तर** ९·१; **प्रश्णोत्तर** १८·१५७८. (२) पुढें, नंतर. **उत्तरीं बोलें** ११·२५०; **उत्तरखंड** १०·३९; **उत्तरोत्तर**, क्रमाक्रमानें, ४·१९०, १५·१९६. (३) मागचें. **टांकेचेन उत्तरभागें**, टांचेच्या मागच्या भागानें, ६·१९६. (४) चार दिशांपैकीं एक. **उत्तराभिमुख** ८·९१; **उत्तरायण** ८·२१८, ८·२२२; **दक्षिणोत्तर**, दक्षिण पहा. (५) श्रेष्ठ. **लोकोत्तर प्रौढु** १७·४७. (६) विराटपुत्र. ११·४६४. **उत्तरणें** पहा.

**उत्तरणें**—(१) उतरणें. समाधि पैलाडि उत्तरे। ६·१९१. **उत्तरवेंठ**, उतारपेठ, बंदर, १७·२७३. (२) पलीकडे जाणें. **उत्तीर्ण**, पलीकडे गेलेला, तें(ते)थ उत्तीर्ण होये प्राणें। १·२०२; **उत्तीर्णत्वा लागि** ८·१२९; **शतमखोत्तीर्णकरा हातीं**, शंभर यज्ञ केलेल्या इंद्राच्या हातीं, १०·२२०.

**उत्पत्ति**—जन्म, उद्भव. **उत्पत्ति...स्थितिप्रलयो** ११·४९१ (१); **उत्पत्ति प्रलयो** १३·९९०, **उत्पत्तिप्रलयो** ११·४९१ (२); **उत्पत्तिस्थिति** ११·४९२;

**उत्पन्न**—उत्पन्न झालेलें, तयार झालेलें. १६·५६.

**उत्पवन**—हवेंत उडणें. **उत्पवनासरिसा**, ज्ञानदेवींत 'उत्प्लवनासरिसा' असा पाठ आहे, ३·४१.

**उत्पाटणें**—उपटून टाकणें. जे एवडें झाड उत्पाटी। ऐसें काइ असे ॥ १५·२०८.

**उत्प्रेक्षा**—कल्पना, दृष्टांतादाखल योजलेला भाषेंतील एक अलंकार. आइकिलेयां उत्प्रेक्षे सल चढे। १०·२४८, उत्प्रेक्षा बळावते.

**उत्संकु**—**उत्संकु खलु** हा अपपाठ असावा. **उत्संखलु** किंवा **उत्संकलु** असा पाठ घ्यावा. ज्ञानदेवींत 'उत्संखळु' असा पाठ आहे. अर्थ उच्छृंखल उघड आहे. १७·१९०. **उच्छंकल** पहा.

**उत्संग**—मांडी. संतोषा उत्संगिं। घर दीन्हले (लें)॥ १२·१५०, संतोषाला आश्रय दिला. ११·१०३; १३·३९५. **दीठिचां उत्संगीं** ९·४७३.

**उत्सर्ग**—बाहेर टाकणें. १३·११९.

**उत्साव**—उत्सव, उत्साहानें केलेला समारंभ. १८·७९२. **उत्साह**, तंव अधिकाअधिक। उत्साहो धरी आगलिक। १८·६३८; **भवविजयाचा उत्साहो** १८·१०६०; **उत्साहाचेनि अवतरणें**, उत्साह आल्यानें, १४·४१०; **उत्साहें** १६·२३०.

**उत्सुक**—उत्कंठित, आतुर. **उत्सुक बोलणें** ६·१६२. **औत्सुक्य** पहा.

**उदक**—पाणी. जरि उदकें उदकीं बुडीजे। २·३३६. कल्पांतिं उदक उदकें। रुंधलेयां वाहो ठाके। १८·११६०. उदका एका परौतें। तरंग नाहिं चि हें निरुतें। १८·११८४. २·३०५, ६·४२, ६·२७०, ७·५९ (१, २), ८·६४ (१, २), ८·१७५, ८·२४७ (१, २), ९·२२३, ९·३४९, १०·६८, १०·७६, १२·२०४, १३·४३१, १३·८८८ (१,२), १४·९४, १५·३१६ (१), १७·११६, १८·२६९, १८·३०७, १८·५५६, १८·७८३, १८·९८० (१,२). **उदकाचेनि आयुष्यें** ६·३९६; **उदकाचेनि चि आवेसें** ७·५७; **उदकाचेन बलें** २·३०६; **उदकाचिये भूमिके**, ओलसर जमिनीवर, १७·२७९; **उदकाचें सांकडें नव्हैल**, पाण्याची कमतरता होणार नाहीं, ९·३८३; **उदक साहाजें सपाटलें** २·१०७; **फटिकु चि आवडे उदक**, स्फटिक पाण्यासारखा दिसतो, ७·११०; **कल्पान्तिचेन उदकें** १५·५३; **खलालिचेया उदका सरिसी** १५·४६५; **पाउलां पाउलां उदकें** ६·१७४; **स्वातिचें उदक** १५·३८८; **उदकाचिया आर्त्ती रोहिणी पींतु**,

पाण्याची तहान मृगजलानें भागवावी असें होईल, ११-५९३; उदकातीत १५-३१६ (२); उदकपणें १८-११६५; उदकमय २-२६२; उदकलेशें ९-३८९; अनन्योदकधुवट, अनन्य पहा; अमेध्योदक, घाणेरडें पाणी, सांडपाणी, १६-३१५; अर्घोदक अर्घ पहा; उष्णोदक, उष्ण पहा; क्षीरोदक ११-२१८; गंगायमुनाउदक १८-५९१; गंगोदक १७-५२; चूलोदक ९-१३; तिलोदक १-२५३, ११-१०; पर्जन्योदक १८-३६६; प्रलयोदक, प्रलय पहा; रथ्योदक, रस्त्यावर वाहणारें पाणी, ५-१५३, ९-४८४; विषोदक ८-१४५; वैद्योदक, जें जाणावयाचें तेंच पाणी, १८-१२९२; समुद्रोदक १८-३९२; हिमोदक १७-२५७; वारेनि का उदकें ८-२१०.

**उद्दंड**—विपुल. उद्दंड शांति । ९-२०९. १८-१६५०. उद्दंड पहा.

**उदय**—उगवणें, दिसणें. का पदार्थे शरीर । तैं रोगां उदयो ॥ १६-३१६. जयाचां उदईं अथ बुडे । ज्ञातेनसिं ॥ १८-५२६. ३-१९५, ५-८६, १८-१३, १८-१९४, १८-१०९१. उदयाचां परिवरीं, जन्मस्थानांत, ९-४९८; उदयीं... अस्तुसवें १०-८६; अभ्युदय १८-१६३४; अरुणोदय ११-१३३; उदयाचल १८-१५२२; कल्पोदईं १४-१११; चंद्रोदईं १८-७३२, १८-१५९५; चंद्रोदय ४-२३, १५-४१०; ज्ञानोदयीं ५-८७; दीनोदईं १५-२८२,—यीं ८-१६५; सुखोदय १४-१; सूर्योदय ११-५०३, १५-३९३, १८-३५४; विदुदयोद्यानद्विरद, विद्+उदय+उद्यान+द्विरद, विज्ञानाचा उदय हेंच उद्यान, त्यांतला (उद्यानाचा नाश करणारा) हत्ती, १८-७. उद्दंड पहा.

**उदर**—पोट, कूस. देवकिया उदरीं वाढिला । ६-१३७. परि उदरा वैराग्य आलें । बुद्धिचेया ॥ ६-१४८. १-१९, १०-६४, १२-८३. उदरा माजि १५-३७६; उदरा लागि १८-५६२; जगदुदरदोंदिल, जगाच्या उदरांत समावेश झाल्यामुळें जो स्थूल झाला आहे तो, ११-६९०; उदर हें थोंके, पोट सपाट होतें, ६-२०९; बहूदरें ११-३३६; मकरोदरीं गुपितु, शंकर पार्वतीला ब्रह्मनिरूपण करीत असतांना मगराच्या पोटांत राहून विष्णूनें गुप्तपणें तें ऐकलें. पार्वतीला झोंप आली तेव्हां हुंकार दिले. पुढें विष्णूचा मत्स्येन्द्रनाथ म्हणून अवतार झाला व नाथसंप्रदायास आरंभ झाला. १८-१७३१; महद्ब्रह्मउदरीं १४-८८; मातृकोदरकुहर १३-७३१; मातेच्या उदरा १२-८३; सहोदर, एकाच आईच्या पोटीं जन्मास आलेले, कालकूटाचें सहोदर, अमृत, १०-१७६; व्याससहोदर १७-४२७; सहोदर प्रेमें, बंधुत्वाच्या भावानें, १३-४४५; स्त्री द्रव्य विष्णोदरीं वांटी, उपस्थ व पोट यांचें क्षेत्रस्त्री व द्रव्य असें विभागून देतो, १८-५५५.

**उद्‌ळणें**—उसळणें. १५-४६५.

**उद्गारें**—भर, बहर, ऊत. की [illegible] अति पाल्हे । तीर आपैसेया [illegible] . १०-१९०. विकाराचें उद्गारें ८-२४१.

**उदान**—पांच प्राणवायूंपैकीं एक. हा कंठांतून मस्तकापर्यंत जातो. १८-२२५.

**उदार**—थोर अंतःकरणाचा, मोठा, विस्तृत, मोकळा. जिये उदार [illegible] । १-२८. २-७९, ९-२०४, ११-११७, १२-१, १२-१३४, १३-११४४, १४-२१३. उदार गद्या ११-५९४, —ज्ञान १३-१६१, —परिमळें १८-८६५; उदारें नीतिवंति १४-२२; अवसरिं उदार १३-२११; नं अपार्थी हीं उदार ११-१०६; दैविकी उदारा वाचा १०-७, चोरियेचा ध(ध)नीं उदारा होणें १७-२९४; उदारपण १८-१४८३; उदारें अनियतें ११-१२६. औदार्य पहा.

**उदावादा**—प्रकटपणा, पूर्णता. [illegible] उदावादा । एकार्णवाचा ॥ १५-४९९. संपदा उदावादा हिं वेंचिला १३-३०५.

**उदास**—निःसंग, निरपेक्ष, तटस्थ. जैसा बांटे पांता उदासे । आणि नाटे अति सूरसे । २-१०. ९-२५, ९-४०८, १३-५८८, १३-५०२, १३-९३०, १३-१००८, १८-४९३. शरीरीं उदासु ८-१०५; अभ्यर्थैसीं उदासपण, कंटाळा, ९-४८७; उदासवृत्तिचा ५-७७; उदासु आणि मित्रु ६-९४; व्यापक आणि उदास १२-१८०. उदासिन—उदासिनें स्वेहालें ११-११५;

**उदासीन**—तैसा इंद्रियार्थीं उदासीनु । २·३३४, १८·१५१, १८·३०४, **उदासीनाचिया परीं** ९·१२६; **उदासीनें दैवें** ११·४०७.

**उदीपणें**—**उद्दीपणें** पहा.

**उदैजणें**—उदयास येणें, उगवणें. उदैला चि उदेजतखेउ‍ऽ। १६·१४. **उदैजत** ९·४९, १६·८८, १६·१०९, १६·१६१; **उदैजतां** १३·३८७, १८·९१७, १८·९७९, १८·९९२; **उदैजति** १५·१५२; **उदैजते** ११·२३४; **उदैजे** १३·१०३०, १५·२७१; **उदैजेला** १६·१; **उदैजो**, प्रकाशित होवो, १४·२०; **ज्ञानाचा उदोजो**, प्रकाश, १३·५०९; **नुदैजे** ५·५१, ९·४२२.

**उदैणें**—**उदैजणें** पहा. जैसा उदैला दिनकरु । लोपी नक्षत्रांतें ॥ १·१४४. सूर्यवंशीं उदैला । सूर्यो जो कां ॥ १०·२३४. ४·११६, ९·४७२, ११·३३३, ११·४२२, ११·४७४, १५·६१, १५·६२, १५·३८५, १५·४४०, १६·४, १६·१४, १६·१७७, १६·२३७, १६·३१७, १७·१३४, १७·४०१, १८·७३०, १८·१२९०, १८·१६०८. **उदैलेनि** ११·२४८; **उदैलेयां** १०·४५, ११·६८३ (२), १४·१३; **उदित**—हे संग्रामीं अति उदित । जाले असति कौरु समस्त । १·१९४; **अग्निचें उदितें**, तेज, ८·२११; **उदितें दिवाकरें** १७·१७७, –**रश्मिराजें** १४·४६; **उदो**, उदय, ५·८५, १०·२३३; **चिन्हाचा उदो** १४·२२५; **दीनउदो** १०·१४४; **भाग्यउदो** ११·१७५, १७·४२३; **प्रतापें उदो केला** २·१९२; **उदो अस्तु** २·१६०, ३·२०२, –**अस्तूंचा** १६·१४, –**अस्तूचेनि** ४·९८, –**अस्तूंचे लोंढे** ७·७४; **उदो करितां** १४·८, –**करीं** १०·१२७, –**न करिजे** ११·६८३ (१); **उदो होये** ९·२६४, ९·४९७; **अरुणाचा उदो** १८·८९९; **उदौ**, उदय, १४·२९७.

**उद्गत**—बाहेर आलेलें. **मुखोद्गतें पुराणें** १३·८२६.

**उद्गार**—उच्चार, बोधवचन, ढेंकर. मिया धाले तेणें उद्गारें । लागति गर्जों ॥ १०·१०९, माझ्यामुळेंच तृप्त झाले म्हणून उच्चारलेल्या बोधवचनादींनीं (पक्षीं ढेंकर) गर्जूं लागतात. **पूर्णोद्गार** १८·१६४१.

**उद्दंड**—**उदंड** पहा. **उद्दंड अज्ञान** १३·६९०; **उद्दंडें** १·१३१, ८·४९; **उद्दंडीं हवन केलें** ४·१२८.

**उद्दीपणें**—प्रकाशणें, प्रकट होणें, दिसणें. कां जागृति जंव उद्दीपे । तंव तंव नीद हारपे । १८·१०९८. **बोधु उद्दीपे** १८·२२६; **सूर्यकांतें उद्दीपावें** १४·२९४; **उदिपणें**, पेटणें, इंधनें आगि उदिपे ११·६८२.

**उद्देश**—अभिप्राय, हेतु, आशय. ३·३४, ६·२९१, १०·२६२, १०·२७८. **उद्देशा लागौनियां** ३.१६२, –**साठिं** १६·२०; **योगयुक्तिचा उद्देशु** ५·१६०; **उद्देशें**, उदाहरणार्थ, त्याकरितां; उद्देशें एक दोनि । जाइजति बोलौनि । १·१०४, १०·१७२; **ईश्वरोद्देशें** १८·१४३२; **उचितदेवउद्देशें** १७·३५७; **देवपितरोद्देशें** ९·३४९; **पितरोद्देशें** ३·१२०; **फळउद्देशें** १८·६२८; **मजउद्देशें** १२·१२९.

**उद्धरणें**—वर काढणें, मुक्त करणें. तेया विषयो ना स्वर्गु मिळे । ना उद्धरे तो ॥ १६·४५१. १७·१९६, १७·३२२. **उद्धरलों** ११·६८; **उद्धार**—**जीर्णोद्धार** १०·२३४, १६·३५८, १७·३८८; **समुद्धर्ता** १२·९४.

**उद्भीज**— -ज पहा.

**उद्बोधणें**—जागृत होणें. साच ज्ञान उद्बोधें (धे) । कोवळें जें ॥ १८·१४३६. **उद्बोध**, जागृति, अनुभव, ९·९५.

**उद्भट**—शूर, धैर्याचा. साबायें विण उद्भट । १८·८५४, कांहीं साहाय्य नसतांही शूर. १४·२१६.

**उद्भवणें**—उत्पन्न होणें, प्रकट होणें. **उद्भव**—**भवनोद्भवारंभस्तंभ**, (विश्वरूपी) घराच्या बांधकामाच्या आरंभाचा खांब, १८·६, 'भवन' या ऐवजीं ज्ञानदेवींत 'भुवन' असा पाठ आहे; **विश्वोद्भवभुवन**, विश्वनिर्मितीचें स्थान, १०·५.

**उद्भिज**— -ज पहा.

**उद्यत**—तयार, सज्ज. **कली उद्यत जालें** १·१८४; **जूझावेया उद्यत जाले** १·२१९; **उद्यतायुधीं**, हत्यारांनीं सज्ज असलेले, ११·२१३.

**उद्यम**—उद्योग, प्रयत्न, व्यापार. भांडवल जेया । उद्यमीं मी ॥ ७·१७३. कां आंग जालें साइाजे (जें) । परि लेणें उद्यमें कीजे । १८·९५. ९·३३१, १०·१५२, १३·४४, १३·९७३. **उद्यमें विण**

१८·४२७; उद्यमजात १४·२२९; ग्रंथउद्यमु फलावेया वेव्हारा होई १४·१६.

**उद्याणी**—मांडणी. १६·६०.

**उद्यान**—बाग, उपवन. जैसा उद्यानामाजि अनङ्ग। संचरला देखौनि प्रबळ। १·२३०. १·४३. चंदनाचें उद्यान १७·२२४; विवेकतरुचें उद्यानवन १·२८; सुरतरूचीं उद्यानें ९·३८८.

**उद्ध्वस**—ओस, उजाड, उध्वस्त. १४·२४८.

**उद्वेगणें**—अस्वस्थ होणें, खिन्न होणें. मग अत्यंत उद्वेगला। १·१६७. उद्वेग २·२९४; लौकिकाचा उद्वेग १३·१९२; भयोद्वेगरहित १२·१६९.

**उधलणें**—उडणें, उडवणें, भडकणें. ३·२००, ४·१७४, १३·४८९.

**उधवणें**—वर उसळणें, उभे करणें, उद्भवणें. सागरु शोषूनि उधवला। अंबरासि॥ १·७०. ६·२६४. शिलाराशि आकाशें उधवली १६·३७७; उधवला ठांइं ७·८४. नुधवणें, विवेकु नुधवी माथा। १५·२२१.

**उधवि**—धुरांडें. उधविचें तोंड। उगळीत धूमाचें उभड। १६·२९२.

**उधाइणें**—प्रकटणें, वर काढणें. आर्ताच्या नेत्र वोखटा। उधाइला हा॥ ११·४८७. माथा उधों नेदिजे, डोकें वर करूं देत नाहींत, १८·८९.

**उधि**—वाढ. ज्ञानाची उधि १३·६२९, —धि उधी १४·२२०.

**उनीद**—ज्याची झोप उडाली आहे असा. उनीदयाचें पहुडणें १२·६८.

**उन्नती**—उत्कर्ष, वाढ. १८·५९७. दिवसाचिये उन्नती १७·१३२; उन्नती धरी १७·५७, १७·२६८, १८·१५२६; उन्नती ये १४·२४१; सुख उन्नती १६·२००.

**उन्निद्र**—उनीद पहा. उन्निद्रें एकें निद्रितें। ११·१२८.

**उन्मत्त**—माजलेला. ३·११५. उन्मत्तें जगें १२·१६६.

**उन्मनी**—मनाचा लय झालेली स्थिति. योगियां उन्मनीं(ती)। आराय ना॥ १२·२०८. जिया नरि गेलें आहे। परि उन्मनी ते नोहे। १४·२५१. उन्मनियेचें लावण्य ६·३२०.

**उन्मलणें**—मुळासकट उपटून पडणें. फळती केलि उन्मले। १५·२५७. १५·५६. उन्मलावेया दोलें, उपटून टाकण्याच्या इच्छेनें, १५·२१२.

**उन्मीलन**—उघडणें, प्रकट होणें. दीठी उन्मीलन होतसे ११·१३४; [illegible] उन्मीलित गेलें। परिपनाचि आनंद [illegible]। [illegible]. अर्द्धोन्मीलन-स्थिति ६·२०३; जगदुन्मीलनाविरला, (१) जगाच्या प्रकटीकरणापासून जो निराळा नाहीं (अविरल) तो. [illegible] त्याच्यांत [illegible], व जगांत जो, असा; (२) जगाचें [illegible] (प्रकटीकरण) व विरल (लय) [illegible], या [illegible] कलिमिय याचें [illegible] 'ना' [illegible] 'अ' चा बाध [illegible]. [illegible] १८·८; निमिलोन्मीलन. [illegible] म्हणजे जगाच्या आदि प्रलयीं. [illegible].

**उन्मूलणें**—मुळासकट उपटणें. [illegible]। १३·१७३. १५·२०१. उन्मूलन १५·२१४, १५·२९४.

**उन्मेख**—प्रकटपणा. [illegible], ज्ञान, डोळ्यांची उघडझांप. [illegible] आणि [illegible] ७·२५. १५·१०, १५·२७. उकलनेन उन्मेखें १५·१८४; उन्मेखोत्तमें उन्मेखें १५·१६०; मनाचेनि उन्मेखें २·२८६; उन्मेखें आथिला १३·६२८; उन्मेखचांदिणें ६·१३८; उन्मेखनेत्र ४·१५८; उन्मेखलता १५·५४९; उन्मेखसागर १४·३४; उन्मेखु सूक्ष्मेक्षणु, ईक्षण पहा; उन्मेख सूर्यकांत-स्फुलिंगें, (गुरूच्या [illegible] [illegible]) ज्ञानाच्या [illegible] स्फुलिंगानें, १६·८; उन्मेख-सुलोचन १३·३३८.

**उन्मेष**—उन्मेख पहा. [illegible]। [illegible] २·७५. ३·२७१, १३·५, १३·११२९, १८·१६८८. अर्जुनोन्मेषाचें डोलें ७·१८४.

**उन्ह**—उष्ण, ताप. [illegible]। अमी वि[illegible] पां॥ १७·१४०, [illegible] की नांगांत थागन शिरेल की काय!, १७·१४१.

**उन्हाला**—उन्हाळा, कोरडेपणा. [illegible] जो न तपे। १३·३४६. १४·३३१, १६·३९३. उन्हाला करी, सुकवून टाकी, ६·२३५.

**उप**—जवळ, कमी प्रमाणें, गौण, या अर्थी. शब्दास जोडून.

**उपकंठ**—जवळचा,आसपासचा भाग. **अस्तगिरिचां उपकंठीं** १२·३५.

**उपकरणें**—उपयोगी पडणें, खर्ची घालणें. हें जिवित ही उपकरावें । कार्जी यांचां ॥ १·२१७. आपुलां अथवां(वा) परावां । ठांइं उपकरिसि पांडवा । १८·१३५०. ३·१५२, १८·५५९. **नुपकरे**, येथ कृपालुपण नुपकरे । २·२३, ९·२०४, ९·३७६, १८·९६०; **उपकरण**, साहित्य, **देव्हाराचिं उपकरणें** १३·४०६; **उपकरणजात** १३·४०८; **यज्ञोपकरण** ३·१२८.

**उपकार**—साहाय्य, मदत, कल्याण, हित. १·१८३, १·२२२, २·३७, १३·६३३, १३·१०२९, १७·४२७, १८·१५५७, १८·१६८६. **उपकारु करी**, उपयोगी पडतो, १७·१३६, १७·३८४; **परोपकार** १३·२०८, १७·२०९; **प्रत्योपकारु** १७·२८०; ज्ञानदेवी–**प्रत्युपकारु** १७·२८१; **सर्वोपकारी समर्थ** १८·१७०७; **अपकारियां उपकार** ११·१०६; **अपकार...प्रियउपकार** १६·२६.

**उपक्रम**—आरंभ. १०·२७,१५·१४५,१८·४५३, १८·९३२. **कर्मांचा उपक्रम** १८·८३१; **सृष्टिचेया उपक्रमा** १७·३३३; **समारंभ-उपक्रम**, योजना व आरंभ, १४·२३२; **उपक्रमु किजो** ११·९३.

**उपखणें**—खर्ची पडणें, श्रम होणें, व्यर्थ जाणें. परि ते ही वृष्टि उपखे । जरि खडकां वरि होए ॥ ११·९५. १६·१५५, १८·६५०.**उपखा—उपखा पडिला** ९·११४; **उपखे ठांति**, श्रम मात्र पडतात, ९·३०३.

**उपचार**—उपाय, प्रयत्न, साधन, पूजासाहित्य. मी उपचारीं कन्हणी हीं । ना कलें गा ॥ ९·३६३. चंदनादि होईन । उपचार मीं ॥ १३·४१९. **उपचारांचा आगम**, उपभोगाच्चीं साधनें एकत्र होतात, येतात, १८·३४३; **निरुपाधिका उपचार**, ज्याला उपाधि नाहींत त्याला पूजा-साहित्याची आवश्यकता नाहीं, ९·१५६; **यथोचितें उपचारें** ४·७०; **उपचारमिसें** ९·३६२; **उपचारसमृद्धी** ७·१३९; **आंगोपचार** १७·२०२; **निरउपचार** १२·१५१; **निरूपचारा प्रेमा विषो**, साधनापलीकडील प्रेमाचा जो विषय होतो, १८·१३३७; **यज्ञोपचार** ९·३४७, **–भरण** ९·२३९; **सुखादिउपचार** १७·३२.

**उपजणें**—उत्पन्न होणें, उद्भवणें. हें उपजे आणि नाशे । तें मायामय दीसें (से) । यऱ्हवि तत्वता वस्तु असे । अविनाश चि ॥ २·१०५. उपजे तें नाशे । नाशलें पुनरपि दीसे । हें घटिकायंत्र तैसें । परिभ्रमे ॥ २·१५९. उपजों उपजों मरणें । नावां नावां ॥ १६·१७८. १·२४२, २·११२, २·११४, ६·१७०, ६·२०३, ७·५६, १३·१२, १३·३१२, १४·१३४, १८·७१०. **उपजत** १·१९६, ६·३३१, ९·२७५, १०·८५; **उपजत खेऊ** १८·४६४, **उपजतखेवो** ६·४६९; **उपजतसे** १·१२६, ११·५८३; **उपजतां जाली**, जन्मास येतांना झाली, १३·७३२; **उपजतु असे** ११·७७; **वेगु उपजतु** १०·१८८; **उपजैल** २·२८१; **उपजों न लाहे** १६·५६; **उपजैनि** १८·१०४५; **उपाये उपजति** १२·४४; **चंदनीं आवडि उपजे** ४·२२; **चित्ता आवडि उपजे** ३·२०७; **जीवीं चाड उपजे** १०·२३९; **प्रेमा उपजे** १८·३८०, **बोधु**–८·१७९, **मत्सरु**–४·११२, **विकल्पु**–१३·४७५, **सद्भावो**–६·६९; **सत्कर्मिं सुख उपजे** १३·९७१; **उपजणें निमणें** १५·३१५. **नुपजणें**—तैसा नुपजे उपजवितां । क्रोधोर्मि तो ॥ १६·११८. १·२६१, २·३४३, १२·८८, १२·१६५, १३·११६२, १६·१८७. **उपजवणें** २·११६, २·११८, १०·१००, १३·३०८, १६·१२८, १८·२७४; **उपजविता** १५·३१३.

**उपजीवी**—पोषणाचें साधन असणारा. **ग्रंथोपजीविये**, ग्रंथावर निर्वाह करणाऱ्यास, १८·१७७९; **दैवगुण-येकोपजीवी**, मोक्षप्राप्तीसाठीं लागणाऱ्या दैवी गुणांवरच आधार ठेवणारा, १६·६६.

**उपटणें**—तुटून पडणें, कोसळणें. **जैसा राजहंसु खडकीं उपटला** १८·७९५; **शोकाचा कडा उपटत** ७·८४.

**उपडणें**—मुळासकट उपटून पडणें. तेथ समूळ उपडति । जातिधर्म ॥ १·२४९. तेथ समूळ हें उपडे । ज्ञानजात ॥ २·३२७. १५·४१. **धर्माचे पाये उपडी** १३·६९३; **उपडूनियां** ३·२४८; **उपडूनु** १०·२४१; **उपडणें–कामनेतें उपडणें** १८·१०८;

उपडवणें—एकां उपडविलें । समूळांतें ॥ १३·२२६.

**उपणणें**—उंचावरून धान्य सोडून भुसा, टरफलें वारवणें, पाखडणें. कां भूस बीज एकावट । उपणितां राहे घणवट । २·१३०. कणु सांडौनि उपणिला । कोंडा जैसा ॥ ९·३२९. **भूस उपणिलेयां** १८·६११.

**उपताप**—त्रास, दगदग. **परोपताप**, परपीडा, १६·३२५.

**उपदेशणें**—बोध देणें, शिकवणें, माहिती देणें. मनू आपण अनुष्ठिली । मग इक्ष्वाकूसि उपदेशिली । ४·१७. ४·३६, १३·६३३, १८·११२६, १८·१३८०, १८·१४५६. **उपदेश**—३·७; **उपदेशामाझि गावाई**, हा नाहीं तो उपदेश अशी गुंतागुंत, ३·११; **उपदेशा सेल दीधली**, शेवटचा उत्तम उपदेश दिला, ११·६३३; **कें उपदेशु कें जूझ** ६·१२३; **गोमटा उपदेश** ३·९; **भलें उपदेशा आंतुडलें**, उपदेशांत चांगलाच सांपडलों, ११·३६७; **अन्योपदेशाचेनि हातासनें**, निराळाच उपदेश आहे अशा मिषानें, ६·११९; **उपदेशु केला** ४·१९; **गुरूपदिष्टा विद्या**, गुरूनें सांगितलेल्या विद्या, १६·२१७.

**उपद्रवणें**—त्रास देणें, पीडा देणें. **जेतुलें काहीं उपद्रवीति** १६·३९८; **उपद्रव**—**उपद्रवांचे मेळावे** १३·३४३; **अदृष्टिचेनि उपद्रवें**, न दिसणाऱ्या पूर्वसंचिताच्या पीडेनें, १३·२२१; **उपद्रवां पातलेयां** १६·१९३; **उपद्रवधुमाळें**, उपद्रवाच्या वावटळीनें १३·४९०; **सोपद्रवा लोका एउनि**, त्रासदायक जगांत येऊन, ९·४८८.

**उपनणें**—उत्पन्न होणें. वायां चि धिवसा उपनला चित्ता । १·६७. जेथ कामु उपनला । तेथ क्रोधु आदिं चि आला । २·३२२. १·१९७, १·२०५, २·२, २·२६, २·६४, ७·१२२, ७·१२८, ९·२७१, ११·३१६, ११·३६६, ११·६२८. **उपनलां चि ठांईं**, उपजल्या ठिकाणींच, ११·४१७.

**उपपत्ति**—उगम, कार्यकारणभाव, तत्त्वनिर्णय, सिद्धांत. उपपत्तिची बाहे । उभूनि सांगों ॥ १८·३९९, हे सर्व सिद्धांत स्पष्ट करून सांगतों. ९·१०४, १८·१४१९. **उपपत्तिचेनि उवायें**, तत्त्वनिर्णयाचा विस्तार करून, १८·१३७९; **उपपत्तिचेनि सुरवाडें**, क्षेत्राची उपपत्ति, पूर्वापर संबंध दाखवून, विस्तारानें, १३·९३७; **उपपत्तिसिं**, उपपत्तिसहित, १८·६२४; **उपपत्ती**—२·३७०, ८·१६३, ९·६८, ९·१२९, ९·१३१, ९·१३९, १०·२६, ११·३९६, ११·६९४, १७·४०६, १८·१४१७; **मज हें उपपत्ती नेये**, मला याचा उमज पडत नाहीं, २·४९; **उपपत्तीं**, उपपत्तीनें, १४·४०.

**उपमणें**—सारखेपणा दाखवणें, तुलना करणें. तैसें ज्ञान हें उपमिजे । ज्ञानेंसीं चि ॥ ४·१८१. तरि तेया तेजाची थोरी । उपमूं येंती ॥ ११·२३४. **उपमा**—**उपमेचा काटालां**, उपमेच्या तराजूंत, ८·२६२; **उपमाश्लेषकोंदाकोंदी** १३·११५८; **उपमा असे** १२·१५९ (२); **–आली**, सुचली, १२·१५९ (१); **ज्ञानासि उपमा घडे**, ज्ञानाचें मोजमाप घेतां येईल, ४·१७९; **पाडें जरि उपमा पाइजे**, बरोबरी करण्यास उपमा पाहिजे असली तर, ६·४८२; **उपमां केवि**, (१) क्रि. कशी उपमा द्यावी?, (२) ना. उपमेंत काय सांगावें?, १६·११५; **उपमे येतां** १६·१७१; **उपमेसि नुपकरे** ९·२०४; **तो ही उपमो नोहे**, त्याची ही उपमा देतां येणार नाहीं, १८·१७६७, ज्ञानदेवी—'उपमे नव्हे' १८·१७८९.

**उपयोग**—उपयुक्तता, साहाय्य, मदत. ५·१७६, ११·२०. **अनुपयोगी** १६·२१२. **उवेग** पहा.

**उपर**—वर, वरची बाजू. मी तलु उपरु म्हणता । १३·४१७, स्वारी चालत असतांना, 'सखल, उंच भाग आला आहे' अशी सूचना देणारा चोपदार. **उपरि** पहा.

**उपरत**—(१) उलट. **इये उपरती ज्ञानचिन्हें**, वर वर्णिलेल्या चिन्हांच्या उलट जीं ज्ञानचिन्हें, १३·८४६; **अधिचीं हीं मूळें उपरतें दाविलीं**, खालचीं मुळें, उलट (वर) आहेत असें सांगितलें, १५·२०७; **उपरतें जाणे** १८·७२५; **उपरतें मांडिलें** ११·३७९. (२) वरची. **उपरता शाखा** १५·२०३; **उपरतविणें**—आंतलें उघड करून दाखवणें, घडी उघडून दाखवणें, **वूस उपरतविलें** १८·८२.

**उपरति**—वैराग्य. ते उपरतिचां वाविं सेलत । ७·९८. **चित्ता उपरति होउनि** २·१७२; **उपरतिरागें**, वैराग्याच्या आवडीनें, रंगानें, १५·१९२.

**उपरम**—विश्रांति, शांति, वैराग्य. ऐसा बुद्धिचा उपरमु । तेया नांव म्हणिपे शमु । १८·८३१. **परिणतोपरमैकप्रिय,** परिपक्क वैराग्यच ज्यास आवडतें, परिपक्क वैराग्य ज्यानें मिळविलें आहे असाच ज्याला प्रिय वाटतो, १८·९.

**उपराट-ठ**—उलटें. ९·५१०. **उपराठ,** ना उपराठिं ज्ञानपदें । तें चि अज्ञान ॥ १३·८४८, **उपराठा** ११·५४०.

**उपरि**—वरच्या बाजूस, त्यावर, श्रेष्ठ. १·१८, १८·४०, १८·४१. **उपरि डाहालिया** १५·१९५ (१); **उपरिशाखा** १५·१९५ (२), १५·१९७; **सर्वां उपरि** १०·२०६, १४·४३.

**उपरें**—आधिक्यानें, श्रेष्ठत्वांत. **साचोकारें उपरें** ९·४४८.

**उपरोध**—आग्रह, भीड, अडथळा. **उपरोधें,** भिडेनें, १८·१३२५; **उपरोधें करणें** १३·२८८; **उपरोधी,** हट्ट, बालक स्तनपानीं उपरोधी करी। ११·७९. **अनुपरोध मत,** स्पष्ट, निश्चित मत, ३·१८९. **उरोधणें** पहा.

**उपलक्षण**—तुलना, उपमा. ६·३५८.

**उपलभणें**—मिळणें. परि देहाचें मोटकें उभें। चेतना तेथ उपलभे । १५·३४१.

**उपलवणें**—उघड करणें, विस्तारानें सांगणें. प्रमेय उपलउं पुडुतीं । १४·८५. ६·४८५, १५·४४. **गोठी उपलउं** १६·२७३; **घडी उपलविली** ६·२९२, ११·६४१; **श्रद्धा उपलविली** १७·४०९; **उपलवणी केली** १३·८४९.

**उपलाणा**—खोगीर नसलेला घोडा. कां जीवनृपाचे उपलाणे । १८·४६१.

**उपवास**—कांहीं न खाणें, उपास.. **उपवास करी,** उपासमार करतो, ९·५८, —**कीजति** १७·२५६; **उपवासिं मारी** १७·४१७; **मासोपवासिं,** महिनाभर उपास करून, १७·३६१; **उपवासी,** उपवासियें अन्नें माखिलें । १३·४६८, उपाशी राहून अन्न आंगास लावलें.

**उपशमणें**—शांत करणें. जो शरीरभावातें उपशमी । तो अधियज्ञु गा मी । ८·३६. **उपशम**—**उपशमीं निहिटिला** ४·१३०; **उपशमू भागा आला** १२·१८४; **उपशमाची मान मोडिली** ३·२४७.

**उपशाखा**—मोठ्या शाखेला फुटणाऱ्या लहान शाखा. **शाखोपशाखा होये,** मोठ्या शाखांतून लहान शाखांपर्यंत पोहोंचतें, ९·१०८.

**उपशांत**—शमन झाले आहेत असे. **सकलकामोपशांत** ६·८१.

**उपशांति**—शमन. **सर्वोपशांतिप्रमदे कांतु,** सर्व कामनांची शांति, हीच स्त्री, त्या स्त्रियेचा पति, १८·१३११.

**उपसर्ग**—उपाधि, त्रास. ज्ञानिये तेयातें उपसर्गु। हाणि म्हणति ॥ ९·३१०. १३·५३५.

**उपसंहरणें**—संपणें, ओसरणें. तो घोपु तरि उपसंहरला । १·१६१. **उपसंहरौनि** ७·३०.

**उपसाहणें**—सहन करणें, क्षमा करणें. तरि उणावो साहाजें उपसाहला । १·६५. १३·३१३, १३·३३७, १३·४५८, १६·२१, १६·२९, १८·२६. **उपसाहावें लागे** ६·३१; **माउलीपणें उपसाहिजो जी** १८·१७४५; **उपसहावीं** ११·५५१.

**उपहत**—इजा झालेला, निस्तेज, हतवीर्य. जैसा राजकुमरु पदच्युतु । सर्वथा होये उपहतु । १·२६८. **उपहति,** अपमान, जैसी भातारेंहीन वनिता। उपहति पावे सर्वथा । २·१९९.

**उपहार**—फराळ. **उपहारु वोगरीन,** फराळ वाढीन, १३·४२०.

**उपहास**—थट्टा, निर्भर्त्सना. उपहासु चालु । वर्मस्पर्शु ॥ १३·२७०, **निर्भर्त्सना, छळ करणारे,** वर्मी लागणारे, हे वाचेच्या अवगुणांपैकीं दोष. १३·२७०-२७१ पहा.

**उपहित**—जवळ ठेवलेलें. **उपहिता चैतन्या,** उपाधियुक्त चैतन्याला, १६·४३; **उपाधि उपहिता सेवट्ठ** १५·४३४; **उपाधिसिं उपहित** १५·४७८; **उपाधि उपहिताकारें** १८·११८०.

**उपाइणें**—जवळ येणें, मिळणें, आरंभ करणें, क्रमप्राप्त होणें, तयार करणें. म्हणौनि तिहिं प्रेम धरिलें । तें चि देणें येयां उपाइलें । १०·११६. माणिक एक उपाइलें । १३·७८६, **माणिक** रत्नासारखें जर कां एकादें मूल जन्मास आलें. **आत्मसुख उपाइलें** ५·१०७; **आपुलेया स्मरणाची उपाइली** ८·१३१; **भेदलेपणें उपाइलें,** फोड करून विस्तारानें पुढें मांडलें

१८·६९२; **स्वर्ग मोक्ष उपाइले** १०·१२२.

**उपांग**—आंग पहा.

**उपादान**—(१) कारण. घटास माती, वस्त्रास तंतु या समवायिकारणांप्रमाणें. तें हेतु ना उपादान। १८·३०४. (२) प्राप्ति. **मोक्षोपादान** १८·१२३७.

**उपादेय**—घेण्यास योग्य. सर्वज्ञ जे ही होंति। हेय उपादेय जाणति। ३·२२८.

**उपाधि**—शुद्ध स्वरूपाला अन्यरूप देणारें किंवा भासविणारें द्रव्य. रंगीत पाण्यांत रंग ही उपाधि. तांबड्या फुलामुळें स्फटिक तांबडा दिसतो, तेथें तांबडें फूल हीं उपाधि. उपसर्ग, माया, संसार, पसारा, त्रास. जीउ तैसा उपाधि। आवडे लोकां॥ ४२०. २·२३५, १३·९४, १५·७६, १५·४२९, १५·४३०, १५·४३४, १५·४३६, १५·४७८, १८·११८०. **उपाधिचे त्याग** १७·३५९; **उपाधिचेनि पाडें** १५·४६७; **उपाधिचा वोथंबा** १५·२४६; **उपाधिनाश** १५·४६६; **उपाधि-भेदहीनु**, उपाधीमुळें होणाऱ्या द्वैतापासून अलिप्त, २·२९६; **उपाधिमाझि गुप्त** २·१२६; **उपाधिरूप** १६·४२; **उपाधि डसिटिलें** १८·२१; **डिंभोपाधिकु विडालु**, बालपणाच्या उपाधीचा दोष, १८·२२; **निरुपाधि** २·१४५, २·३५५; **निरुपाधिक** १५·४२८, १५·४३४, १५·५२४; **निरुपाधिका उपचारु** ९·१५६; **सर्वोपाधिविनासें** १५·४७७; **उपाधी—असतेन उपाधी** ५·२४; **उपाधी आतला** १५·४६४. **औपाधिक** पहा.

**उपाय**—इलाज, प्रयत्न, साधन, उपयोग. ३·२६१, ४·२०५, ६·६१, ७·९९, १३·९६४, १६·५१ (२), १६·१५०, १८·१०७८, १८·१२२२ (२), १८·१३७०. **उपायाची उजिरी** १८·१३७३; **उपायांची केणि** ९·४६७; **उपाया न ये,** उपयोगी पडत नाहीं, १३·८६१; **उपायातें कीजे** १८·१२२२ (१); **उपायांसि वाटा नव्हति** ११·६७२; **उपायबल** ८·८०, **उपायस्थिति** १८·१२३९ (२); **मोक्षउपाय** १८·१२२४ (१); **शास्त्रउपाय** १८·१२२४ (२); **सुखोपायें** ६·३३४, ६·३८५, ९·५४; **उपाइं जचिजे** १८·१२२०, **—जाचतेया** १५·२३०; **उपाओ** ३·२६२, ६·३२९, १०·१६६, ११·७९, ११·४६८, १८·६१९, १८·९०६, १८·१२२३; **जीवनउपाओ,** उपजीविकेचें साधन, १८·६०३; **उपाओ** ६·४२३; **उपाये** १२·४४, १३·१०३०, १३·१०४१, १५·२२६; **हें(हे) दोनी चि उपाये,** मनोरथभंग व सिद्धि हे दुःखास व सुखास कारण, १३·१३३; **जेणें उपायें घडे** १४·३६७; **उपायें घेंति** १७·१२; **उपावो** ४·१८४, १६·५१ (१), १८·१२३०; **अनुपायनी,** सहज प्राप्त झालेली, १८·३३१; **उपेय,** उपायानें मिळण्याजोगी, १८·१२३९ (१).

**उपार्जणें**—मिळविणें, संपादन करणें. **उपार्जलें** ८·३२.

**उपासणें**—अनुसरणें, सेवा करणें, भजणें. जेयां निदेलेयांतें उपासी। वैराग्य गा॥ ९·१८७, जे झोपले असतां त्यांची सेवा वैराग्य करतें. आगम उपासिले। मूर्त होंति॥ १३·८२८. **उपासित** ९·२६२, १२·३२; **उपासिजे** ४·१२४, ६·४०८; **उपासितां—लक्ष्मीपती उपासितां** ३·२५; **उपासिति** ४·७०, ८·१२४, ९·२२६, १२·३६, १२·८०; **उपासिती** १२·३०; **उपासिलां**—यन्हवि तन्हीं सकल मीं चि आहें। तरि कोणें कैं उपासिलां नोहें। ९·२६१; **उपासिली** १८·१४७४; **उपासिलें** ९·३५३; **उपासा—सी** ३·८८, १३·३८४, १३·७९६; **उपासीति** ९·३३३; **उपासन, योगाग्नीचें उपासन आणिलें** ४·१२१.

**उपास्ति**—सेवा, पूजा. परि उपास्ति ते योग्यते। अधीन असे॥ ३·४०. ८·१२५. **उपास्तिचें कवतिक** १३·४०८; **आचार्यउपास्ति** १३·३७०; **उपास्ती**—१८·१६८२, **उपास्तीची पदवी** १०·११९; **साचा उपास्ती** १३·४०४.

**उपेक्षणें**—हेळसांड करणें, अव्हेर करणें, टाकणें. ५·७३, १०·१४४. **उपेखा,** हयगय, **वायाणी उपेखया जांति** १०·१४५.

**उपेग**—उपयोग पहा. जैसी काना आर्द्र दीठि। उपेगा जाये॥ ७·२०१. जें राजा नरि घरासि ए। तरि बहुतु उपेगु होये। १७·१८५. ४·८९, ७·४२, ११·५२४, १८·१६२७. **उपेगु आथि** १८·३६६; **उपेगा आथि गेला** १८·५७२;

**उपेग करुनि घाली** १३·५८६; **उपेगु केला** १३·७२७, १८·१७७०; **उपेगा गेला** ३·१४०, ६·१३७, – **गेलें** १५·१४१; **उपेगासि गेला** १५·३८५; **उपेगा जाइल** ६·२६, ६·१६३, – **जाए** १६·८६, – **जांति** ९·३०३, – **जाये** २·६७, – **न वचे** ३·१९५.

**उफका**—उपेक्षा. तेथ उफकेन जो रिगे । तो नांगवला ॥ १३·५८२, म्हातारपण येऊन शेवट जवळ आला आहे हें दिसत असतां जो उपेक्षा करतो तो फसतो. ज्ञानदेवी–'उपेक्षूनि जो निगे', १३·५८४.

**उफगणें**—रिकामा होणें, संकुचित होणें. आणि फूंके भाति फुगे । रेचिली सवें चि उफगे । १३·६६३, वारा भरला कीं भाता फुगतो, व वारा सोडला कीं आकुंचित होतो.

**उफलणें**—उसळून वर उडणें. **उफलौनि** १७·२७९.

**उफाडणें**—त्वेषानें वर येणें. **दरिये माझि सिंहाडे उफाडति** ११·३३९.

**उब**—उष्णता. **वदनिचिया उबा** ११·३०९. **उबात**, उष्णतेनें त्रासलेला. कां उबातेन वस्त्र फेडिलें । ८·६५. **उबारा** १०·२९८, ११·६१७; **आसनाचा उबारा** ६·२२१; **उबारा धरी** १३·७२०; **स्वस्वरूपउबारीं**, स्वरूपसाक्षात्काराच्या उबेंत, १६·९. **ऊब** पहा.

**उबगणें**—त्रासणें, कंटाळणें. निकवडेया निष्ठुरा । उबगिजे जेविं सोइरा । १५·२५६. १८·२१८. **भवस्वर्गी उबगले** १५·२४७.

**उभगणें**—**उबगणें** पहा. ११·४४७. **मीं तुसीं व्यक्तिसेजारा उभगलां**, मी तुझ्याजवळ असूनही अजून तुझ्याशीं ऐक्य झालें नाहीं, म्हणून या नुसत्या व्यक्तिशेजाराला कंटाळलों आहें, १८·२८९. **उभग—शास्त्रांवरि उभगु** १३·१९२, **सोइरियां** – १३·५७१. **तुभगणें** १०·५४, १२·१६७, १८·१३९, १८·१७०२.

**उभजणें**—**उबगणें** पहा. १३·६७१, १८·१८२. **न तोखे उभजे ही ना** १४·३२७.

**उबडणें**—उपटून टाकणें, नाश करणें. तैसें मनपण जैं मोडे । तैं इंद्रियां आधीं चि उबडे । १३·३०१. **परत्रा उबडें केलें**, मोक्ष पालथा घातला, टाकला, १६·४४९.

**उंबरा**—दाराच्या बाहेरच्या चौकटीचें खालचें लांकूड. **मनाचा उंबरा वृत्तीसि देखों नेदी**, मनाचा उंबरा सुद्धां वृत्तींना पाहूं देऊं नकोस, वृत्तींपासून मन अलिप्त ठेव, १८·१०२४; **उंबरें**—रिगतां निगतां दातारें । अव्हांडिजति उंबरें । १३·४१५.

**उवारा**—**उब** पहा.

**उभड**—पाण्याची लाट, उसळी, लोट. जियें ब्रह्माचलाचां आधातां । पहिलेया संकल्पजळाचेया उभडा । ७·६७. **ज्वालाचे उभडु(ड) ऊठित** ११·३०८; **धूमाचे उभड उगलीत** १६·२९२; **प्रलयांबुचा उभडु** १६·१३७; **उभडें—पुनरावृत्तिचेनि उभडें** ७·७८.

**उभणें**—उभारणें, उभें करणें, रचणें, उत्पन्न होणें. गगनाचा तडवा । उभिला कोणें ह्मणावा । १३·५६. उभिला जैसा देउलिं । जाणौनि कुंचा ॥ १३·६५७. **अनुष्ठानाचें उभे**, जें अनुष्ठानानें उभें राहतें, मिळतें, १८·२४५; **आंगीं त्राण उभलें होतें**, उभें राहिलें होतें, संचरलें होतें, १८·१०७१; **करतलें उभूनि** १४·१८४; **कर्मभुवनें उभितां**, उभीं करीत असतांना, बांधीत असतांना, १८·४५२; **गुढिया उभिति** ९·५०७; **गुढी उभिली** ६·५२, ११·६०३; **नाभिकारा उभिजे**, भिऊं नको असें आश्वासन देण्याकरतां हात वर करावे, १३·२८७; **पडवी उभिली** १८·११३७; **बाहे उभिली** १८·१६३७, –**उभूनि** १८·२७६, १८·३९९; **भुजा उभूनियां** १८·११२५; **उभूं येईल** १८·१७५५. **उभणें — कवित्व उभणें जालें**, पुढें उभें राहिलें, १८·१७२५. **उभविणें**, उभें करणें, उपजवणें. झाडिं उभविलें आप । १५·३८६, १५·४५०; **मीं सज्जनाकरवि गुढी उभवीं** ४·५१; **उभावेया** १८·९७. **उभा, उभारणें** पहा.

**उभय**—दोघे, दोघे जोडीनें, दोन्ही. **उभयातीत**, कापूर व अग्नि यांच्या पलीकडचें, १८·१२०५; **उभयता** ३·२२४, –**था** ७·१३७; **उभयबंध**, पापपुण्याचें बंधन, २·२७७, हातपाय जोडून, ११·५३७; **उभयबुद्धिची मीठी**, मी व माझें, जीवत्व व विश्व या दोघांचे व्यापार बंद

पडतात, १५·४८१; **उभयभोगुत्रासु** १३·५२२; **उभययोगु,** क्षेत्र क्षेत्रज्ञ यांचा योग १४·८१, **–योगें,** प्रकृति व पुरुष यांच्या संयोगानें, १३·१०४९; **उभयसंग,** क्षेत्र व क्षेत्रज्ञ यांची गांठ, १४·९०.

**उभली**—खोकल्याची ढांस. **उभलिचा उजगरा** १३·५७३.

**उभलें**—दाराचा उंबरा. वाणसिये उभलें । कोण न रिगे ॥ १३·६९९.

**उभा**—ताठ, सरळ, जवळ असलेला, स्थिर, जिवंत, संपूर्ण. दर्दुरु सापें गीलिजतु उभा । ९·५०९. लोह उभें खाये माती । १८·१३९८. १·१७४, ६·२९५, १२·५१, १३·१०१६, १५·३४१, १५·५०४. **उभा-भी-भें ठाकणें** ४·९५, ९·३०५, १०·१६६, १०·२३३, १३·५०२, १६·१९१, १६·४४१, १७·३३०, १८·२६२, १८·८९६, १८·१७४९; **उभा ठेला** १८·१५३८, **उभें ठेलें** ९·५१; **उभा,** सज्ज, २·५३, १६·४२८; **उभा,** साहाय्य करण्यास सज्ज, **पाठिं उभें** १४·९३; **बाहे उभा** १८·१६२६; **उभा-भी-भें,** सतत, संपूर्ण, पूर्णपणें, १३·१३५, १३·५०६, १७·२४७, १८·१२१०; **उभा ना बैठा** ११·२७३; **पडिलें उभें** १६·१५०; **बेंठा कां उभा** ११·२७०; **बैसला कीं उभा** ११·२२२; **मृता उभेया** १३·१०९५; **उभेयां,** उभा असतांना, १·१३५, १·१६३, ८·६२ (१); **उभाट,** उंच, १३·४६; **उभेपण** ८·६२ (२).

**उभारणें**—उभें करणें, रचणें, स्थापना करणें, प्रवृत्त करणें. कर्ता क्रिया जे उभारी । १८·५०४. गीताश्रवणीं श्रद्धा । उभारी जो ॥ १८·१५१९. १८·४६५, १८·१४२६. **अपाययंत्रें उभारिति** १६·३४२; **आंगवटा उभारिला** १८·७४९; **उभारलेनि दंडें** ६·२०२; **महाभूतांचें दलवाडें उभारी** ५·७८; **संपूर्ण पद उभारे,** ६·१९; **उभारणी** १६·२५४, १८·३६४; **उभारा—कर्मांचा उभारा** १८·३०२; **उभारा करितां** १८·३९.

**उभावें**—उभारलेली रचना, मांडव इत्यादि. गगनावरि उभावें । घडे केवि ॥ १०·१२.

**उमचणें**—मोकळें होणें, सुटणें, देण्याची फेड करणें. द्वारि उमचावेया । झुंबारु ये डाया । १३·५४०. १८·१५६१. **घेतलें उमचों न सकतां** १७·२८८. **नुमचवणें—काइसेन हीं नुमचवे,** कशानेंही परतफेड केली जाणार नाहीं, १७·२७७; **नुमुचणें—कोण्ही आंगें नुमुचे,** कोठल्याही बाजूनें परतफेड होणार नाहीं, १७·२८१.

**उमजणें**—लक्षांत येणें, समजूत पटणें, बोध घेणें. हा उमजे आतां कवणी परी । २·८५. १४·१११, १४·१५५. **उमज** ५·३.

**उमटणें**—बाहेर येणें, स्पष्ट दिसणें, उद्भवणें. वाणें उमटत आहे मा आकाशीं । साहित्या रंगाचें ॥ ६·१३३. मोटकी देहाकृति उमटे । ६·४५०. चतुर्विधु ठसा । उमटों लागे आपैसा । ७·२३. ९·७३, १४·२००, १५·४१०, १८·१४२३. **अविद्यांचें दांग उमटलें** ११·२१३; **अवेव उमटति** १४·९७; **आंगिं उमटैल** १३·२९१; **चित्र उमटे** ११·१८०, १५·४११, **संसार** – ५·१५५; **जीविं व्यथा उमटे** १६·१५८; **देहिं चिन्हें उमटति** १३·१८३; **मूर्त्ती उमटलिया** ११·२७९; **रागेंसिं उमटतां,** रागाचे आरोहावरोह दिसतील, १०·१४१; **सिंपी चि पुव्हडें रूपें उमटे,** सूर्याचे किरण शिंपल्यावर पडले तर शिंपीच्या आकाराएवढेंच रुपें दिसेल, १५·१०५. **नुमटणें—बालपणाची फूली नुमटतां,** कोवळें बाळपण गेलें नाहीं तोंच, १०·२६६; **मनीं काहिं नुमटे** १३·४७६.

**उमडणें**—दिसूं लागणें, उत्पन्न होणें. विषायें घुणाक्षर उमडे । १७·२९९.

**उमप**—पुष्कळ, अतिशय, फार, अगाध. तेया उमपा माप कां सुआवें । ७·१५२. सुख जें उमप । अद्वैत जें ॥ १४·४०२. डाहालिया जांती उमपा । ऊर्ध्व हिं उजू ॥ १५·१४३. १३·९८५, १४·८९, १८·८६७, १८·१५११, १८·१६८४. **उमपा आत्मेयां(या)तें देह वरि मवी,** अमर्याद आत्म्याला देहाच्या मापानेंच मोजतो, १८·३८२; **उमपें रूपें** ११·११५.

**उमरडणें**—ओलांडणें. स्वर्गींची आडवंगी । उमरडूनि ॥ १३·१६२.

**उमलणें**—(१) फुलणें, विकास पावणें. तें उमललें

अष्टदल । ठेउं वरि ॥ १५·६. १४·९०. **आखाड-अभ्रें उमललीं** १५·१२४; **गर्भपत्रें उमलती** १५·९८; **महातत्व उमललें** १५·९३. (२) फुगून ढिलें होणें, गळून पडणें, लय पावणें. **प्रकटिया सृष्टि उमलती**, प्रकट झालेली सृष्टि लय पावते, १५·१२५; **हरडी उमलैल** १३·५६३.

**उमसणें**—सांगणें, उघड करणें. जें भिन्नाभिन्नव्यवहारें । उमसिजैल ॥ १५·३०३. **नुमसणें**—जीउ जाऊं परि नुमसे । ठेविला ठाऊं ॥ १३·२०२, लोभी जीव गेला तरी ठेव्याचें स्थान उघड करीत नाहीं, सांगत नाहीं. **मी कर्त्ता हें नुमसे** १८·६३१.

**उमाणणें**—मोजणें, झाडा घेणें, अंदाज करणें. हा संसारु उमाणितें माप । ६·४६१. ८·१००, १७·३०४. **महेंद्रमहिमा उमाणिली**, गोवर्धन पर्वत उचलून त्याच्या खालीं गाईगोपाळांचें इंद्रानें केलेल्या अतिवृष्टीपासून रक्षण केलें हा संदर्भ आहे, इंद्राच्या महिमेचा झाडा घेतला व तो कमी आहे असें दाखविलें, १०·२६६; **उमाणें घेणें**, १३·११५२, १८·४९७, १८·५११, १८·११८५.

**उमाला**—लोट, पूर; प्रेम, राग इ० विकारांचा आवेग. **पोकळिचे उमाले**, पोकळपणाचे लोट, अवडंबर, ११·४५९; **महामृत्यूंचे उमाले** ११·३५९; **महामेघांचे उमाले** ११·४७९; **उमाले उठिति**, अंकुर फुटतात, १५·१२३.

**उमाह**—महापूर. काइ प्रलयांबुचा उमाहो । वोघु मानी ॥ १८·४१०, प्रळयकाळाचा महापूर नद्या-ओहळांचे ओघ गणतींत घेईल काय?

**उमेठ**—जमाव, मेळावा. **भूतांचीं उमेठें** ७·१७७. **उमेठा**, आधिक्य, **उमेठा चाचरु मांडतां**, अतिशय चाचरूं लागला असतां, १८·१५८८.

**उर**—छाती. आइूं पाउलांची मुद्रा ।. मीं उरीं वाहें जे सुभद्रा । ९·४७७, पावलाचा जो शुभ ठसा अजुनही मीं छातीवर धारण केला आहे. भृगूनें ब्रह्मा, विष्णु व शिव यांच्या सहनशीलतेच्या परीक्षेकरतां विष्णूला छातीवर लाथ मारली याचा निर्देश येथें केला आहे. या छातीवरील डागाला श्रीवत्सलांछन हें नांव आहे. पुढील उरीं आदळे। १३·७५७, चालतांना न दिसल्यामुळें पुढें आलेली वस्तु छातीवर आदळते; **उरीं हालासि**, छातीवर लाथेनें मारला गेलास, वरील ९·४७७ पहा, ११·१०५, **उरु कुहिजैल** १३·५५९; **उराउरी**, ऊर पहा.

**उरग**—सर्प. १७·२२४. **दोरिएचेया उरगा**, दोरीला सर्प समजून, १५·२२८. **सुरनरउरग** १३·१५८.

**उरणें**—बाकी राहणें, शिल्लक राहणें, मग तत्वता तत्व उरलें । ज्ञानियासि ॥ २·१३१. परिमलु घ्राणीं उरे । ६·२४६. मरणें चि मृत्यु मारी । आपण उरे ॥ १३·५५१. काहिं चि नुरोनि उरे । जें कां हिं (जें कांहीं–ज्ञानदेवी) गा ॥ १८·९९९. २·१५४, ३·१२१, ३·१२५, ३·१५४, ३·२६५, ४·६२, ४·१४७(१), ५·१३३, ६·३००, ८·११५, ८·१६९, ८·२४९, ९·५३, ९·२३६, ११·४२, १२·१८३, १३·६५३, १४·५३, १४·२२८, १४·२३६, १५·३८१, १५·४७६, १५·४९४, १५·५३०, १६·७६, १६·१३९, १६·३४८, १७·३७२, १८·२६१, १८·३९६, १८·४२०, १८·५३०, १८·५६५, १८·७९७, १८·९७१, १८·११०४, १८·११२०, १८·११९५, १८·११९७, १८·१२०५, १८·१२६०, १८·१४०५, १८·१७७१. **अहंभाओ उरला होआवा** ५·९४; **आकाश हि वरि उरता** १५·५१६; **आगा उरैल**, दूरच राहील, ३·२२२; **आग्रहो चि उरे** ३·६३, १८·१२७९; **आमचें काइ उरैल** १·२३४; **(हितालागि) काइ उरैल** १३·५७५; **काहिं उरे** १८·४०९; **कें उरैल** ५·९२; **कैचें उरैल** ८·९९; **कैचें काइ उरे** ५·३८; **चिखल उरे**, चिखल तेवढाच मिळतो, ९·५७; **जीविं उरे** ८·७३; **जैतेंसि उरिजे**, जय मिळेल, २·२३२; **निखल उरे** ८·५१, ९·७९; **पदर उरे** ६·२३७; **बोलु उरला** २·२०८; **मनीं उरिजे**, आदर करील, १·२२७; **उरणें नाहिं** १५·४०६; **उरत दीसे** १७·३१४; **उरावेया कारण** १८·१३७१, १८·१४०२; **उरे चि ना** ६·३०९, १८·१०६७, १८·१३७६; **उरेचिना** ४·१४७(२); **उरों ठाकों जावें** १८·५९८; **उरों नेंदिसी** १८·१५४९; **उरों नेंदी** ६·२१७, ११·१९३,

१२·११९, १३·१७१, १३·५२३, १३·७१९, १६·३४९, १७·४०९; **उरों नेंदील** १५·२३९; **उरो(रों) आहे** ९·५५; **उरौनि** १८·१३५१. **तुरणें**—**तुरती** १७·१७२, १७·४०५; **काहीं तुरवी** ६·२३९, ९·३९७; **तुरावेया** १६·३९०; **तुरे** ३·२, ४·११२, ७·१११, ९·४१५, १३·११३६, १५·२७०, १५·२७२, १५·२८३, १६·११, १६·४६, १६·१३८, १७·२४७, १८·१६७, १८·११५६, १८·१२५८; **तुरैल** १५·२३८; **तुरो** १७·३६८; **तुरौनि** १८·९९९; **तुरौनियां** १७·१८१; **तूरे, ऊरणें** पहा.

**उराउरी**—छातीस छाती लावून, झटकन, लगेच. केवि उराउरी मज। पूसों येईल॥ ११·३६. **उराउरी भेटति**, छातीस छाती लावून भेटतात, १८·४७; **उराउरीं**—चांग तें उराउरीं मागों। ११·५४२.

**उरिण**—ऋणमुक्त. **आजि मज उरिणें जालिं**, आज माझ्या ऋणांतून मुक्त झालीं, १६·३३.

**उरुयें**—श्रेष्ठ. **उरुयें...हीन** ५·९३.

**उरोधणें**—विरोध करणें. **तुरोधिं**, याला विरोध करूं नकोस, १५·२२२. **उपरोध** पहा. **उरोध**—**तुसीं सदमुख उरोधु करूं** ११·५३६; **उरोधु वाडुवलु**, वाचेच्या अवगुणांपैकीं, १३·२७०.

**उर्ध**—वर, उंच, वरच्या बाजूस. मग केतिकां खांदो-खांदिं। येया हिंडावें उर्धि अधिं। १५·२२७. तेव्हालिं उर्ध कां उर्धि मूल। ना अधिचें हान शाखाजाल। १५·२४०. १५·६३, १५·७२, १५·७८, १५·८७, १५·२०९. **उर्धिचें मुदल मूल** १५·१७५; **उर्धिचेया ब्रह्मादि मनुष्यत्व चि होए** १५·२०५; **उर्धमुख** १५·१८९; **उर्धमूल** १५·६२, १५·१७८, १५·२०२, १५·२०६(२), १५·२४१; **उर्ध शाखा** १५·६४, १५·२०९; **उर्धशाखांचा पैसारु** १५·१९६; **अधोर्धीचां शाखिं** १५·१७६; **अधोर्धशाखु** १५·२०६ (१); **अधोर्द्ध** १५·९०; **मध्योर्धअध**, मध्यें, वर, खालीं १५·७३; **उर्ध्व** १५·२०४; **उर्ध्विचें खंड** ६·२३२. **ऊर्ध** पहा.

**उर्मि-र्मी**—लहर, लाट, वेग, उमाळा. जो कासे लागौनि तरे। तेया पन्हती उर्मि तुरे। १८·१६७. ३·७०, १३·४९७, १३·६६६. **उर्मीभारें** ११·२४८; **क्रोधोर्मि** १६·१२८; **भूतउर्मी** १३·४८९; **विश्वासोर्मीचेनि बलें** ११·२४५; **विषयोर्मीचे कलिया**, विषयलाटांच्या तरंगाचे भाग, ७·७३; **समुद्रोर्मि(र्मि)** १६·३६४; **सुखोर्मीचेनि बलें** ९·५२३.

**उर्वी**—पृथ्वी, यज्ञाकरतां तयार केलेली जमीन. ८·४८.

**उलग**—सेवा, कष्ट, व्यवसाय. **प्रवृत्तिचे उलगीं** १८·४५५. **उलिग** पहा.

**उलंडणें**—कलंडणें, उतास येणें, उलटून पडणें. जैसें उलंडलें कालकूट। धरी कवण॥ १·८९. पृथिवीतल उलंडों पांत। १·१५६. देखें अमृतकुंभु जोडला। तो पायें हाणौनि उलंडिला। २·२५२. २·१४१, ६·२१८. **नक्षत्र जैसें उलंडलें** ६·२२६; **विषयांचें विष उलंडुनि** ८·१०२; **शाकांसिं उलंडैल**, शाखांसहित उलटून पडेल, १५·५०; **स्वभावें उलंडौनि जाये**, द्रवपदार्थ असल्यामुळें साहजिकपणेंच तें सांडून जाईल, १८·३६९.

**उलथणें**—उलटें करणें, उलटून, उपटून पडणें. **उलथौगि(नि) पडति** ११·४६२; **कर्मवेली उलथौनि सांडिति** १३·१६४.

**उलिग**—**उलग** पहा. उलिग मी करीन। आंधो-लिचें॥ १३·४१८. चातुर्वर्णा धातली (लीं)। सिनानि उली(लि)गें॥ १८·८१४. ९·३१९. **पयां पायां उलिग घापे**, पाय श्रम घेतात, १७·२०१.

**उल्व**—गर्भावरील वेष्टन. ना तरि उल्वाची खोली। गर्भस्थासी॥ ३·२५५.

**उल्लाल**—उसळी. **उल्लालु घेति** ७·७३.

**उल्हाटणें**—उलटून पडणें, मागें फिरणें. ना तरि भेडा उल्हाटे। विवसां जरि॥ ७·९१, भित्र्या मांत्रिकाला पाहून हडळ मागें फिरेल काय? **उल्हाटशक्तिचेनि उजियेडें**, कुंडलिनीच्या प्रकाशांत, ९·२१३.

**उल्हासणें**—आनंदित होणें. समुद्र कां वायुवसें। तरंगाकार उल्हासे। १५·३१२. १४·३८४, १८·१२४२. **उल्हासतसे** १८·१२९३; **उल्हा-सितु जाला**, लाटा वर उसळूं लागल्या, ११·११४; **कंठु उल्हासता स्वर्गु**, कंठस्थानीं आनंद देणारा स्वर्ग, १४·१०४; **उल्हास-सें** १·८४, ४·१०५, ९·३३, ९·३७८, ९·५०७,

१५·३६७; **मृगजळाचेनि उल्हासें काइ भूमि तीमे,** मृगजलाच्या आनंदातिरेकानें (वर्षावानें) काय जमीन भिजेल?, ९·१३६; **श्रीमंतांचा उल्हास** १८·४९३; **सुख तेथ उल्हासु** १८·१६१८; **सुख जेणें सोल्लास,** सुखाला ज्यामुळें आनंदाचा बहर येतो, १८·१७०६. **उल्हसणें—उल्हसे** १५·३८३.

**उवल**—स्पष्ट दिसणारा, शुद्ध. उवल उदैजेला चंद्रांशु । १६·१. **निःप्रपंचें उवलें** १३·३६५.

**उवाइणें**—विस्तार पावणें, पसरणें, आनंदित होणें, बोध घेणें. उवाइला अवयव पसरी । २·३०२. २·३७२, ५·१४२, ५·१६१. **उवाइला ठाइं** ६·२१५; **उवाइलेनि चित्तें** ११·६२६; **उवाईं पडिलां** ९·५०४; **उवाॐ,** विस्तार, ३·२७१, **आकाशाचा उवाॐ** १८·१२१४; **उवाॐ धरूं तुझां चि आंगीं वोलगे,** उत्साहानें जवळ यावें तर तुझ्याच ठिकाणीं समावेश होऊन राहतो, १७·१०. **उवाय—उपपत्तिचेनि उवायें,** उपपत्ति पहा; **वयसेचेनि उवायें** १३·७७०; **उवाया येणें—कैवल्याचा उवाया यावें,** कैवल्य प्राप्त करून घ्यावें, १६·२६८, **येणें नीकें उवायाये (उवाया ये),** यामुळें खचित सुख लाभतें, १७·१३५, **उवावो,** आनंद, **साउमा उवावो घेआवा,** प्रत्यक्ष आनंद घ्यावा, १६·६१.

**उवील**—सायंकाळ. पैं ब्रह्मा प्रातःकालु । विष्णु तो मध्यान्हवेळु । सदाशिव उवीलु । बालका येया ॥ १४·११०.

**उवेढा**—वेढा उठविणें. **उवेढा केला** ११·३८२.

**उशि**—वर्णन,प्रसिद्धि. या अर्थाला उपपत्ति सांपडत नाही. जें भवरुखु हा जाणे। उशि ऐसी॥ १५·१४२, ज्ञानदेवींत **उशि** ऐवजीं 'उखि' असा पाठ आहे.

**उशिना**—उसणें घेऊन, अधिक नेटानें. उशिना घाइं जूझावें । २·१९०.

**उष्ण**—गरम, तापलेलें. सीत वेढावें । उष्ण पांघुरावें १२·६५, थंडींत थंडीचेंच पांघरूण घ्यावें व उन्हाळ्यांत उन्हाचेंच आच्छादन करावें. **उष्णोदक** ८·१९५; **उष्णता**—अंगारकणीं बहुवर्सि। उष्णता समान जैसी । १३·१०५७, **वन्हि उष्णता अभेद जेवि,** आगीची उष्णता सारखीच असते, १३·९०८.

**उसंतणें**—शेवटास नेणें, पुरें करणें, विसावा घेणें. **कृच्छ्रादि व्रतें खरपुसें उसंतितां** १६·९१; **उसंतु कहीं चि नाहिं,** कधींही विसावा नाहीं, १८·१२६९. **नुसंतणें—विंवसी नुसंतितां,** हडळीचा शेवट लागल्याशिवाय, तिला घालवल्याशिवाय, १७·३०९; **जांभैयांची परिवडी नुसंते,** जांभयांचा प्रकार सारखा चालू राहतो, जांभया सारख्या येतात, १४·१७९.

**उसपणें**—उसपाउसप करणें, खणून बाहेर काढणें. एका कणा लागि उंदिरु । असिका उसपे डोंगरु। १८·३०४. **आंधारें उसपतां** ११·३४०.

**उसलणें**—जोरानें वर येणें. समुद्रजल उसलत । आकाशवेन्ही ॥ १·१५५.

**उससणें**—वेगानें बाहेर येणें, वाढणें; दीर्घश्वास टाकणें. मणिजु उससे । अवेवु तो ॥ १४·९८. कावरें झाड उससे । १५·१०८, आभासात्मक असें झाड वाढतें. **आयुष्यनदी उससे** १७·१३१; **उससौनि,** जोरानें श्वास सोडून, ११·२४९. **उससा** श्वासोच्छ्वास. व्यग्रता पडे मिठी । उससाचिया ॥ १८·१५८७, श्वास कोंडल्यामुळें कावराबावरा झाला.

**उसासणें**—उल्हसित, आनंदित होणें. **दुष्कृतीं चित्त उसासे,** वाईट कामांतच आनंद मानतो, १४·२४८; **देहाधाराचा उसासा,** देह धारणास तोच एक विसावा असतो, १६·४१३. **उससणें** पहा.

**उसिटणें**—उष्टें करणें. **उपाधि उसिटिलें** १८·२१. **उसिटा-टें, उसिटा खीचु,** उष्टा खिचडा, ८·१४२; **श्रीगुरुचें उसिटें** १३·४४८; **कुहिलें उसिटें** १७·१५३.

**उंसिसी**—उशी. न करवे उसिसी । अजगराची ॥ १३·५१४.

**उहरवणें**—उद्धार करणें, पलीकडे नेणें. पर्कि पाखाणि वाउनि उहरविलि। समुद्रीं कटकें॥ १०·३५, रामाच्या नलनीलांपैकीं नलानें दगड वाहून, सेतु बांधून सैन्य पार केलें, ज्ञानदेवी—'**उतरलीं**' १०·३६.

**उहीपुही**—वाटाघाट, साधकबाधक विचार, चर्चा. ६·८९.

# ऊ

**ऊंच—उंच** पहा. ऊंचा मुखा माजि धांवत । ११·४१६. **ऊंची,** उंचपणा. कां आकाश ऊंचिया जींके । आवडेतेया ॥ १८·८५९, उंचपणांत आकाश कोणत्याही वस्तूला जिंकेल, कोणत्याही वस्तूपेक्षां आकाश अर्थात् उंच असतें. **ऊंचीं,** उंच जागेवरून, ९·२२३.

**ऊटणें—उटणें** पहा. पुडुतीं पुडुतीं पुटें । भांगारा देतां ऊटे । १०·५५, एकावर एक पुटें दिल्यानें सोनें जास्तच चमकतें.

**ऊठणें—उठणें** पहा. **ज्वालाचे उभडु(ड) ऊठित** ११·३०८; **आवडि दूणा थाउं ऊठी,** विषयाची आवड असली म्हणजे वर्णन करतांना दुप्पट जोर येतो, १२·१६०. ऊठि—उच्च स्थान, पदवी, प्रतिष्ठा. **इंद्रपणाची ऊठि उतरे** ९·३२५.**नूठणें—आधवणी नूठिं,** अर्धतृप्त राहून मी उठणार नाहीं, १६·३०; **काहिं केली जीभ नूठील,** कांहींही केलें तरी जीभ उचलणार नाहीं, बोलतां येणार नाहीं, १३·५६४; **गतायु नूठी** १६·१२८; **नूठी चि ध्रुवा जावों,** ध्रुव जाण्यासाठीं उठणार नाहीं, १८·४१८; **मरणवटे पडिलें नूठी,** (जन्म) मरणाच्या फेऱ्यांत सांपडल्यावर सुटका होत नाहीं, १४·२७१.

**ऊणें—उणें** पहा. **पांडवांचें ऊणें कीजे चि ना** १५·२५.

**ऊब—उब** पहा. आणि ऊबे उबगणें आगी । १८·२१८. विस्तवानें उष्णतेला कंटाळून चालत नाहीं.

**ऊर—उर** पहा. ऊरीं आदळलेयां मरण । ८·६८.

**ऊरणें—उरणें** पहा. तूंपण ऊरे ॥ १२·९९. **नूरणें—नूरे** १७·११, १८·४०५, १८·४१८, १८·१५५१; **नूरौनि** १७·१८.

**ऊरू—**मांडी. ६·१९२.

**ऊर्ध—उर्ध** पहा. तैसें मध्य ऊर्ध अध । हे जे गुणत्रिभेद । १४·२७६, सत्व, रज व तमाचे हे भेद. १५·१४३, १५·१४४. **ऊर्ध तल्हौतें त्यांचे,** ऊर्ध्ववायु खालीं रेटला जातो, ६·२३७; **ऊर्ध ना अधि** १५·१५५; **ऊर्धपंथें** १४·२९७; **ऊर्ध्विं** १५·९०, १५·९२; **ऊर्ध्वें** १५·६०, १५·१९८; **ऊर्ध्विंचिया रिगिनिगा** १८·३३५;**अधऊर्ध्व गुडें काढी,** योगशास्त्राप्रमाणें शरीरांत असलेल्या प्राणोपप्राणांच्या मर्यादेसाठीं खालींवर-अधऊर्ध्व-घातलेले दगड-गुडे-काढून टाकतो, १८·७३६; **नवां प्राणु** सं. वा. श. पहा; **अधोर्ध्वें** ११·१८८; **अधोर्ध्व**—कां अधोर्ध्व अवयवां । नांव देह ॥ १३·१५१; **ऊर्ध्वमूल** १५·५६, १५·५७, १५·१५३; **उर्ध्वमूलांतीं, 'ऊर्ध्वमूलं'** या १५·१ श्लोकारंभापासून अखेरपर्यंत, १८·१४३९; **ऊर्ध्वांउजू** ६·२२८; **ऊर्ध्वत्व** १५·७२.

**ऊर्मि-र्मी—उर्मि** पहा. २·७०. **ऊर्मि व्यापिला** २·६९; **ऊर्मीवीण,** वर्षाव न करतां, ४·११६

# ऋ

**ऋक्—**ऋग्वेद. **ऋग्यजुसामु हे तीन्हीं** ९·२७६; **ऋग्वेदादि तीन्हीं,** ऋक्, यजुस् व साम हे तीन वेद, १७·२२१; **ऋग्यजुःसामे(में)** १५·१६५.

**ऋख—**नक्षत्र. चांदिं ऋखें जैसिं । दिनोदइं ॥ १५·२८२, दिवस उजाडतांच चांदणें व नक्षत्रें जशीं दिसेनाशीं होतात तशीं.

**ऋद्धि—**वाढ. योगानें मिळवलेली समृद्धि, ऐश्वर्य. **विषय ऋद्धिचेनि मीसें पावति,** विषय हे ऐश्वर्याच्या भुलावणीनें इंद्रियांना गांठतात, २·३१३. **प्राप्ति(प्तिं) ऋद्धिसिद्धिं,** मिळालेल्या ऋद्धि व सिद्धीमुळें, २·३५९. **रिद्धि** पहा.

**ऋषि—**तपश्चर्यादि पुण्यकर्में सतत करणारा साधु पुरुष, वेदमंत्रद्रष्टा. पैं कश्यपादि ऋषिकुळें । ११·२५९. **पितृ ऋषि विद्याधर** १५·१९३; **देवऋर्षीं आंतु...नारदु तो मी** १०·२१६; **महर्षि—जें महर्षी वांटलें,** जें महर्षींच्या वांट्यास आलें, ५·१४६; **महर्षीमाझि** १०·९०. **रिखि, रिषि, रुषी** पहा.

# ए

**ए**—हा, हें. ए कामिं बुडकली । यावी किं नां ॥ १८·७०१. **आधिं ए दीठिचें** ६·२०५, 'आधिये' असा पाठ ज्ञानदेवींत आहे. **एआ,** ह्या, ह्याला, ६·१५१, **एआ अभिप्रायाचा** ६·३१२; **एआ कारणें** ६·४७९; **एआ जालेआ मानसा** ६·४२२; **एआ बोलाचा** ६·३१५; **एआ सवे होईल** ६·३८१; **एआं,** यांना, ६·३६३; **एया,** ह्या, अशा; **एया छेदु न घडे** २·१४५; **एया तरुचें** १५·७८; **एया परीं** ९·४०१; **एया बोला** १०·३०३; **एयाचा** १३·६१; **एयाचेन** १३·६४; **एयाचेनि** १३·१७; **एयातें** १३·१०२२; **एआ-या लागि** ६·४१६, ९·४७०, १०·२८०, १०·२९३, १३·७०; **एयालागि** ३·२०४, ७·११९; **एयावरि** १०·११७, १३·७२, **एया ही वरि** १०·२८२; **एयां** ३·२५९ (२), ४·१५३; **एयां दोघां** १·११८; **एयातें** ३·२५९ (१), **एयांतें साधावेया,** यांना स्वाधीन करून घेण्यास, ३·२६०, **एयां लागि** १६·२३०; **एयासि** ६·१५०; **एहिं,** यामुळें, ३·२५८, **एहीं,** यांनीं, ३·२४७; **एहींविण,** ह्यांच्याशिवाय, ३·२५७. **ए,** येतो, **एणें** पहा. **ए** व **ये** हे प्रयोग सुटे किंवा शब्दास जोडून अनेक ठिकाणीं आले आहेत.

**एउतें**— -कडे. **अर्जुना एउतें** १०·५२; **झाडा एउतें** ९·३७१.

**एक**—पहिली संख्या दाखविणारा शब्द. एकटा, एकादा, कोणी एक, प्रत्येक, कित्येक, तेवढा मात्र, अपूर्व, सारखा, बरोबरीचा, त्या विरुद्ध दुसरा एक. परि एक चि कूड करीति । २·२५०. एयां अैहिक ही एक धड नाहीं । ४·१५३. तेथ विश्वा एक आपण । ११·२४१. मीं आत्मा एकु चराचरीं । किं ह्मणति एकाचा आडलु करी(रीं) । आणि कापौनि एकां मारीं । हें चि रूढवीति ॥ ९·१६७. एथ एकु एकातें पोखी । ऐसे बहुत पदार्थ एकिं । संपजति ते लोकीं । संपत्ति ह्मणिपे ॥ १६·६५. एकांतें सावधां मारीति । एकांचीं सर्वस्वें हरीति । एकां लागि उभारिति । अपाययंत्रें ॥ १६·३४२. **एक ही करणें नाहीं,** कांहींच करावयाचें नाहीं, ९·११२; **एक चि करुनि दूसरें,** एकच वस्तु दोन आहेत असें दाखविणें, १५·२४३; **निर्मलत्व एक जालें,** निर्मलपणा तेवढा राहिला, १३·४७३; **एक जालेयां,** तादात्म्य झाल्यावर, १५·२३८; **एक होंति,** समावेश होतो, १३·९३२; **देवेंसि स्वयें एक होंति** १५·२९०; **चैतन्य एक,** तेंच अद्वितीय, २·१७७; **एक निश्चित,** ठाम असें एक, ३·३१; **एक पारणें,** अपूर्व पारणें, ४·२१९; **मनाचें एक नीकें** ६·४१९; **शरीर तरि एक,** तेंच, २·१०८; **समर्थु एक(कु),** एकादा समर्थ, २·९६; **एक...एक,** हें, तें, ५·९३, एक, दुसरा, १३·१०९४; **एक एकातें,** एक दुसऱ्याला, १·१६३, **एकएकांचेन,** प्रत्येकास, १५·१४८; **एकएकि नवाई,** एकेक विलक्षण, नवलपणाचें, ३·११; **एक...एरु** ३·३६ व ३·३७ पहा. **एका एका,** प्रत्येक, निरनिराळ्या, १७·४०७. **एकासिं**—कैंचें एकासिं मज दूसरें । १५·३०३. **एक चि,** एकाच प्रकारचे, योग्यतेचे, ६·३९(१), ६·४२, ९·८५, १३·१०७१, १८·३२९; **एक चि केवढें पसरलें,** एकच असून केवढें पसरलें, ११·४२८; **एकाचिं एकिं,** एकासारखीं एक, १३·१०५२; **एका चि ठाया** ६·४१, १०·२८३; **एकासवें,** त्या एका कौमार्याबरोबर, २·१०९.**एकु शिष्यु एकु गुरु,** १८·१२१९;**एव्हडें एक** १५·१७; **काइ एक,** काय काय, केवढें तरी, १०·२६९, ११·५४८, कोणतें बरें? १७·३१७; **काइएक** १०·२४३; **काहिं एक,** काय बरें?, सर्व कांहीं, १८·११६७, १८·१४११, **– मानसीक भाव** १२·७९; **कोडि एक** ११·२९५; **कोण्हि एकिं अवसरिं** १५·३२५, **कोण्ही एक** १३·१०३१; **कोण्ही एकीं अवसरिं** १३·३९१; **कोण्हीं एकिं अवसरीं,** १८·६४२; **कोण्ही एकी वेळीं** १३·३९७; **कोण्हीं एकु वाटे जातां** १७·२८८; **क्षण एक** १·२३०; **तैसें एक** ६·१६३; **नांव एक, नांव** पहा; **बहुतां एकां** ७·१००; **शत एक,** १५·३१; **एक दाटें, दाटणें** पहा; **एक दोनि,** थोडेसे, १·१०४, **एकदोनि घांस** ६·२३१; **एकदु झोंबे,** एकदम जाऊन भिडतो, १८·१६६; **एकत्र,** १८·११४४; **एकत्व-त्वें** ६·३९३, ९·२४६,

९·२४७, १३·१५५, १५·४०४; **एकपण** १८·११९५, १८·१२००, १८·१३८९, **–णा** १४·३९३, **–णें** १८·१०००, १८·१५७७; **एकमेक** १३·१४६, १८·२९३; **बहुतां एकाचिया संपत्ति**, अनेकांचे ऐवज, १६·३४६; **सकलैक** १३·४०८, **एकैक** पहा. **एकि**—(१) एकच. विस्फुलिंगि सर्व । वन्हि एकि ॥ १३·१०८०. कां बालका एकि माए । वांचौनि जीणें काइ आहे । १८·९०४. (२) एकत्व, परि एकि केधवां गेली । १५·१२४. **एकिं अर्थिं** १८·८६; **एकिं एक गीलिलें**, लहान तरंग मोठ्या तरंगांत लुप्त झाले, १८·४३९; **एकिं देहीं वयसात्रय** १४·१३९(२); **एकि दोनि वेल** १५·२३७; **एकिं मतिवंतीं**, कांहीं ज्ञात्यांनीं, १३·४१; **एकिए विनतिए** १५·२८९; **एकी कडे, एकीकडे**, कडे पहा; **एकी चि कालिं** १३·४३८; **एकी दीचेनि पराजें**, एका दिवसाच्या पोसण्यानें, १६·२२५; **एकी परी**, एका प्रकारें पाहतां, ६·३७४, एका रीतीनें ६·३७८, १५·४२; **एकीवडे करीतु**, एका बाजूस सारून, १८·६२२; **एकि वस्तु**, एकच तेवढें सत्य, १३·१०४१; **एकी चि बुद्धि**, हाच एक विचार, २·२४२; **एकी चि वृत्तिचां ठांइं** १४·१३९ (१); **एकी हातीं**, १·१२; **एक हेला**, ९·२९६, **एकी हेला**, एकाच वेळीं, एकदम, ९·१२९; **एकीहेला**, एकदां, १०·२४३, ११·४८; **एकीं आंगप्रांतीं** ११·१४०. **एकु**—जगीं एकु तेजसु । सूर्यो हा ॥ १६·२२८, तूं आपणपेयांतें कल्लोलु एकु करीं । ९·९२, तूं आपणा स्वतःला एक तरंगच समज. **ईश्वरु एकु अकर्त्ता** ५·८४, **एकु चि**, तेवढा एकटाच, ६·३९ (२), ७·१२, ११·६९१; **एकु माझा भाऊ**, ९·४२८; **मी एकु** ९·८२, ९·२४६, ९·४६६; एकु मी चि ऐसें जाणावें । वस्तुजात तें॥ १०·२८१; **एकु वेल** ५·१६६; **तरि एकु वेलु** ११·४३९; **वेलु एकु** ९·२०६; **एकु ना विविधु**, १३·११०५; **एकु ...सकल लोकु** २·९९; **चंद्रेंसिं एकु न्हवे**, चंद्रावर डाग असला तरी त्याचें चंद्राशीं ऐक्य नाहीं, १८·२७१; **संतोखु एकु** ६·१४४; **एकें...एकें**, कांहीं असे, कांहीं तसे, विरोध दाखवितात, ११·१२४ ते ११·१४० पहा. **इयें एकें इंद्रियें**, एवढीं इंद्रियेंच, ६·९०; **केतुलेनि एकें अवसरें** ६·४१८; **एकें अंशें**, कोठल्यातरी एका भागानें, १८·१६७०; **एकें चित्तें**, चित्त जरी एक असलें (तरी भावना निराळ्या असतात), १३·४७९; पुढें **एकचित्तें** पहा. **एकें पाडें** १३·४६१; **एकें लक्षें**, एक लक्ष श्लोकांनीं, १०·२९; **मज एकें विण**, मला वर्ज करून, ९·३३०, **एकें वेलें**, वेल पहा. शब्दास जोडून कांहीं शब्द येथें व कांहीं शब्द पुढें दिले आहेत. **एकाक्षर ब्रह्म**, ॐ हें एक अक्षर ब्रह्माचें निदर्शक, ८·११६, **एकाक्षरपणेंसिं**, १८·१५००; **एकाग्र** ६·१८६, **एकाग्रचित्तें** १३·७९६; **एकांगुष्टि(ष्ठिं)**, एक आंगठ्यावर, पायावर, उभें राहून, १७·४१२; **एकांत**, येक पहा; **एकांतर**, एक दिवस सोडून दुसऱ्या दिवशीं जेवणें, व्रताचा एक प्रकार, १७·३६१; **एकानुभवें** ५·२८ (१); **एकाध्याई गीता**, एका अध्यायांत सर्व गीतेचा सारांश असलेली, १८·८३; **एकार्णव**, १२·१८५, १४·१२, १५·४९९. **एकार्थ**, **एकार्थत्वें**, **अर्थणें** (१) व (२) पहा. **एकार्थें**, **अर्थ** पहा. **एकावधी**, **अवधि** पहा; **एकावलि**, **आवलि-ली** पहा; **एकासनीं**, **आसन** पहा; **एकखंड**, अखंड, ८·४३; **एकगम्य**, जाणण्यास योग्य असें एकच, ११·७३; **एकचित्तें**, एकाग्र चित्तानें, १८·१५३०; **एकछत्र**, सार्वभौमाचें छत्र, राज्य, ९·२१६; **एकताली**, हाहाकाराची टाळी, १·१५७; **एकतूक**, एक वजनाचें, एकसारखें ७·२५; **एकंदरें**, शरीरीं एकंदरें । केलें मन ॥ ५·१५०, वैराग्यानें विषयवासना काढून मन एकाग्र करावें, **एकचित्त** व्हावें. ११·१६८; **एकधाम**—**नानाभूतैकधाम** अनेक वस्तूंचें एकच स्थान, ११·५५६, **विश्वैकधाम** १४·२३; **एकनरेंद्र**—**त्रिभुवनैकनरेन्द्र**, तिन्ही भुवनांचा एकच राजा, ६·४८३; **एकनाम**—**प्रणवैकनाम**, प्रणव, ॐकार हेंच एक नांव, ८·११६; **एकनिष्ठ**, विश्वास ठेवण्यास योग्य असें एक, पटेल असें एकच, ३·१८, ५·४, **–वा** २·११३, **एकनिष्ठतेचां पाउलीं** ७·१६८, **वेदैक निष्ठा (वेदैकनिष्ठा) जालेयां**, वेदांवरच निष्ठा बसल्यावर, १६·४५८; **एकनिधान**—**पवित्रैकनिधान**, पवित्र असा एकच

ठेवा, १३·१७४, विश्वनिक्षेपैकनिधान, विश्वाची सांठवण करण्याचें, आधाराचें एकच स्थान, ११·३०३; **एकनिरत, स्वधर्मैकनिरत,** आपल्या कर्तव्यांतच रमलेला, ३·१०२; **एक-पत्नीव्रत** १३·४१०; **एकपवित्र—भुवनैक-पवित्र,** पृथ्वीवरील एकच (अत्यंत) पवित्र असें, १८·१७८२, **सर्वाधिकारैकपवित्र,** सर्व अधिकार असलेलें, आणि अत्यंत पवित्र असें, १८·१४१६; **एकप्रिय—परिणतोपरमैकप्रिय,** १८·९, **उपरम** पहा; **एकभावें, भाव** पहा; **एकमुखें**—जेयाचिं इंद्रियें एकमुखें। स्त्रिया केलीं ॥ १३·७९०, ज्याचीं इंद्रियें स्त्रियांकडे पाहात राहिलीं, जो स्त्रैण झाला; **एकरस, रस** पहा; **एकरूप, रूप** पहा; **एकलभ्य—सर्वशास्त्रैकलभ्य,** सर्वशास्त्रांत लाभण्यास योग्य असें एकच, १५·५३७; **एकवाक्यता, वाक्य** पहा; **एकवाट, वाट** पहा; **एकवीर, वीर** पहा; **एकसरिता–त्रिभुवनैकसरिता,** त्रिभुवनांत एकच अशी नदी, अत्यंत पवित्र या अर्थी, १०·२३७; **एकसारिखा** १५·११०; **एकहातें, एकहाथी, हात** पहा; **एकहारीं,** एका पंगतींत, बरोबरीनें, ३·२५१, १७·३३१, **एकाहारा** १८·२८९, **एकाहारी** १४·५६; **एकीकडे** १८·६२२; **आनंदैककला,** केवळ आनंदच ज्याची कला आहे असा, अंतरात्म्यास उद्देशून, ११·३६४; **पवित्रैक,** अत्यंत पवित्र, १·४९. **आणिक, येक** पहा.

**एकदेशी**—(१) एकाच ठिकाणीं असणारा. तेणें एकदेशिये परि व्यापिलें। लोकत्रय ॥ ५·३६. **व्यापक...एकदेशिय** ११·६९३; **व्यापकु किं एकदेशी** ६·८९. (२) एकांगी, अगदीं पुरा. **एकदेशी मूढ** ३·१७६; **समु...एकदेशी** ९·१६६. **येक** पहा.

**एकधा, एकाध, एकादा**—कोणी एक, कोणताही एक, **एकधा वेळु,** कोणे एके वेळीं, एकदां कधीं तरी, ११·६६८; **एकादेया** १४·१६३; **एकाधा प्रसादु** १४·२३०; **एकाधिए शरीरिं,** कोणा एका शरीरांत, १५·३२९; **एकाधी वेल** ९·२०३; **एकाधेनि अंगें,** एकाद्या बाजूनें, १७·३८५; **एकाधेया वेळा** १३·४४०, **एकोधिये वेळे,** एकाद्या वेळीं, १३·३९५. **येकाध** पहा.

**एकला-ली-लें**—एकटा-टी-टें, केवळ. तरि अवधान एकलें देइजे। ९·१. ३·२५७, ५·५३, ६·२०, १०·९६, १०·२८४, १०·२८५, ११·२३, १३·३९, १३·१०८, १३·३७७, १३·४३८, १३·८१९, १३·८३३, १५·२३६, १६·३५०, १७·३०८, १७·३३३, १८·१२९४, १८·१५८५. **दूजेन विण एकलां** ८·२४; **एकलाचि** १·१०६; **एकलिया** १८·१०१६; **एकलेनि** ८·५४, ११·४६५, १३·८३५, १४·२४६, १५·३०८, १८·१४९१; **एकलेया** ११·९५, **–यां** ६·११६, १८·११३५. **एकलेपण** १८·११५१, **–णिचें** १८·१५५५; **येकला** पहा.

**एकलौता-ती-तें**—(१) एकुलता एक. **एकलौतें अपत्यें** १५·१९, **एकलौतें चराचर** १४·१०९; **एकलौतेया बालका** १३·५०१. (२) एकुलत्या एक मुलाची आई. श्रीगुरु बहुतांची माए। परि एकलौती होउनि ठाए। १३·४०९.

**एकवंक**—एकनिश्चय, एकवाक्यता. एकरूपता, ६·३९५, १३·१७, १५·५३६. **येक** पहा.

**एकवटणें**—एकत्र होणें, येऊन मिळणें, मिसळणें. १·१७, १·२०, ६·४५८, १४·३८७, १६·२५६, १८·१११९, १८·११२४, १८·१२४८. **एकवटथि** ६·२४४, **एकवटिति** १५·२६८; **एकवटलेया प्रेमा** ६·४८२; **मजसिं एकवटलेयां** १८·१४०२; **एकवटूनि** ९·३३४; **एकवट** १०·२५, १५·२८८, १५·३१९, १६·२१४, १७·३४५, १८·३७, १८·११०२, १८·११७७; **एकवटें** १३·९५६, १८·७१९, १८·१६६२. **एकावटणें** पहा.

**एकवद**—एकत्र, ऐक्य. १५·७३. **एकवद करूनि** १८·१०३१, **–होउनि** १८·११३१; **एकावद—त्रिजगती एकावद केली,** सर्वतोमुखीं आपली कीर्ति पसरविली, १८·१७०९; **अहंकारेंसिं एकावदी करूनि** १३·५०.

**एकवला**—ऐक्य. १६·३९१, १८·६४७.

**एकसर**—एकसारखा. **एकसरी देहबुद्धि** १०·२१, **–भूतसृष्टि** ९·११६; **एकसरु निर्वाहो** १३·८१२; **एकसरा** ११·१२२, १५·७०,

–रां ५·४; एकसरिं—एकसरिं दोंदें निघति १३·२७५; एकसरीं फळें पावति १८·२४९; एकसरें, एकदम, न अडखळतां, एकसारखें, ६·१५५, ९·७९, ९·२२२, १०·२८६, ११·१७७, ११·१८५, ११·४६४, ११·६७८, ११·६८३, १७·३८१, १८·४७१. येक पहा.

**एकसरणें**—एकदम पुढें सरणें. तिये कांतिचेनि पाडे(डें) । एकसरे जो ॥ १३·६०५.

**एकाएक**—एकटाच. मार्कंडेयो एकाएकी पव्हे ११·१८६; एकाएकू चि पुरुषु १८·३३०; एकाएकु (एका एकु) गेलेयां, एकांतून एक वजा केला तर, १८·१२०६. येक पहा.

**एकाकी**—एकुलता, तेवढा एकच. ६·१०६. ऐकाकी, येक पहा.

**एकांत**—निवांत स्थान, कायमचें स्थान. बहुत-करूनि एकांतें बैसिजे गा ॥ ६·१८०. पाउलें येंति एकांतीं । हृदइं चि रिगे ॥ १८·९५४. १३·१९८, १८·८३०. ऐ(ए)कांतावरि प्रीति १३·६१२; एकांतु होउनि टाईल, एकांत लाभेल, १८·१३५३; टाईल हा पाठ ठाईल असणें संभवतें. ज्ञानदेवींत 'ठायील' १८·१३६२, असा पाठ आहे. मोक्षाचा एकांतु, ६·३२१; हृदयाचा एकांतिं १३·१३०.

**एकादा, एकाध**—एकधा पहा.

**एकावटणें**—एक होणें, एकत्र येणें, संघटित होणें. हे मार्ग तरि दोन्हीं । परि एकावटति निदानीं । ३·३८. वासना एकावटे, एकच ध्येय स्वीकारते, १४·२११; भावना एकावटलिआ ६·३९२; एकावट १·८९, १·१४७, ६·२२०, १३·४६, १८·१७१५; भूस बीज एकावट २·१३०; एकावटें सात ही पदें ७·१९२; सैन्यें एकावटें सांचलीं ११·४०८. एकवटणें पहा.

**एकैक**—प्रत्येक, एकामागून एक, विलक्षण असें एकेक. हें सांघों काइ एकैक । ५·४५. हें एकैक काइ सांघावें । ६·४०६. ५·१३९, ५·१५३, १०·१९७, १०·२३८, ११·१९६, ११·२०२, ११·२२२, ११·३९१, १३·७६, १३·४०८, १८·११. एकैक वेगळालें १८·६९२; एकैकाचिये लीले ११·२४५; एकैकाचेनि मनोव्यापारें १·१०६.

**एकोध**—एकधा पहा.

**एकोल**—एक वेळ. ९·२०५. एकोल एक वंकौनियां, एक वेळ पुनः सर्व संघटित करून, १८·१३२८. येकोल पहा.

**एटाल**—विटाचा तुकडा, विटकर. पैशून्याचिं एटालें टाकीति, छद्मी भाषणाचा, निंदेचा बडिमार करतात, १६·३९९.

**एणें**—(१) येणें (क्रि.). ए, येतें, येईल, ६·२०५; आपैसें ए १८·११२८; उल्हसों ए १५·३३० (१); करुं ए १८·२२१; कल्लोलु ए, (जसा) कल्लोळ येतो, १८·१३९१ (१); झांकोलें ए १८·१५९४; थोरु ए १८·२०५; दशे ए १८·४८८; दीठी पाहों ए, दृष्टीनें पाहतां येईल, १६·२०२; द्रवत्व ए १८·१५९५; नीद ए १४·१८७; बूडासि ए १५·१९९; वस्तिसिं ए १५·३३० (२); वानिभेदासि ए १५·३०९; वानों ए १५·७९; विचारुं ए, विचार करतां येईल, ५·१; शरण ए १८·१३९१ (२), १८·१४०७; साहों ए ५·१६५; सूर्यु ए १८·१४५९; हाता ए १८·९००, –सि ए १८·४९९; ह्मणों ए १८·२७०, – कायि १६·३६. एं—बोधासि एं १८·११९८. एआवेआ, येण्यासाठीं, ६·४३१; एइजे—स्तुती तरि एइजे चांगावेया। १६·१८, एईल ६·३८२; एउनि १६·३६, १८·१०९; विवेकतीर्थतटा एउनि १८·१००५; सागरा एउनि ७·१२१; एउनु ११·६७५; एऊनि ९·२७८. एऊं—यावें, येइना का! कां आकाश वरि एऊं । १४·१८२, एऊं न ये १८·५१५; एऊं लागे १०·१८०; एऊं—एऊं पाहें १८·२८९. एंत, येते, व्यासकृपा संजयासि एंत १५·५५५; एंतसे १०·१३७; पालटा एंतसे, बदलते, १८·३४०. एता, येणारा, एता वेगु १३·९५१; एंति १५·२९२, गान्हाणें देवों एंति १७·३२८, फलभार – १५·१९७, विश्रांती –, थांबतात, १३·१०६९; न एंति, परत येत नाहींत, १५·२८७; एंती १८·१६४४, १८·१७५५; बैसउं एंती १३·२८०; एतु—जांतु किं एतु आहे १५·१२९. एंथि—इंद्रियें मना एंथि ६·४५८; पाहों एंथि ८·८३, ब्रह्मत्वा – ६·३३०. एंसी, येशील, त्रिशुद्धी एंसी

१२·१२४; ऐ, पहा. नैए—एथ हें वांचूनि काहीं। करूं नैए॥ ३·१८८, नैए बोलों अवेवां। शरीरेंसि॥ १५·२९४, २·२०३, ९·४१, १५·१७७, १८·११२; नां ह्मणों नैए १५·१८०, १८·१००; नैएंति १५·२९६. (२) येण्याची क्रिया, आगमन (ना.) एणें ५·१०४, १५·२५३; मज शरण एणें १८·१३८९, १८·१३९०; एणें जाणें १८·९८३, १८·११६२, एणें जाणें करणें...भोगणें १५·३४०, एणेंजाणें ६·४७८, १३·४८८. (३) यानें, ह्या, अशा रीतीनें. एणें अज्ञान सांडी विभालें। धर्माधर्म जें॥ १८·१३८०. १५·३३९. एणें ज्ञानें १८·५३०; एणें दुलभारु साचु १·१२४; एणें उपायें १८·१३७०; एणें कारणें, कारण पहा; एणें नांवें, नांव पहा; एणें प्रसाद-बळें१८·१३७८; एणें मानें, मानणें पहा; एणें मेळें १३·४६३; एणें ज्ञानेश्वरें १८·१२३०.

**एतुल**—इतका, एवढा, असा, येथला. एतुला ना तेतुला । १३·११०६. ६·१४३, ६·३९१, ९·१२९, ९·४५९, ९·५२१, १०·३४, १०·११७, ११·२६८, ११·५०३, १३·९४९, १५·३३८, १८·९०, १८·१४५, १८·१२३८. एतुला अपराधु ११·५४३; एतुले दिवस ११·५०५; एतुले वेऱ्हीं ११·५६, १३·४३६, १३·९९२; एतुलेन ६·३८०, –लेनि–लेंनि ३·४६, ३·२६४, ४·१५५, ६·३५१, ६·४६७, ९·१५५, ११·१०, १२·१०२, १३·६७४, १३·१०८३, १८·१४०६; ऐतु-लेनि १३·१०४३, एतुलेंनि असा पाठ संभ-वतो, ज्ञानदेवींत 'येतुलेनि' १३·१०४९ असा पाठ आहे. एतुलेया साठिं १३·९०२; एयां एतुलेयांतें १३·१५०; एतुलाल—एतुलालिए ६·३४३, –लेया १७·२७. येतुल पहा.

**एथ**—येथें, या ठिकाणीं, या प्रसंगीं, या जगांत. तूं कोणु पां एथ कैंचा। ११·२८३. १·३५, १·३७, १·३८, १·७५, १·७८, १·९६, १·९८, १·१००, १·१०७, २·९६, २·१४६, ३·१५७, ३·१८८, ५·६५, १०·२७९, ११·१५३, ११·६२८, १५·३४९. एथिचा अभिप्राउ १८·१२२३; एथिची गोडी ६·२८; एथौनि १·३३, १·३४, १·१०९, ११·६०४, १५·१७४, १५·२७०; एथौनियां १·११३, २·२०२. एथ, या जगांत, १·२१०, १५·३४३, एथ अथवा स्वर्गि १५·३३६.

**एर-री-रें**—(१) हा, तो, इतर, दुसरा, निराळा, बाकीचें. मग स्तन्य दे एरि॥ ८·१२. एकु मींवांचूनि एरु वाउ। केलें जिहीं॥ १०·१२५. एरि जे दुसरी। संपत्ति कां आसुरी। १६·२६४. शिर लोटिलेयां जैसें। एर आंग॥ १८·१२७. तेणें ब्रह्म एक आथि। एर आघवी चि भ्रांति। १८·९९६. तेथ एरीं एर देखे। आपणपें जैसें॥ १८·१५७४. १·१४६, २·२४३, २·२५७, २·३०७ ३·३७, ३·४४, ३·५९, ३·२१५, ५·७२, ५·८०, ६·८०, ७·२४, ८·२६, ८·३७, ९·११३, ९·१४२, ९·२३३, ९·३९२, ९·४६५, १०·९५, १०·३०८, ११·१२, ११·९६, ११·४५१, १३·८११, १४·४३, १४·२५५, १५·४८, १५·८८, १५·३०२, १५·३८७, १६·२४, १६·१८१, १८·२२८, १८·५९२, १८·८१६, १८·९२८, १८·१०२२, १८·१३५१, १८·१६२६, १८·१६७४. एरु, एरें, अर्जुनास उद्देशून, ६·७, ८·५३, ११·१५२, ११·१५६, १३·१०८७, १८·२८३, १८·२८८; एरें, चतुर्भुज मूर्तीस उद्देशून, ११·६२६; एरांचेनि पाडें, शत्रूंच्या (पांडवांच्या) सैन्याशीं तुलना केल्यास, १८·१६१०; एरी कलशिचें एरीं, एका कळशींतलें पाणी दुसऱ्या कळशींत, १३·११३९; एरी मोहरा केलियां, त्याच्या उलट केल्यास, १३·८४७; एरी मोहरे नलिका भविनली, पोपट पहातो त्या दिशेनें नळी फिरली, ६·७६; एर-एरां, यांना व त्यांना, १·२५१; एर सामान्य सकल ३·१५७; एक...एर १३·६१९, १८·५५०; एका...क्षरु एरातें...अक्षरु १५·४४३; एका गौतमासी...एरां समस्तां १७·९०; एरी कडे १५·११८, एरीकडे ६·२२१, ११·२९१; एरी विषिं १३·७९८; एऱ्हीं हीं दिशां, इतर दिशांतही, ५·८६. (२) एरवीं. एर सिद्ध तैसा येथें। उपायें मीं॥ १८·१२२२, तसें पाहूं गेल्यास, योग्य उपायांनीं

मी सहज प्राप्त होईनच. **एर काह्या**, तर मग कां बरें ?, १८·९४२. **येर** पहा.

**एरझार-एरिझार**—येरेजारे करणें, हेलपाटे घालणें. पथिकांचिया एरिझारा। सवें एणेंजाणें धनुर्द्धरा। १३·४८८. ६·६२. **येरझार** पहा.

**एऱ्हविं**—नाहीं तर, जर कां, तसें पाहिलें तर. तेया अडिनांव पुरुषु। एऱ्हविं स्त्री ना नपुंसकु। १३·९७६. ६·२३८, ६·२८८, ७·११२, ७·१७७, ७·१९३, ८·१५, ९·२५, ९·९२, १०·१५१, १०·२७९, ११·९४, ११·९५, १३·३१६, १३·४५५, १४·४२, १८·१८७. **एऱ्हविं तऱ्हीं** ६·३९२, ९·३११, १०·२९०. **यऱ्हविं** पहा.

**एव-व्ह-डा-डी-डें, एवढा-ढी-ढें**—आकार किंवा प्रमाण दाखविणारा शब्द. निरालंबिची वाडी। त्रिभुवना एवडी। १३·४५. किं विषयज्ञानें होये। गगना एवडा॥ १४·१५२. **एवडा ग्रंथसागरु** १८·१७५९; **एवडा विश्वाभासु** १८·२०९; **एवडिया मूर्त्ती** ११·२८२; **बोला एवडा श्रोता** १४·६३;**एवडी प्रसन्नता** ११·६०३;**एवडी महिमा** १८·५२२; **एवडे थोर सागर** १८·१३६८; **परि ऐसें हें एवडें** १३·७१; **एवडें झाड**१५·२०८, **–ध्यान** ११·६०२, **–भरितें** १८·२८७, **–भाग्य** १३·५, **–भारी** १८·७८१; **क्षीरसागरा एवडें** १८·१४६६; **नरदेहा–** १८·६१३. **एवढा ढी-ढें**—मा आत्मेयां एवढिया प्रिया। वाळभैला जो धनंजया। १८·६४०, **एवढेया लाभाचा उपावो** १६·५१. **एव्हडा-डी-डें**—**एव्हडी विश्वपरंपरेची वेळांडी** १५·२५१; **परि सिंपी चि एव्हडें** १५·१०५; **एव्हडें एक सौभग** १५·१७.

**एवाका, एवांका**—अधिकाराची व्याप्ति, सार. **महासिद्धांचा एवाका** १८·१२३६; **एवांका**—एवं भारताचा एवांका। आणूनि अक्षरा एका। १८·१६३८, **तात्पर्याचा एवांका** १८·१४४५. **आवांका** पहा.

**एष**—यश. **एषा यंती**, यश मिळवितात, ४·९.

**एसणा-णी-णें**—असला-ली-लें. संसारा एसणें थोर वोझें। फेडिलें जगाचें॥ १८·१४६०. **एसणी हे हिंसा** ३·५; **एसणें ढेंढें** १८·२८७; **एसणें तीव्रपण** ११·२९५; **एसणें पतन** १·२६०, **–हें पतन** २·३३०; **मेरु एसणें ढिसाळ** ६·९२. **येसणें** पहा.

## ऐ

**ऐ**—येत. माघारा कमलकोशा। ऐ चि ना॥ १४·३११.

**ऐकाकी**—एकाकी पहा. **स्वप्नीं ऐकाकिया आपणपें**, स्वप्नांत आपण एकट्यानेंच, १५·१०७.

**ऐकी**—एकत्रित केलेली. **आपुलिया ऐकी सत्ता**, आपलें एक झालेलें अस्तित्व, १८·१०६९.

**ऐक्य**—अद्वैत, सारखेपणा, एक होणें. ऐक्याचें ऐक्यपण सरे। जेथ अद्वयकणु हीं विरे। १८·९९९, ज्ञानदेवी–'हि विरे' १८·१००५. ४·११७(२), ६·११८, ६·१८९, ७·१११, ८·४४, ८·६१, ९·९९, १३·१४६, १३·१०५१, १४·३९२, १८·१०७८, १८·११३४, १८·१२४६, १८·१३५४, १८·१३९०.**ऐक्याचिये उतारां** ७·९६; **ऐक्याची कुळवाडि** ७·१७४; **ऐक्याचिया दीठी** ६·३९७; **ऐक्याचां परिवरीं** १८·१३३६; **ऐक्याचिये मुठी माझिवडें** १८·९५६: **ऐक्याची उतली आहे** ८·६३; **ऐक्याचलाची बुंथी**, ऐक्याचें आच्छादन, ऐक्यांत समावेश, ६·३९८; **ऐक्यतेज** ६·३८३; **ऐक्यबोध** १७·३८०, १८·५४२; **ऐक्यभाग्य—चराचरैक्यभाग्य**, स्थावर जंगम सृष्टीचें एकवटलेलें ऐश्वर्य, ८·२६६; **ऐक्यभाव** ४·११७ (१), १५·२; **ब्रह्मैक्यं** १८·१०६६; **मदैक्यगावि** १८·१२१५; **मना आणि बुद्धिचें ऐक्य, हें** योगाचें सार, २·२७३; **योगसंन्यासा ऐक्य** ५·३०; **सांख्यीं...योगिं...ऐक्य** ५·२९. **ऐक्यता—ऐक्यता पावति** ३·३९; **ऐक्यते ये** १३·९३२.

**ऐर**—इतर. **ऐरिं**, इतरांनीं, १८·९०९.

**ऐल**—अलीकडे, जवळ, पूर्वी. **मोक्षाचां ऐली द्वारीं** १८·८९२; **ऐली चि थडी** १३·८४०,१८·२५३, **ऐली थडिये** ९·४१५. **ऐली चि –** ७·९४:

ऐली वदनीं ११·४१६; फलणेयां ऐली कडे १८·९२१; मरणा ऐलीकडे ९·३६१; ऐलपणा...परत्व १८·११३०.

**ऐलाडि**—या बाजूला. मागौति ऐलाडि ६·१९१.

**ऐश्वर्य**—वैभव, प्रतिष्ठा, ईश्वरगुण. तुज ईश्वरेश्वराचां ठांइं। ऐश्वर्य केलें॥ ११·५६२. ९·८६, ११·४७, ११·१७८, ११·६१८. ऐश्वर्यतेज ११·१८५, ऐश्वर्ययोग ९·९१, ११·१६३; ज्ञानवैराग्य-ऐश्वर्य ६·३७.

**ऐसा-सी-सें**—असा-शी-सें, अशा प्रकारें, रीतीनें, सारखें. विरिदांचे दादुले जाले। हीवां ऐसे॥ १·१३५. १·७३, १·११२, १·११४, २·४५, २·१५२, ७·४१, ८·२८, ८·५७, १०·९५, १०·२८७, ११·१०६, १५·३१२, १६·२३४, १८·७९०, १८·७९८. ऐसा उवाइला २·३७२, –परितोषें ९·३८९; ऐसां ६·२०, ६·४३२ (ऐ), ७·५०; ऐसिं ऐसिं १३·२००; ऐसिया आशा १३·७३७, –ओजा ७·४८, –गोठी १६·२०२, –वाटा ८·२३६; ऐसिया ऐसिया परी १३·११२८, –परीं १३·५३९; ऐसी ऐसी १३·१९३; ऐसिये परी १५·५०६, –विवंचने-पुरतें ६·३०९; ऐसीऐसीया १३·५९०; ऐसीं-ऐसीं १४·२५२; ऐसीसी १७·२१२, १८·८२०; ऐसे आणिकही १·१०८; ऐसे हे अकरा १०·९२; ऐसें, अशा प्रकारें, रीतीनें, ८·६१, १३·५४७, १५·३११, १५·३५२; जें ऐसें हीं ८·१६; झोलु ऐसें मानूनि ८·५९; मी चि ऐसें १०·२८१, मीं ऐसें १५·३१०. ऐसेन २·२०५, १३·४३५, १३·९४७, १५·१३१, १८·१०२५; ऐसेनि १·६१, ८·५१, ९·१९९, ९·३६०, ९·४११, १०·७१, १३·९५१, १५·३५८, १५·३७३, १८·१३५२; ऐसेनि धनें, अशा प्रकारें मिळविलेल्या धनानें, १६·३४९; ऐसेया वरि १५·३७९; ऐसेयां १५·३१६, ऐसेयांतें २·५४.

**ऐसेस-ऐसैस**—अशा अशा प्रकारचा. १३·३९८. ऐसेसे वाढु १३·६६; ऐसेसेयां अपराधां ११·५६४; ऐसैस—ऐसैसा आडाड १८·२९०, –व्यापारु १८·३३९; ऐसैसां कर्मीं १४·२३२; ऐसैसी ख्याति १५·४८३; ऐसैसें १५·५०२, १६·१३, ऐसैसें संपत्तिमीसें माजणें १६·२२७.

**ऐहिक**—अहिक पहा.

**ऐहेर**—अहेर. ऐहेरा दीठि घालूनि १७·२८५; ऐहेरा वान्हीं आघवें नागवीति १६·३८५.

**ऐहेव**—अहिवा, सुवासिनी. आघवेनि गांवं(व)दारी। ऐहेव जैसी॥ १३·८२०. वर वर पतिपरायणत्व दाखवून दारोदार फिरणारी वेश्या हा अर्थ संभवतो. याच अर्थी ऐहेवपणे(णें) १६·३७५ पहा.

# ओ

[**ओ**—महानुभावी व बाराव्या व तेराव्या शतकांतील कांहीं जुन्या वाङ्मयांत ॐ, ओ व वो हीं अक्षरें पर्यायानें येतात. येथें ॐ व ओ चीं रूपें निराळीं दिलीं आहेत. वो चीं रूपें व या अक्षराखालीं दिलीं आहेत.]

**ॐ, ॐ**—ब्रह्मनिदर्शक अक्षर. अ विष्णु, उ शिव, म ब्रह्मा या देवांचें निदर्शक. इतर ठिकाणीं अ वैश्वानर, उ तैजस, म प्राज्ञ मिळून ॐ असें अतर्क्य अवाच्य ब्रह्माचें निदर्शक म्हणून दिलें आहे. अकार, उकार व मकार यांचें गणेशावर बसविलेलें रूपक १·१९ व २० मध्यें पहा. ॐ नमो आद्या। १·१. ८·११५. ॐकार—जेया ॐ(ॐ)काराचिये कुंसी। आखरें होंति अकारां ऐसीं। जियें उपजत वेदेंसीं। उठिलीं तीन्हीं॥ ९·२७५, ६·३०३, ८·११४, ९·२७४, १७·३५४, १७·३६४, १७·३७०, १७·३८१, १७·३८८; ॐतत्सत्, ॐ तेंच हें खरें सत्य, –ब्रह्म, १७·३९८; ॐतत्सदाकार १७·३४०; ॐनमो १०·१.

**ॐइचिलें**—एवढेंसें, कमी. १·११९, ज्ञानदेवींत 'वरचिलेनि पाडें' असा पाठ आहे.

**ॐखट, ओखट**—वाईट, ओंगळ, अभद्र. ॐखटे बोल १८·१३९५; ॐखटें १·२०९, २·२०५, ९·५१०, १०·५५, ११·४७४. ॐखटेनि २·२९९; ॐखटिया क्रिया आदरी १८·६६२; ओखटा ५·१२६; ओखटी ९·४३९; वोखट पहा.

**ऒखद, ओखद**—औषध. रोगावर योजलेली वनस्पति, मुळी, मात्रा, रसायन इ. ऒखद—नातरि आयुष्य पुरलें आहे। तरि ऒखादें हिं काहिं नव्हे। २·६७. १५·२३१, १८·१३१, १८·१५४, १८·७०३. **ओखद**—जीउ न निगतां ओखदा। धांविजे जेवि॥ १३·५४६. **ओखध** —आदिं चि साखर आवडे। आणि ते चि जरि ओखधा जोडे। ४·२१६. **ऒषध**—देखैं रोगातें जीणावें। ऒषध तरि घेयावें। ३·१९, **ऒषधेंसीं उदासपण** ९·४८७; **कालज्वरु ऒषध न मनी,** कालज्वर औषधाला जुमानीत नाहीं, औषधाच्या उपयोग होत नाहीं, १८·६०१; **दोखु ऒषधा नाहिं,** थोडासुद्धां दोष नाहीं, ९·११८. **ओषध**—कां ओषधाचां कडवटपणीं। जैसी अमृताची पुरवणी। २·८९, **दिव्योषध,** परि मात्रेचेनि मापें। दिव्योषध जैसें घेपे। १८·७७१; **रसोषध,** आपला गुण दाखवून आपोआप उतरतें, १८·१०७३. **ऒषधी** अमृतासारिखी ऒषधी। निर्वाणिची॥ २·८६. **ओषधी,** यज्ञांत किंवा रोगनिवारणास योजलेली वनस्पति वगैरे, सोमादि ओषधी विविधा। ९·२६६, कां फळौनि शुष्कां होणें। ओषधींचे(चें)॥ १६·१०५; **दिव्योषधी—महारोगीं दिव्योषधी न विसंभिजे** १८·९४६; **सर्वौषधी—सर्वौषधींचे आगर भरीतुसें,** सर्व वनस्पतींना चंद्र पोसतो याला उद्देशून १५·३७२. **औषध**—तेया औषधातें काइ वैरी। जिव्हा न म्हणे॥ ६·३६२, परिणामीं हितकर असलें तरी जिभेला औषध रुचत नाहीं याला उद्देशून; **औषध घेंत खेऒ आपुला थाऒ लाभे काइ,** औषध घेतांच गुण येतो काय? १८·९९२. **वोखद** पहा.

**ऒग**—ओघ, आवेग. **जाणिवेचिये ऒगें,** ज्ञानाच्या ओघानें, आवेगानें, ७·१७६.

**ऒगरणें, ओगरणें**—अन्न वाढणें. भूकैलेया पासीं। ऒगारिलें षड्रसीं। १८·१००१. ९·४३६, १८·१४६८. **राया ऒगारिलें** १५·२१७. **ऒगर,** वाढलेलें अन्न, **आत्मबोधाचेया ऒगारा** ४·१०६. **ओगरणें**—हें असो तेयां बोलाचीं ताटें भलीं। वरि कैवल्यरसें ओगरलीं। ६·२२; **ओगरूनि ठेविलें** ८·११; **ओंगर**—रोगु जाये दूधें ओंगरें। तरि नींबु कां पियावा॥ ४·२२०, दूध पिऊन जर रोग जात असेल तर कडुनिंबाचा रस कां प्यावा?

**ऒघ, ओघ**—ओढा, प्रवाह, क्रम. जन्हीं सरिता ऒघ समस्त। परिपूर्ण होउनि मिळत। २·३५७. १५·२६९, १८·१०३३, १८·१२१६. **ऒघाचेनि मेळें,** ओघामुळें, १५·३०६; **ऒघु सांडूनि गंगा** १४·३५०; **गंगेयमुनेचे ऒघ** ११·६; **गंगेचेनि ऒघें** १४·३९६; **विधिचेनि ऒघें आलें** १८·६९६; समुद्र कां ऒघिं पडिला, (वाफेनें मेघरूप झालेला) समुद्र ओघरूपानें वाहतो (व पुनः समुद्ररूप होतो), ६·३०७; **उगाविं...ऒघिं** १३·३००. **ओघ**—जैसे सरिता ओघ समस्त। समुद्रामाझि मिळत। २·१७५, ४·४८, ११·४१८; **सृष्टिसंहाराचेनि ओघें** ७·६८; **कर्तव्य हें ओघें आलें** ३·१४४. **वोघ** पहा.

**ऒज**—तेज. १८·११११. **वोज** पहा.

**ओजणें**—प्रकाशित होणें, आंगीं तेज, सामर्थ्य येणें. म्हणौनि जे बुद्धियोगें ओजले। २·२७७. **ओजा घालीं,** ओज, प्रकार, रीत, ६·१८३; **ओजा प्रवर्त्ते** ७·४८.

**ऒझीलपण**—भारत्व, भार. **फळाचेनि ऒझीलपणें** १५·११८.

**ऒझें, ओझें**—भार, जबाबदारी. **संभावितपणाचें ओझें** १३·१८४. देखें पुढिलांचें ओझें। जरि आपुलां माथां घेइजे। ३·१७४, **अहंभावाचें ओझें** ७·९५; **गृहस्थाश्रमाचें ओझें,** ६·५०.

**ऒटंगणें**—अवलंबून राहणें. आम्हि तनुमनुजीवें। तूझेया बोला ऒटंगावें। ३·१२. **वोटंगणें** पहा.

**ओडण**—आच्छादन, निवारण्याचें साधन. आगा वरिपडतां पाषाण। न सुवावें केवि ओडण। १·४८७. **वोडण** पहा.

**ऒडवणें, ओडवणें**—प्राप्त होणें, पुढें करणें. ऒडवणें, आणि मीं दोन्हीं हात ऒडवीं। ९·३७९. किं आत्मराजाचिये सभे। गीते ऒडविले खांबे। १८·१६४४. **अधिकाराचेनि ऒडवलेन विण** ६·३३९; **उपदेशु ऒडवला** ३·९; **युगांत ऒडवलें होतें** १·१६०. **ओडवणें—मुख ओडवी** ९·१५. **नोडवणें—नोडवे** ७·१८०, १८·७१९, १८·१०६८. **वोडवणें** पहा.

**ऒडियाण**—योगांतील मल. उड्डियान व जालंदर

असे तीन बंध आहेत त्यापैकीं दुसरा बंध. ६·२१०.

**ऒतणें, ओतणें**—धातूचा रस तयार करून साच्यांत ओतून विशिष्ट घनाकार देणें. **ऒतणें**—मग को(कों)दली ठाये रसें। ऒतलेनि ॥ ६·२४९. **ओतणें**—जे अमृताची जाणों ओतली। ५·१७१, **जग... माझें चि ओतलें,** (मी, रस) माझ्यान्त रसाचें ओतलेलें, ९·२९८; **रूपडें ओतलें आहे** ६·१२०; **समरसाचे ओतले,** ओतलेले, ५·१३६. **वोतणें** पहा.

**ऒत**—ऊत, पूर, पूर्णपणें भरलेलें, सर्वत्र. कां कल्पांतिचेया पाणियां। काइ ऒत भरताति धनंजया। १५·३०५. **नेत्रयुगुलिचेनि ऒतें** १८·१५४१. **ऒतप्रोत**—ऒतप्रोत पटी (टीं)। तंतु जैसा ॥ १०·२४४.

**ओतपली**—कोवळें उन्ह. **ज्ञानाची ओतपली पडिली** ७·१२८. **वोतपली** पहा.

**ऒतिव**—ऒतणें पहा. ६·३२७. **विकल्पाचें ऒतिव** ८·१४३, **सिद्ध रसाचें**—६·२५५. **वोतणें** पहा.

**ऒथिजणें**—पातळ होणें. **विश्वाकारें ऒथिजलें** ९·६५. **वोथिजवणें** पहा.

**ऒपणें**—देणें, अर्पण करणें. जें इंद्रियां ऒपे मा(मा)तें। ६·३५२. जे ऒपले माझिये चित्तें। ९·३३१. **वोपणें** पहा.

**ऒपासिरा**—ओपसर, रत्नें उठून दिसण्यासाठीं रत्नाखालीं बसविलेला वर्खाचा चकाकणारा तुकडा. येथें, संबंध या अर्थी. उपाधिचा दूसरा। घालितां ऒपासिरा। १५·७६, उपाधीमुळेंच **अदृश्य** (१५·७५) दृग्गोचर होतें, नामरूपाचा संसार बनतो.

**ओभाणें**—पूर, वेग. **कर्मां अकर्मांचीं ओभाणें** ७·७१; **पाणियांचेन वहिलेपणें आइं, ओभाणें न** धरिती, निरनिराळ्या बाजूंनीं पाणी येत असल्या-मुळें पूर असा कधींच भरून स्थिर होत नाहीं, म्हणून या मायापुरांत तरणें कठीण. ७·७९.

**ऒरपणें**—ओरबाडणें. शिरांचे हीर ऒरपे। ६·२३४. **वोरपणें** पहा.

**ऒरस**—उत्साहाचा, प्रेमाचा अतिरेक. **आर्त्तांचेन ऒरसें** १८·१७४०; **वोरस** पहा.

**ऒलखणें, ओलखणें**—ओळखणें, चिन्हांनीं जाणणें, पारख करणें. **ऒलखणें**—२·१२४, २·१२५, ३·६६, ३·७४, ४·२३, ४·७१, ४·९५, ४·१०४, ११·२८८, १३·२३६, १८·५४५, १८·५५८. **ऒलखों ए,** ओळखतां येतो, येईल, १५·३३०; **ऒलखों केवि,** आम्हीं कसें ओळखावें? २·२८७; **गुणकर्में ऒलखौनि** ३·१७८; **ऒलखण** १३·८९; **ऒलखणें** १५·२५३; **ऒलखी** १३·२०१. **ओलखणें**—मनोगत ओलखे। मुंगियेचें ॥ ६·२६९, जो विष अमृतें ओलखे। ८·२३९. ४·८९, ६·३६६, ७·५२; **साच लटकें ओलखावें** ८·२३७; **ओलखावेयाची संज्ञा** १०·२८७; **ओलखी**—तिये ओलखी चि सरिसें। ६·३६७, **अनोलख** १३·८४२, १८·१३१, **—जाली** १८·५४०; **अनोलखपण फीटलें** १०·१४६; **अनोलखि फीटली,** परिचय झाला, ९·२७३; **नोलखणें**—जैसा वायसीं चंद्रु नोलखिजे। ६·२९, ४·१९९, ५·८९, ५·९८, ११·५३३. **वोलखणें, सनोलख** पहा.

**ऒलगणें, ओलगणें**—सेवा करणें, आधार घेणें, भेटणें, मिळणें, प्राप्त होणें. तैं संकल्पाचें आंगण। ऒलगति सिद्धी ॥ ८·९. **जन्मशतीं ऒलगिजे** ९·२०५; **पाए ऒलगे** ११·७२, **पाइकी**—१४·२०६; **मज पसायदान ऒलगे** १६·४७०; **वनश्री रितुपतिचें द्वार ऒलगे,** वनश्री वसंताच्या दारीं उभी राहील, ३·१००; **ऒलगौनि** ४·१६४; **ऒलग,** सेवा, १३·४२३; **ऒलगणे—रस अक्षरांचे ऒलगणे होंति,** रस अक्षरांचें अधिकरण (१३·१) होतील, अक्षरें रसपूर्ण होतील, १३·३. **ओलगणें—ओलगावा** ६·१३८; **ओलगे** ९·३२१. **वोलगणें** पहा.

**ऒलंडणें, ऒलांडणें**—वरून पलीकडे जाणें. **कर्मकडा ऒलंडौनि** १५·२४८; **नोलंडणें**—समुद्रीं रेघ नोलंडावी। ९·२८१, **कर्मरेखा नोलंडिता (तां)** ६·५१. **ऒलांडणें**—जरि मुंगी मेरु ऒलांडी। ७·९२, १४·५१, १८·१५५५; **ऒलांडिजति** १३·४१५; **नोलांडणें**—मशका नोलांडावे चि गगन। १०·६५, मुंगिये मेरु नोलांडावे। १३·२५९, १३·२४५, १३·२५८, १३·६९८; **रेखा**

नोलांडितां १८·१२४. वोलांडणें पहा.

**ओलणें, ओलणें**—द्रव पावणें, ओलें होणें. हृदयाकाश सारस्वतें ओले ९·२८; ओल, द्रवत्व, ओलसरपणा, शारदियेचेनि ओलें ६·२५८; ओलावा, सहृदयता, ९·२८५, ९·२८९, ११·५०८; कामाचा ओलावा १६·३२२, ज्ञानाचा – १३·३५३, निजवृत्तिचा – ३·२१३, वैराग्याचा – १८·१००२; शास्त्रओलावा १८·१४४३. **ओलणें**—जें धूम्ररजाचें गगन। ओललें आहे(हे) ॥ ८·१४८. ओलावणी ४·२१० हा शब्द ओवालणी असणें संभवतें, ज्ञानदेवींत 'वोंवाळणी' ४·२१३ असा पाठ आहे. **ओलावा**—जरि पुण्याचा ओलावा। नाशिजैल ॥ १·२३२, ९·४४४; विवेकाचा ओलावा ९·१८८. सर्वज्ञतेचा ओलावा ८·२६८. वोलणें पहा.

**ओलांतरणें**—उशीरामुळें गमवणें, फसणें. ऐसा ओलांतरला काजीं। ६·४३५.

**ओलिंवा**—वाळवी. पाताळ लंघीति ओलिंवें १८·६०६. वोलिंबा पहा.

**ओलि**—ओळ, रेपा. पाउलाची ओलि, पावलांचा ठसा, ६·२९७. वोलि पहा.

**ओलिवटा**—ओलिंवठा, रहदारीची वाहती वाट. जन्ममरणाचा ओलिवटा ८·१४२, ज्ञानदेवींत 'वोळिवटा' ८·१४४ असा पाठ आहे.

**ओवंडणें, ओवांडणें**—मागें फिरणें, परत फिरणें. मग ओवंडति स्वर्गस्थ। पूर्वपुरुष ॥ १·२५२. **ओवांडणें**—ते ओवांडिली देखां। बूढासि प ॥ १५·१९९, फलभारानें वांकलेली फांदी बुंध्याकडे येते; ऊर्ध्व दूणें ओवांडैल, वर जाणारें झाड तितकेंच (दुप्पट) वळून परत मुळाशीं येतें, १५·१९८. वोवांडणें पहा.

**ओवर**—खोली, कोठडी. जो आत्मबोधाचेया ओवरां। पवडला असे ॥ ६·६२. वोवर पहा.

**ओवालणें**—ओवाळणें. ज्ञेयदीपें ओवाली। निरंतर ॥ १३·३८८. सोहंतेजें ओवाळूं। १५·७. वोवालणें पहा.

**ओवी**—साडेतीन चरणांचा, पहिल्या तीन चरणांत ओ यमकें असलेला, छंद. १८·१७२०. ओवियेचेनि बंधें १८·१७२१. वोवी (१) पहा.

**ओषध-धी, ओषध-धी**—ओखद पहा.

**ओस**—निर्जन, ओसाड. मागां ओस फूल देंठीं। ९·४०९, येथें वासाशिवाय या अर्थी. वोस पहा.

**ओसणणें, ओसणणें**—ओसणावणें, झोपेंत बोलणें, बरळणें. **ओसणणें**—ओसणाए, झोपेंत बरळतो, १५·४५८; **ओसणातिया**—ओसणातियांचा ग्रंथि, कांहीं तरी बाष्कळपणें लिहिणारांच्या ग्रंथांच्या अभ्यासानें, १५·३६२. ओसणतां हीं, बरळला तरीही, ८·६.

**ओसंडणें**—दुर्लक्ष करून टाकणें, हेळसांड करणें, मर्यादा टाकणें, वरपर्यंत भरून ओतणें. दैवें चिंतामणि लेइजे। कि तेयातें वोझें म्हणौनि ओसंडिजे। ११·६१६. ३·५४, ३·१४८. ओसंडुनि १·२४०, ओसंडूनि २·६१; अव्हेरुनि ओसंडिति ३·१११; आनंदामृताचें भरितें ओसंडत १८·१५४१; भरुनि ओसंडत असे १५·५५५. वोसंडणें पहा.

**ओसरणें, ओसरणें**—कमी होणें, मागें हटणें, संपणें. नातरि गुरुकृपे सवें। ओसरलें प्रपंचजात आघवें। ११·६४६. मार्गौतें ओसरलें १८·१४१०, – ओसरे ४·१४८. **ओसरणें**—मेघु उदास परि ओसरे। ९·२०४, आकाश हें ओसरे। १३·४०४. वोसर पहा.

**ओसाण, ओसाण**—पुरांत वाहून आलेली वस्तु. सात्विकाचें ओसाण १०·१०८. **ओसाण**—सुखदुःखांचीं ओसाणें ७·७१.

**ओहटणें, ओहोटणें**—कमी होणें, मागें सरणें. **ओहटणें**—तेथ अपानु आंतुलीकडे। ओहटों लागे ॥ ६·२००. चैतन्य चढे ना ओहटे। १५·३५८. ओहटु पडे १८·१०८७, – न पडे ११·१५४. **ओहोटणें**—नोहोटे, दुःखी कधी होत नाहीं, १३·४९५.

**ओहिरी**—खोली, आवार. निश्चयाची ओहिरी ८·६०.

**ओझा**—हांकेस ओ देणें. नालवितां उठी। ओझा म्हणौनि ॥ १४·१८०. वो पहा.

# औ

**औठ**—आउठ पहा.

**औत्सुक्य**—उत्कंठा. **औत्सुक्याची दाटि** १८·१५४२. **उत्सुक** पहा.

**औदार्य**—उदारपणा. ११·९८, १८·१३६९, १८·१४४६. **औदार्यांचा कुरुठा** ५·१२,–**ची संपति** १०·२५५; **यशश्रीऔदार्य** ६·३७. **उदार** पहा.

**औद्धत्व**—उद्धटपणा. औद्धत्वें उंचावे। अहंभाव ॥ १६·३८९.

**औपाधिक**—उपाधियुक्त, मायात्मक. तैसा उपाधिनाशीं न दीसे। औपाधिकु फुरे॥ १५·४६६, उपाधि नाहींशी झाली कीं तो दिसत नाहीं, मायेमुळें आहे असें वाटतें. १५·४३७, १५·४६५. **उपाधि** पहा.

**औपध**—ओखद, ओखद पहा.

# क

**कंकण**—कडें. **सकंकणु बाहु** १८·१४०९. **कांकण** पहा.

**ककारांत**—ककाराचा, सुषुम्ना-नाडीचा शेवट. **ककारांत फोडी**, ककारांतून प्रवेश करते, ६·३०२; **ककारांतीची खिडकी उघडिली** १२·५२.

**कक्ष**—कूस, बाजू. **शैलकक्षाचीं कंदरें**, डोंगराच्या बाजूच्या दऱ्या, गुहा, १३·६११.

**कक्षा**—कांख, वादविवादाची बाजू, आक्षेप. **कक्षे सूदली**, बगलेंत मारली, ११·६१, हिरण्याक्षानें पृथ्वी समुद्रांत नेली तेव्हां विष्णूनें वराहावतार घेऊन त्यास मारून पृथ्वीचा उद्धार केला ११·६२. **सिद्धांतकक्षा** १८·१२३६.

**कंचुकित**—झग्यानें आच्छादलेलें. **रोमांचीं आपादकंचुकित जालें**, सर्वांगावर रोमांच आले, ९·५२२.

**कट, कटा**—(१) कष्ट, दुःख, यातना दाखविणारा उद्गार. **कट रे**, अरेरे, १६·४१८. **कटा**, अरेरे, हाय हाय, आहा कटा अखटें। ९·५१०, ११·३८५, **अर्जुनु ह्मणे कटा** ११·४४७; **कटाकटा** ११·३९५; **कटारे** १३·५३८. (२) वांकड्या दृष्टीनें साभिप्राय पाहणें. **कामिनीकटाक्षु** १४·१६९.

**कटक**—सैन्य. रावो तेथ कटक। १८·१६१४. १०·३५. **कालरात्रीचीं कटकें** ११·१९६; **विषयांचिं कटकें** १२·४६.

**कटणें**—दुःखी, कष्टी होणें. **संसारसीणें कटले** १७·३२८.

**कटार**—कट्यार. जरि मैत्रें चि वैरी मरे। तरि वायां कां बांधावे कटारे। ४·२२०.

**कटाह**—कटोरा, आकाश व ब्रह्मांड उलट्या कटोऱ्यासारखे दिसतात म्हणून त्यांस हा शब्द लावतात. **ब्रह्मकटाह** १·१४७, ११·१२०, ११·१३३, ११·१४९, ११·३००, ११·४२५; **ब्रह्मकटाहाचिं भांडारें** ११·२६४; **ब्रह्मकटाहधात्री**, सर्व विश्वाचें पालनपोषण करणारी दाई, १०·१३६.

**कठिण-न**—घट्ट, अवघड, कठोर. **कठिण**—३·२१४. **काठिण्य**—**काठिण्याचा क्षोभु** १८·७८५. **कठिन**—ऐसें कठिन कोवलेपणें। स्नेह देखां॥ १·२०२, **कठिनें बोलें** ११·४४८; **वज्रापासौनि कठिन** १·१९९; **मृदु आणि कठिन** २·११५; **कठिनपण** ६·१८७; **काठिन्य** १८·७५१.

**कठोर**—अवघड. **क्रिया कठोर तऱ्हीं**, क्रिया अवघड असली तरीही, १८·९२७.

**कड**—बाजू, दिशा, कांठ. **अव्यक्ताची पैली कड** १३·११३५. **अहोरात्राचा पैलकडु**, दिवसरात्रीच्या पलीकडे असणारा, १६·१६; **कर्म आरंभाची कड** १८·१८३. **कडा-कडां**—बाजूनें. **कव्हणी कडां** ११·३६८, १८·२०९; **तेया कडा** १७·१९१; **देवलविसेंया कडां** १८·४४२; **पैलीकडां** १८·१७५९; **मागिला कडां** १८·४६५, **मागिली कडां** १८·१०३५; **माझिया कडा** १६·४६९; **वरिचिली कडां** १३·४७०. **कडिल-कडील**—**जीवाप(पै)लीकडिली** ७·११५; **पैलीकडीलु** १०·१३४. **कडूनि**—**चहूंकडूनि** २·२०४. **कडे**—**कडेलग**

६·५६; शब्दापुढें सुटा किंवा शब्दास जोडून, त्या त्या पाशीं, बाजूनें, दिशेनें, या अर्थी व इतर संबंध दाखविण्यासाठीं, **अइली कडे** ९·५१; **अधर्मा कडे** १८·८३२; **अभ्यंतरिली कडे** १३·३८४; **आंगभोगा कडे** १३·२०९; **आंगा कडे** १३·१८७; **आत्मेया कडे** १६·११०; **आंतुली कडे** १४·३०, १७·१२९, **आंतुलीकडे** ६·२००, ६·२०४, ९·५०६, १०·१९८, १४·२०३; **उपनिषदांकडे** १३·८२४; **ऊर्ध्वा हि कडे** १५·६०; **एकी कडे** १८·१६७०; **एकीकडे,** एका बाजूस, एकत्र, ११·१६८, १३·६१८; **येकि कडे** ११·२३८; **एरी कडे** १५·११८, **एरीकडे** ६·२२१, **येरीकडे** १७·२७८; **ऐली कडे** १८·९२१, **ऐलीकडे** ९·३६१; **कवणी कडे** ११·१८४, ११·२०३, **कवणीकडें(डे)** ६·१४४, **कव्हणी कडे** ११·१९३, १५·२३९; **काम्यकर्मा कडे** १८·८९४; **कोण्ही कडे** १५·५२२, **कोण्हीं कडे** ११·२६८; **चौहीं कडे,** सर्वत्र, ११·१९२, **चौहींकडे,** ११·३८६; **जीउतीतिउती कडे,** जिकडे तिकडे, ११·३३९; त्याचप्रमाणें इतर ५·७४, ६·२११, ६·३१३, ७·८३, ७·१२९, ८·१०९, ९·७६, ९·२३३, ९·३२३, ९·३७९, ९·४८८, १०·७२, १०·१६७, ११·२५०, ११·२६२, ११·२७१, ११·२८८, ११·३८६, १३·२२, १३·४८, १३·८२, १३·३२२, १३·४८४, १३·५०३, १३·५१८, १३·१०८२, १३·१०९४, १४·२४७, १४·२६७, १५·१३४, १६·१४८, १६·१८८, १६·२५९, १७·१२४, १८·६५, १८·४४०, १८·७०५, १८·७३७, १८·८६२, १८·१६३२. **कडौनि-नु—आघवां चि कडौनि** ११·४१८; **आपुलेया कडौनि** १८·१२८७; **कोणीकडौनि** ११·४३२; **तिये कडौनु** १३·३७५; **दोराचिया कडौनि** ८·२४६; **भलेतेया कडौनि** ११·३३४; **वरिलीकडौनि** ६·२४७.

**कडवाड**—कडवा. **बैलासि कडवाडें** १४·२३८.

**कडवस**—(१) कडेला लागून, आधारानें असणारें. **कडवसां राहिले** ११·३५९. (२) **कडवसें,** अंधार. फीटलें भेदांचें कडवसें । ७·१०९, प्रकाशु आणि कडवसें । १०·८६.

**कडवसा**—(१) प्रतिबिंब. जो अमूर्तांचा कडवसा । ४·१७२. (२) फटींतून पडणारा प्रकाशाचा किरण, कवडसा. **चंद्रसूर्य वस्तुचेया प्रकाशा कडवसां पडति,** त्या वस्तूच्या प्रकाशापुढें चंद्रसूर्य कवडशाप्रमाणें दिसतात, १५·२८१; **बुध्यादिकें...हे जेयाचे कां कडवसे,** बुद्धि ही गीतेंतील ज्ञानापुढें कवडशासारखी आहे, १८·१३१६.

**कडसणें**—विचार करणें, छाननी करणें, कसास लावणें, तावून सुलाखून घेणें. मग ज्ञानाग्निसंपर्कें । कडसिलें विवेकें । १·५२. तैसे धर्माधर्मीं कडसलें । ४·६४. **निवडितां सानेंथोरें न कडसी** १६·१५३; **श्रोतेयां कडसावें न लगे** ६·२७. **कडसणी—** नेणति सानेया थोरा कडसणी करूं । ९·२०१, ४·७९, १८·५५२; **कडसणीं(णी)** ९·३६८; **मंत्राची कडसणी** १८·३७२; **युक्तिची** – २·३४२, **व्यक्ताव्यक्ताची** – ८·१७२, **सुखदुःखाची** – ६·८५; **दधिकडसणी** २·१२९.

**कडा**—डोंगराचा सुळका, डोंगराची तुटलेली बाजू. कडां पाथेरी कीजे । १३·९४२. **कडेयासि तळवटीं,** पायथ्यावरून (उलटून) कड्याजवळ, ४·७४; **धैर्यांचे कडे** १२·४९; **शोकाचा कडा उपटत** ७·८४; **कर्मकडा** १५·२४८.

**कडाड**—(१) डोंगराचा कडा. कडाडिं लोटिला गाडा । १३·७५३. **कडाडिं जो गाडा मोडे,** कड्यावरून पडून जो गाडा मोडतो, १८·६४३. (२) चाणाक्ष, जाणता. **कडाडां आणि गहिंसाला,** चाणाक्ष आणि मंद, जाणता आणि नेणता, ११·९७.

**कडियाली**—गोल कडें, माळ, वेष्टण. जाली भीदा भुवनासि कडियाली । ११·३१२. **मोतियांची कडियाली लेइला** ९·५२४.

**कडू**—गोडाच्या विरुद्ध, न रुचणारी चव. कडू दूधिया माखिला । गुळें जैसा ॥ १३·४६७. १६·११५. **कडू मधुर** १६·२४९; **गोडिरें...कडू** १८·८०१; **कडवटपण—ओषधाचां कडवटपणीं** २·८९; **कडुवट** १७·१३८, १८·१८४, **–पण** १८·९२०; **कडुवाले-पण** १८·१३८४.

**कढणें**—काढणें पहा.

**कण**—अणुमात्र पदार्थ, दाणा. ९·१५२, १३·२३५, १३·९५५ (२), १५·४३३, १८·२५१, १८·६०४. **कणें विण सोपटें** ९·४२९; **कण··कोंडा** ९·३२९; **कणा भूसा** १८·९३५; **भुर्षि कणु** ९·१३५; **सालिचा कणु**, साल झाडाचें बीं, १८·१२८०; **अंगारकण** १३·१०५७; **अद्वयकण** १८·९९९; **अमृतकण** १·५६; **अवकण**, फोल दाणा, ९·४५; **जीवकण** १८·१२६६; **निकण**, कण नसलेला, निकण वाढे धनंजया । कणेंसिं कोंडा ॥ १३·९५५ (१), (छाया जशी रूपाबरोबर असते तसा) कणरहित कोंडा हा कणाबरोबर वाढतो; **बीजकण** ९·४०६ (२); **मकरंदकण** ११·१५८; **लवणकण** ९·४५७, १३·९१४; **विकण** १८·५०१; **सूर्यकण** ८·८९; **स्वेदकण** ९·५२४; **हिमकण** १४·३८२.

**कणि**—**माणिकुलेयांचियां कणियां** ६·२६४; **कणिका**—बीज कणिके माझि असे। ९·४०६ (१); **लवणांची कणिका** १८·९८०; **परमाणु-कणिका** १३·१०७९; **बीजकणिका** ७·५४, ११·६३८, १४·९४; **स्वेदकणिका** ११·२४४.

**कणव-वा**—करुणा, दया, कृपा. **कणव**—**सकणव** १८·१२३१,—**पणें** २·२०६, १६·१५४. **कणवा**—चातकाचिये कणवे। मेघु पाणियेंसिं धांवे। १८·१४५८, ६·४१०, १७·३२९; **कणवा दीधला** १८·१३१८; **ह्मणि कणवा घेपति** १३·१०३७.

**कणिस**—धान्याचा तुरा, गुच्छ, भुट्टा. मग कणिसौनि कणु झडे । तो विरूढला कणिसा चढे । १८·२५१. ९·४२९. **कणिसांचा निर्वाला**, धान्याची परिपक्व दशा, येथें मोजमाप अंदाज या अर्थी, १४·१२५; **उंसाचीं कणिसें**, निरुपयोगी असतात, १८·५७३.

**कंथ**—पति. १८·१०७५.

**कथणें**—सांगणें, वर्णन करणें. तैसें मातें विश्वि कथित। कथितेनें(न) तोखें कथू विसरत । मग तेया विसरलेयामाझि विरत । आंगें जीवें ॥ १०·११२. आणि रिघिं मार्ग होंति जे कथिले । १०·१४६. ३·१६, ४·१५, ९·१७६. **कथित**, सांगतात, १०·११२ (१); **कथितेनें(न) तोखें**, सांगत असतांना होत असलेल्या आनंदामुळें, १०·११२(२); **कथिलेयादारभ्य** १५·५३७, आरंभणें पहा. **कथन**—१·८७, १३·८५५; **ज्ञानकथनादिप्रस्तावि**, ज्ञाननिरूपणाच्या आरंभाच्या प्रसंगीं, १६·२७२; **भजनकथनाचेनि खागें** १८·१४३३. **कथा**—भला जाला विनोदु । कथेचा इये ॥ ४·३, १·२७३, २·८०, ५·१४०, ५·१७२, १०·४०, ११·१; **अवघी चि हे कथा** ११·४७७; **असंभाव्य कथा** १८·८०६; **आद्य हे कथा** ३·१२६; **गहन कथा** १·२८; **पुढारी कथा** ५·१७८; **पुढील कथा** ११·६९६; **प्रज्ञावलिची कथा** १५·४२७; **सुरस कथा** १·४८; **भक्तिकथा** १२·२३२; **मृत्युकथा** ५·९०; **रसालकथा** १२·२४३; **शांतीकथा** १३·११५०; **साधुकथा** ९·१८६; **कथा अनुभवावी** १·५७; **कथेचें आइकणें** ४·२१९; **कथा नीमे** ७·१७०; **कथे पसरु जाला** १३·३३४; **कथा ह्मणितली** १३·११४८; **कथा सांधैं** ४·६,५·६८, ६·१३९,—**सांधैन** ३·८५; **कथाप्रसंगीं** १०·३१०; **कथारूपें** १·३२; **कथालागु** ५·६६; **कथू** १०·११२ (३).

**कंद**—(१) कांदा, मूळ, उगमस्थान. एकांचे कंद खणविले। १३·२२६. १५·८७. **कमलकंद** ९·५७; **जगदादिकंद** १७·३२६; **विश्वकंद** ११·४८०; **विषकंद** ५·११४. (२) नाभिकमळ, याच ठिकाणीं असणारें मणिपूरचक्र, **कंदा वरि आगिठी करुनि** १५·३७५; **कंदौनि कां हृदय वेन्हीं** १८·३३४; कंदावरि शकति । उठिली दीसे ॥ ६·२२७, कुंडलिनी (हीच शक्ति) नाभिस्थानावर उभी राहिली कीं काय असें वाटतें.

**कदंब**—समुदाय. **इंद्रियकदंब** १८·४९९; **भक्तकदंब** १८·१६३६.

**कंदर**—दरी, गुहा. १३·६११. **गिरिकंदर** २·४७.

**कदरणें**—त्रासणें, थकणें, निरुत्साहित होणें. कदरसी हो मनें । १६·२६५.

**कदर्थणें**—कष्टी होणें. तेथ कदर्थले प्राण। ते चि हिंसा॥ १३·२३५. आतां पराजयें राजा। जैसा कदर्थिजे लाजा । १६·१७४. **व्याधी कदर्थत** १६·१४०.

**कंदर्प**—इच्छा, काम. ७·५०, १६·१२६. **कंदर्पाचेनि बळें** १३·८४; **अतिक्रुतकंदर्पसर्पदर्प**

१८·८, भक्ति पहा.

**कदलि**—केळ. **कदलिचा गाभा** ६·२९५; **कर्पूर-कदलिचीं गर्भपूटें**, कापूरकेळींचीं, कर्दळीचीं गर्भपुटें उकलतात तेव्हां कापुरासारखा वास येतो. ११·२४६.

**कनक**—(१) सोनें. लोहाचें कनक होये । १·७७. लोहाचें कनक जालें । ८·१९९. १६·१९४, १७·२१५, १८·११७६, १८·१७५५. **कनक—चंपकाचा कला**, सोनचाफ्याची कळी ६·२५७; **लोहा कनकत्वदीक्षागुरु**, लोखंडाला सोन्याची दीक्षा देणारा गुरु, परिस, १८·१६२८; **कनक-द्रुमाचां पालवीं** ६·२६२. (२) धोत्रा. कनकाचेया फळा । आंतु माजु बाहिरी मैळा । १८·६५७, धोत्र्याच्या फळांत विष व बाहेर कांटे, अशा प्रकारें अंतर्बाह्य त्याज्य. **कनका आणि कापुसा**, धोत्र्याचें फूल व कापूस दोन्ही जरी पांढरे असले तरी **रात्रि आणि दिवसा** एवढें त्या दोघांत अंतर असतें, १३·१०९६.

**कंप**—हालचाल, चलनवलन, कांपरें. जैसा निर्वातिचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । २·३४१. ११·४०४, १३·४९६, १८·३८४ (१, २), १८·१५८५. **जेयाचा तापसांसि कंपु**, ज्या कामाचें (१८·१०५२) तपस्व्यांना भय असतें, १८·१०५१; **निष्कंप** ४·१३; **कंपवणें—मंदानीलें कंपवितु** १८·१५०८; **न कंपे, कांपणें** पहा.

**कपट**—ढोंग, लबाडी, कावा. **कपट-गुर्बिणी मैत्री**, पोटांत कपट ठेवून वरवर फुगवून दाखविलेला मित्रभाव, १८·१४९३; **कपटी**, कपटी स्त्री, **कपटिचें देह** १८·६७०; **निष्कपट** पहा.

**कपाट**—कपार, गुहा. आवडति कपाटें । वसों जिया ॥ १३·६१०. **कपाटीं कोंडियलीं** १२·४७, **—भरौनि** ७·८६; **गिरिकपाटीं निकुंजीं वसे** १८·१०१५.

**कपाल**—कपाळ, नशीब. **घरोघरीं कपाल पीटवीतसे**, सर्व ठिकाणीं डोकें उठविते, १३·१९; **मेघांचा कपालिं पीटे**, शब्द हा आकाशाचा धर्म मेघांवर लादतात, १५·३४७; **लोकें माझां कपाळें पीटावें**, लोकांनीं माझ्या माथीं मारावें, ११·३९७; **कपाळीं आहे**, नशीबीं आहे, ६·५०; **कपाल धरूनि ठाके** १३·६६५.

**कपिल**—(१) ऋषि. परिशिष्ट (६) पहा. (२) पिंगट रंगाचीं. **कपिलवर्णें** ११·१३२.

**कर**—(१) हात. ११·२१३, ११·३४२, ११·४४२, १३·२७७, १३·२८०, १३·२८१, १३·२९८, १४·१०८. **हातिचेनि करकमळें**, हातांतल्या कमलानें, १२·२२१; **वाचा कर चरण अधोद्वार अपायु** १३·१००; **करचरण** ८·१११, ११·२२४, १४·२०४, **—तल** ६·२६५, १४·१०२; **करतल** १३·९११, **करतलीं घेऊं ये** १८·१६७५, **—लें उभूनि** १४·१८४, **—लें पावसी, तुझ्या हातीं** सांपडेल, १७·३१६; **करपल्लव**, ११·२११; **करपुट** ६·२०१; **करसंपुट** ११·२५०, ११·३३१, ११·४८२; **करसंपुटपालवी** ११·३३२; **पद्मकर** १·१३, १८·६६५. (२) किरण. **चंद्रकर**, **चंद्र** पहा; **रश्मिकर**, **रश्मि** पहा; **सहस्रकर** ६·२०, ९·३७५, १८·१२९०. (३) **-कर**, शब्दाला जोडून, करणारा, देणारा, या अर्थी, **करणें** पहा.

**करंडी**—देव ठेवण्याची संपळी. **परमात्मशिवाची करंडी** ६·२७३.

**करण**—कान. **प्रवृत्तिकरणाचां चाली**, प्रवृत्ति हेच कान, त्यांच्या हालवण्यानें, १७·६.

**करण**—(१) करण्याचें साधन, इंद्रिय. तरि श्रवण नयन । त्वचा घ्राण रसन । इयें जाणें ज्ञान । करणें पांचें ॥१३·९८. घाणीनि इंद्रियातें आखीं । करणें म्हणों ॥१८·५०३. ९·१९२, १३·५०५, १४·२४९, १८·४५१, १८·५०४, १८·८८१, १८·१०१२. **करणें चालितां**, इंद्रियांना चालना दिल्यावर, १८·४९४; **करणें तोंडें सूंति**, इंद्रियें सरसावतात, १३·१२४; **कवण विषय कैसिं करणें** १३·७६; **पृथग्विधकरण**, निरनिराळीं इंद्रियें, १८·३२८; **करणसामग्र** १८·७६२; **पांचें...करणिं** १८·३११; **दाही करणें** १३·१०३ सं. वा. श. पहा; **कर्त्ताकरणकार्य** १८·५०९; **कर्त्ताकर्मकरण** १८·५०८; **कर्त्ताक्रियाकरणीं** १८·५११; **मनप्राणकरणें** १८·७३८; **मनीं बुद्धिं करणीं** ८·२२९. **करणता**—करण्याचें सामर्थ्य, **ज्ञाना करणता आणी** १८·४९१;

**उपकरणें**, गौण साधनें, पूजासाहित्य, १३·४०६. (२) क्रिया, कार्य. हें असो काजेंविण । जें जें काहीं करण । तें केवळ कर्म जाण । इंद्रियांचें ॥ ५·५९. ९·१२१, ९·१९२, १३·१७८. **समरसिं करणासिं,** ऐक्य करण्यासाठीं, १३·५०८; **इष्टानिष्टकरणीं** १६·६०, येथें **करणी** शब्द असणें संभवतें; **अकरण**—कांहीं न करणें, **अकरणाचेनि खेदें** १८·५८९; **अकरणां आणि निषिद्धा,** कर्म न करणें व करण्यास अयोग्य, **१८·८९३.**

**करणी**—क्रिया, कार्य, काम करण्याची रीत. **अवांतर करणी** ९·७४; **इयें करणी(र्णी) कीं चेष्टा** १३·२३३; **करण** १६·६० पहा.

**करणें**—(क्रि.) होणें, घडणें, बनविणें. इतर शब्दांबरोबर या क्रियापदाचे अनेक उपयोग केले आहेत. त्यांपैकीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. तूं गुणत्रयातें अव्हेरीं । मीं माझें हें न करीं । २·२५९. करितू चि न करी काहीं । फलत्यागी ॥ ५·७५. आणि करितांति जें न करावें । वेदु ह्मणे ॥ ७·१०१. तो मी करितु आहें । ऐसें न ह्मण ॥ १२·११७. न करावें तें करी । १३·७७१. तेंसें जें तेणें करावें । तें तो चि आहे स्वभावें । १८·४१७. तें होंत चि आहे । जें करावें भाए जाए । ऐसें न करणें चि होए । तेयाचें केलें ॥ १८·११७१. **करां**—**जतन करां,** जपाव्या, ९·१३९; **करावा**—**अश्वमेधु करावा** १४·२३०, **आक्षेपु कां**—१८·१३६२, **आश्रो हा न**—३·२१३, **काइ**—११·६१५, **काये**—, काय उपयोग होईल?, १३·६२५; **काइ कराविया** १८·९२४; **करावी**—**शास्त्रें चि पारखी करावी** १६·४६३; **करावीं**—**धवलारें कां करावीं,** कां बांधावीं? ५·११३; **करावें**—**कर्त्ता कर्म करावें** ५·३७, **मोहरा**—९·३९६ (२); **करावेया**—**सार्थें करावेया** १६·४६१; **यात्रादिकें**—१७·२०१; **करिजे**—**से न करिजे** ६·४२१; **करिता,** करीत असणारा, **गोठि करिता जाला** ११·२८; **करिता,** करणारा, कर्त्ता, या अर्थीं पुढें पहा. **करितां**—(१) करीत असतां, केला असतां, **उभारा करितां** १८·३९; **कर्म करितां** १८·२३४; **न करितां सर्वं केलें** ४·१००; **संसर्गु करितां** ३·२३०; **करितां वेळीं** १८·६६३. (२) करण्यासाठीं, **चंद्रु करितां** १८·१७५६; **करी—आठवण करी** ११·५४४, **आन**—, निराळे उपयोग होत नाहींत काय? १७·८९(२), **आरती**—१८·१०६४, **इष्टापूर्तें**—१३·५२३, **उजगरा**—६·२२१, **काइ**—, १८·२१७, **चोजवाउलें**—, कौतुकास्पद पावलें टाकतो, १४·११२, **जपु**—१८·१५२३, **तळें**—, बांधतो, १७·८९(१), **तेजातें**—, पसरतो, १८·१६९४, **प्रतिष्ठा**—६·३७७, **प्राची**—, उदय पावते, १३·१७७, **राबु**—१४·२२८; **वाचे एणें करी,** वाचेला बोलावयाला लावते, १८·३३२; **चाड न करि** १६·४४४; **करीं—चाचाले करीं** १८·१६८८; **करिति, करीति—अवकळा करीति** २·२१८; **कूड**—२·२५०, **खंति**—१८·२१६, **पाकु करिति** १८·१७२४, **वीरू**—१७·१०४, **स्वर्गांतरा**—१०·२३०. **करिति** पुढें पहा; **करिथि** ६·४५३; **करितु—कृपेची वाट करितु** १३·२४९; **घेणीं न करी(रि)तु,** न घेतांच, १६·१६३;**करिसि—खेदु कां करिसि** २·१६२; **करितासि**—परि वायां चि गजबज । करितासि कां॥ ११·६१८; **करीन—विनती करीन** १३·४०४, **लेणीं**—१३·४१२; **करूं—पाहुणेरु करूं धांवे** १६·२२; **फार करूं** ८·१९४, **भेदु केवि**—१·२२१, **रूप**—, **रूप** पहा; **रंधन करूं,** स्वयंपाक करावयास, १८·४८८; **करू,** करेना कां, १३·१०२७, १८·१२४५; **करुनि, करूनि**—या शब्दाचे उपयोग अनेक आहेत; **करूनि घाली,** करून टाकतो, १३·३५१; **काइसेनि हिं करुनि** १८·१५४७;**सोयरिकी करुनि** ११·५३७;**कुरौंडी करूनि** ९·३७७, **चढावा**—११·३८३, **धीटींव**—९·२३, **धूरे**—१६·९३, **भावना**—९·३९६(१); **वत्स करूनि,** वासरूं समजून, १८·१६६७; **आदिकरुनि-करूनि,** आरंभास धरून इतर, १·१०४, २·१०३, ३·१९८; **आदिब्रह्मा करुनि,** मूळ ब्रह्मदेवापासून आरंभ करून, ९·२२०; **बहू-बहुत-करूनि,** **बहू, बहुत** पहा. **करुनिया—सर्वत्रताहं करुनिया,** सर्व ठिकाणीं मीच आहें असें समजून, १८·१२४३. **करुनु—मौन करुनु** २·८३. जुन्या गद्यपद्यांत येणारीं, आतां लुप्तप्राय झालेलीं,

११·६२; **ठायावरौनि** ९·११७. **ठायें**—**ठायें ठाउं**, जेथल्या तेथें, तत्काळ, वारंवार, ६·२०४, ८·१५४, १०·३३, ११·२२७, १३·१०८३, १७·१२७; **ठायेंठाउं** ११·११२.

**ठि-ठीकरी**—खापर, तुकडा. **ठिकरिया आंतौनि** १८·४३१, **आतणें** पहा; **ठीकरीया आंतूनि** १८·५३६, येथें ही **आंतूनि** चा व्यापून असा अर्थ घेतां येईल.

**ठी**—स्थान, स्थिति, आधार, दोष. जैसा पूर्वापरां नदीं । समुद्रु चि ठी ॥१५·४००. **ठीकरणें**, स्थिरता देणें, १३·१५; **ठी केली**, विवरणास स्थान दिलें, १५·४०९, **–ठेवी**, दोष देतो, २·३६३, **–होईल**, स्थैर्य मिळेल, १०·२७६, **– होये**, अखेरचें स्थान मिळतें, १८·४७३.

**ठीक**—व्यवस्थित, यथार्थ. **ठीक केलें** १४·२९८, ज्ञानदेवी–'ज्ञानें टीक केलें' सुशोभित केलें या अर्थी, १४·३००.

**ठेणें**—राहणें, बंद पडणें, कमतरता येणें. वांचूनि चंद्रिका ते ठेली । चंद्रीं चि आहे ॥८·१३६. येथ मागिल पुढैलि ठेली । आठवण सहाजें ॥८·२१५ तैसें दलिद्र तेवडें । ठेलें चि आंगीं ॥१७·४१६. ४·८४, ६·८९, ६·४३४, ६·४५३, ६·४७०, ७·६२, ७·१२१, ११·६१, ११·१६८, ११·१९२, ११·३२१, ११·४२७, १३·१०८, १३·२३१, १४·३००, १४·३१३, १५·२८८, १७·१५५, १८·६१, १८·१४२, १८·४१६, १८·७५३, १८·१३२४, १८·१४१३, १८·१५३८. **अपटांतरिं ठेलें**, जें साधनेलाही गोचर होत नाहीं, ११·६१०, ज्ञानदेवी–'अपारांतरीं', ११·६२०, कुंटे–अपारांतरें; **अहंता बुडौनि ठेली** १५·३९४; **आपणपें होउनि ठेलें** ८·५९; **आपादान ठेलें**, शास्त्रज्ञान मिळविणें अवघड होऊन राहिलें, १७·३८; **एणें जाणें ठेलें** १८·११६२; **कपाटीं भरौनि ठेले** ७·८६; **करितां काइ ठेलें**, काय कमी पडलें, २·७; **कव्हाल पडौनि ठेलें** ११·३५४; **कोकिं नाहिं ठेलें**, कोकशास्त्रांत कांहीं बाकी राहिलें नाहीं, १३·८२८, **चित्त उमें ठेलें** ९·५१; **डहुलतें ठेलीं**, बुचकळत राहतात, ९·६१; **दूरि ठेला–ली –ले** ६·३१२, ९·१२२, १२·१६८, १२·१९१, १३·३३४; **बोलांचें बोलणें ठेलें** ४·१६१; **मतांगें बोलों ठेला** १३·३३२, ज्ञानदेवी–'ठेला'; **मीपणें हालों ठेला**, मजजवळ येऊन मीच होऊन राहिला, १८·११६६; **वायुचें स्फुरण ठेलें**, बंद पडलें, २·१०७; **वारा वाजों ठेला**, थांबला, १४·३०३; **विवक्षा ठेली** ११·२६७; **वेदांचिये ही मती ठेलें**, वेदही कुंठित झाले, ११·१८३; **वेदु उगा ठेला** १७·१७१; **श्रवणें आइकों ठेलें** ३·५५; **स्वप्नावबोध ठेले** ३·५७; **होउनि–नु ठेला-ली-लें**—परि तें मीं चि आववें । होउनि ठेलें ॥ ९·२५६ ३·२५८, ५·१५९, ८·८४, ८·१४९, १०·९४, ११·१७४, ११·२२९, ११·३४२, १५·४९४, १८·५४०; **मीं चि होउनि ठेलीं** ७·१५७; **मी ते चि होउनि ठेले** ४·६२; **ठेलेया–यां हीं** २·२७०, **भवव्यथा**, संसारव्यथेंत कष्टत राहिलेल्यांना, १८·१४४८, **भींति पडौनि** – १८·२६१.

**ठेंकुलें**—कमी, क्षुद्र. १८·१७६२.

**ठेंगणें**—त्या मानानें लहान, खुजें. **गगन ठेंगणें केलें** ११·४४३.

**ठेवणें**—व्यवस्थित करणें, जवळ असणें, निश्चित असणें. या क्रियापदाचे संदर्भानुरूप अनेक उपयोग ग्रंथांत केले आहेत, त्यांपैकीं उदाहरणार्थ कांहीं दिले आहेत. क्रोधीं असे ठेवला । संमोहो जाणैं ॥ २·३२२. अनामा नामें ठेविति । ४·६८. कां जेयाचें ठेविलें तेया । देउनि होइजे उतरायियां । १७·२७५. २·३६३, ६·१९४, ६·२८४, ६·४८९, ८·४१, ८·२०४ (१), ९·१२७, ९·३३२, ९·३६८, ९·३७०, ९·४९४, ९·५१५, १०·१५, १०·१७, १०·१२३, ११·१३, ११·५९, ११·३३१, ११·४८२, ११·५९२, ११·६३२, ११·६६३, ११·६६९, ११·६८७, १२·१८७, १३·१८२, १३·२०२, १३·४३२, १३·५२५, १३·६७०, १३·७१८, १३·८४१, १३·९४९, १३·१०३९, १४·१५, १५·३६, १५·३४५, १६·१००, १६·३८४, १६·४०४, १७·२५३, १७·३७४, १८·१५०, १८·४३५, १८·७१८, १८·७३३, १८·८२६, १८·८२८, १८·१०७७, १८·१३००, १८·१५४३. **अजत्व परौतें ठेवीं** ४·४९,

अस्पृता ही चूकि – १३·११५१; अष्टदल वरि ठेउं १५·६; आपातें पूसूनियां ठेवी ६·२३९; ओगरूनि ठेविलें ८·११; गुणाग्निं ठेउनि, वातीच्या टोंकास लावून, १८·१६३९; चोखडें ठेवी १३·५७९; देह ठेविति ८·२१९,– ठेवी ८·९६; नांव ठेवणें, नांव पहा; नीद ठेविली ऐसी ये १८·६७८; पाए माईवें ठेवीतु जाये १३·२५४; पाये हलुवार ठेविति १३·२४७; फळ ठेविलें १७·८६; मोक्षु ठेवला आहे ६·४३९; मोक्षु ठेविला ऐसा १८·७००; वाहागी ठेविले आहाति १०·१२२; वैरागीं पाउल ठेवी १८·८९८; सखा जोडूनि ठेविला १८·१०३७; साक्षी ठेविला १३·५९६; सोनेयाचा करूनि ठेवी १०·११९; हेतु ठेउनि, इच्छा धरून, १८·१५११; ठेविलेनि १३·७१४; ठेवणें ८·२१६, १८·४०१; सांडावें कां ठेवावें १८·११६४; ठेवित खेउ ८·२०४; ठेउ १८·४५२; ठेवा ११·६२३, १६·४५५, १८·१३१८; घरिचा चि ठेवा १८·८८८; नैष्कर्म्यसुखाचा ठेवा ८·४६; ठेवा जोडला १३·४४; आत्मठेवा १८·१००२; ठेवां—कृपणु आपुला ठेवां, जसा दक्ष असतो, १८·६५१; जीउ ठेवां आहे १३·४८६; ठेवाठेवी ९·३१.

**ठोंठावणें**—अडखळणें, अगतिक होणें. अभ्यासीं ठोंठावला ठाये, अभ्यासांत व्यत्यय येतो, धक्का बसतो, २·३१४, ज्ञानदेवी – 'ठोठावले ठाये' २·३१४, कुंटे – 'थोटावलें ठाये' २·३१४.

## ड

**डगर**—(१) प्रसिद्धि. १८·१३. सात्विक ऐसा डगरु १८·२०५. (२) फोल प्रसिद्धि, आळ. अव्ययत्वाचा डगरु असे, खोटी प्रसिद्धि, १५·११७.

**डगल**—स्थूल, मोठ्या आकाराचें. आकारें नव्हंति डगलें। १७·१२६.

**डंडलणें**—डळमळणें. तेथ तीन्ही लोक डंडलित। १·२५५.

**–डंबर**—जग पहा.

**डवरणें**—लिप्त होणें, लेप लावणें. कां कैलासु पारजें डवरिला। ११·२१८. सेंदुरें नभ डवरलें ११·१३२.

**डंष-स**—दंश, चटका, मर्म. डंष – १३·८३०; डंस—हा डंसु जंव नये (न ये) हाता। तंव माझें साचोकारण पार्था। न संपडे गा सर्वथा। जेवि मुर्षि कणु॥ ९·१३५. नाथसंकेतिचा डंसु, मर्म, ६·२९१; जिव्हाडंसु, चटका, १७·१४३; सुडंसु अर्जुनु, मर्मज्ञ, ५·१६०.

**डहुलणें**—ढवळणें, गढूळ होणें. जें थीतें हें डहुलले। हृदय माझें॥ ३·१४. म्हणौनि जन्ममरणाची दूथडी। डहुलतें ठेली॥ ९·६१. क्षीरसागरु न डहुलितां १०·१७८; घर डहुली (क्रि.) ६·२१६, घरड हुली (घर डहुली) (ना.), घराचा झाडा घेणें, ११·५७६; दर्दुरु समुद्रु डहुली १८·६०४.

**डाउ**—डाव. जो डाउ पडे, डावांत जें दान पडतें, जी मनोवृत्ति बनते, १३·१२६; नक्षत्रीं डाउ पाडावा, नक्षत्रांना सोंगट्या समजून डाव मांडावा, ११·५७१. डाय पहा.

**डांक**—धातू सांधणारा पदार्थ. तरि डांक देउनि सांधिलें। शिलेतें कांइ॥ ८·४२.

**डाकुली**—चुटकी, टाळी. डाकुलिया वाजवीति १७·९३.

**डाखला**—फांदी, डाहाळी, येथें फडा. जी सहस्र शीर्ष याचे डाखले। ११·२६५, ज्ञानदेवी – 'सहस्र शीर्षयाचें देखिलें' ११·२६९.

**डांग**—सोटा, दंडुका. डांगा मेलवितां, सोटा मारला असतां, १५·२२८.

**डांगुरटी**—दवंडी. बोलाचिया डांगुरटी १८·२७९, ज्ञानदेवी, कुंटे 'डांगुरटी'.

**डांवोरा**—दवंडी. सुकृताचा डांगोरा १३·६५८.

**डाय**—डाव. डाया ये, डाव खेळावयाला येतो, १३·५४०.

**डाल**—(१) डाहाळी, शाखा. चहुं युगांचीं डालें १५·१२८, माणुसें – १५·१७४; अधिचा डालिं फांकतसे १५·२१०; डाले(लें) फांकली

१५·१४४; **मनाची डाळ धरी** १५·९५; **वैराग्याचीं डाळें घेईं,** आश्रय या अर्थी, ६·५७; **पान पालव डाळें** १५·१६४. (२) पसरट पात्र, परडी. **इक्षुरसाचें डाळ** १५·४२४; **बुद्धिची**–१३·३८७. **डाळी,** डाहाळी, **संकल्पाची डाळी** १३·५१; **डालुका,** कोंवळ्या डाहाळ्या, १५·१६३.

**डावलणें**—चुकवणें, बाजूस सारणें. तैसिं पुण्यें डावलूनि गेलीं । अभक्तांतें ॥ ९.४३३. ८·२५८. **मातंग-सदनु डावलावेया** १८·५४५.

**डावा**—उजव्याच्या उलट. अप्रवृत्तिचा अव्हांटा। डावा केलो(ला) ॥ ७·१२५, वाम मार्ग टाकला या अर्थी. **डावे(वें) जेवणें, डावें उजवें,** १०·२९०.

**डावी**—हा अपपाठ दावी ऐवजीं १८·४७६ ओवींत आला आहे.

**डाहारणें**—प्रसिद्धीस येणें, अंगास लागणें. **जें श्रुती डाहारिजे,** जें श्रुतींनीं प्रसिद्धीस आणलें, १४·४१; **मीपणें विण डाहारलें,** हें तें हा भाव व मीपणा गेल्यावर जो अनुभव आंगीं येतो, त्यास उद्देशून, १५·२४२; **सबलु डाहारला ठाये,** पहारीसारखें रुपतें इतकें तिखट, १७·१४२, अर्थ क्लिष्ट वाटतो.

**डाहाल**—डाहाळी, फांदी. **डाहाल-फलादिक** १४·३७२; **धर्मडाहालबाहालिं,** धर्माच्या फांद्यांच्या विस्तारांत, १५·१९१; **मूलडाहालांची उजिरी** १५·२१५. **डाहालिका—चित्तचतुष्टय डाहालिका** १५·९६; **डाहालिया** १५·५८, १५·१४३, १५·१४९, १५·१९५; **उंचा नीचा**–१४·११८, **तपाचिया**–१५·१८८.

**डिखल**—ढेंकूळ. **मातियेचें डिखल** ६·९२.

**डिंडिमा**—डंका, गजर, गडबड. **संसारिक डिंडिमा आटे** १६·४४०.

**डिंब**—आभास, आकृति. नातरि प्रबोधलिए वेळे । स्वप्नाडिंब मालवे । १५·२८३.

**डिंभ**—मूल. **डिंभोपाधिकु विडालु,** मुलाच्या बाबतींत मातापित्यांना लागणारे उपाधींचे दोष, १८·२२.

**डिर-रि-री**—अंकुर. **तिवना डिरु फुटे** १५·९४. **डिरि-री**—डिरिया रिगति निमिखें । बांबलैजौनि ॥ १५·१८४, **प्राणाची डिरि** १५·१०३; **देहाची डिरी** १५·१३१.

**डुडुल**—घुबड. आंधारीं देखणें जैसें । डुडुलांचें ॥ १४·२४८. १६·२३७, १८·३८२, १८·६७९.

**डोइ–ई**—डोकें. पायांचें चालणें डोया । केलें जैसें ॥ १८·९२८. १३·७१४. **डोई दाटिलें** १६·४४२.

**डोंगर**—मोठी टेकडी, मोठी रास, विपुलता या अर्थी. गांविंचे देउळेश्वर । न्यामक चि होंति जर । तरि देशिंचे डोंगर । उगे असति ॥ १८·५६७. ११·६२५, १६·३४३. **आगिचा डोंगर** १५·२७१, **खदिरांगाराचे**–१६·३७१; **देह–दुःखाचेनि डोंगरें** ६·३६८; **यमनियमाचे डोंगर** ५·१५८, **व्यामोहाचा**–४·१७०, **सोनेयाचा**–११·६१५, **सोमकांताचा**–१८·२८४; **उंदिरु असिका डोंगरु उसपे,** कणासाठीं एवढा सायास, १८·६०४; **कां डोंगरिं जैसें पेटलें,** एकदम पेट घेऊन मर्यादा राहत नाहीं या अर्थी, १३·६९७; **जेया पासिं डोंगरीं माती होंती,** गुरूच्या मातीच्या प्रतिमेपुढें एकलव्यानें धनुर्विद्या संपादन केली, या गुरुमहात्म्यास उद्देशून, १८·१७०९; **म्लेंछधर्माचां डोंगरीं बोलविलेंसे,** अशा तामस ज्ञानाची बोळवण दूर डोंगरावर केली, १८·५४७, ज्ञानदेवी–'बोळविलेंसे' १८·५५०; **राऊ रायेपणं डोंगरा गेलेया(यां),** ओसाड निर्जन भागांत गेला तरीही, १४·२१८; **रूपाचां डोंगरिं हिंडतु** १५·३२५; **स्तब्धपणें डोंगरासि न मनवे** १८·६६८; **दांगें डोंगर झाडलीं** १८·९३.

**डोंड**—धोंडा. हे देहदुर्गिंचे डोंड । ३·२३७. **डौंड** पहा.

**डोणी**—नाव. १५·२२९. **संदेहडोणी बुडे** १४·३०.

**डोलणें**—एका बाजूकडून दुसऱ्या बाजूस हालणें, हालत राहणें, कलणें. स्फटिकगृहिंचे डोलत । दीप जैसे ॥ १३·४७४. करतला वरि वाढुला । डोलत देखिजे जेवि आवला । १३·६५०. **आंग हान डोलैल** ६·१८४; **कृष्णु सर्वांगिं डोलला** १०·१८७; **कृष्णद्रुमु डोलति** ७·१८२, **पालव**–१५·१५६; **प्राणुक्षोभें डोलतेया** १८·१५४०; **रुंखु डोलतु देखावा** १५·३४४; **सुखावलेनी चित्तें डोलतसे** ९·२३०; **डोले ना** १४·३४४;

डोलों लागला १८·१५६०, —ले १२·१६३; डोलों लागे १४·१८७, कमलदलें डोलवीजिजति, डोलविलीं जातात, १३·२५३. डोल— डोलु आला ६·१३५, १८·६१; डोल रूखीं उरे १८·४२०.

**डोलस**—दृष्टि असलेला, चतुर, ज्ञानी. मोराचां आंगिं असोसें। पिसें आहाति डोलसें। १३·८३३, डोळ्यासारखीं या अर्थी. ज्ञानाचां डोलां डोलसां। माझि डोलसु तो वीरेशा। १३·१०६२. ते ज्ञान नव्हे जाणावें। डोलस तम ॥ १८·५७८. ११·६९, १५·३२, १७·४०६. ज्ञान तूझेनि डोलस, तुझ्यामुळें ज्ञान पाहूं शकतें, १४·१०; बुद्ध्यादिकें डोलसें १८·१३१६, सर्वदृष्टी—१८·१४०८; ज्ञानडोलसां नरेंद्रु, ज्ञानदृष्टी असणारांत श्रेष्ठ, १८·५१७.

**डोला**—डोळा, दृष्टि, दृष्टिकोन, ज्ञान. जैसें डोलेयां अंजन भेटे। तेव्हळि दृष्टीसि पाटा फुटे। १·२३. जंव कवलु आथि डोलां। तंव चंद्रु देखावा पीवला। १८·३८६. रूपाचा सुजाणु डोला। वोडीं ये काइ परिमला। १८·१४८५. पासिं एउनि दिनकरें। डोलेयांतें आंधारें। पूसिजे हें काइ सरे। कोणी ठांईं ॥ १८·१५४५. ४·१२, ६·१८, ७·१८४, ८·४१, ८·१५७ (लां), ९·६०, ९·७१, ९·१३८, ९·२००, ९·३५५, १०·७३, ११·६५, ११·१७१, ११·३०६, ११·३५९, ११·३७०, ११·३७६, ११·५७८, १३·१७३, १३·१७६, १३·१८८, १३·३८१, १३·५५८, १३·६५०, १३·८७३, १३·१०८४, १३·११२०, १३·११५६, १४·२०, १५·३५०, १५·४१८, १६·३, १६·२९, १६·१६९, १६·३३२, १७·१७६, १८·१५९, १८·२०८, १८·२७१, १८·४९२, १८·८५८, १८·८८८, १८·१४६७, १८·१५०८, १८·१५४६. डोलेयांचा अंजुलिं ११·४; डोलेयांचें देखणेपण ७·६१ (२); डोले नाराजांची सूटी १६·२४१; कर्माचे डोले ज्ञान ९·३४६; चामल डोले, चर्मचक्षूला दिसेल तेवढें, १८·५७०, जगाचे —१८·६१५, जाणिवेचे— ७·४; ज्ञानाचां डोलां ११·२९७, १३·१०६२, विचाराचां — १४·२६६, विज्ञानाचां — ११·२११; लोका(कां)चेया डोलेयां १८·२८१; व्यवहाराचे डोले १४·१७३, शास्त्रांचे —१८·३६८, श्रीगुरुचे—१३·४२६; डोले उचलूनियां १३·२७४,—काटी, आंधळा होतो, १७·२०१,—जाति १३·७६७; डोलां दावी १८·१५७, —दीसे ६·१७१, —देखिजे १३·११३२; डोले निवाले ११·३६१, —फूटति ४·२३, १६·२३७, १८·६७९; डोला देंतिये क्षणीं १८·१२०१,—लागत खेओ ८·७२, —लागला १३·१०७३; अचक्षू मज डोले १२·२२१; डोलां चि पटल रचे ७·६१ (१); डोले भिंगुलवाणे करूनि ११·४४३; डोलेयां...माझि लपे ६·२९३, —तमोरी मिले १८·९६२; डोला नाखें रोविजति १८·१७६, —रिगतें झाडावि १३·२८२; डोलां विण पाहालें वायां जाए ११·९६; डोला सावाइला होए १८·१२६५; डोलां हरलु न थरे १२·५२७; आपुले डोले आपण बांधे ६·७३; करचरणीं डोले होंति १४·२०४; खोलिं डोलां पाहे १३·१०५१; फुलें आणुनु डोलां केवि बांधावीं ९·३४४; विन्यासातें डोलां बांधौनि, व्यवस्थेकडे जो दुर्लक्ष करतो, १३·६८२; लागौनि डोला उघडे तंव, एका क्षणांत, १५·१३३, लोकां डोले वरि घेऊं ए, लोकांना सहज दिसेल, १८·१७५८; जात्यंधाचा कां जैसा डोला वाडु १८·५७६; अर्जुनाचे दोन्ही डोले ११·२०६; दोहीं डोलां झोंबावें १०·३०७; डोलेया प्रति १०·३०६; डोलेयां चि लागि १६·१५९; डोलां विण, नीट न पाहतां, १८·७१८; डोलेभारणीं १७·२९६; मनडोले ११·२८५.

**डोह**—खोल पाणी असलेलें तळें वगैरे. जैसी स्वप्निचां डोहीं। जाग्रति न बुडे। ७·५३. ७·१३०, १६·३१६. अगाधा डोहा १३·७३७; अंतः-सुखाचां डोहीं ५·१४३, जाणिवेचां—७·८०, महाशून्याचां—६·३१५, रजोवृद्धिचां—(हीं) १४·२४०; सुखामृताचे डोहो ९·५; स्वप्निचां डोहीं १८·९६८, हृदयाचां—८·१०९; वदन-डोहीं ११·४१४.

**डोहला—डोहोला—डौंला**—गर्भवतीची वासना, इच्छा, उत्कट इच्छा. डोहला—तो पाहावा हे

डोहले । ह्मणूनि अचक्षू मज डोले । १२·२२१. **विश्वरूप पाहावेयाचे डोहले** ११·३६१; **डोहोला–आर्त्तिचे डोहोले** ११·१११, **ब्रह्मत्वाचे**–६·१४८; **डौंला**—कैसा प्राप्तिचिये वेले । निदैवां आंधलेपणाचे डौंले । ६·७३. हे सर्व शब्द बहुवचनी आहेत.

**डौंड**—धोंडा. घेतलिया अहंभावाचिया डौंडी । ७·८१, **डोंड** पहा. ज्ञानदेवी–'धोंडी' ७·८४.

**डौंडि**—दवंडी, डांगोरा. **डौंडिचें तोंडीं लावी**, प्रसिद्धि करतो, डांगोरा पिटतो, १८·६००.

**डौर**—डंका, नगारा, प्रसिद्धि, डौल, उपहास. **डौरु वाहे**, डौल दाखवून बडबड करतो, १३·८२३; **वेदांतिं डौरु केला** १५·४९०; **गा डौरा** ११·५३२, **गाडौरा** पहा.

## ढ

**ढंक**—अडथळा, दृष्टिआड येणारा मोठा पदार्थ. जै सोहंभाओ हा ढंकु । ६·११५.

**ढलणें**—ढळणें, हालणें. जैसी तीरीं नाव न ढले । ७·४. वांझु(हु)टलिचेनि बलें । पृथ्वी जैसी न ढले । १३·४९०. ११·४९२, १६·१५७, १८·११५९. **पातिं न ढलति** ६·२०३; **मंदराचल न ढलितां** १०·१७८; **संवादाचा सुवाऊ ढले**, वाहतो, ९·२८; **चले ना ढले**, १२·४५. **अढल**—अनंत हें अढल । आद्य हें ॥ ११·६०५, ७·४४, ११·४८६, १८·७५७, १८·८८४, १८·९८९, १८·११२०, १८·१२३२, १८·१२८५.

**ढलमलणें**—डळमळणें, डुलणें. **ढलमलीत** १४·३९६.

**ढवल**—धवळें, पांढरें, उज्वल. **धर्मकीर्त्तिढवलु** १२·२४०.

**ढवलणें**—पांढरा रंग देणें, उजाळा देणें, प्रकाशित होणें. भानुचें(चे)नि तेजें ढवललें । १·३९. महातेज कवणें ढवलावें । १·७४. **व्यासोक्तितेजें सकल ढवललें** १·४१.

**ढवलार**—चुनेगची वाडा. १७·८८. **धवलार** पहा.

**ढालणें**—स्खलन करणें, ओतणें. जी बुद्धितें सली । निश्चयातें ढाली । ६·४१३. **गुरुलिंगा ध्यानामृत ढाली**, अभिषेक करतो, १३·३८६. **ढाल**—(१) उतार, **तोयाचे ढाल** १८·७७२; **पाणियां ऐसा ढालु** १३·३५८; **पाणिढाल** ७·९५; १८·१६६८. (२) अनुकूलता, **रूपागुणाचा ढालु** १३·९८०; (३) मर्मस्पर्शी शब्द, **प्राणुपापताढालु** १३·२७०, ज्ञानदेवी–'प्राणुपापढालु' १३·२७१. **ढालें**, हळूहळू, क्रमानें, ३·४२, ६·२४७, १६·४५१; **ढालें ढोलवीजिजति** १३·२५३; **ढालें ढालें** १५·२५७.

**ढिल–ढील**—सैल, मऊ, मंद. **ढिल**—रसें गाढिं वरि ढिलीं । १७·१२७. **ढिलें केलें** १८·१०७१. **ढील**—आंगें कर्मा ढीला । जो मनें विकल्पें भरला । १३·६७६. **ढीलेपण** २·२८.

**ढिव**—मुलामा, बेगड. कलस ढिवांचे पोकल । जलो वरिचील झलाल । १३·४६९, ज्ञानदेवी–'ढिमाचे' १३·४७१.

**ढिवर**—कोळी. १६·३१६.

**ढिसाल**—अगडबंब पण ठिसूळ, अफाट. नाहिं येणें पाडें ढिसाल । दूजें जगीं ॥ ४·१७३. मेरु एसणें ढिसाल । ६·९२. १८·१२२.

**ढूंकणें**—झुकणें, कलणें. **जीवा कडे ढूंकैल** १३·५०३.

**ढूम**—खडक, टेकडी. **क्रोधाचिये ढूमे नेहटित** १६·३३९, ज्ञानदेवी–'ढेमे' १६·३४१.

**ढूलणें**—डुलणें, झुकणें. मदिरा नेघतां ढूले । १४·२५०.

**ढेंकर**—पोटांतील कंठांतून येणारा वायु. १८·१७, १८·३३९.

**ढेंढा–ढें**—धेंडा, प्रस्थ, अवडंबर; वरातींत वधुवरांस खांद्यावर घेऊन नाचतो तो माणूस. **ढेंढा—अनुभवाचा ढेंढा तो नाचे** १८·११८१; **कीर्त्तिविजयाचा ढेंढा नाचे** १८·१७५९. **ढेंढें**—कां वार्षिये ढेंढें फीटे । ९·१०१. १८·२८७; **महा ढेंढीं** १०·२६८.

**ढेंपुली**—ढेंकूळ. **पांसूची ढेंपुली**, मातीचें ढेंकूळ, १५·३६९.

**ढोंडा–डी**—धोंडा. **ढोंडा**–शिखरौनि सूटला ढोंडा । १३·७५३. आंगभारें सूटला ढोंडा । १७·२५९. **ढोंडी**—१४·१८१, १४·२४५.

**ढोंढा–ढी**—धोंडा. **ब्रह्मगोलकांचे ढोंढे** ७·७८;

ढोंढी १८·७५१; ब्रह्मगोलकांचां ढोंढी मोडौनि ये, ब्रह्मगोलकांची सृष्टि तयार होते, ८·२१.

**ढोर**—बैल, गाय, म्हैस इ. गुरें. ढोर सवडबुडी। पंकिं गेला ॥ १३·७८२. १३·५६४.

# त

**तगणें**—टिकून राहणें. तरि विरक्तु वांचूनि कें ही। ज्ञानासि तगणें नाहिं। १५·३६.

**तट**—(१) तीर, किनारा, कांठ, सीमा. ९·१५२, १७·२५७, १८·१०११. दुःखकालिंदीचां तटीं ११·३४२, प्रकृतिचां – १३·१०१७, सायुज्याचां – १२·९२; निवृत्तितटीं ७·९८; विवेकतीर्थतटा १८·१००५; सिंधुतट १८·१६९०; तपोवनें तीर्थें तटें १३·८२२, तीर्थें तटें तपोवनें १३·६१०; तटस्थ—तेथ तटस्था तटस्थ पडिलें। ११·१९१. (२) पर्वताचा कडा. तुंगें तटें ७·६८.

**तठ**—चढाओढ, स्पर्धा. करुनि महाकाळेंसि (सिं) तठें। ११·३४८.

**तंडणें**—विनोदानें भांडणें. निकरें तंडों। ११·५४१.

**तडवा**—चांदवा, छत. गगनाचा तडवा १३·५६.

**तण**—तृण, गवत, पेंढा. तणाचा बाउला १८·४३५; तणाचें बुजवणें १३·५६८. तणकुटा, पेंढा, ३·२४५.

**तण्हार**—गवताची झोंपडी. असतीं तण्हारें। सांडावीं केवि ॥ ३·२१८.

**तत्**—शब्दास जोडून तो, ती, तें या अर्थी; ब्रह्मनिदर्शक शब्द. तदनुसारें ४·७८, १५·४५३; तदाकार १३·८६९, १८·३२०; तदात्मक १७·३६९; तत्कार—तरि सर्व मंत्रांचा राजा। तो प्रणउ आदिवर्णु बुझा। तत्कारु दूजा। तीजा सत्कारु ॥ १७·३३९, ॐकारु तत्कारीं १७·३५५, १७·३८८, –रें १७·३८१; ॐकारें...तत्कारें १७·३७०; तत्पदार्थ—जैसें त्वंपद हें आघवें। तत्पदार्थी सामावे। ११·६३८, तत्प्रसादें, ईश्वरप्रसादानें, १८·२२६; तद्ब्रह्मादिवाक्यफलें ७·१८१; तन्मयता १३·८६२, १८·९१७, १८·१४१०, तन्मयतेचें एकछत्र ९·२१६; तन्मात्रा—(१) पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या पंचमहाभूतांचीं अतिसूक्ष्म तत्त्वें, यांची रूपें पांच ज्ञानेंद्रियें आकलन करतात, श्रोत्रादितन्मात्रें १५·९८; (२) ॐकाराच्या साडेतीन मात्रा, तन्मात्रार्द्धेंवेन्हीं ६·३०४; तद्रूप १७·३६७, १७·३६८, –ता २·१७४, ३·३६, ६·४७०; तत्व-त्त्व पहा; तल्लीनता २·१७२, ६·३३१; तच्छब्द १७·३६५, १७·३६६; ॐतत्सदाकार १७·३४०; तत्क्षणीं, क्षण पहा.

**तंतु-तू**—सूत, वात, फुलांतील केसर. देखिलें जैसा पटीं। तंतु एकु ॥ ६·३९७. तरि दोन्हीं पालववेन्हीं। जैसा एकु तंतु अंबरीं। ९·२१९. ओतप्रोत पटी (टीं)। तंतु जैसा ॥ १०·२४४. पैं पट(ट)त्व तंतु नोहे। तन्हीं तंतुचें चि तें आहे। १३·१०५१. कां दीपा संगें दीपाकारु। होये तंतु ॥ १८·९७९. ६·१००, १३·८८७, १८·७०, १८·५४१. तंतुसिं पटु १८·११७७; वस्त्रपणें तंतु दशे राहे १३·९५; तंतुमय १८·३५८, –त्यागें १६·१३०, –समवाय ९·१०५; सूत्रतंतु १५·३३३, १६·१८२. तंतू १४·३७६. तांधु-थू पहा.

**तंत्र**—आधीनता. परतंत्र ३·८४, –ता ३·६०; स्वतंत्र—सम मीं स्वतंत्रु। ब्रह्म मीं पर॥ १८·११९३, ११·९८, ११·१२९, १७·३६०, १८·९५३, १८·१२२७, १८·१३००, १८·१४२६, १८·१५९३; स्वतंत्रता ३·१११, ४·४५.

**तत्व-त्त्व**—सत्य, वास्तविक स्वरूप. तत्व—मग तत्वता तत्व उरलें। ज्ञानियासि ॥ २·१३१ (२). जें साधकाचें कारण। सिद्ध तत्व गा ॥ ६·४७६. ३·१६, ३·२०, ६·४, ६·३६६, ७·३४, ११·६४६, १३·१४३, १६·१०३. चोवीसां हिं तत्वांचें १८·३१७, तत्वाचां चौविसीं मापीं १८·५१९, सतीस हीं तत्वें १३·१५५, सं. वा. श. पहा; तत्वार्थ १२·१७९; तत्वज्ञ २·१२६, ३·१७७, १०·३८; तत्वज्ञान १३·४५२, १३·६२३; तत्वज्ञाना चोखटा १०·१२६; तत्वनिष्ठ ३·१२४, –भेद १३·४, –मेळापकिं १३·९९, –विषिं १८·७६;

मेधावी तपिया १८·१४९५, तापस पहा.

**तपिनणें**—तप करणें, तापणें, तापवणें. तपें तो चि तपिनला । ९·४१८. **पाठी चि तपनली,** वसिष्ठानें आपली छाटी तापवून सूर्यासारखा प्रकाश पाडला याला उद्देशून, १०·३५, ज्ञानदेवी–'शाठी', कुंटे–'शाटी' १०·३६.

**तपन**—सूर्य. नाना मालवतेनि तपनें । नेइजति लोकाचिं दर्शनें । १५·३३४, ज्ञानदेवी–'मावळतेन' १५·३६६. १४·३३०. **तपनें विण प्रकाशु** १७·२२७.

**तम**—(१) अंधार. हां गा सूर्योदयीं राहावें । कैसेनि तमें ॥ ११·५०३. **तम प्रकाशु होये** ८·१९५. **संसारतमसूर्या,** संसाररूपी अंधाराला सूर्यासारखा, १०·२ (१). (२) सत्त्व, रज, तम या गुणांपैकीं तिसरा गुण, यापासून अज्ञान व कामक्रोधादि अनिष्ट विकार उत्पन्न होतात. रजोगुणु पेरी । तेतुलें सत्व सोंकरी । एकलें तम करी । सावगणी ॥ १३·३९. मोहो अज्ञाना प्रमादा । पयां मिळालेयां दोषवृंदां । पुडुतीं पुडुतीं प्रवुद्धा । तम चि मूल ॥ १४·२६५. ते(तें) ज्ञान नव्हे जाणावें । डोळस तम ॥ १८·५७८. रज चि तमें भेसळ । तेथ शूद्रु जाला ॥ १८·८२६. १०·१२७, १३·९६९, १४·१४२, १४·१७६, १४·१९२, १४·१९९, १४·२५२, १४·२५३, १४·२५६ (२), १४·२७२, १४·२९४, १४·३४१, १५·१६२, १५·१८२, १६·४१४, १७·६९, १८·५७७, १८·५७८. **तमां(मा)लि पढियंते** ३·२३९; **तमाची पुरवणी** १६·३६७; **तमें वाढिनलेनि** १४·३२८; **तमाचें विंदाण** १४·१७२; **बहुवलें तमें** १७·६९; **तमाची आगि उठी** १७·६५; **तम चि कामौनि** १८·७४९; **तमाचिये गर्ते पडिले** ९·१८४; **तमें धसालु गुणसंबंधु** १८·७४८; **तमाचे धारसे काढ (गाढ)** ७·७७; **तमाचिये लोथे संकल्पातें बांधौनियां** १४·२५६ (१); **तमक्षेत्र** १७·९८; **तमरज** १७·३१५, १८·९४७; **तमरजें** १४·९९, **तमसत्व** १४·२२४; **रज तम सात्विक भेदिं** १७·६७; **रजतम** १७·६३, १८·१५७; **रजतमाचें कवाड** १७·३१०; **रजतमाची कावडी** १६·७६; **रजतमात्मक** २·२५७; **रजतमविजैयें** १४·२०२, **–विनाशें** १७·३१४; **रजतमादि** ७·५२; **रजतमें**—तैसीं रजतमें हारवी । जैं सत्व माजु मिरवी । १४·१९८, १४·२६७; **सत्वतम** १४·२००; **सत्व…रज…तम** १४·१३८, **सत्वरजतम** १४·१३७; १४·२९२, १७·४५, १७·६६, १८·५२२; **सत्वरजतमात्मक** १५·९४.

**तमस्**–(१) अंधार. **तमोरी,** सूर्य, १८·९६२; **त्रितापतिमिरतमोरी,** १७·४२०, सं. वा. श. पहा. (२) तम (२) पहा. **तमोगुण** १४·२४१; **तमोगुणिची राक्षसी** ९·१७८; **तमोगुणाचें सार** १७·८० (१), **तमोमात्रें** १४·१००; **तमोयोनि** १६·४०५, **–वृद्धी** १४·२५७. **तामस**—तमोगुणयुक्त, तमोगुणी मनुष्य. तेयाचें कर्म सांडणें । तें तामस पैं मीं ह्मणें । १८·१७७. १७·१०२, १७·११७, १७·११८, १७·१५४, १७·१५६, १७·१६२, १७·१६३, १७·१६७, १७·२९९, १८·१८०, १८·१८१; **तामसांचिया आहारा** १७·१९०; **तामसा आहारिं आवडि** १७·१५२; **तामस कर्म**–तामस कर्म तेतुकें । अज्ञानफलें चि पीकें । १४·२६२, १८·६०८, १८·६२३; **तामसु कर्त्ता** १८·६५९, १८·६८५; **तामसें गुणाग्रहें** १८·५४८; **तामसियेचें घर,** १७·८० (२); **तामसाचें चिन्ह** १८·६०७; **तामसज्ञान** १८·५७५, **तामस ज्ञान** १७·२९८, १७·३०५; **तामसाचां ठांइं दोष** १८·७५८; **तामस धृति** १८·७४५, **तामसी धृती** १८·७५९, **तामसिये नरीं** १७·३०२, **–चां सुखा माजि** ९·१७९; **उपरतें जाणे जे बुद्धी ते तामसी जाणावी** १८·७२५ व १८·७२६; **तामसिं मद्रु अढलु** १८·७५७; **तामसा यज्ञा** १७·१८८; **तामसु यागु** १७·१९४; **तामसा योनि** १६·४१३, **–योनी** १६·४१७; **तामसैयेचिया रीं(री)ती** १७·२५२; **तामसाचें लिंग,** खूण, १८·५४५; **तामसी श्रद्धा** १७·७०; **तामसीसात्विकीं** १५·१७६, ज्ञानदेवी–'तामसीं सात्विकीं' १५·१७७; **सात्विकराजसतामसनिबद्ध** १८·६९५. (३) **तम**—आत्यंतिकभाव किंवा पराकाष्ठा दाखविणारा प्रत्यय. **तरुणतमतूर्या,** अत्यंत परिणत

अशा तुर्यावस्थेचा, समाधिस्थितीचा, १०·२(२).

**तरंग**—लाट, लहर, मनांतील क्षणिक विचार किंवा कल्पना. ना तरि सागराचां पाणीं। काइ तरंगाचिया आहाति खाणी। ९·७४. नां तरि तरंगीं(गीं) सागरु सामावे। १०·६९. हो कां तरंगु लाहानु। परि सिंधुसि नाहिं भिन्नु। तैसा ईश्वरीं मी आनु। नोहें चि नां॥ १४·३८३. पैं आटौनि गेलेयां सागर। मग तरंग ना नीर। १५·४७३. उदका एका परौतें। तरंग नाहिं चि हें निरुतें। १८·११८४. ८·१७५, ९·२९९, ११·६५९, १३·२४५, १५·१३३, १५·५१९, १६·१३२, १७·२२४, १८·५३१, १८·९७३, १८·११४२, १८·११६३. **तरंगाची निश्चलता** १८·११६५; **नादिंचे तरंग** ६·१५; **पाणियांचां तरंगीं** ११·३२०; **महोदधिचेयां तरंगां** १०·२७७; **मृगजलिंचे तरंग** ९·१७१; **वृद्धाप्याचेया तरंगा माझि** ७·८३; **तरंगाकार** २·१०६, २·१६७, ८·२४८ (१), १५·३१२; **तरंगमूर्त्ती** ११·२८०; **तरंगलोपे(पें)** ८·२४८ (२); **गीतासागरतरंग** १८·१६५३; **तरंगता**—आणि तरंगता हारपे। जालें जेवि॥ ९·१०२; **तरंगता आसारे** १५·१०६; **तरंगपण** ८·२४७.

**तरंगणें**—पाण्यांत तरत राहणें. तरंगाऊं लागे बुद्धी। विवेका वरि॥ १४·२२०. ऊसाण **तरंगत आहे** १०·१०८.

**तरणी**—तरवून नेणारी, नाव. **तोयतरणी** ५·१६.

**तरणें**—पाण्यांतून पलीकडे जाणें, पोहणें, पार होणें. ते तरले चि न तरति। विषयसिंधु॥ २·३४८. २·१८०, ७·९४, ७·९९, ९·४५१, १७·९१, १७·३६३, १८·१६७, १८·१२६७. **तराति**—ओसाणें तराति, तरत येतात, ७·७१, ज्ञानदेवी – 'तरताती' ७·७३. **तरिजैल** २·१८२; **मृगजलाची गंगा तरावेया** १५·२२९; **तरों ये** ७·८८; **तरणें**—ह्मणौनि समुद्र बाहीं। तरणें आथि कैंही। १२·७१.

**तरलणें**—चंचलपणें तळपणें. **तरलत असे** १३·१०४.

**तरांडें**—होडी, ताफा. ७·९७.

**तरास**—त्रास. **तरासिं गेलें आहे** ११·३६९, ज्ञानदेवी व कुंटे – 'जीवित्व गेलें आहे' ११·३७४.

**तरि-री**—तर, मग, ही, सुद्धां, तरीही, तसें असलें तर. **तरि**—संवादु तो चि दश नु (दशनु)। १·१५. तरि मोतियां भिंग देणें। तैसें होइल॥ १०·१४. ज्ञानियां तरि अखंडु। उजु चि असति॥ १७·४. १·११, १·६५, १·८७, २·३२३, २·३३०, २·३३३, ६·४०१, ९·२२३, १०·७०, ११·५४, ११·२२३, १२·३, १४·८६, १४·२४३, १४·३६२, १४·३६८, १७·१६, १७·१८, १७·२१, १७·२४, १७·२९, १७·३१, १८·१२८६. **कां तरि** ११·२१९; **तरि काइ** २·३८; **चित्त तरि गेलें आहे** १४·२५१; **राज्य तरि काइ** १·२१०; **तरि…जरि** ५·९४; **जरि…तरि** १·७८, २·३२१, ३·२ व ३·३, ७·१७, ८·२०४(१), १०·७९; **यऱ्हविं…तरि**—यऱ्हविं बोलु तरि भला जाला। अवसरिचा॥ ६·६, ८·२०४ (२), ११·५६, १३·२१४, १५·३००; **यऱ्हविं मी तरि कैसा** ९·६२; **यऱ्हविं…जरि… तरि** ६·४३८; **येऱ्हविं तरि** ८·१७०. **तरिं** १०·२९५. **तरी**—**तरी…जरि** ८·२०९; **यऱ्हविं दिवस तरी** ६·१४९; **ना तरि, नां तरि, नातरि** पहा.

**तरु**—वृक्ष, झाड. कां फळलेया तरुची शाखा। साहाजें भूमीसि उतरली देखा। ९·२२४. जें बीज आलेयां मुठी। तरु आला चि आहे। १०·२८९. तें उर्ध्व गा तरु येया। १५·७२. १५·७८, १५·८६. **काइ शाखा तरु नव्हे** १३·२९३; **कां बीज चि तरु जाले** ९·६४; **बीजमुद्रे आंतु समस्तु तरु थोंके** १३·९५; **तरुतलवटीं** ११·१४८; **तरुवर वर** (२) पहा; **कल्पतरु, कल्पणें** पहा, **क्लेश–, क्लेश** पहा, **चंदन–**१०·१८६, **प्रवृत्ति–** ६·१५३, **भव–**१५·१३१, **महा–**१५·४७, **विवेक–**१·२८, **वेद–**१३·१६६, **संसार–, संसार** पहा, **संतोष–**६·२५६, **सुकृत–, कृत** (१) पहा; **सुरतरु** ९·३१९, ११·२१४, १३·२१०; **सुरतरु…बाबुल** ९·१४६; **तरु तृणें लोह लोष्ट पाखाणें** १५·१७२; **चैतन्य** पहा.

**तरुण**—प्रौढ अवस्थेंत, भरांत आलेला. मीं सर्वदा

स्वतःसिद्ध। मी बालु तरुणु वृद्ध। ९·२६३. **तरुणांगी,** तरुण स्त्री, १५·८५, १८·११४१ (२); **तरुणी**—तरि माझी घरणी। अनादि तरुणी। १४·८६; **तरुणें**—अभिलाषाचें तरुणें १४·१६०; गोरें आणि तरुणें, १८·१४९१; **तरुणतमतूर्यों** १०·२, तम (३) पहा; **तरुणपण** १३·५७४; **तरुणेपण**...वृद्धाप्य १३·७५८; **तारुण्य**—नातरि अप्रौढें बाळकिं। तारुण्य राहे थोकिं। १३·७९, तारुण्याची गांठि ६·२६०; तारुण्याचेनि तोषें १३·७५२; तारुण्याचिया भरा १३·५५३; तारुण्याचें भुररें १३·७५४; तुरियेचें तारुण्य ६·३२०; तारुण्या आली ७·१६१; रसां तारुण्य आणिजैल १०·४६; तारुण्य...वृद्धाप्य ११·४८८; कौमारत्व तारुण्य २·१०९. **तारुण्यता**—मनाची तारुण्यता १४·९१.

**तर्क**—तर्कशास्त्र, न्यायशास्त्र, प्रत्यक्ष व अनुमान यांवरून निर्णय घेणें. तरि तर्कु तो चि परशु। १·११. तर्कु एगें चि ठीकरणें। तोंडौता केला ॥ १३·१५, याच क्षेत्रनिर्णयाची चर्चा तर्कशास्त्र करतें व वाटाघाट करतें. ७·२. तर्काचि दृष्टि ४·१६०; तर्काचिये दृष्टी २·१४७; तर्की अतिगाढा १३·८३१; कुतर्क १२·१४; सत्तर्कवाद १·१३; तर्कें होतेनि वहिलेपणें, तर्कानें अनुमान करतां येतें कीं ह्या वृक्षाचें होणें जाणें त्वरित होतें, १५·१२०, ज्ञानदेवी—'न तर्कें होतेन वहिलेपणें' १५·१२१, तर्कानेंही याच्या त्वरेचें अनुमान करतां येत नाहीं; **तार्किका,** तर्क करणाऱ्या, अर्जुनास उद्देशून. तार्किका हा शब्द शंका ह्या शब्दाशीं जोडून, 'तर्कास अनुसरून अशी शंका घेतलीस तर' . असाही अर्थ लावतां येईल, ९·५३.

**तन्हि-न्हीं-न्हैं**—तरी, निदान तरी, तरीही, म्हणून, सुद्धां. **तन्हि**—तन्हि अभ्यासाचेनि बळें। ६·५७· ६·९८, ११·४३८, १५·४५, १५·१७८, १५·४००, १५·४१२, १५·४२४, १७·२७०, १८·१२७८. यन्हविं तन्हि १·७६(१), ३·२०१, ७·१७०, १७·२५०, १८·१९. **तन्हीं**—ह्मणति हा हो विवेकी। तन्हीं तुह्मि ॥ १३·५२. तो किर जाणावा कवणें। तन्हीं काहिं सांचें ॥ १८·३९३. तो न चले तन्हीं जाये। दिगंता जेवि ॥ १८·१२८६. १·७६(२), १·८०, २·१५२, २·२६९, ४·२१४, ५·५, ५·१६, ५·३७, ५·१७४, ६·१७५, ६·२६०, ६·४१४, ८·३८, ९·१३, ९·४१, ९·६९, ९·९४, ९·९८, ९·२२९, ९·२३५, ९·२५४, ९·४२६, १०·३४, १०·७६, १०·१७६, ११·२३६, ११·५५३, १२·१२५, १२·१७६, १३·२७, १३·९३, १३·४५०, १३·६२२, १३·७५६, १३·१०५१, १४·२३७, १४·२७७, १४·४०८, १५·७९, १५·३३२, १६·११९, १६·२११, १६·२९२, १६·३८०, १६·४११, १७·३, १७·५, १८·२६, १८·७८, १८·१७८, १८·१७९, १८·३६७, १८·४१९, १८·४२४, १८·५७८, १८·६०५, १८·८१७, १८·८५५, १८·९२७, १८·९३१, १८·९३३, १८·११४५, १८·१२८०, १८·१२८६, १८·१३०७, १८·१४१३, १८·१४७८, १८·१४९५, १८·१६७०, १८·१६८४, १८·१७२७, १८·१७६८. एऱ्हविं तन्हीं ६·३९२, ९·३११, १०·२९०; कैसेनि तन्हीं ९·७; जरि...तन्हीं ९·७६; जन्हीं...तन्हीं, जन्हीं पहा; जन्हैं... तन्हीं २·२६०; जैं...तैं तन्हीं १८·२६६ व १८·२६७; तेव्हां तन्हीं ६·२८८, दरारा काइसा तन्हीं, तो कसला या अर्थी, १५·२१४; पीसें काइसें तन्हीं १८·२२०; प्राकृतां तन्हीं रंकां १५·१९९; लोकिं तन्हीं, निदान लोकांना तरी, १८·३१; साहाजें तन्हीं ९·२६; यन्हविं तन्ही—न्हीं ४·२१, ४·५९, ४·६५, ५·२६, ५·१०८, ७·१७९, ९·७१, ९·७३, ९·२६१, १२·१२१, १३·३२९, १३·४६६, १३·८७९, १४·३४८, १७·१११, १८·२३१, १८·१७१८. **तन्हैं**—तन्हैं एथ काहीं। तुज शोकासि कारण नाहीं। २·१५८, ५·१६६, ६·२७७, ६·३४१, ६·३९५, ६·४३९, ८·१३४, ९·५१९, १०·१४, १०·२१५; काइसी तन्हैं ६·१४२; जन्हैं...तन्हैं, जन्हैं पहा; यन्हविं तन्हैं २·३१०, ५·१६४, ६·३१२, ६·३६५; यन्हवीं तन्हैं ६·३९४, ६·३९५.

**तल**—तळ, बूड, खालचा भाग, आश्रय, सपाटी, आधार. वरिचिलें पातिं न ढलति । तलिचिं तलिं पुंजालति । ६·२०३. तलिं मूळें वरि शाखा । १५·४८. धडेयांचेयां आखरा । तलिं बाल लिहे दातारा । १७·४२. ११·६५२, १५·१४४, १५·२१०, १८·६६५, १८·१४९७. **तलीं वरि कवली** ६·२३०; **तळीवरि**, खालीं वर, ११·२७३; **तलु उपरु** म्हणता, **उपर** पहा; **तलु खाए**, खचतो, १३·८०४; **तलु घे** १५·१०३,– **घेतला**, तळ गाठणें, ५·१४३; **रश्मिजाल तलिं फांके** १५·५२; **सव्य तें तलीं ठेविजे** ६·१९४; **आत्मनिवेदनातलिची पीठिका** ६·१२७; **करतल** १३·६५०; **करतलीं दाविलीं** १८·१६७५; **करतलें घेउनि** ७·१८७; **कर** (१) पहा; **चरणतलें** ६·१९३; **जीवा तलिं** १३·२४९; **झाडातलीं** ८·१०२; **पायां तलीं** १४·२३४; **पृथिवीतळ** १·१५६, **पृथ्वीतल** २·६५, २·२१९, **पृथ्वीतलिचे देव** ९·४७२; **प्रवृत्ती तलिं** १८·७०१; **भीष्मातलिं राहिजे**, भीष्माच्या अधिकाराखालीं, १·१२३; **भुतल** १८·४३१, **भूतळ** ११·२३९, ११·२८१, १५·२६७, १५·३६९, १८·२६८,१८·१५०६, १८·१६९२, १८·१६९८, १८·१७५५, १८·१७७५; **परिमाणु भूतलीं** १४·३८२; **भुवां तलिं** ११·२०१; **महीतळ** २·२६२; **रुंखातलिं** १३·५९५; **शब्दकूपिकेतलिं** ७·१८०; **हाता तलीं** ७·४१; **तलबुड** १५·१६७; **तलवट**, खालीं, स्थावरां हिं तलवटीं । बैसणें घे ॥ १६·२६०, ६·५५, ६·१८२, १२·२१८, १३·२३१, १३·४१३; **तलवटुवरि** ९·२२३; **तरुतळवटीं** ११·१४८, **चैतन्यतरू-** १३·३९६; **नाभिस्थानातलवटीं** ६·२१०; **हृदयाकाशातलवटीं** ६·२२९. **तलवा**—मग तलवे तलहाथ शोधी । ६·२३२ (१); **तलहाट**—**तलहाटीं नाडर बांधे**, पावसाचें पाणी खालीं पृथ्वीवर पाण्याचें डबकें बनवितें, १८·३२०. **तलहात**—रोमशुद्धि जैसी । तलहातासि ॥ १७·२३४, तळहातावर केंस नसतात यास उद्देशून; **तलहातिचा आवला** १४·२६६, **तलहातिचेनि दीपें** १७·२७६; **तलहातिचें रत्न**; ७·२; **तलहाथ** ६·२३२ (२); **तलिल-तलिली** दोन्हीं भुजा ११·२९१; **तलौटेपण**, नम्रता, १३·१९४; **तल्हात**, **तळहात**, **तल्हातिचेनि पाणियें**, तळहातांतील पाण्यांत, ७·१४७; **तल्हौत**, खालीं, ऊर्ध्व तल्हौतें खांचे। ६·२३७.

**तलग**—पिलूं. **चकोरतलगे (गें)** १·५६.

**तलपणें**—चमकणें, झळकणें, चलनवलन करणें. माझि प्रमादादि तलपु अंत । माहामीन ॥ ७·७०, ज्ञानदेवी –'तळपत महामीन', ७·७२. सिंधु वरि तलपे गंगा । १८·११३२. **पाणी चि तलपे** १३·६०८.

**तलमलणें**—दुःखानें अस्वस्थ होणें. **तलमलीत ठेलें** ११·३२१.

**तलें**—तळें. १७·८९.

**तव**—त्या त्या करितां, त्या त्या कारणामुळें, त्या त्या साठीं. लोकत्रय निफजे । इयेतव ॥ ७·१६. सांवें अग्नीतव धूमु होये । ७·५८. शाखातव देखां । पल्लव पानें ॥ १०·९७. दूधीं जैसी साये । दूधा चि तव ॥ १४·७३. ७·५४, १३·९७०, १६·१७४. **अन्ना तव** ३·१३४; **अज्ञाना तव** १५·३०२; **अर्थातव धर्मु** ७·४५; **कामा चि तव** १६·३०७; **चमत्कारातव** ११·१८५; **जीउ कर्त्ता भोक्ता तो गुणा तव** १७·१२१; **ज्ञानातव** १३·६१४;**तृणंतव** ७·३७;**त्यागातव** १२·१३८, १२·१४१; **देवकिये वसुदेवातव जाला** १०·२६५; **प्रकृती तव** १३·९७६, १३·९८१, **प्रकृतीतव** ९·२६८; **प्रसादा तव** १८·१२६७; **भयातव आंग कांपे** ११·३६३; **मज चि तव** ४·७७, ७·१४२, १५·३९६, १५·३९७; **रश्मी तव** ११·१७९; **वृष्टी तव** १८·३५३; **येकातव एक** ८·१७०; **दोघां तव** ७·१६२.

**तंव**—तेव्हां, तर, तोंपर्यंत, इतक्यांत. तंव गोत्रवर्गु आवघा । देखिला पथ ॥ १·१९३. हारतलें न देखिजे । तंव मागु न संडिजे । १८·१४९. १·८३, १·१६३, २·१३९, २·२१०, ६·३०६, ६·३१४, ७·२८, ११·२२३, १३·२२२, १३·२२६, १६·३२३, १६·३६९, १७·६३, १८·१४६, १८·८०९, १८·१०२८, १८·११४७. **तंव...जंव**—जाणतेन तंव चि जियावें । जंव अपकीर्ति आंग न पवे । २·२०२, १६·३५४; **जंव...तंव**...७·४०, १३·९७३,

१६·३४७; जंव...तंव तंव १६·३६८, १८·१०९८, १८·१५८५; **जंव जंव...तंव तंव**—जंव जंव तुज फावे। तंव तंव आमचें दुणावे। प्रेम देखें ॥ १०·५८, ९·५०६, १४·१४०, १८·१५४; **जंव जंव...जंव... जंव जंव...तंव तंव** १३·७४७ व १३·७४८; **तंव तंव**—तंव तंव होंति थोरांडें। अकर्मांची(चीं) तलबुडें। १५·१६७, ११·१७, ११·५२१, १५·२७८, १५·४१२, १६·२४०; **तंवरि** १·२३७. **जंव** पहा.

**तंवक**—आवेश, नेट, धैर्य. आधपलिपि तंवकें। इंद्रियें धरिलीं ॥ १२·४६, ज्ञानदेवी–'तवकें' १२·४६.

**ताउनि**—ताप देऊन. तावणें या क्रियापदाचें हें रूप आहे. धावा केला तऱ्हीं खरा। ताउनि तो ॥ १८·१७६८, अंधकार नाहींसा केला पण तो जगाला ताप देऊनच कीं नाहीं ? **अनुरागाचा नीरुताउनि** ७·९५, **नीरु ताउनि** असा पाठ घ्यावा, प्रेमाचा पाणिढालु तपासून घेऊन, तावून सुलाखून, कसोटी करून या अर्थी.

**ताउवा**—माहीत असलेला, उघड. तो जैसा ताउवा नोहे। झांकवलपणें ॥ ३·२०९, ज्ञानदेवी – '**ठाउवा**' ३·२१४.

**तागा**—संबंध, आधार, थांग, टिकाव. जेथ वैराग्याची नाव न रिगे। विवेकाचा तागा न लगे। ७·८८. **एआ बोलाचा तागा लागैल काइ** ६·३१५; **एयां पापियांचा तागा मोडैल** ३·२६४; **मनुष्यदेहाचा तागा घेउनि** १६·४०४.

**ताट**—जेवण्याची थाळी. अमृताचां तार्टी वोगरूं। ऐसिं रसोयें कैंचीं ॥ ९·९. तेथ सुखदुःखाचें खिचटें। जेविजे येकें चि ताटें। १४·२७१. **कुमुददलाचेनि ताटें** ५·१०६; **बापाचां ताटीं** ९·१५; **बोलाचीं ताटें** ६·२२; **वाढलें ताट**, वाढलेलें ताट, ८·१९३; **ताट काढीन**, खरकटें काढीन, १३·४२२; **ताट सांडूनि जाए**, न जेवतां पानावरून उठून जातो, १५·३८.

**ताटी**—कामट्यांचें कुंपण. जे हांतें (जेहांतें) अभ्यासाची घरटी। यमनियमाची ताटी। २·३११.

**ताठा**—गर्व, अहंकार. तपें ज्ञानें अपार। ताठा चढे ॥ १३·७२२.

**ताठि**—मूर्च्छा. विषयव्याळें मीठी। दीधलेयां उठणें नाहिं ताठि। १२·२, ज्ञानदेवी – '**नुठी ताटी**' १२·२.

**तांडव**—शिवाचें नृत्य. **तांडवमीषें** १७·८.

**ताडातोडि**—ताटातूट. ह्मणौनि येकैकें नोहे। ताडातोडि ॥ १४·३३४.

**तांडी**—तांडा, समुदाय, ढीग. **चित्तइंद्रियांची तांडी** १५·३३२.

**ताणा**—कापड विणण्यासाठीं तागलेले उभे धागे. **तांथुवाचा ताणा** १८·३५८.

**तातणें**—तापणें, त्रस्त होणें. तातलिये मूसे। मेण निगौनि जाये जैसें। ६·२४९. विश्व तातलें अतिक्षोभा। जांत असे ॥ ११·३०९. **तातलां तेलिं** १६·२३६, –**तेलीं** १६·३७१; **तातलें लोह पीटितां** १३·१०१०; **तातलें साडपन्हरें** ११·१३२.

**तात्पर्य**—सारांश. **तात्पर्याचा एवांका**, सारांशाचें मथित, १८·१४४५.

**तांथु-थू**—तंतु-तू पहा. **तांथु**—कां तांथुवाचा ताणा। तांथु घालितां बोइरणा। १८·३५८, धाग्यांच्या ताण्यांत आणि भरीस धागे घातले म्हणजे, ताण्याच्या उभ्या धाग्यांत आडवे धागे (बागा) घातले म्हणजे. **तांथुवीं** १८·८०९. **तांथू**, (१) धागा, **तांथू पटु केउते सांडितील** १८·२१७. (२) फुलांतील केसर, जैसा फुलाचेनि सांधातें। तांथू तुरंबिजे श्रीमंतें। १८·८१९.

**तानी-नें**—तान्हें मूल, वासरूं. तानी आणि पारिठी। इया कामधेनूतें दीठी। सूनि जैसिया गोठी। कीजति नां ॥ १८·१६५८. **गीतामाउलीसि जानेंतानें नसे** १८·१५१८. **तान्हा** पहा.

**तान्ह**—तहान. **चातकाची तान्ह** ९·२३४; **तान्हभूक** ९·३३६; **तान्हैला**, तहान लागलेला, ११·९१; **तान्हैलेयां तोय सेविजे** ६·३. **ताहन**, **ताहान** पहा.

**तान्हा**—लहान मूल. आहो तान्हेयां(या)ची लागे झटे। तरि तेणें अधिकें चि पान्हा फुटे। ९·१८. **तान्हेनि मियां अपत्यें** १५·१९; **तान्हेयांची वास पाहे** १३·२५२.

**तापणें**—शेकणें, उष्णतेनें कष्टी होणें, उद्वेगणें. नावेक आगलें तरि मन तापे। ११·३६३. जैसें

भांडेयाचेनि तापें । आंतुल उदक तापे । १७·११६ (२). **न तपे—उन्हालेनि जो न तपे** १३·३४६, **दैन्यदुःखें**–१३·४९१, हीं क्रियापदें **तपणें** चीं रूपें असणें संभवतें. **ताप**—तापु जेणें पोळे । १६·४१६, आगितें न संडी तापु । १८·७५३, १२·३, १६·१९७, १७·११६(१), १८·१०८६; **तापापह**, ताप नाहींसा करणारा, १८·८; **पाप ताप** १२·१७३, **पापताप** १७·२१८; **पुढिलाचेनि तापें**, परपीडेनें, १६·१५६; **अग्नितापें** १७·१२७; **तापत्रय**, **–याग्नि, त्रितापतिमिरतमोरी**, सं. वा. श. पहा. **तपणें** पहा.

**तापस**—तपस्वी. तापसांचा आद्यु । तपोनाथु॥ ६·४७७. ९·३६८, १८·१०५१, १८·१४७७, १८·१४७८. **तापसु असें** जींतला १·२६९; **ज्ञानियां कर्मठां तापसां** १८·१५०५.

**तांबडें**—लाल रंगाचें. **तप्ततां(ता)म्रतांबडीं**, तापलेल्या तांब्यासारखीं लाल, ११·१३६.

**तांबोल**—विडा. तांबोलें वोंठ राउं । १३·५६२, विडा खाऊन ओंठ रंगवूं.

**तार**—लखलखीत. कैसें उन्मेखचांदिणें तार । ६·१३४.

**तारणें**—तरून जाणें, तरविला जाणें, रक्षण करणें. तेणें तारिलों संसारपुरु । १·२२. ऐसा मायापुरु हा कवणें । तारिजैल गा ॥ ७·७९. जे तारी पैल तीरीं । १६·२१८, जी तरवून पलीकडील तीराला पोहोंचवते. **तारिता** १६·२२०, १७·३; **तारितें**, तारणारें, १३·९४२.

**तारा**—(१) पायउतार. जेया ऐक्याचिये उतारां । बोधाचा जोडला तारा । ७ ९६. (२) चांदण्या. मग सूर्याचां अस्तमानीं । मावुतिया तारा उपडती गगनीं । ११·६५०. तऱ्हीं पाहालेयां रजनी । तारा लोपति गगनीं । १३·९३.१८·१७५६. **तारागण**—**तारांगण, गण** व **आंगण** पहा; **तारातेज** ४·१५७; **तारांमाझि** १०·२०३.

**तारू**—तारणारा, तारक. जेयां सद्गुरू तारू पुढें । ७·९७.

**तारुं-रूं**—नाव, होडी. धर्मार्थकामाचें तारुं भरी । १८·७४३. **गुरु तारुं** १३·४००; **तारुं लागे**, नाव कांठास लागते, लाभ होतो या अर्थी, १३·१०८१. **तारूं**—**तारूं जालां**, नावेसारखे तारक या अर्थी, १२·९१.

**ताल**—(१) बांध, योग्य ठिकाण. नियोजिलीं वितंडें । ताला येंति ॥ १३·२२, ताळ्यावर येतात. (२) हालचाल. **निवृत्तिकर्णतालें, कर्ण (२)** पहा.

**ताली**—टाळी. ऐसी एकताली पीटली । सत्यलोकिं ॥ १·१५७, हाहाकाराची एकच टाळी वाजली.

**तास**—पेरणीसाठीं नांगरानें पाडलेल्या रेघा, घळ, चर. पृथिविये लेउनियां तास । चिंतामणि पेरिले ॥ ११·५७२.

**ताहन-ताहान**—तहान. **ताहन**—**ताहन भूक** ६·१५७. **ताहान**—ताहाना ताहान चि पियावी । १२·६३. १८·५५६, १८·६९७. **ताहाना जरि फूटावें**, फार तहान लागून मरावें, ३·२४. **तान्ह** पहा.

**तिकडी**—तीन कड्यांची. १६·४३५.

**तिकडे**—त्या बाजूस. **तिकडें(डे)** ११·२२४.

**तिख-तीख**—तिखट, तीक्ष्ण, भयंकर, पोलाद. **तिख**—तिखेयाचें करवत, पोलादी करवत, १६·२४२; **प्रज्ञाकुशलतेचां तिखें**, तीक्ष्णपणानें, नेटानें, १५·१८४; **मृत्यूहूनि तिख**, भयंकर, १२·६८; **तिखट**—तैसें तिखट खाये । जें घायें विण लागे ॥ १७·१४२, **तिखटपणें**, तीक्ष्णपणानें, ११·४३४; **तीख**—तैसें तोडावेया संदेह । तीख जैसें काल लोह । १६·११७, तीक्ष्ण धारेचें; १५·१८९; **तीखट**—तेया द्वेषाचेनि कालकूटें । बासटूनि तीखटें । १६·४०२, द्वेषाचें मारक विष लावून; **तीखटें शस्त्रें** १८·६६१; **ज्ञानशस्त्रें तीखटें** ४·२०६; **हातीयेरांहुनि तीखट** ११·४५८.

**तीघ**—तीन, तीनप्रकार, त्रिवार. सं. वा. श. पहा.

**तिडिपिडणें**—ज्योतीवर पाणी पडलें असतां तिडतिड होणें. जीवनें तिडिपिडि । १३·७१०, दिव्याच्या ज्योतीस उद्देशून.

**तिमिर**—अंधकार; एक विशिष्ट प्रकारचा डोळ्यांचा रोग, या रोगानें झावळें दिसतें, किंवा एका-ऐवजीं दोन वस्तु दिसतात. तेजिं तिमिर जेविं न सिरे । जें दिहा चि आंधारें । चर्मचक्षूसी । ८·८८. दीठी चंद्रू चि घे साचें । परि यतुलें हें तिमिराचें । जें एक चि असे तेयाचें । दोनि दावी ॥ १८·१११७. १८·१५२२, १८·१७७४. **तिमिरैजति**—बुद्धिचे

तुमचा परिवारु १३·४०५, तुमचिये सभे १३·११६०; तुमतें, तुम्हांला, तुमच्याकरितां, ३·९९, ११·५६८, १८·१५६४.

**तु-तुंकणें-तू-तूंकणें**—मापणें, मोजणें, तोलणें, समतोल होणें, डोलवणें. **तुकणें**—ब्रह्माचेनि पाडें तुके । ६·९०. **योगबळेंसीं मनोबल न तुके,** योगबलाशीं मनोबलाची तुलना करूं नये; मन अस्थिर झालें कीं योगी योगभ्रष्ट होतो, पण योगानें मनोनिग्रह साधतो, मनोनिग्रह व योग असे परस्परावलंबी आहेत म्हणून यांची तुलना करूं नये, ६·४२६; तुकवणें—**माथा तुकविला** १८·२८८; **दीठिचेनि हाततुकें,** हातानें अंदाज करण्याऐवजीं दिव्यदृष्टीनेंच अनुमान करून, ८·२६४; **आंगतुक** १७·२१५; **तूकणें**—आतां स्वप्न चि हें तूकलें । साचा सरिसें ॥ ४·१, १०·४९, १५·२०२, १७·२७०, १८·१४९९; **जीउ महेशेंसीं तूके** १०·९; **माथा तूकिजे** ११·१७, –**तूकिला** ९·५१८, –**तूके** ९·३०५; **तूकिलासि** १६·२८; **तूकौनियां** १८·८२१; **तूक**—(१) वजन, माप, बरोबरी, योग्यता, ९·२६०, ११·३०६, १२·२५; **एकतूकें** ७·२५; **समतूकीं** १४·५१; **हाततूकें,** हातांत वस्तु घेऊन वजनाच्या अंदाजानें, १८·१३०; (२) सोन्यापेक्षां हलकी धातु, हिणकस. नाना धूपाचा अग्निप्रवेशु । कनका तूका तूंकाचा नाशु । १६·१०६(१). **तूंकणें**—परि मासिं तूंकितां तूंका। तूटि नाहिं॥ ९.४४५(१), तूंकूनि घेतलीं। मोतियें जैसीं॥ १८·३१२, ६·४००. **तूंक**—(१) वजन ९·४४५(२), १४·१४०. (२) हिणकस १६·१०६(२), १८·६३८.

**तुंग**—उंच. तुंगें तरें ७·६८.

**तुगुटी**—त्रिपुटी या अर्थी. हें असो वयसेचिये सेवटीं । जैसें येक चि विये वांझौटी । मग ते मोहाची तुगुटी । नाचों लागे ॥ ६·१२१, उतारवयांत जर का एकादें मूल झालें तर त्या आईच्या अत्यानंदाला सीमा राहत नाहीं—हें रूपक अर्जुनावरील कृष्णाच्या प्रेमावर बसविलें आहे. आई, मूल व मोह ही त्रिपुटी, पक्षीं कृष्ण अर्जुन व त्यांचें प्रेम, ज्ञानदेवी–'मोहाची त्रिपुटी' ६·१२१, यावर ६·११८ ते ६·१२५ पहा.

**तुटणें-तूटणें**—संबंध तुटणें, मोडणें, कमी होणें. **तुटणें**—परि कोणें मानें विशाल । जैसें तुटलें होये अंतराल । ११·३५४. **देहाची डिरी तुटे** १५·१३१; **तूटणें**—परा इंद्रियां विखो तूटे । २·३०७. विवेकाचा ही सोयु तूटे । ४·१६२. कीड आगिठां पडे । मल तूटे वानीं(नी) चढे। १८·१२०. ७·९, ११·४६२, १८·२०७, १८·२३३, १८·६४१, १८·१५५४. **अज्ञान जैं समूळ तूटे** ५·८३; **कीड तूटे** १८·१५६; **तूंक तूटलेयां** १८·६३८; **बंधमोक्षाचें गूंतलें तूटे** १८·३१७; **भेदभावाची अवधि तूटे** ८·४०; **मीनां उदक तूटतां** १८·७८३; **मुद्दल तूटे** १७·३४४; **मूळा पासिं तूटलेया(यां)** १५·५०; **संन्यासैला संकल्पु तूटे** ६·५३; **संसारगुंति तूटति काइ** १५·३६२; **सूत्रतंतु तूटलेयां** १६·१८२; **तूटो(टौ)नियां** १·१२८; **तूटौनि पडावें** ११·५७, – **पडिलें नाहिं** १५·३५२. **तूटि**—कमीपणा, कमतरता, उणीव. कां पाडिवां वाढि न मगे । अंवसा तूटि सांडूनि मागे । माझि हरिणु चंद्र आंगें । जैसा राहे ॥ १६·७४, ज्ञानदेवी– अंवसेतुटी सांडूनि मागें । •माजी अतिसूक्ष्म अंगें । चंद्र जैसा राहे ॥ १६·७५, अर्थ उघड आहे, राजवाडे पाठांत मागें असा पाठ संभवतो; अर्थ दोन तऱ्हेनें लावतां येईल—मध्यंतराच्या काळांत चंद्र व चंद्रावरील हरिण सूक्ष्मरूपानें राहतात, किंवा चंद्रावर हरिण राहतो. ९·४४५, १३·५८; **आशतूटि,** आशाभंग, ११·४४८; **फळिं आसतूटिया** १८·१७०; **अतूट** १६·२११.

**तुंबिणि**—भोपळ्याची वेल. **येकिचियें(ये) तुंबिणिये फळें होंति** १३·१०५५.

**तुर**—तुतारी. **तुरबंबाळ,** तुताऱ्या व इतर वाद्यांचा नाद, १·१३६, १·१४५; **रणतुरें आस्फालिलीं** १·१३०.

**तुरंग**—परिशिष्ट (८) घोडा हें सदर पहा.

**तुरं-रुं-बणें**—वास घेणें, डोक्यावर खोवणें, कांडणें. **तुरंबणें**—तियें कुसुमें अति चों(चो)खटें । तुरंबिलीं देखिलीं ॥ ११·२१५. तुरंबित असौसें । गगनौलेयां ॥ १६·३६१. १७·३४०, १८·८१९. **माथां बूरु तुरंबिला प्रत्योपकारु न करी,** कृतघ्न माणसाचें मस्तक हुंगलें, त्याला प्रेमानें वागविलें, तरीही

तो केलेल्या प्रेमाचें ऋण फेडत नाहीं, बूर (कोंडा) जर कांडला तर त्यांतून धान्यकण निघत नाहीं, १७·२८०. तुरंबणी, सुवास, खपुष्पाची तुरंबणी ये १६·३९. **तुरुंबणें**—सांगा परिमळें काइ तुरुंबावें। ९·११, ९·३८०; **चंदनतरूचीं फूलें तुरुंबिलीं** १०·१८६; **फुल ना तुरुंबितां** १५·५५.

**तुरिया—तुर्या**—जागृती सुषुप्ती व स्वप्न या पलीकडची समाधीची चौथी अवस्था, सं.वा.श. पहा. **तुरियेचें तारुण्य** ६·३२०; **तुर्येचें माजिघर** १३·१०६८. तम (३) पहा.

**तुळई—तूळी**—गादी, बिछाना. शेष तुळई, शेषाची गादी, गुरु शेषशायीसारखे आहेत यास उद्देशून, १३·३९२; **सुलीनतेचिये तूलिये** १३·४३.

**तुळणें**—तोलणें. तुळावै, तोल पाहिला जाईल, १५·२३७, प्रत्यग्बुद्धिकरवाळें १५·२३५ यास उद्देशून. अतुल १६·३५४. तुलें, तराजू, **तुलें घालूनि** १६·२८.

**तुलिग**—वाद्यध्वनि, प्रतिध्वनि. **तुलिगासवें** १·१२७.

**तुषान्न**—कोरान्न. ५·१०९.

**तुषार**—वाऱ्यानें उडणारे पाण्याचे कण. **गुरुकृपामृततुषारें** १८·२५७.

**तुष्टणें**—आनंदित होणें, तृप्त होणें, तृप्त करणें. ते देव तुह्मां तुष्टतील। ३·९७, इच्छा तृप्त करतील. तऱ्हीं कृपाळु तो तुष्टे। १८·४०८. **कैसा तुष्टलासि** ११·३९२. **तुष्ट**—परि तुष्टें आत्तैं। प्रसन्नें पर्के॥ ११·१२८, **तुष्टि** १०·८३; **आत्मतुष्टी** ३·१४७. **तोखणें, तोषणें, संतोषणें** पहा.

**तूरट**—एक चव. १८·१८४.

**तृप्त**—संतुष्ट, समाधान झालेला. मग जाकळिला ढेंकरें। तृप्तु जैसा॥ १८·१७. **नित्यतृप्त** २·२९२, **स्वयं**— ९·१६० (१). **तृप्ति**—जैसी सिद्धसाध्यभोजनीं। तृप्ति एकि॥ ३·३८, ३·४८, ३·१४७, १७·१२८, १८·१००१, १८·१०९७; **तृप्तिची सेवडी**, सीमा, शेवट, १०·५९; **पूर्णाची तृप्ति** १३·९९५; **स्वयंतृप्ता तृप्ति भाविति** ९·१६०(२);**तृप्तिलाभ**१८·११९.

**तृषा**—तहान. सावियां तृषा फूटला। तेया मज अमृतसिंधु भेटला। ११·६६१. **गाइची तृषा हरुं** १२·१४६; **बापैयाचिये तृषे** ११·९५; **तृषार्त्त** १८·२५९, १८·७०२; **तृषापीडितें मृगें** ५·११०. क्षुधा पहा.

**तृष्णा**—तहान, इच्छा, हांव. ते दासिपणाचेनि बिकें। तृष्णा जिए॥ ३·२४३, भ्रांतीच्या दासीपणाच्या बळावर तृष्णा तगून राहते. ९·५०९, १४·१६३. **तृष्णेचिया सांखळा** १४·१७१; **वितृष्ण** १३·४५९, १७·३१.

**तेउता-ती-तें**—त्या बाजूला, त्या दिशेनें, तितका-की-कें. **तेउता**—नेऱ्हाळि जियाकडे वांस पाहे। तेउता मीं चि येकु तेया आहें। ७·१२९. **तेउते** १६·३८३; **तेउती शांती** ४·१८९, **—सुखाची सृष्टि** ५·७४; **तेउतें**— तेउतें तेजाचें चि विश्व होये। ६·८६. **भलेतेउता**, वाटेल तितका, १८·११६५. जेउत पहा.

**तेकडे**—तिकडे. १८·८९४.

**तेज**—उजेड, उष्णता, कांति, चकाकी; चंद्र सूर्य ग्रह तारादि. आपातें तेज जिरवी। तेजातें पवनु हारवी। ६·२९९. म्ह(ह्म)णौनि दिवा पालवे। सवें चि तेज मालवे। १२·१००. नीरातें आटी तेज। तेजा वायुसिं जूझ। १३·१४४. तेजा दिवेलावणी। जेणें तेजें॥ १३·९२७. तेजाचा तेजौनि निगाला। परि तेजीं असे लागला। १४·३८१. जें तेज तेजासि सांपडलें। १५·५१४. १·१३९, २·२३८, ६·२५८, ६·३२३ (२), ७·३५ (१,२), ७·५७, ८·८८, ९·२०३, ९·३७५, १३·४३२, १३·८८८, १३·१०७१, १४·८ (१,२), १४·९९, १४·३६०, १५·२८१ (१), १८·४४६, १८·८५७, १८·९१२, १८·१६९४, १८·१७०३. **तेजाचें उग्रपण** ११·३१३; **तेजाची थोरी** ११·२३४; **तेजाचें बीज** ६·२२६; **तेजाची वोज** ११·५९०, **—सिधौरी** ६·२८१; **अंगिकें तेजें** ६·११०, ११·३२२; **आध्यात्मिक तेज** १६·१८८; **चंद्रादि तेजें**, चंद्र ग्रह तारादि, १४·४६, **चंद्रसूर्यादि**— १५·२७९; **दृष्टिचें तेज** २·५६, **नेत्रांचें** — ३·५५, **महाप्रळइचें** — ११·१९३, **शक्तिचें** — ६·२९३, **शशांकाचें** — १६·११४, **सर्वांगि(गिं)चें** —११·२३७; **तेजादि** ११·२३६; **तेजकर** ११·६८३, **वचन**— १०·१३२; **तेजतत्व**,

ज्ञान, १३·८८; ऐक्यतेज ६·३८३, ऐश्वर्य– ११·१८५, ज्ञान–११·६०५, १३·१७२, तपो–४·६१, तारा–४·१५७, दिव्य तेज ११·२१०, दिव्यतेज १६·२३, पूर्ण तेजाला, हा पाठ पूर्णते जाला असा घ्यावा १२·१७१, पूर्णतेचा ब्रह्मस्थितीचा पति झाला या अर्थी; तेजप्रकाशें ११·१३१; प्रळयतेज १०·२५१, १५·५००, भानु तेजें १८·८५३, भानुचें(चे)नि तेजें १·३९, भानुतेज १·६७; महातेज १·७४, १·१३८, ४·१७८, ९·९, ११·२०९, ११·२३५, ११·२९९, ११·६१८, १३·९२३, महातेजाचें तेज ६·३२३ (१); योगतेज ११·६३७; व्यासोक्तितेजें १·४१; संहारतेज ११·२९७, ११·३५३; सूर्यतेज २·३२५, ११·२१७, –प्रतापें ११·१८९; सोहंतेजें १५·७; सतेजा दिशा १८·१२२९; स्वतेज १३·१००६; आप तेज गगन ७·१८; तेजा आणि उखरा १३·१०४७; तेज आणि तेजकरु १३·२९३; तेज आणि थोरी ११·२८९; तोय तेज धूम्रु १८·३०६; पृथ्वी आप तेज वायु व्योम, महातत्वें, १३·७७; राति ना तेज, सांज, १४·७८; शौर्य तेज दक्ष्यता १८·१२८२. तेजस्—तेजोराशि ११·३०१, १५·२८०, –वृद्धि १५·३६८; प्रतापतेजस्वीं(स्वी) १·१०५; तेजस १५·२८१ (२), १६·२२८, सूर्यकोटितेजसा ११·६९. निस्तेजणें पहा.

**तेजणें**—त्याग करणें. आणि फलमात्र का तेजिजे । त्याग तो गा ॥ १८·९१. ८·२१४, -१८·१०६. त्यजणें पहा.

**तेती**—तितक्या. १०·२५४.

**तेतुका-की-कें**—तितका-की-कें, तेवढा-ढी-ढें. वांचौनि ज्ञानेन विण एकें । उपाये करिसि तेतुके । तिहिं गुंपसि अधिकें । रुंखि इयें(ये) ॥ १५·२२६. दृश्यजात तेतुकें । अंकित केलें ॥ १८·५२१. २·२६१, ३·११४, १४·२६२, १५·५३.

**तेतुला-ली-लें**—तितका-की-कें, तशा प्रकारचा-ची-चें. कां झाडांची साउली । वाटे जातां मिनली । घरावरि तेतुली । आस्था जेया ॥ १३·५९३. ४·११०, ६·४३९, ११·२६९, १३·३९, १३·४०५, १३·४०६, १३·५७७, १३·६५८, १३·७१८, १३·१०१६, १३·१०३८, १३·१०८४, १३·११६०, १४·१३, १६·४१०, १७·१५, १७·१३९, १८·११७५, १८·१२३५. एतुला ना तेतुला १३·११०६; तेतुलिया ६·३३४; तेतुलेन १४·२५३; तेतुलेनि १३·७२०, १३·७८७, १४·१७०; तेतुलालें २·२७१, १२·१०६. जेतुला-ली लें पहा.

**तेथ-थें**—त्या ठिकाणीं, त्या वेळीं, त्या प्रसंगीं, त्या संबंधीं. तो लागे तेथ राहे । महाबोधु ॥ ५·७४. तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्यालशंका ॥ १८·२२६. १·४, १·१५५, १·१५६, २·३२४, ६·३०६, ११·१९१, १६·३६८, १८·७५५, १८·११४७, १८·१६१२ ते १८·१६१९. तेथ केउता प्रसंगु १६·४५०; तेथ वर्त्तलें १·२७१; भले तेथ ८·२५५, ९·३८४; तेंथ १·१५८; तेथिचा ५·४१, १६·४६६, तेथिचा तेथ १४·१८३, –चे ६·४४१; तेथिचें ८·२५१; तेथिचें सांघणें १५·४३६; तेथिंचें ९·७७; तेथिचेनि २·२६९, २·३३३. तेथें १·२३९, २·१; जेथिचा तेथें १७·१७९; तेथौनि ४·१८, ६·३८१; तेथौनु ८·२३३; तिथेय—एवं तिथेया मातें चूकले । ९·३२७. जेथ-थें पहा.

**तेधवां**—तेव्हां, त्यावेळीं. तेधवां बैसतेन आनंदें । १८·१५९०. १२·१३७, १३·४२१, १३·९२०, १५·१६३, १६·२७७, १६·३१४, १७·६५, १७·३३६, १७·३८८, १८·२५८, १८·४०३, १८·६७८, १८·७८९, १८·९५७, १८·९६५, १८·१०७१, १८·१०९०, १८·११०१, १८·११४६, १८·१३५४, १८·१४१३. भले तेधवां ८·२५५. जेधवां पहा.

**तेवडा-डें-तेव्हडी**—तितका, तितकी. पैं गगन जेव्हडें जैसें । पवनु हि तेवडा चि असे । ९·८८. दलिद्र तेवडें १७·४१६; तेव्हडी—जेवढी माझी व्याप्ति तेव्हडी चि तेयांची प्रतीती ९·२५७; भले तेव्हडी, वाटेल तितकी, १५·४९.

**तेवि-विं**—त्या प्रमाणें, त्या सारखें. तेवि—तेवि मीं चराचरीं । माता ही होयें ॥ ९·२६९. तरि मीं चि तेवि तेणें मीसें । नटें तेया ॥ १८·११६७.

३·२२०, १०·७८, १४·८४, १४·३६१. जेवि...तेवि १६·२०३; तेविं १·३६, १५·३३५, १५·४०७; तेविं चि ११·२३५, ११·४८३, तेवीं चि ७·४७.

**तेव्हलि-लिं**—त्या वेळीं, त्या प्रसंगीं, त्या स्थितींत. **तेव्हलि**—तेव्हालि प्रजीं विनविला ब्रह्मा। ३·८७. तेव्हालि मनासि मनपण न स्फुरे। ११·१९०. १·२३, १·८८, १·२२९, ३·२०३, ४·७, ४·१६८, ६·६८, ६·२४०, ६·२८३, ६·३०१, ७·१२९, ७·१७२, ८·१२०, ८·२१२, १०·२५३, ११·४८४, १४·११९, १४·१९६. ते व्हलि (तेव्हलि) २·२११; तेव्हलिं १·१६९, १·२४७, ८·१२८, ८·२४५, ९·१३७, १५·१४८, १५·२४०, १५·४०४, १६·११, १७·७, १७·२१४, १८·१६७६; तेव्हलां १४·२०१, १४·२१२; तेव्हली ७·१८०. जेव्हलि-लिं पहा.

**तेव्हां**—त्या वेळीं. जें ज्ञानिं बैसलें मन। तेव्हां चि तो तें॥ १३·६२१. ४·१८९, ७·१०१, ९·३३४, ९·५२७, १६·२६७, १६·४४८, १७·६४, १८·३७४. तेव्हां तऱ्हीं ६·२८८; तेव्हां तैसा चि फांके १५·३३७; जेव्हलि...तेव्हां ११·४७१; जेव्हलिं...तेव्हां ८·२५१; भले तेव्हां ८·२४७.

**तेसण**—तसा, तेवढा. आवडे तेसणा घुंधुरु ९·९.

**तैं**—तेव्हां. तैं वनशोभेची खाणि उघडे। ९·४३. तै (तैं) १३·९२०; तैं पुढुतीं भरे ९·२९४; तैं...तैं...जैं ९·४५१, जैं तैं, जैं पहा.

**तैसा-सी-सें**—त्यासारखा, त्याप्रमाणें. **तैसा**—ध्रुवो देवो गगनिचा। तैसा राहला॥ १३·६२०. १०·७७, १४·२४१, १६·४६८, १८·३७८, १८·१०८८, १८·११६६. तैसेनि १५·६६, – उन्मेखें १३·६२८, – साहंकारें १८·६०२; जैसा आहासि तैसेया नमो ११·५१४; तैसेयांचिये पांती १४·२३९; जैसा...तैसा २·३३३ व २·३३४, १५·२७१, १८·२२८ व १८·२२९; जेविं...तैसे १५·२५६; – सें १५·२७२, जैसी...तैसे २·३२६; तैसी ११·४७८, १५·२५७, १५·२६०; तैसी परी आहे १·५९; जैसी...ते(तै)सी २·३२५; तैसें २·३२८, २·३३०, ३·२१०, १५·२६५; १५·२६८; जेणें जेणें...तैसें तैसें ५·१७५; तैसिं चंद्रसूर्यादि थोरें १५·२७९; तैसीं फलें १८·५९८; जैसिं...तैसीं १८·१०९३.

**तो–ती–तें**—तृतीयपुरुषी सर्वनाम, कोणी एक, विशिष्ट. मग तो ह्मणे कृष्णु काइ बोलिला। तें नि आइका॥ ५·१४२. तो अज्ञानु गा पांडवा। तो ही तो चि जाणावा। १३·७६९. तो थिल्लरिचें बिंब काई। नानूं न व्हाए॥ १८·३८३. तो मी चि केवल तुज। श्रुत ही आहे॥ १८·११२४. तो अभिमन्यु, निर्देश करून, १·१०१; तो धांधा १७·४१९; जो...तो ५·१४४, १७·३६, तो...जो...जो १३·७७४; जो...तो तो १८·१४७५; तो ही १६·४६६; तो कर्में मवी १८·३९१; तो कालासे १८·३८९; तो पांडुचा कुमरु...पूसैल १६·४६७; नलिये वरि तो बापुडा १८·३९०; स्वयें सर्वेश्वरु तो अनुवादला १·७२; तो चि जाणें २·३५५ (२); तो चि ज्ञान १३·६३१; तो चि तो २·३५५(१). तेणें, त्यानें, त्यामुळें. तो तेणें नि गा जीवणें। १७·७८७, तेणें पाडे(डें) ३·११७, – लौल्यें ७·१३८, – बोलिलें १७·४२०, – सिद्धी गेलें १८·१७५४, – भलेतिये जातिचेयां होआवें ९·४११; तेणेंसिं १७·३८०, – सीं, त्याच्याशीं, १७·१३; तेया—तेव्हलि जियाकडे वांस पाहे। तेउना मी नि येकु तेया आहें। ७·१२९, ७·१३०, ७·१३१, ११·२२१; तेया उन्मत्ता ३·११५, – नांव १७·३०५, – परीं १८·११३१, – पासिं १३·७२५, –पासौनि १·२६४, – बोलतां, त्याच्याविषयीं सांगतांना, ११·४७८, १८·११४८, – भेण ११·२२४, – माझारि ११·४५३, – लागि २·१६९, – ही वरि १७·२९७, – ही सकट ११·२२६, – ही हुनि १८·१६२७, – गिंवसी १८·१५८; तेयां—आह्मा तेयां परस्परें ९·४०७; तेयां, त्यांच्या बाबतींत, ९·३२७, – चिंतवणी, त्यांची चिंता, ९·३३४, – नीकें, त्यांना जें योग्य, ९·३३६; तेयां मूर्खांचें जियालें ९·१७४; तेयाचा मज मोहो १२·१७०; तेयाचां ठांई १३·६२१,

तें एका चि देहाचेया नीकें लागले । ९·४९१, पोषगास, हितास, या अर्थी. २·५२, २·५८, २·२८६, २·३४७, ३·१३, ३·१८, ३·२२४, ५·१०८, ५·१६७, ६·२८२, ६·३२८, ६·३६३, ६·३६४, ६·४३९, १३·५९, १३·४०३, १३·४३१, १३·४५६, १३·५११, १३·६३७ (कें), १३·७१७, १३·७९५, १५·११५, १६·२७३, १६·२९७, १७·१०९, १७·१३५, १७·१८६, १७·२०४, १७·३१८, १८·२८१, १८·२९१ (नी), १८·३०१, १८·६७२, १८·१३२२, १८·१३२३, १८·१६४२. **नीकें अवधान** ९·९६; **नीका गीताअभिप्राउ** ११·२५; **नीका गीतार्थु** ४·२२२; **नीकें चित्त देउनि** ६·३५९; **नीकें तें करणें** ९·३३६; **नीकी निश्चिति** १८·१५१; **नीके पाक** ३·१२९; **नीका बोलु** २·२०८; **नीकी रसोय** २·२५४; **नीकेया स्थाना** १३·५७६; **मनाचें एक नीकें** ६·४१९; **देओ नीकें बोलताति तें न चुके** ६·४२६; **नीकें रूप केलें** १३·९३६; **नीकिया निहालिलिया,** चांगल्या प्रकारें पाहिल्या, ११·६९२; **शंका नीकी फेडूं,** चांगल्या रीतीनें, १५·३८२; **वीरूं अथवा नीकें** ४·१९९; **नीकेनि,** चांगल्या रीतीनें, ४·२१४, **– अनुष्ठीं** १८·१४७१; **नीकेया परीं** १०·४८.

**निकर**—(१) समुदाय. हे आइशाखानिकर । थोरावनी ॥ १५·१६९. (२) आवेश. **निकरें** १८·१२३०, **– तंडों** ११·५४१, **– बोलत असों** १३·७२५.

**निकवडा**—दरिद्री. निकवडेया निष्ठुरा । उवगिजे जेविं सोइरा । १५·२५६. १३·९७५.

**निकर्ष**—तात्पर्य. १४·४०३. **निष्कर्ष** पहा.

**निकुंज**—दाट झाडी. १८·१०१५.

**निकुंभ**—गंडस्थळ असा अर्थ घेतात. १·१७. **द्वैत** पहा.

**निकृष्ट**—नीच, हलका, कमी प्रतीचा. तेथ क्रिमि कीटक लोष्ट । हे देहलाभ होंति निकृष्ट । १८·२४०. १६·१७४, १६·३४४, १६·४२७. **तमोमात्रें निकृष्टें** १४·१००; **उत्तममध्यमनिकृष्ट** १८·६९४.

**निक्षेपणें**—खालीं ठेवणें, त्याग करणें. ऋगांनि माझां स्वरूपीं । मनबुद्धि हे निक्षेपीं पां) । १२·१०२. ९·४२०. **निक्षेप** ९·२९१, १५·५४५, **–रूपहवनिं,** त्यागरूप हवनांत १७·३५८; **विश्वनिक्षेपैकनिधान,** विश्व ठेवण्याचा एकच सांठा, येथें विश्वाचा एकच आधार या अर्थी, ११·३०३.

**निखल**—केवळ. निचळ, शुद्ध. हें ज्ञातेंनजाचें निखल । विश्वात्मक केवल । ११·६०५. हें असो निखल । ज्ञान चि तें ॥ १३·३११. जें तोंड भरूनि निखल । आलासि पूर्णा ॥ १५·४१३. ९·३९, ९·९५, ११·५२८, १३·६८२, १५·४३१, १७·३२, १८·८१३, १८·१२१२. **निखलें पाणीं** १५·३००; **निखल भक्तितत्त्व** ९·३९२; **निखल समरसाचे ओतले** ५·१३६; **कनकाचें निखळ** १८·१७५५, **सोनियाचें —**६·९२; **सुखाचा निखलु राशी** १६·३५४; **निखल उरे** ८·५१; **निखलु हा निवटे** ४·२०६; **निखलें मियां चि भरे** १८·११२८.

**निखिल**—सर्व. जग निखिल माझें चि ओतलें । ९·२२८. ९·२०९, १३·१०८.

**निगणें-नीगणें**—बाहेर येणें, टाकून जाणें, येणें, नष्ट होणें. **निगणें**—जैसें मूळसिंचनिं साहाजें । निगति शाखापल्लव ॥ १·२५. तेणें अपमानें निगाली । वीरवृत्ति ॥ १·१८५. ऐसि श्रीमुखौनि अक्षरें । निगति ना जंव एकसरें । तंव अविद्येचें आंधारें । निगौनि गेलें ॥ ११·१७७. बोलतां अधिकु ही निंग । १३·२६४, गैरवाजवी शब्द बाहेर आला. १·२३१, २·५४, ५·१७१, ६·१५४, ६·१६८, ६·२४२, ६·२४९, ६·२६७, ६·३००, ६·४५२, ७·१३, ७·९८, ७·१४३, ८·९३, ८·१६०, ९·२१, ९·७३, ९·१८१, ९·५११, १०·१०९, ११·२५, ११·३४०, ११·५९१, ११·६२७, १२·१०१, १२·१०७, १३·२३, १३·२५५, १३·४११, १३·५३८, १३·५४६, १३·६१७, १३·१०३८, १३·१०४०, १३·१०६७, १३·१०९४, १४·४०, १४·१८८, १४·२५३, १४·३८१, १४·३९६, १५·९३, १५·१०२, १५·१८३, १५·१८५, १५·१९७, १५·३२३, १५·३२५, १५·३२६, १६·१६३,

१६·१९८, १६·२५१, १६·३४३, १७·१९, १८·३६, १८·३६७, १८·३७३, १८·४०४, १८·६५४, १८·९३९, १८·१२८४, १८·१६९३. आटी निगों न लाहासि, फेऱ्यांतून सुटका करून घेतां येणार नाहीं, १३·१०५४; कोंभ निगाले ६·२५३; खरें निगे १६·४६४; तीरीं निगाला, तीरास लागला, ११·६५९; थाउं न निगे, थांग लागणार नाहीं, ७·१९०; थानौनि निगे, स्तन सोडतें, ८·१२; दोंदें निगति, पोटें सुटतात, तृप्ति होते या अर्थी, १३·२७५; नमरतु निगाला, वांकला, ९·४१४; नाखें निगति ६·२६२; पैजा निगाले १५·२४७; फोंक निगति १५·१६४; बोबांत निगे १३·३०४; भेटों निगे ६·३६५; मुखें जें निगे ६·४९०; वाटा निगति ८·२०६, –निगाले १०·११५, १२·६९; सर्वांगिं कान निगाले १४·६१; साधकु निगौनि जाये, पुढें जातो, ६·२९७; न निगिजे ९·४८८; निगिजत आहे ९·१५२; निगिजैल ११·४३२; निगैं, तूं नीघ, ११·६१७. निगणें—जरि विपायें निगणें घटे २·२०५; १३·७८३, १५·२८७; निगणेयां-(या) आणि प्रवेशा १६·२८०; निगवणें करी १५·३२७; निगालेयां वोघांचिया, निघालेल्या ओघांच्या, १८·३२९, ज्ञानदेवी–'निघालया' १८·३३२; कुंटे–'निघालिया वोघाचिया' १८·३३२; परिमलु पवनापाठीं निगालेयां ९·४०९; निगिजे...येइजे ६·१५९;निगाला... वाटे लागला ६·४३१; निगतां...रिगतां १२·१०९; रिगतां निगतां १३·४१५; रिगे... निगे ७·५; निगलें, चिपड्या, झांपड, १३·७५७; निगाली, तयार होऊन बाहेर दिसूं लागलेली, १४·१४२. निगा—पुढां निगा, पुढें निघण्याची क्रिया, १७·१७१; निगावां, सुटकेचा मार्ग, १६·४६६; रिगिनिगा, येणें जाणें, १८·३३५. नीगणें ६·१९६, १४·२१६; वाटा नींगे ७·४७. निघणें पहा.

**निगड्**—बेडी, बंधन. प्रवृत्ति वरि निगडु वाउनि। ८·१२२.

**निगदणें**—सांगणें. निगदिलें असे १५·५७.

**निगम**—वेद. निगमागमद्रुमफल, वेद व शास्त्र या वृक्षांचीं फळें असणारा, १८·२; निगमाचल, वेदरूपी पर्वत, १७·२२०, –शिखर १७·२३१; निगमपद्म १७·४६; निगमरत्नाचल १८·३५.

**निगर्व**—गर्वरहित. ८·१९२. गर्व पहा.

**निगुति-ती**—कौशल्य, युक्ति. निगुति १७·१८३, १८·१३०. निगुती—ए(ऐ)सिया निगुती दोन्हीं। त्यागसंन्यासअनुष्ठानिं। १८·१२९; यथानिगुती १८·१५५.

**निग्रह**—संयमन. मनाचा निग्रहो ६·४२३.

**निघंटु**—यास्कांनीं निरुक्तांत विवेचन केलेला वेदांचा शब्दकोश. १३·८३०.

**निघणें**—एका जागेवरून दुसरीकडे जाणें, फुटणें, बाहेर येणें, २·२०२; २·२०३. परिणामा कोंभ निघाले ९·१९०; माघौता निघसील २·२१७, –निघालासि २·२०६. नि-नीगणें पहा.

**निचाड**—इच्छारहित, निरिच्छ. देखे दगडाचेनि पाडें(डें)। निचाड ऐसा ॥ ६·९३. २·२८१. चाड चि निचाडां करी ६·१३५. चाड पहा.

**निज-नीज**—(१) स्वतः, आपलें, आत्मविषयक, गुह्य, भक्त. निज—नवियें आवडिचेनि भरें। कामिकु निज वनिता विसरे। १·१८७, ज्ञानदेवी–'निजवनिता'. हा पुरुषु कां ह्मणिजे। जें पूर्णपणें चि निजें। पैं मायापुरिं पहुडिजे। तेणें हिं बोलें ॥ १५·४८७. ऐसें ईश्वरा कडे निज। धांवे आपैसेया साहाज। तेया नांव गा तेज। आध्यात्मिक तें ॥ १६·१८८. ४·१४७, १०·२८०, ११·१६२, ११·३३०, ११·४०२, १३·५४२, १३·६०४, १६·१८८, १६·३०९, १७·२३२, १७·३१६, १७·३८९,१८·१४,१८·८५०. अंतरिचें निज, गुह्य, ११·३६; निजांग ७·१५; निज अवधान १६·४७०, निजावधान १६·२११; निजु आचारु ६·४४४, निजाचार ३·४४; निजात्म-पद १८·१३१३; निजानंद १२·१७१, –बहुवसा १७·४२१; निजकांत, आपला पति, आत्म्यास उद्देशून, १८·१६५२, –कांति ६·२८३, –गडें, दृढ, आपल्याशींच असलेलें, १३·४९९, –गुणें १३·१४७, –गुरु ३·२१; निजाचा चक्रवर्ती, भक्तांचा सम्राट्, १२·२४१, ज्ञानदेवी–'निजांचा' १२·२४४; निजजन,

आपले भक्त, **निजजनाखिलमंगला** १८·१, **निजजनानंदें** १२·२३८, **निजजनकल्पलते** १२·१०, **निजजय(न)जितभजनीय,** आपल्या भक्तांनीं जिंकलेला, भक्तांना वश झालेला व भजण्यास योग्य असा, १८·९; **निजज्ञान** १५·४०३, **–त्याग** १६·१३१, **–धर्म** २·१८६, ३·८२; **निजधाम** ८·९७, ८·२०१, ९·४८, १०·५१, १५·२८४, १६·७६, १६·४०१, **–व्योमिचा** १६·१४, **–ह्याम** ९·५११, १०·१३३; **निजनिजें सामर्थ्यें,** आपापल्या सामर्थ्यानें, १४·२७८; **निजनिर्मल** १२·२३९; **निजपती** १६·२०८, **–पद** ३·२३९, **–पुण्य** ६·४४६, **–प्रकृति,** मायेस उद्देशून, ९·११६, **–बिंब** १८·१११९, **–बोध** १८·४७, **–रूप** ८·२५७, १६·७५, **–वृत्ति** ३·१११, ३·११६, ३·२१३, **–व्यापार** ३·१८१; **निज स्वरूप माझें** ६·३२३; **निजस्वभाव** ३·२०३. (२) **निजणें**—झोंपणें. ब्रह्मायुषी होइजे । मग निजिलेयां चि असिजे । १४·१८६, ब्रह्मदेवाचें आयुष्य लाभलें तरी दिवसभर झोंपून राहावें. **नीज**—(१) **निज** (१) पहा. ११·३२२. **व्रजांगनाचिं नीजें** ९·४६१, हा अपपाठ आहे, **व्रजांगनांचिं नीजें** असा पाठ घ्यावा; **विरुद्ध ना नीज** १४·७८. (२) झोंप. **नीजे आलें** १४·१११.

**निडल**—कपाळ. तिहिं निजीवीं हीं देवांचिं निडलें । वैसणीं केलीं ॥ ९·४८०, चंदनाबरोबर निंबाचीं पानेंही देवांच्या मस्तकावर जाऊन बसतात. **निडला घालि फेडी,** कपाळावरचे टिळे लावतां व पुसतां येतील पण कपाळ कांहीं ठेवतां, काढतां, बदलतां येणार नाहीं, १८·२२१; **आर्त निडलिचा घामु पूसीं** १०·१६४, **आर्तनिडलिचा** असा पाठ घ्यावा, ज्ञानदेवी–'आर्तीचिये निडळींचा', इच्छारूपी कपाळावरचा घाम पूस, १०·१८०; **हृदयाचां निडलीं** ११·६६९.

**निडार**—परिपक्वदशा. निडाराचेनि कोंधाटें । मोतियें नावरति संपुटें । ६·२६६.

**निढाल**—केवळ. १३·१०८.

**नितंब**—कंबरेखालचा मागचा भाग. १४·१०४.

**नितरणें**—निस्तरणें, झिरपून गळून जाणें. १८·१८०.

**नित्य**—सतत असणारें, नेहमींचें, नेहमीं. नगिसार तें स्वभावता । नित्य जाणें ॥ २·१३३. ६·६१, ८·१३१, ९·१६५, ९·४२५, १३·९५१, १३·१००१, १४·५२ (२), १५·१३३. **नित्य कर्म** १८·११३, १८·११७, १८·८३५, **–कर्म** १३·४४३, १८·५८५, १८·६९६; **नित्या होये** १३·१००१; **नित्यादि क्रिया** १·२५३; **नित्यादिक** १८·११७, १८·१४३०, **–का क्रिया** १८·६२९; **नित्यानंद** ८·२६२, ९·३११, १३·८६३; **नित्योदयो** ८·८९; **नित्यता**—जे माझिया नित्यता । नित्य ते पांडुसुता । १०·५२(२), २·२०४, ४·१०५, ८·१८, ८·६३, ८·१३८, १०·१८०; **नित्यतृप्त** २·२९२, **–नूतन** १·७१, **– पणें** १८·५८८, **– भाव** ८·२५५, **–यज्ञ** ३·८१, ३·८४, **–यागसहितें** ३·८६, **–युक्त** ८·१३७, **–रूप** २·१२४; **नित्यु अचलु...शाश्वतु** २·१५०; **नित्य सिद्धु निरुपाधि विशुद्धु** २·१४५; **निं(नि)त्य ना नाशवंत** ८·१७३; **नित्य निष्कंप** १४·४०२; **निरंतर नित्य** २·१५३; **सिद्धु नित्यु आपैसा** १३·११०१. **नित्यनैमित्यिक, निमित्त** पहा. **अनित्य** २·१२२, २·१३२, **–ता** ९·५०१, १५·३९, **–त्व**१५·४०, **–भाव** १३·१०६५.

**निद्णें**—झोंपणें. निंद्रेचा अवतरीं । निदिजे सुखें ॥ ५·४३. **निवांत निदिजे** ९·२२; **देहपुरीं निदैजता** १५·४६३; **निदैला देखे** ९·१५८; **निदैली असे** ६·२२३, **– चेवउनि** १५·८५; **निदैलें**—कृपालुपण निदैलें ९·१९, **भूतजात –** २·३५४, **शरीर –** ५·५३; **निदैलेया** १८·२२३, **–चिया परीं** ८·१८०; **निदैलेयां जागिजे** १५·४०४; **निदैलेयांतें** ९·१८७; **चेंतू...निदेला** ६·६५. **निदसुरा-रें,** झोंपाळू, आळशी, अज्ञानमय, ५·९७, ८·३४, १५·२६१; **निदुसुरे मार्ग,** अज्ञानमार्ग, ६·१५५; **निद—अन्यथामतिनिदेतें** १६·११, **अन्यथा** पहा. **नीद**—तरि अविवेचिया नीदा । विश्वस्वप्नाचा हा धांधा । भोगित होंता प्रबुद्धा ।

**निपटणें**—नाश करणें, समूळ नाहींसें करणें. **निपटूनियां** १.५०१; **निपटौनि**, सर्वथैव टाकून, १३.९९३, १८.९१, १८.१५५२. **निपेटार** पहा.

**निपुण**—कुशल, प्रवीण. **क्षात्रधर्मीं निपुण** १.९६, **साधकजन**–३.३७; **निपुण होउनि** २.२४९; **सत्यें शौर्यें निपुणु आहे**, भीष्मास उद्देशून, ११.३९३; **सर्वशास्त्रनिपुण** १७.४३; **निपुणपणें**, बारकाईनें, १.८: **अतिनिपुण** १३.८२७.

**निपेटार**—निपटलेला, निस्तेज. **निपेटारे जाले** ११.४६५. **निपटणें** पहा.

**निफजणें**—उत्पन्न होणें, करणें; घडणें, घडविणें, तयार करणें. देखें जेतुलालें कर्म निफजे । तेतुलालें आदिपुरुषीं जरि अर्पिजे। २.२७१. तैसीं शुभाशुभ कर्में । निफजती प्रकृतिधर्में । ३.१७५. लोकत्रय निफजे । इयेतव॥ ७.१६, प्रकृतीमुळें. आणि जें जें कर्म निफजे । तें थोडें बहुत न म्हणिजे । १२.१२३. करी-चातुरंग-समाजें । सेना नांव निफजे । १३.१५२. २.३०५, ३.२५७, ४.७३, ४.१३९, ५.५५, ७.१४२, १२.१२३, १३.९६८, १३.९६९, १३.९७०, १३.९७३, १३.११५७, १४.९१, १४.२५८, १६.५५, १६.९५, १७.१८१, १७.२१६, १७.२६०, १७.२८२, १७.४०३, १८.९६, १८.२६४, १८.३०५, १८.५९०, १८.६१६, १८.७६४, १८.९४०, १८.९७४, १८.११५७, १८.११७०, १८.११७३, १८.१४३२. **निफजउं पांतासि** ११.३६०; **निफजत असे** ३.१७७; **निफजतसे** ३.५९; **अन्न निफजलें** १७.१५४; **निफजावेया** १८.६३२; १८.७६२ (२); **निफजे—दिव्यान्न निफजे** १८.१४९३, **दृष्टिबंधु**–१४.५, **रसलोपु**–१८.१०८६; **निफजे उपजे** १३.९७१; **उपजे…निफजे** १३.४७५; **निफज** १७.१८७, ज्ञानदेवी–'निष्पत्ति' १७.१८८; **निफजणें** १८.९७७. **निफजवणें**—निफजवीति पाक । नानाविध ॥ ३.१३१, तैसी बुद्धि कर्मातें दावी । तें करणसामग्र निफजवी। परि निफजावेया होआवी । धीरता जे ॥ १८.७६२ (१), ८.२८, १०.२१३, १२.११, १८.६१३; **अन्न निफजविलेयां** १५.३७४; **दान निफजवावेंया** १७.२६९; **निफजविलेया पाठीं**, उत्पन्न करविल्यानंतर, १८.६०९.

**निफनणें**—निष्पन्न होणें. तैसा नाशीति धर्मु निफनला । हेतुकपणें ॥ २.२५२. ९.१७४. **निफनलिं स्निद्धे कर्में** १२.१२८: **निफनलें दानपुण्य** झांकी १३.२०६.

**निवद्ध**—बंधणें पहा.

**निबर**—प्रखर, तीव्र. **निबर रश्मिपुंज** १६.९. **निबरपणा**—कठिणपणा, **करितेया निबरपणां उभजे**, करणाऱ्याच्या त्रासाला कंटाळतो, १८.१८२.

**निभ्रांत**—निःसंशय. तिहिं गुणीं आवृत । हे वेद जाणें निभ्रांत । २.२५६. आणि जेया जें विहित । तें ईश्वराचें मनोगत । कर्मीनि केलेया(यां) निभ्रांत । परितोषु पावे ॥ १८.९०७, ईश्वराला आनंद होतो या अर्थी, ज्ञानदेवी–'सांपडे चि तो' ईश्वराचा लाभ होतो, १८.९११. मी चि आत्मा एकु निभ्रांत । १८.११९१ २.१६५, २.२२९, २.३१९, ४.७२, १२.२३. **निभ्रांत ओळखे** ४.९५, **–जाण** ३.२६५, १०.२५९, **–जाणें** ४.१९७, ५.११७, **–मानीं** २.३३७, ३.५२, **–न सुटे** ११.४१७.

**निमणें–नीमणें**—लय पावणें, नष्ट होणें, मरणें. **निमणें**—तरि स्वभाव काइ निमाले । इंद्रियांचे ॥ ३.५४. घटाकाशु हा जैसा । निमालेयां तेया अवकाशा । ६.८३. कल्पना निमे । प्रवृत्ति समे । आंगें मन विरमे । साविया चि ॥ ६.२१२. तो मरण नेयंतां निमोनि गेला । ८.२१६. २.१७७, ३.२६६, ७.१५२, ७.२०५, ८.८४, ८.२४१, ९.५०६, १४.५८, १६.३०५, १८.११९२, १८.२३३, १८.२५८, १८.१३५५. **निमालेयांचिया गोठी** ९.५००; **अज्ञान निमालेयां** १८.१३८७, **कर्मजात**–१८.१२८, **त्रिदाघ**–, आध्यात्मिक, आधिभौतिक, आधिदैविक हे तीन ताप नाहींसे झाल्यावर, १६.४२६; **बुडौनि निमे** १४.२४०; **युगें निमति** ८.१६१; **वासना निमोनि गेली** १८.५४२; **विषयांतें निमालेयां आइके**, विषय नाहींसे झाले आहेत असें ऐकेल, ६.३७५; **निमौनु जाइजे** १८.९४२: **निमणें न निमणें** १८.१२७०; **उपजणें निमणें**

१५·३१५; **होउनियां निमतें** १५·४४९; **होये निमे** १७·६९; **निमांतें—दृष्टादृष्टस्पृहे निमांतें** जालें, दिसणारें जग व न दिसणारा स्वर्ग यांबद्दलची इच्छा नाहींशी झाली आहे, १८·९५७; **निमालेपणें**—बोलु निमालेपणें विवरी । अचर्च्यातें ॥ १५·४३५, **अनिम,** न शमणारा, न ओसरणारा, **अनिम आखाडमेघ** १६·३६४, ज्ञानदेवी – 'अनियम आषाढमेघ' १६·३६६. **नीमणें—आकारलोपीं नीमणें** ८·१७; **जरामरणाची कथा नीमे** ७·१७०; **जन्म ना नीमणें** ८·८६.

**निमथा**—शिखर. **महासुखाचा निमथा** ५·३२, **योगाचलाचा** – ६·५४; **निमथावेन्हीं** १२·५१.

**निमळणें**—न मिळणें, याचें हें रूप आहे. न पहा. **चंद्रा चंद्रिके निमळणें आहे,** चंद्राची व चंद्रिकेची भेट न होणें हें संभवतें काय ?, कधीं वियोग घडत नाहीं या अर्थी, १८·२९१, ज्ञानदेवी – 'चंद्रा चंद्रिके न मिळणें आहे' १८·२९३; **हें युगुति निमळे,** हें सयुक्तिक दिसत नाहीं, पटत नाहीं, १८·१६९६, ज्ञानदेवी – 'युक्ती न मिळे' १८·१७१८.

**निमाल**—या शब्दांत **नि** हा उपसर्ग जास्त किंवा अभाव या दोन्ही अर्थी घेतां येईल. **जन्ममृत्युचिं निमालें रानें निस्तरे,** जन्ममृत्यूचें एकसारखें असलेलें, खचरट, माळरान ओलांडून जातो, किंवा जन्ममृत्यूचें दाट रान, जेथें माळरान नाहीं, ओलांडून जातो, १६·४३८.

**निमिख-ष-मेष**—क्षण. **निमिख—कोडि वेळ निमिखें होंतु जांतु,** बराच काळ क्षणभरच आहे असें जाणतो, १५·१३८; १५·१८४. **निमिष**—युगा ही होन वडिल । निमिष मानी ॥ १३·३७८. १२·१०६, १३·४३५. **निमिष भरी** १८·१७२२, **निमिषभरी** १२·१०५. **निमेष—निमेषु भरि** १५·१११; **निमेषानिमेष,** डोळ्याची उघडझांक, ५·४५.

**निमित्त**—हेतु, कारण, नांवापुरतें कारण. कां निमित्तें कारणें एकें । तें सिद्धी न वचत ठाके । २·२६९. १·२५८, ११·४७३, १३·८५०, १८·१३६९, १८·१६६६. **निमित्तादिकीं** ३·१२०; **निमित्तमात्र**—जैसा लोकचेष्टां समस्तां । हा निमित्तमात्र कां सविता । ९·१३०, ११·४६६; **निमित्तिकें** १८·५८५. **नैमित्तिक** १·२५३, १८·११०, १८·११३ (१, २), **नित्यनैमित्तिक** १८·९६, १८·११७, १८·११८, १८·११९, १८·१२२, १८·१२४, **–नैमित्यक** १३·५२४, १३·६८०, १८·५९४. **निमित्य** १६·१२७, १८·१७४४.

**निमिलणें**—बंद होणें. **निमिल—निमिलोन्मीलनीं,** दृष्टीच्या झांकण्याउघडण्यांत, १७·५; **निमिलिणी मीठी देंत आहाति,** दृष्टि बंद केली म्हणजे सूर्याच्या सृष्टया मावळतात, ११·१४१.

**निमुटणें**—झांकणें, मिटणें. दीपाची दीप्ति निमुटली। ६·२८५. ११·२३०.

**निमोल**—विनामूल्य, फुकट. ९·३८४.

**निम्न**—खालीं, खोलगट भाग. निम्न भरलेयां उणें । तें पाणी ढळों चि नेणे । १६·१५७, **प्रवाहांत** खालचा भाग, खाडा वगैरे भरल्याशिवाय पाणी पुढें वाहत नाहीं. १६·३२९.

**नियत**—निश्चित असणारें, ठरलेलें, संयमयुक्त. ह्मणौनि तूं नियतु । सकल कामरहितु । होउनियां उचितु । धर्मु राहाट ॥ ३·१४९. ऐसां(सा) नियतु कां कंदर्पु । ७·५०, असा नियमन केलेला काम, ७·४५ ते ७·४९ पहा. ६·३४२. **अंतष्करणीं नियता,** अंतःकरण स्वाधीन करून घेतलेल्या माणसांना, ८·५; **नियता प्रकृति तुज गुण दीधले,** हे क्षात्रधर्माचे गुण नियमन करणाऱ्या प्रकृतीनें तुला दिले आहेत, १८·१२८२. **अनियतासि योग्यता नाहीं** ६·३४४; **नियंता**—तरि विश्व हा अनादि ठावो । एथ नियंता ईश्वरु राओ । १६·२९३.

**नियमणें–नीयमणें**—स्वाधीन ठेवणें, ताब्यांत ठेवणें. एरा इंद्रियां विखो तुटे । तैसा नियमूं नैये रसु हटें । २·३०७. ३·७०. **नियमावी** १८·१३०८; **मियां नियमिला सांता** ९·२८३; **नियमी ना निवारी** ९·१२७; **नियमिता** १०·२२६, १०·२७२(१), ११·५१५. **नियम**—निर्बंध, ठराव, महत्त्व, योगांतील दुसरी पायरी. हे पूज्य आह्मां नियमाचे । २·३४, श्रोत्रादि इंद्रियें धरिति । परि रसनेसि नियमु न करीति । २·३०४,

२·३०८, ३·७६, ६·३७५, ६·३७९, ६·३८१, ७·१०१, ७·१६३, १३·६९३, १४·२०६, १८·११३, १८·९३०; **नियमाचे गुंडे** १३·५८९, **–चा दीवटा** ७·४७, **–चिया साखला** १८·६३४; **नियमबुद्धी** ७·१३९; **यमनियम** १·२४८, २·३११, ४·६४, ६·५५; **यमनियमाची कांटि** ९·२१२, **–चे डोंगर** ५·१५८; **यमनियमांचीं नगरें** ७·६९; **यमनियमाचिया वाटा** ६·४२१; **व्रतनियम** ३·८९; **नियमें**—(१) नियमन करून, **मनपवननियमें**, मन व प्राण यांचें नियमन करून, १६·१८४; (२) निश्चयानें, २·३०१, १५·१६५; **नेमिजे**, नियमन करावें, १७·२०९, ज्ञानदेवी–'नियमिजे' १७·२१०; **न्यामक**, नियमन करणारे, १८·५६७, ज्ञानदेवी–'नियामक' १८·५७०.

**नियोगणें**—व्यवस्था लावणें. **नियोगी**, आज्ञापक, **ब्राह्मणक्षत्री नियोगी केले**, ब्राह्मण व क्षत्रिय या दोन वर्णांची व्यवस्था लावून त्यांचीं कार्यक्षेत्रें आंखून दिलीं, १८·८२५.

**नियोजणें**—योजना करणें, ठरविणें. नियोजिलीं वितंडें। ताला येंति ॥ १३·२२, वेदांना न मानणाऱ्या जैन व इतर पाखंड्यांचीं ठराविक कुभांडें ताळ्यावर येतात.

**निर्-निश्-ष्-स्**—शब्दास जोडून, नकारदर्शक उपसर्ग. त्याशिवाय, –खेरीज, –पलीकडे, –बाहेर या अर्थी. **निर्**—(१) शब्दारंभीं स्वर असल्यास हा उपसर्ग येतो. **निरंजन, निरंतर, निरवयव, निरहंकार, निराकार, निरानंद, निरायुध, निरार्त्तता, निरालंब, निराशा-स-स्य, निरुपहत.** कित्येकदां स्वरारंभी शब्दापूर्वी **निर्** ऐवजीं **निर** हा उपसर्ग येतो, **निरउपचार** १२·१५१. (२) शब्दारंभीं व्यंजन असल्यास निर्-श्-ष्-स् हे उपसर्ग येतात. **निर्**–(कांहीं मृदु व्यंजनापूर्वी) **निर्गुण, निर्जल, निर्दोख-ष-र्होष, निर्धन, निर्द्धुम, निर्बल, निर्बु-र्बू-ज, निर्भय, निर्भिन्न, निर्मछर-त्सर, निर्मल-मूंल, निर्लोग, निर्लेप, निर्वंस, निर्वात, निर्वाल, निर्विकल्प, निर्विघ्न, निर्विवाद, निर्विशिष्ट, निर्विशेष, निर्वैर, निर्व्यापार, निर्हेतुक; निश्-ष्**—(कांहीं कठोर व्यंजनापूर्वी) **निश्चल, निश्चिंत, निष्कंप, निष्कपट, निष्कल, निष्कृती, निष्क्रिय, निष्पाप, निष्फल;** कांहीं व्यंजनापूर्वी **स्** किंवा विसर्ग येतो: **निस्तर, निस्तेज, निःशब्द, निःसंग, निःसंदेह, निःसंशय, निःसीम.**

**निरंजन**—एकांत स्थळ, अरण्य. **निरंजन सेविलें** १३·२४; **जैसा निरंजनीं पाटु फूटला**, जसा अरण्यांत पाण्याचा ओघ अनिर्बंद्ध वाहतो, १३·६९६.

**निरंतर**—एकामागून एक, नेहमीं, काळ व स्थळ यांत अंतर नसणें, **सतत असणारा.** तिहीं नाना रंग निरंतर। आस्फुरिले ॥ १·१५३. जें आदि स्थिति अंतु। हा निरंतर असे नित्यु। २·१५३. श्रुतींचा निरंतर। अभ्यासु करणें ॥ १६·१०२. २·१७२, २·२४१, २·३१०, ३·६२, ५·२०, ५·१४६, ६·९७, ६·१७८, ७·१४६, ८·८१, ८·१०३, ८·१२४, ९·२२६, ९·४८२, ११·२६३, १२·१२, १२·८०, १३·३८८; १३·४४२, १५·७, १६·३३१, १८·१००८, १८·१२९३. **निरंतर दिवाली** ४·५३, **–वनश्री** ३·१००; **नित्य निरंतर रमति**, २·२४३; **बाणवारि निरंतर वरिषताति** १·१६६; **निरंतरकरुणासिंधू** १४·३; **निरंतर**, सतत असणारा, **निरंतरातें आवांहांति** ९·१६२.

**निरंधन**—निर्+इंधन, सर्पणाशिवाय, **निरिंधन** रूपाऐवजीं **निरंधन** रूप बनलें आहे. जैसा निरंधनि विण आगी। विझोणें चि उरे ॥ १२·१८३. काष्ठाशिवाय अग्नीला विझणें तेवढें बाकी राहतें, विझावें लागतें,ज्ञानदेवी–'निरिंधन आगी विझोनि जाय' १२·१८३, वर दिलेल्या अवतरणांत **विण** शब्दामुळें नकाराची पुनरुक्ति झाली आहे. **निरंधन आणि विझालें** १३·२७९.

**निरपणें**—पुसून स्वच्छ करणें. ६·२३४.

**निरवढी**—कोठडी. **योगाचिया निरवढी कोंडिजति**, अष्टांग योगामुळें इंद्रियांना ध्यानरूपी कोठडींत धैर्य बंद करून ठेवतें, १८·७३९, ज्ञानदेवी – 'निरवडी कोंडिजती', मोठ्या कौशल्यानें कोंडून ठेवतें, १८·७४२.

**निरवधि-धी**—निःसीम, अमर्याद, अपार, अफाट. **अवधि** पहा. **निरवधि**—ऐसे निरवधि

चोखडे । स्वामिभक्ती ॥ १·११२. २·३५५, १५·३६८. **निरवधी**—निवडलें निरवधी । नवनीत हें ॥ १·५१, २·८३, २·८६, २·१७२, २·२३५, २·२९६, ६·६१, ६·४५५, १०·८१, १२·५७, १६·१५४ (धी), १८·७१४, १८·१००३.

**निरय**—नरक. १८·६६. **निरयपुरिची सभा** १६·४२८; **निरय भोग** १·२५९, **–भोगें** १६·२९४.

**निरसणें**—दूर करणें. २·१३१. **माया निरसिली** ११·६४; **निरस्त**, नाहींसें केलेलें, **निरस्ताखिलामंगला**, सर्व अमंगळ, पाप, ताप ज्यानें नाहींसें केलें आहे, १८·५.

**निराकरणें**—निषेध करणें, खंडण करणें, दूर करणें. जें कर्मजात आवर्वें । एथ निराकरिलें देवें । २·३७१. **अशेष कर्म निःशेष निराकरिसि** ३·४.

**निराल**—आधार, संबंध, नसलेला; आकाश, ब्रह्माकाश. किर निरालीं बोल देखसी । सनागर ॥ ५·१४०. चातक निरालीं । लागलें(ले) जैसें(से) ॥ ११·६६९, आकाशाकडे पाहतात, मेघप्रतीक्षा करतात. ६·५७, ८·११४, १३·५१, १३·९४२, १३·९९१. **मोकली गोठि निरालीं केली**, जो अनिर्बंधपणें सहज न कळणारा संवाद केला, आकाशांत ज्याचा थांग लागणार नाहीं, असाही अर्थ संभवतो, १८·१६७५.

**निरालंब**—ज्यास आधाराची आवश्यकता नाहीं असें. १२·६०. **निरालंबिची वाडी** १३·४५.

**निराश-स**—निरिच्छ. **निराश** ३·१६७, ५·१२७, ८·१९२. **निराशाचें चिन्ह** ३·६७, ३·६८ ते ३·७५ पहा; **फलनिराशा** १८·२७१. **निरास** ४·१०५, **निरासता** ४·९२; **निरास्य**, विरक्ति, १२·१८१.

**निरिगणें**—प्रवेश न करणें. जे अभ्यासिं निरिगती चि कहीं । ६·४२०.

**निरिविडी**—चातुर्य, युक्ति. **वाक्यविधीचिया निरिविडी**, वेदांत सांगितलेल्या विधिवाक्याच्या युक्तीनें, ४·१२८.

**निरीक्षण**—पाहणें. **कूर्मिचें निरीक्षण**, कासवी आपल्या पिलांचें पोषण फक्त पाहूनच करते ह्या समजास उद्देशून, १३·१४०.

**निरुता-ती**—(वि.) स्पष्ट, शुद्ध. ५·१०३, १४·३०५, १५·४३७, १८·१७३६. **निरुता बोलु** १३·६६; **निरुती उपपत्ति** ९·१०४, **–क्रिया** १८·८७६, **–प्रतीति** १२·२७; **अंतरीं निरुते होंति** १३·११२८. **निरुति-ती**—(ना.) स्पष्टता, निर्णय, **निरुति करितां** १०·६६; **निरुती लागी** १३·६१३; **योगाची निरुती** ८·२१९; **निरुति होआवी लागे** १४·३६९; **निरुतीं**—बरोबर, च्यारि चि आंगुलें निरुतीं । ६·१९५. **निरुतें**, (वि. क्रि. वि.) खरें, वास्तविक, स्पष्टपणें, निश्चयानें, ३·१६, ५·६०, ५·७०, ८·२००, ९·८७, ९·१०९, ९·१३२, ९·१४३, ९·३०९, ९·४६९, १०·६२, १०·१०१, ११·३०७, १२·२२५, १३·९, १३·१०, १३·३३९, १३·१११६, १४·७५, १५·२४४, १६·१३६, १८·७४१, १८·११८८, १८·११९४(**नि**), १८·१३०७.

**निरुंधणें**—अडविणें, कोंडणें. एक अपानु प्राणीं अर्पिती । एक दोहींतें हीं निरुंधिती । ४·१४४. ६·४१५. **निरुंधुनि** ३·६४; **बिळीं निरुंधलां**, बिळांत कोंडून धरला असतां, १६·४०८; **निरुंधी करणें** ८·१२०.

**निरुपाधि**—उपाधिरहित, मुक्त. हा अनादि नित्य सिद्ध । निरुपाधि विशुद्ध । २·१४५. **निरुपाधी** १४·१९२. **निरुपाधिक**—मज आकारशून्या आकारु । निरुपाधिका उपचारु । ९·१५६. १५·४१३. **उपाधि** पहा.

**निरुपहित**—उपाधि नसलेलें, शुद्ध. **निरुपहित पूसलेयां**, उपाधिरहित शुद्ध स्वरूप विचारलें असतां, १५·४३०; **निरुपहितीं रूपिं**, शुद्ध स्वरूपांत, १५·४०९.

**निरूपणें**—वर्णन करणें, विवेचन करणें, प्रतिपादन करणें. जेथ निरूपिजे कर्मादिक । २·२५७. १३·१७६(२), १८·१४३९. **निरुपिजैल** ५·१७५, १८·२९९; **निरूपितु असे** १५·४२९; **निरूपिलें** ६·३१, ६·३३७, १५·४५२; **निरूपील** ६·४८५; **निरूपण**—आज्ञा दे पां मातें । निरूपणीं ॥ १२·१०, ७·१९६, १०·४९, १४·६२, १८·५८, १८·२७७, १८·१२३४,

१८·१४३८; **वेदांतिं निरूपणभाषाप्रतीति,** वेदांत प्रतिपादन करावयाच्या भाषेंत. १५·८१; **कांडत्रयनिरूपणी,** निरूपण करणारी, १८·१४४०; **निरूपिता,** सांगणारा, २·३७४; **निरूप्य** १६·४६; **अनिरूप्य**—तें अनिरूप्य कि निरूपिजे । १३·१७६ (१).

**निरूपम**—ज्याला उपमा नाहीं असें. जे अद्वितीय उत्तम । पवित्रैक निरूपम ॥ १·४१. २·२११, ४·१०, ६·२६१, १४·२२३, १८·१७७०. **निरोपम,** १२·२२३, हा अपपाठ असणें संभवतें, ज्ञानदेवी–'निरुपम' १२·२२५.

**निरोध**—संयम, निग्रह. निरोधाचें वेल्हावणें । १२·६४, इंद्रियांचा निग्रह करणें हाच ज्याचा विलास. ६·३६४, १८·६३५. **सर्वनिरोध** ६·३४८.

**निरोपणें**—सांगणें; आज्ञा, परवानगी, देणें. आतां निरोपिजैल प्रबंधु । अवधान दीजो ॥ १२·१०. १·८२, १·२७२, ४·१६, ५·२, १२·२२९, १३·२१७, १३·६४८, १३·९३७, १५·६९, १५·५६०, १६·४०, १६·४६६, १७·३१५, १८·३५०, १८·१२३८. **निरोपिजे** १३·३१२, **–जो** ८·१; **निरोपित असे** १८·७६८, **–तसे** १६·६१; **निरोपिती परी,** सांगण्याचा प्रकार, १२·२४२, १३·२४१. **निरोप,** आज्ञा, तेणें वेदांचेया निरोपा । आन न कीजे ॥ १६·४५२, **चांगु निरोपु** १८·१७४; **व्यासाचेया निरोपा** १६·४६८; **निरोपु दे** १८·४५४. **निरोपण,** विवेचन, निरोपणा वाहाती । वाट केली १३·८८५, १३·३२६, १३·६३८, १३·६४५, **निरोपणाचेनि नावें** १६·६२.

**निरोलणें**—तयार करणें, मशागत करणें. साहाजें निरोलले वापे । चतुर चित्ताचे ॥ ६·४८७, ज्ञानदेवी–'वाफे चतुरचित्ताचे' ६·४९०. **निरोलिलिये भुइं,** नांगरून मशागत केलेल्या जमिनीवर, ९·३९.

**निरोवणें**—सोंपविणें, सांगणें. **व्यासें निरोविलें** ९·५२५; **सुना गावीं निरोविलें सुणें,** ओसाड गांवांत सोडलेलें कुत्रें, १८·५४९.

**निर्गुड**—गुड पहा.

**निर्गुण**—गुण नसलेला, उपाधिरहित. म्हणौनि गुणाचा सेतु । अथवा गुणभोक्तु । हा निर्गुणि मातु । दोन्हीं चि न ये ॥ १३·१०७. १३·१०५, १४·२९८, १४·३१९. **निर्गुणाचे गुण** १३·११९; **निर्गुणाची जाणिव** ८·१९२; **निर्गुणें गुणातें भोगणें** १३·९०६; **निर्गुणपणें** १३·११०२.

**निर्घात**—आघात. **महाघोषनिर्घात** १·१५८.

**निर्झर**—झरा, प्रवाह, पाझर. ६·१७४, १८·१४. **अमृताचा निर्झरु** २·३३१.

**निर्णय–निर्णो**—निकाल, निवाडा, सिद्धांत. **निर्णय**— १८·१४४३. **निर्णयो केला** १५·२९, १७·२१, १८·१४२९, **–देति** १८·१३६; **ईश्वरनिर्णयो,** ईश्वराच्या अस्तित्वावर भरंवसा, १८·८३४, **क्रिया–** १८·६३३; **निर्णो—निर्णो केला** १३·२२०, १५·६५.

**निर्दलणें–निर्द्दलणें**—पाडाव करणें, नाश करणें. **निर्दलणें—निर्दलूनि घालीं** ३·२६३; **निर्द्दलणें** १·२१५, २·३१५.

**निर्देश**—वर्णन, दाखविणें. **निर्देशदेशरहित,** दाखविण्यासारखें नाहीं व स्थानाच्या दृष्टीनें मर्यादित नाहीं असें, १२·३२.

**निर्धारणें–निर्द्धारणें**—पाहणें, विचारांत घेणें, निश्चय करणें. **निर्धारणें**—म्हणौनि अपाडु हें आथवे । निर्धारितां ॥ १·३०, पाहिलें असतां, विचारांत घेतलें असतां. **निर्द्धारणें**—आतां तूं यया वरी । नीकें हें निर्द्धारि । मग निर्द्धारूनि करीं । आवडे जैसें ॥ १८·१३२३ (१). **निर्द्धारिजे** १०·९८; **निर्द्धारितां** १·७, ३·७३, ४·१८०, ४·१८९, १८·३९४; **देवें निर्द्धारिलें** ६·१४७; **निर्द्धारुनि** १७·४०, १८·१३२३(२); **निर्द्धारूं** १८·१५८२ (१); **निर्द्धारूनियां** १८·१३२२; **निर्द्धारितेयां,** निर्द्धार करणारांना, १०·२७३. **निर्द्धार**—निश्चय, भेदनिर्णय. रज्जू चि ऐसा निर्द्धारु । होये जेवि ॥ १८·११८२, हें निर्द्धारूं जातां फुडें । निर्द्धारासि ठक पडे । १८·१५८२(२), **आत्मेयाचा निर्द्धारिं** १५·२६९; **स्वमताचिया निर्द्धारा** १३·२४०; **आत्मनिर्द्धार** १८·१३२६, **वेद–**१७·१७७.

**निर्बुज-बूज**—दिङ्मूढ. **निर्बुज**—**अनुभौ निर्बुजें बुडाला** १५·५०१. **निर्बूज**—चित्त होउनि जात निर्बूज । आश्रय(यें)पणें ॥ ११·२९३.

**निर्भयता**—भयरहित हा भाव, निर्धास्तपणा. **भय आणि निर्भयता १०·८३. भय पहा.**

**निर्भर**—पूर्णपणें भरलेलें. महामोहें निर्भरु । २·५. वरिपायें वीण सागरु । जलें जैसा निर्भरु । १२·१५१. **संजयो निर्भरु जाला,** आनंदित झाला, **१८·१५६२; उत्कंठानिर्भर ११·६७०, हर्ष– ११·५०१.**

**निर्भिन्न**—समरस झालेलें. आत्मरसें चि निर्भिन्नु । २·३३४.

**निर्मणें**—उत्पन्न करणें, तयार करणें. जलाशयें निर्मावीं । नानाविधें ॥ १४·२३१. **१२·१७. निर्मूं एंती १८·१७५५; निर्मूनियां १८·१६७७; निर्मावें ना १८·१७६६. निर्माण १७·१८३; निर्मिता—गीताशास्त्रनिर्मिता १८·१४८८.**

**निर्मत्सर**—द्वेषरहित. ४·११२. **निर्मछरु सदयता २·२०३.**

**निर्मल–निर्म्मल**—मल– दोष– पाप– रहित, स्वच्छ, लखलखीत. **निर्मल**—जें परब्रह्म निर्मला। साठिं सरे ॥ ८·२६०. आंतु बाहिरि चोखालु । सूर्यु जैसा निर्मलु । १२·१७९. जय जय देव निर्मला । १८·१. **९·४१७, ९·५२४, १४·२५९, १५·९०, १६·१८१, १६·२०९, १७·२७१, १७·२८३, १८·४५६. निर्मले आत्मरूपीं १८·३११; निर्मलें कारुण्यबिंबें १४·२०; निर्मले गगनीं ८·१९; निर्मलें बरवेपणें ७·१८४; निर्मले मानसिं १८·९५८; निर्मल वाक्य १८·१३३२; माझां निर्मले स्वरूपीं ९·७८, ९·१४० (ले), १८·१२५६; निर्मला संवादियां शिरोमणि १५·४१८; निर्मलां होइजे १३·४६३; मलु...निर्मलु १८·१२२६; निजनिर्मल १२·२३९; निर्मलत्व १३·४७३. निर्म्मल**—कौस्तुभाहूनि निर्म्मलें । लेणीं दीधलीं ॥ ९·३८५, **ज्ञानदेवी – 'कौस्तुभाहूनि निर्मळें' ९·३८९.**

**निर्मूल**—मूळाशिवाय, आधाररहित. ह्मणे तूं निर्मूल । लटकें वाग्जाल । १३·२१, **वेद निराधार आहेत, त्यांत शुष्क शब्द-पांडित्यच आहे या पाखंडी लोकांच्या आक्षेपास उद्देशून.**

**निर्लाग**—संबंध नसलेलें, धरतां येत नाहीं असें. अथवा निर्लागे निसरडां । तपोदुर्गांचां आडकडां । ६·४७४. **निलाग**—पापिं जो निलागु । पुण्य अति निलागु । १३·६८१.

**निर्लेप**—अलिप्त, शुद्ध. तिहिं आपणपें करुनि निर्लेप । ५·१५९, **त्यांनीं आपणां स्वतःला शुद्ध करून घेऊन, ब्रह्मभाव ओळखून.**

**निर्वचणें**—सप्रमाण सांगणें, निश्चित प्रतिपादन करणें, सिद्धांत मांडणें. सोलींव निर्वचूं। फलितार्थु चि ॥ १३·१०४४. **निवर्चे(र्वचे)ना १०·४३, निर्वचेनां १०·१८४; निर्वच, निर्णय, तपाचा निर्वचु १६·१११; निर्वचु करितां १०·२४८, –कीजे १३·२४०; अनिर्वाच्य ६·३२५, १०·३४, १३·२५०.**

**निर्वंस**—निर्वंश, समूळ नाश. **झाड निर्वंसें कीजे १८·२०६.**

**निर्वाण**—अखेर, अंत, परमगति, मोक्ष. अमृतासारिखी ओषधी । निर्वाणिची ॥ २·८६. आदि मीं निर्वाणीं । मध्यें हीं मीं ॥ १०·११८. **२·१२९, ३·३७, ६·३३९, ६·४७६, ७·१४६, ९·४८५. जूझाचें निर्वाण १८·१५६६; निर्वाणवर्णु चि करी,** परिसानें बनविलेलें सोनें अति उत्तम रंगानें (दर्जाचें) असतें, त्यांत उंची हलकें असा भेद राहत नाहीं, **६·९७; निर्वाणवेऱ्हीं,** शेवटपर्यंत, **८·२०९; परब्रह्मनिर्वाण ५·१४८, सिद्धान्तनिर्वाणसूत्री,** सिद्धांतांचा निवाडा करणारा सूत्रग्रंथ, **१३·८३२, ज्ञानदेवी – 'सिद्धांत निर्माणधात्री' १३·८३५.**

**निर्वात**—निवाऱ्याचा. जैसा निर्वातिचा दीपु । सर्वथा नेणे कंपु । २·३४१. **६·३५८. निवातनिवांत पहा.**

**निर्वालणें**—तयार करणें, शुद्ध करणें, झकझकीत करणें. किं अंतर्ज्योतिचें लिंग । निर्वालिलें ॥ ६·२५४. साधकें देखिला आयासु । म्ह(ह्म)णौनि निर्वालिला योगाभ्यासु । ११·६०८. जैसें लोहकर्म लोखंडें । निर्वालिजे ॥ १८·३५७. सोनेयाचें सुंदर । निर्वाललें होये घर । १८·१४९२. **१२·१५५, १३·४७३, १३·८५९, १६·४०१. कनकें निर्वालुनि,** सोनें शुद्ध करून (त्याची कळशी बनवून), **१६·१९४; नेपुरें निर्वालूनि १५·४; भूमि निर्वाललेया(यां) १८·३९; निर्वाला,** निवाडा, परिपक्वदशा, **कणिसांचां निर्वाला**

१४.१२५, **परिणामीचा**—५.७; **निर्वोलेया आले** ६.३२६.

**निर्वाह**—व्यवस्था, रक्षण, जतन, धोरण, टिकाव. नेविं चि नाहिं एकसरु। निर्वाहो जया ॥ १३.८१२, ज्याच्या वागण्यांत एकाच प्रकारचें धोरण, एकनिष्ठता नाहीं. नाहिं निर्वाहो यया रूपा। प्रपंचरूपासि ॥ १५.११०, ह्या प्रपंचरूपी वृक्षाचें एकसारखें टिकणें असें नाहीं. तऱ्हीं देहा जंव निर्वाहो। तंव आथि कर्म ॥ १८.४१०. ८.२०१, ९.३३८, १७.२५१, १८.५८, १८.७३८. **निश्चयाचा निर्वाहो** १६.३२४; **देहनिर्वाह** १८.१०२३; **निर्वाहाती होये,** जोपासना होते, १७.८३.

**निर्विघ्न**—संकटरहित. **निर्विघ्नीं पैठिं होआवेया** १८.१०३६.

**निऱ्हां**—केवळ, अगदीं, पूर्णपणें. कां निऱ्हां करपौनि गेलें। १७.१५५. **सोफ निऱ्हां जाये,** अगदीं निष्फळ होतें, १७.२४८.

**निवटणें**—नाहींसें होणें, नाश करणें, मरणें. परि निवटिलेयाचें जैसें। पोट न दुखे ॥ ८.१५०, मेलेल्या माणसाचें. ३.२६५, ४.२०६, ९.२१५, ११.४३४, ११.४६५ (टिं), ११.४७२, १८.६६१ (टे), १८.१०४२. **निवटलें नुपहुडे** १४.३५६, **पहुडणें** पहा; **निवटूनि घातला** १८.१०५१.

**निवडणें**—पसंत करणें, वेगळें करणें, (त्यासारखें) भासणें. सलीलीं पय जैसें। एक होउनि मिनलें असे। परि निवडूनि राजहंसें। वेगळें कीजे ॥ २.१२७. जैसी अमृताची चवि निवडिजे। तरि अमृता चि सारिखी ह्मणिजे। ४.१८१. निवडूनि कीजे सेना। लक्षवरि ॥ ७.११. मग क्षीराब्धितें सांडितु। गगनीं पूंजा मंडितु। निवडे जैसा न निवडितू। पूर्णचंद्रु ॥ १८.१५३६, क्षीरसागरांतच जन्म घेऊन, त्यास सोडून आकाशांत आपल्या किरणांच्या प्रभावळीनें अलंकृत होऊन, क्षीरसागरापासून स्वरूपानें निराळा न होतां जसा चंद्र आकाशांत निराळा राहिलेला दिसतो. १.५१, २.१२८, ८.१३३, ८.१९७, १२.१८१, १३.१०३२, १४.३४९, १४.३९२, १५.३५२, १६.७५, १६.१५३, १६.२९२, १७.७७, १७.४०५, १८.५१८. **अबंरु चि नभा निवडला,** आकाशालाच अवयव फुटल्यासारखा भासतो, ६.२९५; **मेघाचेनि मुखें निवडला,** मेघापासून वेगळा झालेला, ६.३०७. **निवडी**—**निवडीं नेणु, निवड करुन** सांगतां येत नाहीं, १८.१५५७, ज्ञानदेवी—'**निवडूं न ये**' १८.१७७९. **निवाड**—निर्णय, निकाल, बीजा आंकिक मूला। अंधु निवाडु नेणे कां जैसा। ३.२२१. तरि हीनें [illegible]। निवाडु नेणे पल्वाडु जैसा। १३.२४४, १.४४, ६.२०, ६.६१, ९.८३, ९.५३८, १०.३८, १३.६९५, १३.१०२५, १३.१०७७, १५.३३१, १६.१२७, १८.१४४, १८.१२४७. **निवाडी**—हें मैल हें चोख। ऐसें जें निवाडी। १३.८६, ज्ञानदेवी—'**निवडी**' १३.८६.

**निवणें**—थंड होणें, शांत होणें. आतां तो उदारु कैसा वरिषैल। जेणें अर्जुनाचा निवैल। २.७१. कां निवालेया अमृताचा कल्लोळु। ८.५६. २.१७४, ६.११७, ९.५, १०.१२८, १८.१४५८. **निवालेया विषोदकाचा गलाला** ८.१४५; **निवावेया लागि** ११.३२०; **डोले निवाले** ११.३६१, ११.५९६; **दिठी निवाली** ११.८१. **निववणें**—चकोरांचेनि निमित्तें। तीन्हीं भुवनें संतप्तें। निवविलिं कळावंतें। जिया परी ॥ १८.१६६६, ६.२४२, ९.४८२, १७.११३, १८.१६५४, १८.१७०२; **चंद्रापासौनि निवविते** ९.२४; **जग निवविजे** ९.२३२; **हितानें निवविती,** आत्महित शांतपणें साधतील, ६.४९३; **पृथिवी निवौनि,** येथें निववून या अर्थी, १८.१३६८, ज्ञानदेवी—'**पृथ्वी निवऊनि**' १८.१३७७; **निववितां** ९.४८३.

**निवर्त-र्त्तणें**—परत फिरणें, नाहींसें होणें. **निवर्तावी** १७.२७४; तो निवर्त्तौनि गेला धूमु। ४.१३२.

**निवात-वांत**—स्तब्ध, शांत. **निवात** १.१७९; **धृतराष्ट्रु निवातु राहे** १०.३०३; **ह्मांतारा निवातु...चि असे** ९.५१७; **निवातां** ११.५६३; **निवातकवच,** परिशिष्ट (६) पहा. **निवांत,** शांत, उपद्रवरहित, ना तरि

आकाशाचिये खोंपे । वायु निवांतू चि लोपे। ९.१८२. माळियें जेउतें नेलें। तेउतें निवांत चि गेलें। १२.१२०. तैसी आहारानिद्रेची उजिरी। रोग निवांत जेव्हा वेन्हीं। १३.७६६. २.२२८, ६.१७०, ७.१२९, ११.१५२, ११.१७२, ११.५२२, ११.६५२, १२.१२३, १५.४०२; **निवांत निदिजे** ९.२२; **नमन निवांतां केलें** १०.१३; **स्तुति निवांतां सांडुनि** १४.१५.

**निवारणें—संकट दूर करणें.** किं भोग्य चि ते निवारी। कल्मषातें ॥ ३.१२२. रत्नानें पापताप निवारी। गोडी ही दे ॥ १७.२१८. १३.२२५, १८.१७९. **जन्में चि जन्म निवारी** १३.५५१; **नियमी ना निवारी** ९.१२७. **अनिवार—**जैसे प्रलयांतीं जलधर। अनिवार कां ॥ १.१६६, हें जन्ममरण तैसें। अनिवार जगीं ॥ २.१६०, ११.३१८, १२.३७, १३.६१.

**निवास—राहण्याची जागा.** ९.२८६. **श्रियेचा निवासु** १७.१९४; **सकलकलां निवासु** १८.१७८३; **सर्वदेवनिवासें** १८.१४०८.

**निवृत्ति-त्ती—**(१) विहितकार्यापासून परावृत्त होणें, अशा कार्याचा त्याग करणें, मोक्ष. **निवृत्ति**—तरि पुण्या लागि प्रवृत्ति। पापा लागि निवृत्ति। १६.२७९, आसुरप्रकृतीचे लोक याचा विचार-सुद्धां करीत नाहींत. ७.९६, ८.२३५, १८.७०१. **प्रवृत्ति आणि निवृत्ति** १२.१२२; **प्रवृत्ती...निवृत्ति** १४.१०३; **प्रवृत्तिनिवृत्ति** ७.६८, १६.२८२, **—मापकीं** १८.७१३; **निवृत्तिकर्णताल** १७.७, **—तट** ७.९८; **निवृत्ति-फल—**जेथ प्रवृत्तितरूचां बुडिं। दीसती निवृत्तिफळां-चिया कोडी। ६.१५३, **निवृत्तिसूत्रसोडवणियां,** निवृत्तिसूत्राचा ओळंबा लावून, १८.३८. **निवृत्ती** १८.७१२. (२) **निवृत्ति,** ज्ञानेश्वरांचे बंधु व गुरु, परिशिष्ट (६) पहा.

**निवेदणें—सांगणें.** ११.५६६. **केती निवेदिजैल** ११.५४८. **निवेदन—आत्मनिवेदन** ७.९७, **—नातलिची** ६.१२७.

**निःशंक—शंका किंवा संदेह रहित.** **निःशंक** ३.१८८, १०.१०६, **—पणें** ९.२०४; **निशंक** ४.१६७, ज्ञानदेवी – 'निःशंक' ४.१६९.

**निःशब्द—शब्दरहित.** ६.१७६. **गर्जतें निःशब्दें** ११.१२७.

**निशाचर—राक्षस, पिशाच.** जैसें रात्रिचां अवसरीं। व्योम व्यापिजे निशाचरीं। १६.२७०. १८.१६०६. **अंधकारा निशाचरां सूर्यें गीलितां** १८.१७६८. **निशाचरि, तमोगुणिची राक्षसी...निशाचरि** ९.१७८.

**निशा-साण—डंका, नगारा, रणभेरी.** भेरी निशाण मादल। शंख टीविला भोंगल। १.१३३, **नौबती, नगारे, ढोल, शंख व कर्णे. निसाण, ध्यानाचें निसाण वाजत** ९.२१६; **भेरी निसाण लाउनि** १६.३८७; **निसाणध्वनीं गाजति** १८.२७७.

**निशि—रात्र.** कां अस्तमानीं निशि। जैसी सूर्य-तेजातें ग्रसी। २.३२५.

**निःशेष—पूर्ण.** आतां अज्ञान आघवें हारपे। विज्ञान निःशेष करपे। ७.७. जन्ममृत्यूची भाष। हारपो( पौ )नि जाये निःशेष। १०.१८१. ३.४, ४.६३, ४.२०६, ५.१२९, १५.४७२, १६.३९०. **निशेष** १८.१०९९, कुंटे व ज्ञान-देवी – 'निःशेष' १८.११०५; **निःशेषें,पूर्णपणें,** १४.२९६.

**निश्चंत—चिंतारहित. निश्चित पहा.**

**निश्चय—निर्धार.** जी बुद्धितें सली। निश्चयातें ढाली। स्थैर्येसीं हाता फली। मेळौनि जाये ॥ ६.४१३, **मनास उद्देशून.** पैलु खांबु कां पुरुपु। ऐसा निश्चयो नाहिं येकु। १४.७६. १०.१५७, ११.५६, १२.१५२, १३.६०२, १३.६१५, १३.६२०, १६.३१२, १६.४३२, १७.१७४. **निश्चयाची ओहिरी** ८.६०; **निश्चयाचा खरा** १४.१२७; **निश्चयाचा निर्वाहो** १६.३२४; **निश्चयाचिये मुठी बल** १५.२३७; **निश्चया साचपण** १२.१५२; **त्यागाचा निश्चयो** १८.१४३, **बोधाचा—** १८.१०२६; **मनें निश्चयो करी** १३.६१५. **निश्चयबुद्धि** १३.८३६; **आत्मनिश्चय** १८.६८८, **कर्म—** १८.७६०, **कृत—** ६.३७९, ९.१४९, ९.१५०, ११.६२२, **कृतनिश्चयाचे कोश पियालीं** १३.६०३; **ज्ञाननिश्चय** १३.६२५; **निश्चो** १५.३४६.

**निश्चल—न ढळणारें, स्थिर.** एक आंतरीं निश्चल।

जे निहाळीति केवळ । विसरले सकळ । संसार-जात ॥ २·१७३. तूं मानसासि नियमु करीं । निश्चलु होउनि आंतरीं । मग कर्मेंद्रियें व्यापारीं । वर्त्ततु सुखें ॥ ३·७६. ह्मणौनि मन येक निश्चल राहील । मग आह्मासि साम्य होईल । ६·४१६. हालविलेयां जाये । निश्चल तरि राहे । १४·७३, जशी दुधावरची साय. ६·४२२, ११·३६४, १२·१९५, १८·१०८२, १८·१२४४. **जय जय देव निश्चला १८·४; आपण···निश्चल होउनि असे २·३३७; गगनें निश्चलां असिजे १४·३४४; जैं बुद्धि निश्चल होईल २·२८४; निश्चलां...चलां ३·६०; सव्यापारें...निश्चलें ११·१२५. निश्चलता**—तरंगाची कां निश्चलता । न मोडे चि जैवि ॥ १८·११३५, **निश्चलत्व** २·३४४; **निश्चलपण** ६·१५९; **सुनिश्चल**—जो सुनिश्चलु आंतरीं । मेरु तैसा ॥ ५·१०.

**निश्चित**—ठराविक, खचित, कायम. नित्यता ऐसे चि असोनि । कां निश्चित क्षया जाउनि । २·१०८. योगक्षेमु निश्चिता । करिति तुमचा ॥ ३·९६. ३·४२, ३·४५, ३·८०, ४·१८७, ८·१३७, १८·७६, १८·१४६, १८·६२३. **निश्चित एक** ३·३१, **– करणीय** ३·१९०, **– मत्त** ३·२, **– उल्लख** ४·७१, **– ओलखावें** ४·८९; **चित्तें निश्चित जालें** १६·३३३. **निश्चिति**, निश्चय, १८·१५१.

**निश्चिंत**—चितारहित. ते निश्चिंत जेथ म्हणतले । चेंति चि ना ॥ ५·१४७. **निश्चंत** १३·७६३, **– केलें** ९·४८९; **निश्चंता होआवें** ९·४८६. **निश्चंतै**, निश्चितपणा, **निश्चंतैयेचे(चें) कें कवतिक दीसतसे** ९·५०२.

**निश्चेष्ट**—चैतन्यरहित, येथें निर्जीव. कां उचललें वायुवसें । शुष्कलें पत्र जैसें । निश्चेष्ट आकाशें । परिभ्रमें(मे) ॥ ३·६१, **कर्मेंद्रियें प्रकृतीच्या आधारानें कशीं व्यापार करतात त्यावर हें रूपक आहे.**

**निश्वास**—श्वास पहा.

**निषण्ण**—बसलेला, येथें जवळ आलेला. ७·१७९. **जेयाचें मन आवासिं निषण्ण,** घरच्या माणसांत ज्याचें मन गुंतून राहतें, १३·७८१. **अतिनिषण्ण—माझां ठांइं अति-निषण्ण,** माझ्याच ठिकाणीं रमले आहेत, मला अनुरक्त झाले आहेत, ९·४७९.

**निषिद्ध**—शास्त्रानें नाकारलेलें कर्म, आचरण. निषिद्धाचेनि नावें । भलतें ही भेर(रे) होवें । १४·२४९, निषिद्ध कर्में करावयाचीं मनानें घेतल्यावर वाटतील तशीं व तितकीं वर्ज्य कर्में करावयाची हांव धरतो. निषिद्ध तंव स्वभावें । निषिद्धें गेलें ॥ १८·१२६, (संन्यासांत काम्यकर्में तर नाहींतच) निषिद्ध कर्में शास्त्रानें वर्ज्य ठरविल्यामुळें तीं करण्याची शक्यताच नसते. ३·७७, ४·९०, १४·२०८, १७·१८९, १८·१२४५. **निषिद्धें अधमें कर्में** १३·९६९; **निषिद्धिं वाटे पडे** १७·३९१; **निषिद्धेंसिं सर्वत्र जूझे** १८·१३३; **अकरणां आणि निषिद्धा** १८·८९३; **काम्यें निषिद्धें** १८·१४२८; **निषिद्ध...विहित** १८·५५४.

**निषेध**—परवानगी नसणें, मनाई, बंदी. विधिनें पाळीत । निषेधातें गाळीत । १२·७७. न टके निषेधु आड । न पडे विधिची भीड । १६·१८७. १५·१६५, १७·१६१, १८·२३९, १८·५४९, १८·६०८, १८·७११, १८·७१२. **निषेधाचेया तोंडा** १३·६९२; **काम्यनिषेध** १८·९८६; **विधिनिषेध** १·२४५, १५·१५६.

**निष्कंप**—न हालणारें, चलनवलनरहित. जें अनादि निष्कंप । ४·१३. **अति निष्कंप** २·२३६; **नित्य जें निष्कंप** १४·४०२.

**निष्कपट**—कपट नसलेलें, मोकळया मनाचें, सरळ. निष्कपटां होआवें । उशिना घाइं जूझावें । २·१९०. गीता निष्कपट माए । १८·१७३१.

**निष्कर्म**—कर्मरहित, कर्म न करतां असणें. ह्मणासि निष्कर्मा जरि होवावें । तरि येथ तें न संभवे । ३·७७. **कर्मा अतिसो निष्कर्मा लागि आहे,** कर्मावर भर द्यावयाचा तो पुढें कर्मापासून निवृत्त होण्यासाठीं देतात, १८·१५३. **निष्कर्मता—कर्मिं वर्त्ततां निष्कर्मता देखे** ४·९२. **निष्कर्म्य—**ज्याला कांहीं विधिपूर्वक करावयाचें राहिलें नाहीं असा, कर्मरहित स्थितीस पोहोंचलेला, **स्वभावें कोण्हीं चि क्रिया नाहिं तेया निष्कर्म्य ऐसा प्रवादु** १८·९७२, ज्ञानदेवी, कुंटे–**'नैष्कर्म्य'** १८·९७८. **नैष्कर्म—निष्कर्म्य या अर्थी,**

तेथ सत्क्रिया चि लावावी । ते चि एकि प्रशंसावी । नैष्कर्मी हीं दावावी । आचरौनि ॥ ३.१७२, अशा पुरुषांनींही, ज्ञानदेवी – 'निष्कर्मी ही' ३.१७४, कुंटे – 'निष्कर्मींही' ३.१७४; **नैष्कर्म्य**—(१) त्याच अर्थी, ३.६२, ३.६४, **एतुलेनि नैष्कर्म्या होइजे**, प्राप्त कर्म टाकून नैष्कर्म्य होत नाहीं, ३.४६; (२) कर्मराहित्य, **कर्तव्य तें नैष्कर्म्य** ४.१२०; **करितेन विण कर्म तें वि तें नैष्कर्म्य** ५.६३; **नैष्कर्म्य बोधाची खाणि** ४.१५९; **नैष्कर्म्यापासौनि मुक्त** ५.६१; **नैष्कर्म्यता**—कांहीं न करणें हा भाव, कर्मराहित्य, तैसी कर्मिं जेया योग्यता । तेया प्रति नैष्कर्म्यता । न प्रकटावी खेलतां । आदिकरुनि ॥ ३.१७१, ४.९३; **नैष्कर्म्यतेचेन श्रमें** ४.८६; खरी **नैष्कर्म्यता** ४.९७, **कशी असावी** ४.९४ ते ४.१०४ पहा; **नैष्कर्म्यत्व** ४.९८; **नैष्कर्म्यपद** ३.५०, **–सिद्धि** १८.९७४, **–सुख** ६.४३६, ८.४६.

**निष्कल**—कलारहित, दोषरहित. निष्कलु लोककृपालु । १२.२३९. सकलु ना निष्कलु । १३.११०२. १८.५.

**निष्कलंक**—दोषरहित. २.२८१.

**निष्कर्ष**—सारांश, तात्पर्य, निर्णय. सर्व शून्याचा साहे । निष्कर्ष जें ॥ १३.८८०, सर्वांचा समावेश करून जें राहतें त्याला विकार झालेले दिसतात पण होत नाहींत, यावर १३.८७१ ते १३.८९४ पहा. जो तृतीयु कां निष्कर्षु । १५.४९५, तिसरा शेवटचा. ६.३२५, १३.६१९. **निकर्ष** पहा.

**निष्काम**—कामनारहित, निरिच्छ. जें आंगि निष्कामु आचारु । जीविं विवेकु साचारु । सबाह्य जाण आकारु । शुचित्वाचा ॥ १६.१९५. २.३६७, ६.२२, ८.१०३, १६.८१, १७.२७६. **निष्काम अधिकारियें** ५.१४५; **अशेषिं कर्मिं निष्कामु** १२.१३१; **निष्कामता**—**निष्कामता अनुसरले** ३.१५०, **–पातले** ३.१५४.

**निष्क्रिय**—क्रियारहित. **निष्क्रिय चिन्मात्र चि उरलें**, (अज्ञान व साक्षेप ज्ञान गेल्यावर) क्रियारहित केवळ ज्ञानमात्रच राहतें, १८.९७१.

**निष्टंकणें**—निश्चय करणें. १५.३४८, १८.७२८, १८.१२७८. **जीवा माझि निष्टंकु करीसि** १८.१२७४; **निष्टंकबुद्धी** १८.८४४. **निष्टंक**—**देवें निष्टंकीं निर्णयो केला**, निश्चितपणें असा सिद्धांत मांडला, १७.२१, ज्ञानदेवी व कुंटे – '**निष्टंकीं ठेविला देवें**' १७.२१.

**निष्ठा**—आस्था, विश्वास, श्रद्धा, श्रद्धेला अनुसरून स्वीकारलेले मार्ग. अवधारीं वीरश्रेष्ठा । इये लोकीं इया दोन्हीं निष्ठा । मज चि पासौनि प्रकटा । अनादिसिद्धा ॥ ३.३५. **ऐसी वेदैक निष्ठा जालेयां** १६.४५८, **वेदैकनिष्ठा** असा पाठ घ्यावा, ज्ञानदेवी – 'ऐसिया वेदैकनिष्ठा जालिया जरी' १६.४६१; **तैसें निष्ठा कर्म केलें** १८.१५७; **तो क्रमयोगि इया निष्ठा मी होउनि**, तो क्रमयोगी या मार्गानें मला मिळतो, १८.१२४०; **ईश्वरनिष्ठ**– इ(ई)श्वरनिष्ठांची मांदियली १८.१७७५; **एकनिष्ठ** ३.१८, ५.४, **–ता** २.११३, ७.१६८, ९.४२०; **येकनिष्ठ** ८.१९०, **कर्म**– ६.४७२, ६.४७७; **कर्मनिष्ठा** १८.६१; **तत्वनिष्ठ, जैसा तत्वनिष्ठु भ्रांतिलेशा ना गवे** ३.१२४; **तन्निष्ठ** १५.३, **ब्रह्म**– ४.१५०; **योगनिष्ठा** २.३१६.

**निष्ठुर**—निर्दय, आवड नसणें या अर्थी. प्राणिजातेंसिं निष्ठुरु । १३.८१२. ८.१०४. **निकवडेया निष्ठुरा** १५.२५६.

**निष्पत्ति**—तयार करणें, सिद्धि. निष्पत्ति कीं वोनेयांची । १७.१२०. १७.१५६. **निष्पत्तिचें आंग घेउनि**, चांगल्या रीतीनें पार पाडून, १७.३५९; **येया कर्मत्रया निष्पत्ति जालेयां** १८.७६३. **निष्पन्न**, तयार, सिद्ध झालेला, ज्ञानी, **निष्पन्नाचीं लक्षणें** ६.२०७.

**निष्पाप**—दोषरहित, पापरहित. **निष्पाप वाङ्मय** १७.२१४; **शौच ही निष्पाप** १८.८३५.

**निष्फल**—फलहीन, निरर्थक, व्यर्थ. जियें सदा रीतिं पोकलें । जैसिं चंदनांगें शीतलें । न फलतां हिं निष्फलें । होंति चि ना ॥ १३.२९०. १७.२४९. **अतिनिष्फल**—तें जन्मकर्म सकल । अर्जुना अतिनिष्फल । ३.१४१.

**निसरणें**—ओसरणें, कमी होणें, घसरणें. कांति पाहे निसरों । १३.७५५. **निसरडा**—**तपोदुर्गांचां निसरडां आडकडां** ६.४७८; **बुद्धिचेयां हीं पायां निसरडा** ६.५६.

**निसळणें**—पाजळणें. विवेकुसाहाणें(णे) निसले-

(लें), जें ज्ञानखड्ग विवेकरूपी सहाणेवर पाजळलेलें आहे, १५·२३६, ज्ञानदेवी–'विवेकसाहणे निसिलें' १५·२५९, कुंटे-'विवेकसाहणें निसळें' १५·२५९.

**निसाण**—निशाण पहा.

**निसि**—त्रास. शिष्याची निसिं(सि) ११·६३६.

**निसित**—पाजळलेलें. **नवनिसितिं सरीं**, नुकत्याच पाजळलेल्या बाणांनीं, २·४८.

**निसुग**—निर्लज्ज. पापिं जो निसुगु। १३·६८१. १३·७२७. **निसुगें**, आळशीपणा, निर्लज्जपणा, पैं माझी निसुगें अवधारीं। किं उगा चि वैसें॥ ११·५४४, **ते लाज...एरि निसुगें** १६·२८१.

**निसुटणें**—गळून पडणें. **न धरत निसुटलें** १·१९८.

**निस्तरणें**—तरून जाणें, पार पडणें, पार पाडणें. तरि प्रजा हे कैंसेनि। निस्तरैल॥ ३·१६४. ११·३९९,१३·६७४, १३·१०३५, १४·३११. **खलालांची लगबगा निस्तरे** १४·३५०; **पाणु निस्तरतील** १८·२७८; **रानें निस्तरे** १६·४३८; **हाणी निस्तरावेया** १८·१६३९. **नितरणें** पहा.

**निस्तेजणें**—अपमानित होणें. कैसा रानधा दुर्वादीं। निस्तेजिलासि॥ ११·१०१. **निस्तेज**, अपमान, पाणउतारा, संभाविता निस्तेज। न साहे जैसें॥ १३·५४२, १३·४९३.

**निह-हि-हेटणें**—जोर करणें, जोरानें आंत जाणें, दाबणें. **निहटणें**—निहटिजे वरि आंगें। पेललेनि॥ ६·१९६. ६·२०७, १४·३०९, १८·९५६. **पाइं कांटा निहटे** १६·१५८. **निहिटणें**—**उपशमीं निहिटिला** ४·१३०. **निहेटणें**—निहेटले पर्वत। कवळूनि ज्वालांचे उभडु(ड) जाठित। ११·३०८. **नेहटणें** पहा.

**नि-नेहाळणें**—पाहणें, निरखून पाहणें. **निहाळणें**—जंव मीं नाव येक। हे सकळै वीर सैनिक। निहालीन अशेख। जुझते जे॥ १·१७०. प्रेम धरूनि आवगणिचें। निहालिसी कां॥ ११·६२०. १·४४, २·१७३, ९·१३२, १०·२२७, ११·२९८, ११·५१९, १३·६५, १४·३८२, १५·४७४, १८·१५१२. **चित्तीं निहालिलिया** ११·६९२; **माता निहाली**, काळजीपूर्वक पाहते, १०·११८; **विरक्तिचिया दृष्टी निहालिजे** ५·११८; निहालिता, पाहणारा, १८·३७७. **नेहाळणें**—**नेहाळीं** १८·१०२६, ज्ञानदेवी व कुंटे–'न्याहाळी' १८·१०३२.

**नीक**—निक पहा.

**नीकट**—जवळ. १४·११३.

**नीच**—(१) खालीं, हलकें. उंच नीच भार सांडावे। १०·२८१. कां नीचु म्हणौनि निंदिजे। १४·३५७. कां कांटिये वरिला सरडा। म्योन नीच॥ १६·२२३. ६·१८४, १४·११८, १६·३७८. **नीच वासना**, हलक्या, १५·१६३. (२) नित्य, **नेहमींचें**. नीच वाहातां गंगाजळा। काइ पारिसिंधत आहे॥ १०·१८५, ज्ञानदेवी–'नित्य वाहतया' १०·२०२. १३·८१४. **प्रकाशु नीच दैतो** १८·१३६७; **नव शब्दाबरोबर** नित्य नवें या अर्थी, ११·९७, ११·३०४, १२·६६, १२·६७, १३·७५०, १५·१७०, १५·१९२, १५·२३२, १७·१३०, १८·१३१३; **नव शब्दास जोडून**, आतां आत्मप्रभा नीचनवी। ६·२३, १३·६३; **नीचनवेनि** १४·१०७; **नवे नीच** १५·१६०.

**नीट**—सरळ, चांगलें, स्पष्ट. बोलिजैल नीट मऱ्हाटी। ७·२०१. मूळग्रंथिचेया संरक्षता। सवें नीट मऱ्हाटी पढतां। १०·४२. १८·७३१. **नीट पाठि**, सरळ पाठ, १४·१०३; **नीटे भूमिके** ११·१८०; **बधिराचे नीट कान**, असंभाव्य, १८·५७७; **नीटपण**—**बोधाचें नीटपण** ८·२५७.

**नीणणें**—नेणें. **सायुज्याचां तटीं नीणिले** १२·९२, ज्ञानदेवी–'मिनले' १२·९२.

**नीति-ती**—सदाचाराचा मार्ग किंवा नियम; बरें वाईट, न्यायान्याय यांचा विचार. **नीति**—तरि तर्कु तो चि परशु। नीति भेदुअंकुशु। १·११. आणि तूं चि नीति सांवसि। आज्ञाप्रति॥ २·१०१. नीति सुझे। वैदिक बुझे। १३·८२९. ९·१९१. **नीतिपंथ** ६·४४३, **–शास्त्र** १०·२७३. **नीती**—धर्मासि नीतीसीं। सेस भरीं॥ ४·५२. म्हणौनि जिज्ञासुत्वां पैकीं। ज्ञानीं प्रीति होये नां जंव नीती। १६·५४, येथें नीतीचे (१) सदाचार, (२) ज्ञानाकडे नेणारी, हे दोन्ही अर्थ समर्पक वाटत नाहींत, नीती ऐवजीं नीकी पाठ संभवतो, ज्ञानदेवी–म्हणौनि जिज्ञासू चि पैं कीं। ज्ञानीं

प्रतीति होय ना जंव निकी । १६·५४.

**नीर**—पाणी. नीरातें आटी तेज । १३·१४४. किं रसु आणि नीर । सिनानीं आथि ॥ १३·२९४. कां द्रवपण चि नीर । १४·३७१. २·१६७, १०·७६, १३·१४३, १५·२६६, १५·४७३, १८·३२०, १८·५६२, १८·१५७२. **नीरुताडनि**, **ताडनि** पहा; **क्षीरनीर**, **क्षीर** पहा.

**नीराजन**—ओवाळणी. १६·२०८.

**नीलिमा**—निळेपणा. १३·१०५.

**नु**—**न** पहा. **नकारार्थी. न** अक्षरांतील स्वराचा लोप होऊन उकारानें आरंभ होणाऱ्या कांहीं क्रियापदांचीं संधि होऊन झालेलीं रूपें त्या त्या शब्दापुढें दिलीं आहेत : **उकलणें, उगवणें, उघडणें, उचलणें, उच्चरणें, उजळणें, उठणें, उडणें, उतरणें, उद्वेजणें, उधवणें, उपकरणें, उभगणें, उमचणें, उमटणें, उमसणें, उरणें, उरोधणें, उसंतणें, ऊठणें, ऊरणें** पहा. **नुपहुडणें, नुबुजे, बुजणें** पुढें पहा.

**नुपहुडणें**—**न + उपहुडणें**, झोंपेंतून जागें न होणें. निवटलें नुपहुडे । जलिनलें न विरुढे । १४·३५६, टार झालेला पुनः उठत नाहीं, ज्ञानदेवी – **निवटलें न उपवडे** । १४·३५९, जागा होत नाहीं.

**नूकणें**—करणें, या अर्थास आधार सांपडला नाहीं. १७·२५९. **आपा** पहा.

**ने**—नकारार्थी. पर्जन्यधारीं ने विखोंचे । ९·१२५, ज्ञानदेवी – 'न खोंचे' ९·१२६. **अव्हेरें ने नावें**, अव्हेर करून टाकूं नये, १८·१४१ **ने घे** ७·५; **ने दखे** १२·१८२. **दखणें, देणें, नेणें** पहा.

**नेघणें**—**न** घेणें. **न** पहा. **नेघ**—(म्ह) म्हणौनि विश्वरूपिं श्राध। एथिचें भय नेघ । ११·६१३. **नेघतां** १४·२५०, १८·१७९, १८·१३०६; **लांचु नेघतां** १८·७४०; **नेघति** १५·२८५; **नेघसि**—वेदां हिं येवढें बोलणें । नेघसि कानीं ॥ १७·१४, **नेघा**—**ग्रंथु नेघा** १३·३२६; **नेघां**—**शंका नेघां** १३·११२२; **नेघावे** १·२०७; **ने घे** ७·५; **नेघे**—हें नासारंध्र बुजालें । परिमळु नेघे ॥ ३·५५, हेतु जेथ नेघे । ४·१४९, १२·२०६, १४·१८७, १६·१२४; **नेंघों**—यियें वोझीं नेंघों मती । १२·१२२, हीं ओझीं आपल्या बुद्धीवर आम्ही घालूं नये; **नेघौनि** १८·१६८.

**नेघपणें**—**घेपणें** पहा.

**नेटकें**—नीट, व्यवस्थित. **यथाविधि नेटकें** १८·५९९.

**नेणणें**—न जाणणें, माहीत नसणें, न समजणें, न कळूं देणें. **नेण**—मातें जाणौनि काहीं चि नेण । तूं सुखिया होंसी ॥ ९·३३०. **नेणणेया साठीं मूर्खीं मातें न पविजे** ९·२६३; **नेणत**—**नेणत सांते** ३·१२८; **पूर्वापर नेणत** १८·१२३५; **नेणतां**—इंद्रियां नेणतां भोगिजे । १·५८, **न कळूं देतां**; कांहिं नेणतां चि जाणिजे । १५·२४५, दोरी नेणतां सर्प बिहे । विस्मो कवणु ॥ १८·३८५, ३·६, ५·११४, ९·३२९, १३·७४०, १७·३४७, १७·३४८, १८·१०४ (१), १८·१०१०, १८·१४६८; **नेणति**—परि कमळदळें नेला नेणति । १·५९. २·२५३, ३·८६, ४·२४, ५·९१, ६·२८, ७·१४३, ८·६१; **नेणती** ५·१२०, ७·६३, १७·३४४; **नेणवे**—दीपाचेया झगमगा । जालील हें पतंगा । नेणवे चि पैं गा । जिया परी ॥ १३·७३१; **नेणसि**—परि मूर्खपणें नेणसि । न चिंतावें तें चिंतिसि । २·१०१, १·२२२, २·२४, २·९४, २·१३८, २·१६२, ३·७९, ९·३६, १०·६२, ११·९०(२), ११·६१९, १८·१४६९; **नेणसी**—तो उद्देशु तूं नेणसी चि । म्हणौनि क्षोभलासि वायां चि । ३·३४, २·१५२, ४·४१, १८·१३४२; **नेणां**—तो निर्द्वंदु या भाषा नेणां । १०·२८५; **नेणावेया**—येथ नेणाव(वे)या हें चि कारण। जें इंद्रियां अधीनपण। २·१११; **नेणिजति**—जें द्रवित नां बद्ध । जेथ नेणिजति रसभेद । १०·१७९. ७·१७४, १६·२८२, १८·५२७; **नेणिजे**—हें असो नेणिजे दिठी । हरिची वानुं ॥ ५·१७०, २·२६, २·२२३, ३·१५, ३·७३, ४·१८, ४·३८, ४·१८९, ५·५५, ६·३, ६·९१, ६·१५७, ६·१९७, ६·२८८, ८·२२, ९·४२४, १०·७७, ११·५५९, ११·६३६, १२·१४४, १२·१७६, १२·१८२, १५·५०१, १७·३४३, १८·४३२, १८·६६०, १८·६६१ (२). **क्षोभु द्रोणाचिये मनीं नेणिजे** २·३९; **जेवि नेणिजे,**

**पाखंड-पाखांड**—नास्तिकमत, नास्तिकमतवादी. पाखंड—पाखंडाचेया कडे। नागिवि लुंचिति मुंडें। १३.२२. १३.२०. **पाखांड—पाखांडाचे दरकुटे,** नास्तिकपंथाच्या दऱ्या, १२.१४; १६.३१३; **पाखांडी,** नास्तिक, **पाखांडियाची आस्था** ६.१६७, कुंटे–'पाखांडियाही' ६.१६७, आस्था पहा.

**पाखडणें**—पंख फडफडवणें. १३.१०९८.

**पाखरणें**—आच्छादणें, पसरणें. तेणें हा सैन्यें सिंधु पाखरिला। १.९५, पसरून सिद्ध केला. **पाखर, अभ्यासाची पाखर पडे** ६.२११. **सपांखर,** दयायुक्त, ९.२०४. **पाखिरणें—विं...भुइं पाखिरिलें** ९.३९.

**पाखाण**—पाषाण, दगड. केउता सांदा आकाशा। पाखाणेंसि॥ १३.१०९३. कां पाखाणाचां माथां। हांडी फूटली पार्थां। १६.३६६. पोटीं बांधौनि पाखाण। समुद्रिं बाहिं आंगवण। १६.४३३. ९.४३२, १०.३५, १४.३६५, १६.१२४, १६.२४४, १८.१५६८. **पाखाणामाझि परिसु** १०.७४; **तरु तृणें लोह लोष्ट. पाखाणें** १५.१७२; **ईश्वरु पाखाणप्रतिमां** १८.५६४; **पाखाणमात्र** १८.५६८. **पाषाण** पहा.

**पाखालणें**—धुणें, स्वच्छ करणें. संकल्पपंकु पाखाली। १३.१७२. **पाये पाखालणियां,** पाय धुण्यांत, १३.१०७०, १८.६४८; **साचाचां पाखाळीं कीड,** खरोखर पाहिलें असतां तें घातक असतें, १६.१२०.

**पांग**—(१) कमतरता, उणीव, हीनपणा. **कर्मांचा पांगु फीटो,** उणीव, १८.६८; **क्षेत्रा वापेचा पांगु पडे,** वापराची उणीव भासेल, १७.२६६; **मरणाचा पांगु पडैल,** मरण यावें असें वाटेल, १३.५७१; **वैराग्याचा पांगु फीटे,** उणीव नाहींशी होईल, ४.१६२. (२) आवड, आसक्ति, कोड व यांमुळें येणारी पराधीनता; बरोबरी. **आवडीचेन पांगें** ६.१३१; **इंद्रियांचा पांगु फीटला** ५.६५; **तैं गा तेयाचेनि पांगें** १८.१७१५, हा पाठ आहे तसा घेतला तर आवडीमुळें असा अर्थ घ्यावा, ज्ञानदेवींतील 'तैं गातेयाचेनि पांगें' असा पाठ घेतला तर, गाणाराची उणीव असली तरीही असा अर्थ (१) सदराखालीं घ्यावा; **योग्यतेचा पांगु करूं न सके,** बरोबरी करण्यासाठीं करावी लागणारी यातायात, ६.३३३; **श्रवणाचेनि पांगें विण,** ऐकण्याची आवड टाकून, एकटाच अंतर्मुख होऊन, ६.२४; **स्वर्गसंसारुपांगें,** आसक्तीमुळें, १४.१७०. (३) पांगळा. **उपायबलें पांगु पाहि टाकी,** प्रयत्न करून पांगळाही पर्वत चढूं शकेल, ८.८०.

**पांगुतणें**—आच्छादणें, पसरणें. हो कां जे पवनाची पूतली। पांगुतली होंती सोनेसली। ६.२८४. १३.२४८. **त्वचेचेनि पदरें पांगुतलीसे** ६.२५०; **पां गुंतलें** ११.२४२, **गुंतणें** पहा.

**पांगुरणें-विणें**—पांघरणें, आच्छादणें. नाना क्षीराब्धि पांगुरविला। क्षीरोदकें॥ ११.२१८. पांगुरौनि नैचें उदक। असे नै त्रि माजि खडक। १८.२६९. ११.३७१, १२.१७, १३.२०६, १३.२३१, १८.१४७१. **अहंकारु पांगुरौनि** १८.१२९३, **महिमा**–११.७१; **पांगुरण,** पांघरुण, **गगनाचें पांगुरण** ८.१८८; **पांगुरणें,** पांघरुण, १३.२६, १३.२३२; **पांघुरणें, उष्ण पांघुरावें** १२.६५, **उष्ण** पहा; **पांघुरवितां** १६.१४३.

**पांगुलणें**—लंगडें पडणें, कुंठित होणें. वाचा पांगुलैली जेथिची तेथ। ९.५२२. १०.६३. **पांगुल-ला,** जेथ प्रवृत्ति पांगुल जाली। ४.१६०, बैलाची करी वानी। पांगुलाचेया॥ १४.१५७, १२.७३, १३.१२९; **पांगुला पासौनि मंदु** १३.४५५; **पांगूळ(ल)** ४.३३.

**पांगोरा**—'झाड, मुळ्यांचीं बारीक बारीक मुळें' (हंसकोश), गवत कापल्यानंतर खुंटांना फुटलेला अंकुर. **तृणांतिचा पांगोरा** १५.४४५.

**पांचाखरी**—पंचाक्षरी, मांत्रिक. २.८५.

**पांचिक**—'पाचिक-हीनकस' (हंसकोश), हलक्या प्रतीचें. कसु होये पांचिका। १३.१००३. **पांचिकें आणि सोळें,** हिणकस (धातु, सोनें) आणि उत्तम सोनें, १८.१२४८; **पांचिकां कसीं पडे,** उत्तम सोनें हलक्या सोन्यांत मिसळलें तर तें कमी कसाचें होतें, १४.१४०.

**पाजणें**—प्यावयास लावणें, देणें. दूध पाजिला देख। व्यालु जैसा॥ १८.६७६.

**पांजला**—हा प्रांजला चा अपपाठ आहे, ५·१६. प्रांजल पहा.

**पांजरणें**—विस्तारणें, पसरणें. १५·१८७. **कां पांजरली वाहुली** १४·२२६.

**पांजरा**—पिंजरा, सांपळा. तैसा गुरुद्रोह पांजरा। आपण चि होईन ॥ १३·४११. ७·१५०, ८·१३०, १३·५९७. **त्वचा धूनि पांजरेंसीं जडी,** त्वचा धुऊन हाडांच्या सांपळ्याला चिकटवते, ६·२३३.

**पांजलणें**—भडकणें. १·२५७.

**पाझड**—झुडपें. **कामक्रोधाची(धांचीं) पाझडीं चूकौनि** ७·१२४, ज्ञानदेवी, कुंटे–'**सांकडीं**' ७·१२७.

**पाझर-पांझरणें**—द्रव येणें. **पाझर,** द्रव, **सोमकांता पाझरु फुटे** १८·१३०४. **पांझरणें**—पुढां स्नेह पांझरे। मागां चालति अक्षरें। १३·२६२.

**पाट-पाटा**—(१) मानाचें स्थान, सिंहासन. तेया दलवैंगाचा पाटु। भीष्मासि पैं ॥ १·११५. जें सकळार्थांचा मेळावा। पाटु बांधों ॥ १५·९, ज्याच्यामुळें धर्मार्थकाममोक्षाच्या सिंहासनाचा लाभ होतो. **पाटाचें आंक** १८·६००, **आंकणें** पहा; **पाटाचा धर्मु,** सर्वोत्कृष्ट धर्म, १८·९०४; **पाटाचें निजधाम** १५·२८४; **परब्रह्माचिये पाटीं** ८·२६५; **मोक्षश्रियेचां पाटिं** ९·४६; **विजेश्रियेचां पाटीं** ७·१२, **सायुज्याचां** – १८·१२५१. (२) अधिकार, भार, मक्ता. **पाटा घेतला** १२·८४; **पाटु बांधति** १८·१२९; **आनंदसाम्राज्यीं पाटु बांधिजे** १६·५०, **प्रकृतिधर्माचा पाटु बांधे,** शरीरधर्मादिकांचे अधिकार स्वीकारतो, १५·३१९. (३) पडदा, वाहणारें पाणी. तेव्हळि दृष्टीसि पाटा फुटे। १·२३. तैं ज्ञानदृष्टी पाटा फूटला। ११·१७८. १३·६९६. **पाट पेलौनि** १५·३७२; **सालिचा पाटु** १८·३६६. (४) लिहिण्याची पाटी. १८·१०९३.

**पाटण**—शहर, नगर. जैसें सगळिए पाटणी (णीं)। एकें चि दीपें दिवेलावणी। १५·३८१. **पाटण पावे,** गांवास पोहोंचतो, लाभ होतो, १६·४३९; **अद्वयबोधपाटण** १६·१२, **संसार**– १५·४३८.

**पाटव**—पटुत्व, कौशल्य. **सविवेकमतिपाटव,** विचारयुक्त बुद्धीचें पटुत्व, ९·२४१.

**पाटाउ**—कापड, वस्त्र. पाटाउवें ४·२१.

**पाठ**—पठण, वाचन; ग्रंथांतील शब्द, पद. गीतेचा पाठु जाणे। १८·१४५१. एथ अर्थें तें चि पाठें। १८·१६६२. १८·१५९३, १८·१६७१. **श्रवणें अर्थें पाठें** १८·१६७३; **पाठें जो पढे** १८·१५१५; **पाठमीळें** १८·१६६९; **पाठक—गीतापाठक** १८·१५१८; **पाठेय**—पाठेयां भावसां फावति गुण। चिंतामणिचे ॥ ६·२१.

**पाठार**—पाठवळ. **पवनाचेनि पाठारें** ६·५८.

**पाठि-ठी**—पाठ, पृष्ठभाग, आधार, मदत, मागें. देवासि पाठि आथि कां नाहिं। ११·५२४. नारिलेयाचेनि रागें। पाठिचा सूड मागे। १३·५४१(१), गतकाळाचा. **तेयांचेया ज्ञाना पाठि नाहिं,** त्यांच्या ज्ञानाला विरुद्ध बाजू (अज्ञान) नसते, पूर्ण ज्ञानी असतात, ९·२५९. **पाठि भलेतेया दे,** वरवर मित्रभाव दाखवतो पण आंतून द्वेष करतो, १३·६६७; **दिवसा पाठि देउनि,** दिवस मागें सारून, दिवस मावळल्यावर, १८·१३८५; **पाठि देउनियां,** अज्ञानाकडे पाठ फिरवून, त्याग करून, १३·८५८; **रिपू पाठि नेंदिजे,** शत्रूला पाठ देऊं नये, १८·८६३; **जगासि पाठि पुरवी,** हें मन (१३·१०३) जगाची पाठ पुरवितें, पाठीशीं लागलें आहे, १३·११२; **पाठी लागे**—तैं वैराग्य दवडितां। पाठी(ठीं) लागे ॥ १५·३९, घालवून दिलें तरी वैराग्य साधकाच्या पाठीस लागेल. **पाठि सेइली—वाखाणा चौगुणा पाठि सेइली,** या निरूपणाला चौपट बळ आलें, १३·६४४, ज्ञानदेवी – '**वाखाणा–पासीं से आली चौगुणा**', चौपट स्फूर्ति आली, १३·६४६; **पाठिचां वाटीं,** वारंवार, १८·१५६; **पाठोवाटी,** मागें मागें, एकसारखी पाठीशीं राहून, १०·११८, ज्ञानदेवी – '**पाठींपाठीं**' १०·१३४; **पाठीवरी,** पृष्ठभागावर, ६·३८९; **पाठि पोट,** पाठ व पोट, ११·२७४, **पोट...पाठि,** प्रवृत्ति व निवृत्ति यांस उद्देशून, १४·१०३, **पोटपाठि,** मागची व पुढची बाजू १०·२९१, **पाठिं पोटिं** १२·१२६, **पाठीपोटीं,** वस्त्राच्या आंतल्या व वरच्या आंगास, १४·३४६; **पाठिमोरा,** पराङ्मुख होऊन, १०·७१, तोंड फिरवून, ११·२२४, **पाठिमोर(रे)यासि,** माझ्याकडे पाठ करून

११·५७१, डाऊ पहा; **निद्रा पाडौनि**, निद्रावश झाल्यावर, १३·१००७: **पडिसाइ पाडितासि** ११·६१७; **बुद्धीची भींति पाडूनि,** (आत्मचर्चा हा विशिष्ट महत्त्वाचा विषय आहे) ह्या विचाराची मर्यादा सोडून, १३·८२५; **वज्र पाडिजे,** बंद करावें, ७·१४८; **वावंदणें पाडुनु** १७·१४२, **वावंदणें** पहा; **बोलन्त्रि पाडूं** १३·३३८.

**पाडस**—हरणाचें पोर. ७·९२.

**पाडा**—वासरूं. ८·८. **कामधेनूचें पाडें** ११·१०९, ११·५७०.

**पाडि-डी**—टेंकाड, डोंगर. पाडि—**पाडि टाकी,** डोंगरावर चढतो, ८·८०; **पाडी—गगनाचिये पाडी** ६·३०२, **सद्वासनेचिये** – ७·१२४.

**पाडिवा**—पाडवा. कां पाडिवां वाढि न मगे। १६·७४, **तुटणें** पहा. **पाडिवेयाची चंद्ररेखा** १५·४३७.

**पाढाउ-वो**—वाट दाखविणारा, वाटाड्या. १६·४२३. **पंचप्राणमना पाढाउ,** पंचप्राण व मन वाटाडे म्हणून घेतात, ९·२११; **सर्वगीतादर्शनाचा पाढावो,** सर्वगीतेच्या वाट दाखविणारा, १८·३०, कुंटे – 'पाढाऊ', बोधकसंग्रह, १८·३०.

**पाणधी**—दोन कुंपणांमधली पायवाट. **शून्याचिया पाणधी धांवों आवडे,** विषयांच्या बांधांमधल्या शून्याच्या पायवाटेनें धांवणें रुचतें, १६·१८६.

**पाणवाड**—मासे धरण्यासाठीं केलेला नदीचा पानोथा. तरि मांसा लागि भूलला। ब्राह्मणु पाणवाडां रिगाला। १६·४४८, ज्ञानदेवी – 'पाणबुडां' १६·४५१. पाणवाडा – मोरी, **भवपुरिचां पाणवाडां** १६·४०५, ज्ञानदेवी – 'पानवडां' १६·४०७.

**पाणि-णी**—(१) उदक. **पाणि**—सागरीं हीं पाणि वेगें। संचरे तें रूप गंगे। येर निश्चल जें उगें। तें समुद्र जैसा॥ १८·१०८२, ज्ञानदेवी 'पाणी' १८·१०८८. **लोहें पाणि गीळिलें** ११·४२१, ज्ञानदेवी – 'पाणीपां चि गिळिलें' ११·४२६; **पाणिढाल,** पाणउतार, ७·९५; **गिरीशें गंगेचा पाणिढालु केला,** शंकरानें पाण्याचा ओघ खालीं सोडून दिला, १८·१६६८; **पाणियड,** पाण्याचा सांठा, तळें, **मूर्खे पाणियड फोडी,** तळ्याचा बांध फोडून टाकतो, १३·२९६, ज्ञानदेवी – 'पाणियाडें' १६·२९८, कुंटे – 'पाणियाढें', तळें, १६·२९८; **पाणियेड,** त्याच अर्थी, ९·२१३, ज्ञानदेवी – 'पाणियाडें', ९·२१४, कुंटे – 'पाणियेडें' ९·२१४; **पाणिलग,** पाण्याजवळ असणारा, पाणथळी, **पाणिलगें हंसें** ६·१७७; **पाणिवळें,** पाण्यावरील केरकचरा, ६·४३९. **पाणी**—मैं पाणिआंचियें मूर्तिकें। पाणी चि तळपे कवतिकें। ते कहणी पाणि कैचिकें। पाणीचि पाणी चि नें॥ १३·३८८. जैसे पाणियांचीं वेगळें। आपणपां दीसति कल्लोळें। पाणिचि तरि निवळें। पाणी चि ते॥ १५·३०० (२), ज्ञानदेवी – 'पाणिया ही...पाणी' १५·३२२. निम्न भरलेयां उगें। तें पाणी ढळों चि नेणे। १६·१५७. आतां गंगे(चे)चें एक पाणीं। परि नेलें आनानीं वर्णी। एक नेली एक आणी। शुद्धत्व जैसें॥ १७·१९५, ज्ञानदेवी – 'वर्णी' ऐवजीं 'वाहणी' १७·१९६. कां पाणी पांनां पाणी होइजे। लवणें जेवि॥ १८·३९५, ज्ञानदेवी – 'पाणीं पावतां पाणी होइजे' १८·३९८. आपणपेयां पाणी रिगे। गंगे स्नाना केवि॥ १८·११६१. ९·७४, ९·३६२, ९·४३५, १३·२३४, १३·७५४, १३·८९२, १३·९२७ (१,२), १३·१०५८, १६·२५, १६·३१ (१,२), १६·११६, १६·४४७, १७·१३९, १७·२१७, १८·४७८, १८·५८१, १८·८५९, १८·९०५, १८·१२७१, १८·१३३४. **चित्रिचें पाणी हुताशु** १८·४४३; **चूळु चूळु पाणी** १८·१६९३; **कर्मा पाणी सुभे,** पाणी सोडतो, त्याग करतो, १८·१९३; **फलाचिये आसे पाणी दे,** पाणी सोडतो, फलाशा टाकतो १८·१९९, **पाणीं**—कांहीं ठिकाणीं द्वितीया किंवा इतर विभक्ति नसतांही **पाणीं** असा पाठ आला आहे, त्या ठिकाणीं ज्ञानदेवींत 'पाणी' असा पाठ आहे, जसें – ९·२१, १५·३००(२), १५·३०६, १५·४३२, १६·१०९, १६·१२४, १६·१६०, १७·१९५, १८·३९५, १८·५३१, १८·९८१; **पाणीं लाविलेयां पाखाणु आणी नेघे** १६·१२४; **पाणीं बोथिजवावें न लगे,** पाणी पातळ करावें लागत नाहीं, ९·२१; **पाणियां**—**पाणियां ऐसा ढालु** १३·३५८; – **ऐसें,** पाण्या-

प्रमाणें, १२·१२०, –कडे १८·४४०, –जवली १८·२७०, –जैसा कल्लोळु १८·१३९१, –हिं वेगले १५·३००(१); पाणियांचें पात्र १७·१४८; पाणियांचे न वहिलेपणें ७·७९; पाणियांचा संचलु १३·२४५; पाणियांहूनि १८·९२५; कल्पांतिचेया पाणियां १५·३०५, जलदच्युता – १८·८८२; पाणियां गजघंटा येंति १८·१६९०; पाणियें ७·१४७, ९·२९९, १८·५२९, १८·७०२, १८·८४१, –जो पलिये, पाण्यानेंच जो भडकतो, ४·१७५, –ही रान भीजे, हा पाठ पाणियें हीरा न भीजे असा घ्यावा, १३·४८१; जाळ पाणियें न भरे १६·३२१; मेघु पाणियेंसिं धांवे १८·१४५८; अन्नपाणीं १६·३६०, ज्ञानदेवी – 'अन्नपानीं' १६·३६२; खडुपाणी पहा; नदीनदपाणी १८·३२९; पयपाणी, दूध व पाणी, ९·४४; पाणीपणें १८·५१. (२) हात. मज अचरणा चरणु। अपाणी पाणि॥ ९·१५७. पाणिग्रहण, स्वीकार, ४·१२१; कोदंडपाणी १८·३७२, १८·१२८४; पिनाकपाणिचां भातां, शंकराच्या भात्यांत, ११·२०४; शारंगपाणी ३·२२५; शार्ङ्गपाणी ८·५; शूलपाणी ९·३६८; सारंगपाणी ११·५९३, १८·१६३१.

**पात**—(१) पडणें, गळणें. अश्रुपात १·२७१. (२) पारणी. ६·२०३. पातेचिये कवलिये ६·२६७.

**पांत-तां**—पाहणें, पावणें पहा.

**पातक**—पाप. तेथ पातकें मांधति थाॐ। १८·८००, मांधति हा अपपाठ बांधति ऐवजीं आला असावा, ज्ञानदेवी, कुंटे – 'बांधती' १८·८०३. २·२२२, ३·१२९, १८·७२३. पातकांची अटवी ७·१६८; पातकांसि ठावो १६·३६८; पातकांची दाटुगी सभा १६·४२४; पातकांचा रासि ३·१४०; कुलहरणी(णीं) पातकें १·२२९, नानाविधें – ३·११४; महापातक १·२५६.

**पातणें**—येणें, प्राप्त होणें, मिळणें, होणें, प्रसंग घडणें. एयां कौरवां भलतें (भलेतें) जालें। अथवा तुज चि काहीं पातलें। २·१८१. तो धावेया हरिंगारुडी। पातला कां॥ २·७२.१·४५, २·१६४, २·१९५, २·३६७, ३·१५०, ३·१५४, ५·२१, ५·१०२, ५·१४२, ८·५२, ९·३२, ९·४८१, ११·१३, ११·३६१, ११·६०७, १८·१४६९, १८·१७५२. पातलां ठांइं १८·१०९६; अवधान पातला १४·६१; आंगा पातलें १३·३५१; आंगातें लेणिं पातलिं १७·१७९; काइ ह्मणों पातला ११·१४; गोमटी कीर्ति पातला १८·१४५५; चोखडी कीर्त्ति जगीं पातली १८·१३१५; पार पातले ५·१५८; पाहुणे पातलों ६·२; ब्रह्मत्व पातले ५·१५७, मातें – ८·१५१, – पातलें ९·४३८; तद्रूपता पातले २·१७४; थडी पातला ६·४६३; निष्कामता पातले ३·१५४; विस्मो पातला २·८३, सभा – १६·४२८; पातलिया— पातलिया विविधा अवस्था जीणौनि १८·८६०; पातलेयां १·१८८, १३·३४६, १३·४९१, १६·१९३, १७·१७३(पा), १८·१७२४; पातलेंयां— पातलेंयां मरणाचा माजिवडा ८·२०६, ज्ञानदेवी – 'पातलयां' ८·२०८.

**पातवडा**—पापुद्रा. ६·२५२.

**पाताल**—पृथ्वीच्या खालचा लोक, सप्तपाताळ, सप्ततल, सं.वा.श. पहा; पृथ्वीच्या आंतला भाग. देखत असें पातालें। पन्नगेंसि॥ ११·२५९. तैं एकविसां स्वर्गां ही मीठी। पातालासि दे जै(जे)वि॥ ११·४०६. आगा वृक्षासि पातालीं। जल सांपडे मुळिं। १३·१७९. १६·३२९, १८·६०६. पातालिचा परिमाणु १८·१३२१; पृथ्वी पाताला जाॐ १४·१८२; सर्पु पातालीं रिगालेयां, बिळांत शिरल्यानंतर, १४·३१०; पातालकुहर, पाताळांतील गुहा, ११·३५५; पातालधनें, पुरलेलें धन दिव्यांजनानें दिसतें, ६·४५६; जेविं पातालिंचें धन। दावी किर अंजन। १५·३४, पातालव्याल ११·३५७; पातालस्वर्ग १६·३३४, स्वर्गपाताल ११·२६७; द्यौर्लोकपाताल, द्यौर्लोक पाताल असा पाठ घ्यावा, ११·३१०, ज्ञानदेवी – 'भुवर्लोक पाताळ' ११·३१५, कुंटे – 'द्यौर्लोक आणि पाताळ' ११·३१५; पृथ्विपाताल-स्वर्गीं, मेरु या तीन्ही लोकीं मध्यस्थासारखा राहतो, १५·४७०.

**पांति-ती**—पंगत, रांग, ओळ, बरोबरी. पांति—

पांति उठी, सत्यलोकाच्या एका दिवसांत चौदा इंद्रांची पंगत होऊन जाते, चौदा इंद्रांचें आयुष्य पुरें होतें, ८·१५३; उजिरी पांति लाभली, उदयकाळ येतो, बोधाचा प्रकाश लाभतो, १५·५५७; पांतिकर, पंगतींत बसणारा, ११·२, १३·४२१ (१). पांती—आहो अर्जुनाचिया पांती। जे परिसणेयां योग्य होंति। १·६२, मग देऊं आरोगिति। तेथवां पांतिकर पांती। मीं चि होईन पुढती। देईन वीडा॥ १३·४२१ (२), पंगत व पंगतींत बसणारा मीच होईन. अवधानाची पांती, एकसारखें लक्ष देणें, १३·३७०; एकी–, एका पंगतीचे, १४·११; तीवां वन्हि पांती, वडवाग्नि, विद्युदग्नि व भौमाग्नि हे एका पंगतीचे असले तरी, १६·२५२; हीरेयांची पांती ६·२६३; पांती एऊं न ये, एकाच पंगतीचे, सारखेच आहेत असें समजूं नये, १८·५१५, ज्ञानदेवी – 'पातेजों नये' १८·५१८; पांती जुंपिजे, पंगतीला जाऊन बसतो, कुळांत जन्माला येतो, १४·२३९; येका पांती मानु करुनु, निंदा आणि स्तुति सारख्याच समजून, १२·२०७.

**पातिजणें**—विश्वास ठेवणें. १७·५१.

**पात्र**—(१) भांडें. आतां शांतरसाचें भरितें। सांडित आहे पात्रांतें। ५·३४. ज्ञानदेवी – 'पात्रातें' ५·६४. तेथ किं माझे श्रोत्र। पाठाचें जालें पात्र। १८·१५२३. १८·९५३. पाणियांचें पात्र १७·१४८; प्रतीतीचेनि पात्रें ९·२४२; मौढ्यमद्याचें पात्र १४·१७५; युगांतचक्रिं पात्रें ११·३३८, ज्ञानदेवी, कुंटे – 'युगांत शक्तीचीं पात्रें', ११·३४३. (२) योग्य, योग्य स्थान, योग्य माणूस. तो कृष्णकृपे पात्र। ६·१२६. ११·९८ (१), १८·१४६२. अविद्याविनाशिचीं पात्रें १८·१२२७; क्लेशा पात्र होती १२·७४; चिलसी पात्र होइन १३·५७२; तपाभिधाना पात्र होए १७·२३५; दैवा पात्र हों १५·९; दैवां पात्र जाली ९·३७३; नामा पात्र जालें १३·९११; पापा पात्र जाला १७·१६४; पात्र हों चि लागे १८·१३००; पात्रां होआवें १७·२४३; नामा पात्र जालें १३·९१९; लिंगा पात्र जाली, या चिन्हाला, येथें नांवाला, पात्र झाली, १८·३३५; पात्रमेळु, सत्पात्र माणसांचा लाभ, १७·२८३; देशकाल-शुद्धपात्रिं दान १७·२६०; पात्रविशेषें दानें, विशेष दानयोग्य माणसांस दानें, ९·३९५; पात्रसंपति, दानास योग्य माणसें हीच संपत्ति, १७·२७२; पात्रता ११·११०. अपात्र—अयोग्य माणूस. नं अपात्रीं हीं उदार। ११·१०३. पात्रापात्र ११·९८ (२). (३) भूमिका वेषांग. पात्रें भांट नागारी। सामान्या क्रिया जुवारी। १८·२९५.

**पाथर**—दगड. पाथर नेणा न द्रवे। १३·७२४. १३·५४८.

**पाद**—पाय. निवृत्तिपादप्रसाद ११·६९७; पादप, झाड, १५·१४३; क्षितीचे पादप पोसीति १६·११७.

**पान**—(१) झाडाचें पान. निर्ये पाना वरि पानें। पांजरति॥ १५·१८७. ६·३११, १५·९२(पा), १५·१७७. पल्लव पानें १०·९७; फुलें...पान ९·३८१; पान पालव डालें १५·१६४; वासनावेलि पानिं पसर वेंति १५·१६६; पानोवानीं—वेदतरुचां पानोवानीं, प्रत्येक पानावर, वेदांचें संपूर्णपणें अध्ययन या अर्थी, १३·१६६. (२) पिणें. कां बधिराचे नीट कान। अपेया नांव पान। १८·५७७. पान करावेया १५·५५६; अपेयाचां पानीं १७·१६२; अपेयाचेनि पानें १८·८०३; अमृतपान १०·१७५, स्तन – ११·७९, ११·२००; चलचित्तपानतुंडिल १८·४, चित्त पहा; पिणें–पीणें पहा.

**पानासणें**—सज्ज करणें, रचणें. पौलि पानासिली, कोट तयार केला, ९·२१२; दुर्गं पानासिलीं ११·१९७; हुडा पानासिला १२·४८, हुडे पानासिले ११·३५८.

**पान्हा**—वात्सल्यानें स्तनांत भरणारें दूध. कूर्मिचेया पीलिया। दृष्टि पान्हा ये धनंजया। १८·१३३४. पान्हा फूटे ९·१८, –धरे काइ, आवरतां येईल काय? ११·४०; खडाणे पान्हा आला, तरीही पळवते, १३·२०४; सात्विकाचा पान्हा आणि १३·११५३.

**पाप**—अपराध, दोष, कुकर्मांचे परिणाम, नीति-

बाह्य वर्तनाचा भोग. क्षात्रवृत्ती जूझतां । पाप नाहीं ॥ २·२२५. स्वर्गा पुण्यात्मकें येइजे । पापें चि पापात्मकें नरका जाइजे । ९·३१३ (१). संतांचेनि आंगलगें । पापातें जिणणें गंगे । १२·१७७. १·२४८, २·२०१, २·२३३, ३·८१, ३·२३१, ४·२०१, ९·१९६, ९·३०६, ९·३०९, १०·७८, ११·५२, १३·६९४, १३·७७७, १६·११७, १६·२५५, १६·२९८, १६·२९९, १७·१६४, १७·१९६, १८·१४०५, १८·१५२०, १८·१५२३. **पापाचा अचलु फीटे** ४·५५; **असंभड पाप पीके** १३·३२; **जैसा कृतघ्नु पाप न जाऊं**, जसें कृतघ्नाला सोडून पाप जात नाहीं, १८·७५२, ज्ञानदेवी–'जैसें कृतघ्नांनि पाप जावों न सके' १८·७५५; **पापाचार** १८·१२७२; **पापात्मक** ९·३१३ (२); **पापताप** १७·२१८, **–पुंज** १८·६८५, **–पुण्य** २·२७७, ५·८०, १३·१५६, १६·२४९, १८·४४७, १८·१४०३; **पापिं...पुण्यिं** १३·६८१; **पापपुण्यादिकें** १८·५६९; **पापयोनि**, पापजाति, ९·४४०, **–नीं** ९·४३९, **–रूप** ९·३१६; **पापावांचौनि** १·२४७; **महापापें** १·२०८, १·२५०; **पुण्य-पापभाग** १६·३०७; **पापिया**, पापी, ते पापिये पातकें । सेविति जाणें ॥ ३·१२९, ३·२६४, १६·४०३, १६·४२४, १७·१०५, १७·१६०, १८·१८८; **पापियें सांचिलीं**, पाप्यानें केलेल्या (करून जमलेल्या) पापाचीं फळें, १८·९४३, ज्ञानदेवी–'सांचलां पापीं' १८·९४८.

**पांपर**—लाथ. **उरीं पांपरा हालासि**, उरावर लाथेनें मारला गेलास, भृगूनें विष्णूच्या छातीवर लाथ मारली त्यास उद्देशून, ११·१०५.

**पाबल**—हीन, कमीप्रतीचें. जो आपुलेनि नागरपणें । इंद्रभवना पाव(ब)लें ह्मणे । २·३६२. **पाबली गोठी** ११·६६.

**पायल**—पायाकडून जन्मलेला, जमिनींतील पाणी, गुप्तधन, चोरी पायाळूला कळतात असा समज आहे; जलद पळणारा. तेथ सदैवां आणि पायला । वरि दिव्यांजन हीं होये डोलां । मग देखे जैसीं अवलीला । पातालधनें ॥ ६·४५६. **पायलाचे लोचन**, डोळ्यांत अंजन घातलें कीं पायाळूला गुप्तधन दिसतें या समजास उद्देशून, १५·३४; **तत्वार्थीचा पायल देखणा**, अज्ञानरूपी जमिनीखालचें ब्रह्मरूपी धन दिसतें या अर्थी, १२·१७९; **धांवतेया पायला**, जलद जाणाराला, १३·७४६, ज्ञानदेवी–'धांवतया पायचपळा' १३·७४८.

**पायेरी**—पायरी, जिना. १३·९४२.

**पार**—अंत, शेवट, पलीकडची बाजू. जाण तेयाचां ठांइं । अज्ञानासि पारु नाहिं । १३·७११. ११·१४०, ११·३०१, १२·१७६, १३·४५०, १८·१३६६. **कल्पांताचिया पारा वेगलेया** १८·६८३; **विवेक-सिंधुचें पार** ६·११; **पार पातले** ५·१५८, **–नेदखों**, १०·२७५; **पारत्रिक, पर** पहा; **पार-लौकिक** १७·२९०; **पारावार**, अंत, पलीकडे, ४·१८९, पारित्रिक, १५·५०४; **पारंगत**, निष्णात, पलीकडे गेलेला, ब्रह्मबोध झालेला, १·५३, २·२७७, **शस्त्रविद्यापारंगत** १·१०९.

**पारका**—निवळीचें बीं. तोडिजे खडुपाणी । पार-केयां ॥ १६·८८.

**पार-रिखणें**—परीक्षा करणें, बऱ्यावाईटाची निवड करणें. **पारखणें**—जिये अधमोत्तम सूझे । सानें थोर बूझे । जिया दीठी पारखिजे । विखो जीवें ॥ १३·८७, ज्ञानदेवी–'सुझे' १३·८७. **पारखि**, पारख, परीक्षण, १४·४४; **पारखिया—पारखि-याचेनि हातें** १८·८८५; **पारखी**, पारख, पारख करणारा, निवड करणारा, शास्त्रें चि करावी पारखी । १६·४६३, **पारखीं होंति**, निवड करणारीं होतील, १४·२०६; **मार्गामार्गविशेषीं जैसा वारा पारखी नव्हे** १६·२४७. **पारिखणें**—पारिखावें खरें कुडें । पारिखिलें तरि न पडे । अखरें कहीं ॥ ८·२४०. **पारिखौनियां** ९·४३; **रत्न-पारिखियाचां गांविं** १३·३१९.

**पारखा**—परका. घरिचिया...पारखेया १२·१४७.

**पारज**—पारा. कां कैलासु पारजें ढवरिला । ११·२१८.

**पारणें**—उपोषणानंतरचें जेवण. **आमोदाचें पारणें** १०·१११, **श्रवणासि** – ४·२१९; **मेघौनि थेंबटा पडे तैं तेया पारणें** १०·१६७.

**पारधी**—पशुपक्ष्यादिकांना धरणारा, शिकार म्हणून मारणारा. ३·२११, १६·३४३.

**पारंव**—झाडाच्या फांदीपासून लोंबणारीं मुळें. [illegible] पारंबियां माझारि । डाहालिया ॥ १५·५८.

**पारण्णी-पार्ष्णि**—टांच. **पारण्णी कांवरूंमूला पीडूनियां,** टांचेनें, १८·१०३०; **पार्ष्णिचा माथां,** टांचेवर, ६·१९८.

**पारावार**—पार पहा.

**पारिठी**—मोठी, प्रौढ. **तार्ना आणि पारिठी** १८·१६५८.

**पारिसेपण**—शिंदेरण. १०·१८५.

**पारु**—रक्ष, वेचव. वस्तुत्व गोडवें । अमृतातें पारु म्हणे । १३·३.

**पारुखणें**—(१) पारखा होणें, दूर होणें, नाहींसें होणें. जेथ नित्यादि क्रिया टके । नैमित्तिक कर्म पारुखे । १·२५३. १·२४५, २·२८२, ११·३७५. **अलाभें...न पारुखे** १२·२०९; **पुढैल पैसु पारुखे** ६·६०; **मनाची धांव पारुखैल** ३·२६४. (२) बंद पडणें, स्थिर राहणें. हा पश्चकर जिये नाथां पारुखे । १०·९. **संतप्रसंगें करावें जरि पारुखे,** संतप्रसंगीं जर नित्यकर्म बंद पडलें, १८·५८८; **संवादु तो चि पारुखे,** बंद पडतो, १८·८१; **पारुखणें—जिया परीं निमिष भरी पारुखणें न लगे,** (चंदनाराशीं सुवासाकरितां) जसें क्षणभरही थांबावें लागत नाहीं, १८·१७२२. ज्ञानदेवी 'पाउखणें' १८·१७४४. **पारुखवणें**—कां एउनु फलाचा घडु । पारुखवी केलिचा वाढु । १८·९६३, जसा केळ्यांचा घड केळीची वाढ बंद करवितो, ज्ञानदेवी—'पारुपवी' १८·९६८.

**पारुष्य**—कठोरपण. १६·२४३.

**पार्वण**—पर्व पहा.

**पार्थिव**—पृथिवी-पृथ्वि-वी पहा.

**पालटणें**—बदलणें. ऐसा ज्ञानाचिया युगुती । पालटु पडे गा सुमती । डोळेयांची शोभा राती । पालटे जैसी ॥ १८·४९२(२), (ज्ञानयोगांत ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय ह्या त्रिपुटीच्या जागीं कर्ता, करण आणि कर्म हीं येतात) हा पालट झाल्यावर ज्ञाताच काय तो राहतो, ज्ञान व ज्ञेय यांचा ज्ञात्यांत लोप झाल्यामुळें त्यांतही बदल होतो, जसें डोळ्यांचें तेज रात्रीं कमी होतें. १३·१३५, १८·४९३ (१, २). **पालट** १३·९१८; **पालटा [illegible] मैत्रसे** १८·३४०; **पालटु पडे** १८·४९२(१); **चित्ता पालटु नाहीं** २·२९८.

**पाळणें**—पाळणें, रक्षण करणें, आचरणें. विधितें पालीत । निषेधातें गाळीत । १२·७७. आणि स्वधर्मु चि पाळावा । परधर्मु तो गाळावा । १८·१३०. ९·४२८, ११·३०६, १३·७९९, १६·३७०. **आज्ञा पालिजे** १०·२८४; **व्रूण पालिली** १८·९१०; **भाग पालिजे** १६·४४५; **विधिनिषेधु पालि** १२·२१६; **लला पालावा** ११·५८३, **लळे पालित** ११·१७१, —**पालीसि** १२·४; **सृजी पाली संहारी** ५·८९. **पालक** (१) पालन करणारा, **सृष्टिचे पालक** १०·८९; (२) पाळणा, **हृदयकोशपालक** १२·५; **पालण,** पालन करणारा, **जगद्खील-पालणा** १०·३; **पालणें,** पालन, १८·८६८; **पालति-ती,** पालन, १०·१२०, १७·१३२; **बालाची पालति करी** १८·५८६; **पालिता,** रक्षण करणारा, **पालितेया गोडु** १२·१९९; **पालन—पालनशीलें** ११·१३०; **द्वारपाल** १३·४१५, **भू—**१·२१८, **लोक—**९·३२३, १०·१००(१,२), १३·६३. **प्रतिपालणें** पहा.

**पालव-वी—पालव**—(१) पदर. वरि गगनाचेनि पालवें । गाळूनि घेतलें ॥ ८·१५. तरि दोन्हीं पालववेन्हीं । जैसा एकु तंतु अंबरीं । ९·२१९. **पांचै पालव,** पंच प्राण, ११·६३, १३·३६५, सं. वा. श. पहा; **अविद्येचेनि पालवें** ८·३९; **युगांतविद्यूचां पालवीं** ११·२९६; **वाचेचेनि पालवें** १७·१०५. (२) झाडाचें, वेलीचें, पान. जैसी बीजाचेया वेला पालवा । समर्थ भूमि ॥ ९·११७. घेंत पान पालव जालें । प्रमादिचीं ॥ १५·१६४. **कनकद्रुमाचां पालवीं** ६·२६२; **नवे पालव** ९·१८९; **पालव डोलति** १५·१५६; **वेलपालव** १५·१००. **पालवी**—झाडाचीं कोंवळीं पानें, जैसी वरिवरि पालवी खुडिजे । २·३०५. ७·४९, १५·१९१, १५·२०४, १८·१२३; **जीवाभावांचिये पालविये** ८·२६; **नवी पालवीं** १८·३५२ (१), ज्ञानदेवी—'**नवां पल्लवीं**' १८·३५४. **पालवीं पुष्पपुंजु दावी** १८·३५२ (२); **पालवीं फूल फल** १०·९८; **करसंपुष्टपालवी(वीं)** ११·३३२.

**पालवणें**—विस्तरणें. दिवा पालवे १२·१००.

**पाला**—(१) पानें, पत्री, पाचोळा. तो पाला तेयां वुभे । टकेयां वरि ॥ १५·१६५, **घुमणें** पहा. **वेलांचा पाला** १५·१९०; **वेलु पालों**, वेल व पालवी, १५·१८४, ज्ञानदेवी–'वेलु पाल्वु', १५·१८५. (२) समुदाय. **विषयांचे पाले** १३·८४, ज्ञानदेवी, कुंटे–'पाळे' १३·८४.

**पालाणणें**—खोगीर चढवणें, बंधन घालणें. **माथा चि पालाणवी**, आपलें खोगीर, घरदारादिकांचा भार, जीवाच्या डोक्यावर ठेवतो, १८·१०५७.

**पालिंगण**—समुदाय. **आदित्यांचिं पालिंगणें** ११·२००, ज्ञानदेवी–'पालेगनें' ११·२०३.

**पालिवण**—झोपडें, पर्णकुटी. **तो भिलांचेनि पालिवणें केवि रंजे** २·३६२.

**पालूवणें**—उघड करणें, विस्तार करून सांगणें. **प्रमेयबीजाचा मुडा पालूविला** ६·४८६, परजिला (राजवाडे), ज्ञानदेवी–'पालविजैल' ६·४८९.

**पालेखाइर**—कोवळीं पानें खाणारा माकड. **रानिचेयां पालेखाइरां** ११·२३.

**पालेगन**—थवा. सुमनिं पालेगनें । सारंगांचिं ॥ १८·१६१६, ज्ञानदेवी, कुंटे–'पालिंगनें' १८·१६३६.

**पालोवाल**—पानांचा विस्तार. **पालोवालिं उत्तरोत्तर**, अधिकाधिक वाढणाऱ्या या पानांच्या विस्तारावर, १५·१९६, ज्ञानदेवी, कुंटे–'माळोवाळीं', माळयामाळयावर, १५·१९८.

**पाल्हालणें**—द्रवणें, विस्तार पावणें. हों काज शारदियेचेनि अंकें । चंद्रबिंब पाल्हैलें । ६·२५८. कां सोमकांतु सोमें पाल्हाले । १८·११२. **पाल्हेली जाए**, विस्तार पावते, १५·१०१, ज्ञानदेवी–'पाहाळीं' १५·१०२; **पाल्हाल—सोमकांतु पाल्हालु धरी**, द्रवतो, ११·२४४.

**पाल्हेजणें**—विस्तार पावणें. **उंबाडें पाल्हैजति** १५·१२६; **डालुका पाल्हैजति** १५·१६३; **पल्हैजे** १५·१५१, हा पाठ **पाल्हैजे** संभवतो, ज्ञानदेवी–'पाल्हैजे' १५·१५२, कुंटे–'पाल्हेजे' १५·१५२.

**पावणें**—मिळणें, मिळवणें, पोहोंचणें, गांठणें. जेथ ध्यानाचे डोले । पावतिना ॥ ४·१२. **पाउनि**—तेवि मातें पाउनि ठेलीं । दूरि कर्में ॥ ९·१२२. **मातें पाउनि** १६·३५२; **पाउनियां** १·२१०, **पाहणें** पहा; **पावत—पावतु ऐसा गमे** १३·१०१३; पावता, मिळविणारा, **पूर्णता पावते होंति** ३·४४; **पावतां—पुरता ठाओ पावतां** १८·५९; **पावति** २·३१३, **पद पावति** २·२७१, **प्ररोहो**–३·१३४, **फलें**–१८·२४९, **मातें**–९·४७९; **पावती—आधा पावती** १·२५८; **पावतील** २·१९८, ४·११७; **पावलेयां** १६·१५१; **पावसि—मातें पावसि** १८·१३५५; **पावसी** २·२८४, ८·७८, **करतलें**–, सहज मिळेल, १७·३१६, **मातें उपायें**–१८·१३७०; **पावसील**—तरि स्वर्गसुख अनकलित । पावसील ॥ २·२२०, **पावाल** ३·९९; **पावावें** ८·१२५(२); **पाविजतसे**—पैं जेयाचेनि अंगसंगें । इये प्रकृतीतव अष्टांगें । जन्म पाविजतसे जगें । तो पिता मीं गा ॥ ९·२६८; **पाविजे**—देखें इंद्रियां आधीन होइजे । तरि शीतोष्णातें पाविजे । आणि सुखदुःखीं आक्र-लिजे । आपणपें ॥ २·११९, आणि सांख्यि जें पाविजे । तें चि योगि गमिजे । ५·२९, २·२४०, १२·२३, १४·३०४, १७·२५, १७·११७, १८·९९४, १८·१०००; **तद्रूपता पाविजे** ३·३६, **योगु**–२·२७५; **पाविजैल—महेंद्रपद ही पाविजैल** २·६५; **पावे** १·२५५, २·२२८, २·२९९, २·३०८, ३·८०, ६·४४०, ६·४७८, ८·११७, ८·१२५(१), १३·५३५, १४·३९४, १५·३३१, १७·८६, १७·३४९, १८·६७७, १८·९०७; **अपाओ पावे** २·३४९, **उपहति**–२·१९९, **जन्म**–६·४४९, **जात्यंधा पळणि**–२·३२६, **ठावो**–१८·८९९, **नाशु**–२·३१३, **पद**–१८·१२५२, **पाटण**–१६·४३९, **भूमिका**–१८·९५८, **मेलु**–१७·५३, **सरि**–१६·३५७, **सुखा**–१६·४३७; **पावें—सीणु पावें** १६·३९८, **पाहाणें** पहा; **पावेया, तत्व पावेया** १६·१०३, **नीकें**–१८·२८१; **पावैल**—ते खुण चि पावैल स्वभावें । आत्मारामीं ॥ ५·१३५, **स्वभावें पावैल ना** ४·१५५; **पावों—पावों सरलें** ६·४८४, **पावौनि** ९·५१५, **परम उल्हासु पावौनि** १·८४, **मातें**–१५·२९८; **पावौनियां—त्रिविधता पावौनियां** १७·१२१;

**पावणें**—तैसें शास्त्राधारें तेणें । ईश्वरु चि एकु पावणें । १८·८४२; **पावणेयां परौतें** ८·११७. **न सहित आलेलीं पावणें चीं कांहीं रूपें : न पवतां**—२·३५१, ठाऊ **न पवतां** १३·५४५, १५·१५, **थडी –**, किनारा लागला नाहीं तोंपर्यंत, १८·१५०; **न पवति**—वांछित तेंव न पवति । ना तेकही चि आइसंनति । १३·३३३, ९·४५४; **न पवती** ९·१८८, ९·३५०; **सरी न पवती** ४·१५७; **न पवतु**—अद्योग्य ही मी न पवतु । कें जाइन ।। १८·१६०१, **न पविजे**—ऐसेनि कोडी एकी जन्म जाऊ । परि न पविजे मातें ।। १५·३३४, **जंव न पविजे तें** ठांग । १८·२४८, **न पवे**—कर्मबंधु सर्वथा । बाधुं न पवे ।। २·२३१, २·१८७, २·२६८, ९·४८१, १०·५९, १८·१२६, १८·३७२. **पांतां**—(१) पावतां, जाऊन मिळतां, या अर्थी, १८·३९५, (२) पाहातां, या अर्थी, **पाहणें** पहा; **पावें**—(१) पाहावें, या अर्थी ६·१८१, **पाहणें** पहा, (२) मिळावें, **हारतलें आणत पावें** १८·३९७; **पाववणें**—भाऊ **तुमचा ठाऊ पाववीन**, त्यांतील भावार्थ तुमच्या ठिकाणीं पोंहोचवीन, तुम्हांला सांगेन, १४·४११; **पावविजति**—देखें माता-पितरें अर्चिजति । तियें सर्वस्वें तोपु पावविजति । २·३२.

**पाश–पाशक**—बंधन, जाळें, फांस. **पाश**—मांडिलेयां पाश । वारेयासि ।। १८·६११, निष्फळ यत्न. **आशापाशरहित** ३·७४. **पाशक**—**देह पाशकीं गोविजे** १४·६४; **पाशि**—**कपाशिकें** १६·३४३, **सुखज्ञानाचीं –** १४·१४७. **पांस-पासिक** पहा.

**पाषाण**—दगड, धोंडा. पाशाणा वरि वर्षलें । १७·४१४, **पाऊस निष्फळ होतो.** ९·४८७, १८·१६२२.

**पांस–पासिक**—**पाश–पाशक** पहा. **पांस**—घातले आहाति पांसें । निसंगां जेणें ।। १८·१०५८, **ज्ञानदेवी – 'फांसे'** १८·१०६४. **पासिक**—पासिकेंविण गोविति । ३·२५४.

**पासवणे-पासिवणें**—फांस, बंधन (राजवाडे); मागें हटणें (ज्ञानदेवी) हा अर्थ समर्पक वाटतो. **पासवणे**—जे मतिभ्रमाचे पासवणे । येंति चि ना ।। ७·१६७, मतिभ्रमानें ज्यांची पिछेहाट होत नाहीं. **पासिवणें**—**पासिवणें न घली**, माघार घेत नाहीं, १३·४९५.

**पासाव**—जवळ, पासून, कडून. **तुज पासाव**, तुझ्याजवळ, १३·६; **मज चि पासाव होंति**, माझ्यामुळें, १०·८४.

**पासिं-सीं**—जवळ. शब्दास जोडून किंवा निराळा स्वतंत्रपणें हा शब्द आलेला आहे. **पासिं**—मग पासिं असत न दिसे । वस्तुज्ञान ।। २·५६. वस्तुचें अशेषें । तें पासिं चि असतु न देखे । ५·८०. आपण चि पासिं दावी । इष्ट मैत्र दुरावी । १३·७१२. ७·१२७, ९·५६, १०·१६६, १३·३१८, १३·३८२, १३·४६०, १३·७२५, १५·५०, १६·१७५ (सिं), १६·२५५, १८·४७२, १८·७९३, १८·१५४५, १८·१६२०, १८·१७०१. **ठेवेया पासिं** ११·६२२, **संतां –** १३·११६३; **लक्ष्मी पासिं आलेयां** १६·१६४; **अन्न आणि भूख पासिं असे**, भरविल्याशिवाय मूल जेवूं शकत नाहीं, हा भावार्थ, १७·३४७; **सुऱ्हद पासिं आले** १४·३६०; **कुळापासिं** १·२५४, **जला–** ४·९५, **तेयां –** ९·२०७, **मनबुद्धी–** १२·१०१, **महासिद्धांता–** १५·४०१, **समुद्रा–** ९·४५८. **पासीं**—विखें पासीं ही आलेयां आते न रिगे । हें काइ म्हणौनि ।। ६·३३. १४·२५२, १८·५१२, १८·१०७५, १८·१५७३. **भूकैलेया पासीं** १८·१००१; **द्रोणापासीं** १·९३, **मज–** १०·१४५, **सुषुम्ने–** ६·२४०.

**पांसु**—धुळीचा कण, धूळ, माती. **ई पांसूची ढेंपुली** १५·३६९; **पांसुता**, धूळपणा, धूळ असणें, १५·४७२.

**पासूनि-सौनि**—आंतून, पासून, कडून, मुळें, पेक्षां. **पासूनि**—ज्ञानापासूनि ध्यान । विशेषिजे ।। १२·१४०. **वेदापासूनि** ९·३६६. **पासौनि**—प्रकाशु आणि कडवसें । हें सूर्या चि पासौनि जैसें । १०·८६. आणि चयें लागि पांगुला । पासौनि मंदु ।। १३·४५५. १·११९, ३·३५, ३·१८७, ५·६१, ६·३६८, ७·५१, ९·२४, ९·८७, ११·२१४, ११·४५८, १२·१४१, १३·६८३, १३·१०४०, १३·१०५०, १५·४९८, १५·५१६, १८·१३९९, १८·१५४७, १८·१७३७.

**अतिवृद्धा पासौनि वृद्ध** १३·९७५; **अहित पासौनि काढिती** १६·४५९; **आदिलापासौनि,** पूर्वीं होती त्या पेक्षां, (१) वसंतऋतु येण्यापूर्वी होती त्यापेक्षां, १·४३, (२) पूर्वी आस्था होती त्यापेक्षां, ६·४८४; **कर्मापासौनि बरवा,** पेक्षां, ९·२६५; **खांदियांपासौनि शाखा फूटलिया** १०·९७; **तुज पासौनि,** तुझ्याकडून, ११·६९, **तुजपासौनि,** तुझ्यामुळें, २·९५; **तेयापासौनि,** त्यापेक्षां, १·२६४, त्याच्यापासून, २·९६; **भ्रांती-पासौनि हीतलें** ५·३४; **रश्मि हान मृगजळा पासौनि अर्कमंडला,** सूर्यकिरण व मृगजळ या-(दोहों)हून जसें सूर्यबिंब निराळें आहे, १५·४९७; **विषयांपासौनि हीतलें** ५·१४७; **वैकुंठापासौनि विशालें** ९·३८५; **पासौनियां** ११·३८०, १३·८९९; **पासौनु, देहा** – १५·३३५, **सुषुप्ती आणि स्वप्ना** – १५·४९६.

**पाहणें–पाहाणें**—बघणें, दिसणें, विचार करणें, जोपासना करणें. कित्येक ठिकाणीं **पांहणें** चीं रूपें आलेलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिलीं आहेत. **पाहणें—पाहतां, गलु न पाहतां** १३·७३८. **पाहाणें—पाहा** ६·३०, ११·४२४; **पाहातपाहातां** १८·१६८७; **पाहांत असति** ११·३२९,–**असे** ११·२६८; **वाट पाहांत** ८·१०३; **पाहांत पाहांतां** ११·३३०; **पाहातां** ६·११७, ११·२२२, ११·२८५, १४·७२, १६·३८; **पांहातां** ११·१४०; **पाहांतां** १६·३२९, १६·३५६, **परब्रह्माचेनि कसें पाहांतां** ४·११४; **पाहाताति** १३·६४० (२); **पाहांति** ३·१२८,९·१५१, ९·३७१, १८·७९८ (ति); **पाहांतेया**—आरिसा आरिसेया पाहांतेया। अपाडु जेतुला ॥ १८·२७२, आरसा आणि आरशांत पाहणाराला, ज्ञानदेवी – 'आरिसया आरिसां पाहतया' १८·२७४; **पाहावा-वी-वें**—आगा सूर्योदयो जालेयां। सूर्यो सूर्यें चि पाहावा धनंजया। तेवि मातें मीं जाणावेया। मीं चि हेतु ॥ १५·३९३, १३·३१२ (२), १८·२७१; **तो पाहावा हे डोहले** १२·२२१; ते पाहावी हें उपजे। तैं तो चि पाहावा॥ १३·३१२(१), **अहिंसेचें रूप पाहावयाचें** असेल तर तो (ग्रंथाधार)च पाहावा; **दूरौनि पाहावे** ९·१७१; न पाहावें तें पाहे। १३·७७३ (१), **तैसें एक स्थान पाहावें लागैल** ६·१६३; **पाहवेया**—एक मी वांचूनि वास। न पाहवेया ॥ १३·६०३; **विश्वरूप पाहावेयाचे डोहले** ११·३६१; **पाहासि—शोधुं पाहासि** २·९४; **पाहांसि**—जरि चित्त पाहांसि माझें। एणें मीसें॥ ३·१५, **जाणों पाहांसि** १७·१९७, **झोंबों** – १७·५०; **पाहिं**—हा रातिदिवसु पाहिं। जैसा जात्यंधा ठाउवा नाहिं। ४·२००, १०·२७६, १५·५०२, १६·११७, १६·२९०, १६·३९८, १७·१०४, १८·१४०३; **पाहिजे** ५·१७, ५·७६, ६·३, ७·११२, १५·२४५(२),१६·१०१; १७·१७६; **अद्वैतें पाहिजे** १५·२४४, **घेऊं** – १०·२४१, **धाया** – १८·१७०, **रूप** – १५·२४२; **परि अमृतीं कुहा पाहिजे,** अमृतांत असूनही विहिरीची (पाण्याची) इच्छा करावी, ९·३००; **पुजुनि देऊं पाहिजे,** १६·१४७; **पाहिजेता**—जें पाहिजेतेन विण पाहिजे। १५·२४५ (१), आपण पाहणारे आहों ही भावना सोडून; **पाहिला-ली-लें**—यशोदा सायासें पाहिला। ६·१३७, १·१९३; **वरि डोळां पाहिली** ८·४१; **जंव मियां पाहिलें** ११·२७१; **ध्यानाचां डोळां पाहिलासि** १६·२९; **पाहिलेयां** १८·११६९ (१); **पाहीं**—एणें कारणें ह्मणिपे पाहीं। व्यासोच्छिष्ट जगत्रय ॥ १·४७, ऐसा स्वभाऊ चि पाहीं। इंद्रियांचा॥ २·१२०. २·१५८, १०·२७५, ११·५०, ११·११०, १३·१११५,१४·३६२,१६·१३३, १६·२६१, १७·१९८, १८·९७७; **पाहील**—जात्यंधा कैंचें पाहील। ६·७, **पाहुनि** १८·१५५२; **पाहुनियां,** नीट तपासून घेऊन, १७·२७३; **पाहुनु** १२·४४, १६·४११; **पाहूनि** १३·२८९; **पाहे,** पाहतो, जाणतो, बाहिरि दीठि उघडूनि पाहे। ११·२२३(१), १३·७७३(२),१३·८१७, १३·१०४१, १३·१०५१, १६·१४१, १६·१४३, १७·१८९; **पाहे पां** ९·२५४, ११·५३४, १७·११२; **तूं पाहे(हें)** ९·९१; **वास पाहे** ७·१२९; **हों पाहे** १८·२८४; **पांहे** ६·४३, हा पाठ पाहे असणें संभवतें, ज्ञानदेवींत या पाठाऐवजीं 'अर्जुना' हा पाठ

आहे, ६·४३; **पाहों—**ऐसी(सीं) **पाहों पाहों** वायांगी मीसें ११·१०८; **पाहों एंथि** ८·८३; **पाहों लागला** ६·८८, ९·१५०, ११·१९९; **वाटा पाहों** ११·५४०; **साचोकारें पाहों लागे** ४·९६; **पाहों विसरला** ७·१२१; **मानु पाहों** ११·५३८; **हों पाहों** १७·१६; **न पाहों** ११·२२३(२), ज्ञानदेवी–'न पाहें' ११·२२७; **पाहणें—**कैसें अनुग्रहाचें करणें। पार्थाचें पाहणें आणि न पाहणें। तेंही सकट नारायणें। व्यापूनि घातलें॥ ११·२२३, **पाहणें टाकणें** १८·१४१४(२); **पाहाणें** ४·८५, १६·१४८, १८·५३०. **पहावें** १·१७१, ज्ञानदेवी – 'पाहावें' १·१७१. **पाणें—** पाहणें या अर्थी या क्रियापदाचीं रूपें अनेक ठिकाणीं आलेलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिलीं आहेत. **पाइं,** पहा, इयें शरीरांतरें पाइं। २·११०, झणीनि भक्तु येकु पाइं। ज्ञानियां जो ॥ ७·१०८, मज चि नावें पाइं। जीणें ठेविलें ॥ ९·३३२, ३·४९, ३·५८, ४·१११, ४·१५३, ५·४६, ८·१५६, ९·६८, ९·८१, ९·४६७, १०·११४, १८·२६५, १८·३३३, १८·११८३; **दाउनि पाइं** ९·९५; **पाइजे,** जरि उपमा पाइजे ६·४८२, ज्ञानदेवी–'पाहिजे' ६·४८५: **पाइजेति—जाणों पाइजेति,** जाणावयास पाहिजे तर, १०·२४२; **पाईं** ३·२९, ३·१७७, ३·२३५, १४·३२१, १५·२८४, १५·५५२; **पाउनि,** समजून घेऊन, १८·१२९५, १८·१३४३; **पाउनियां** १६·१८; **पाए,** पाहतो, **निगों पाए** ६·२६७, **वास**–१८·१०९२; **पाये—वास न पाये** ६·३७०; **पाये पां,** पहा बरें, ६·३१२, ६·३६२, या दोन्ही जागीं ज्ञानदेवींत 'पाहे पां' असा पाठ आहे; **पाऊं—**सिंधु सिंधुनें पाऊं जाए। १८·१४१४ (१), **पाऊं जांतां** १८·५३३ (१), **–लागसी** ९·७०; **पांत**–पृथिवीतळ उलंडों पांत। १·१५३, १·१४७, १·२४१, १०·१६६, ११·१४३, **न पांत** १८·६१८; **पांत ठाके** १८·९७० (२); **पांतसे** ११·२१४, **हों**–१८·१५८३; **पांतां** ६·९३, ६·२११, ८·२५, १३·२१४; **पांतां** १·८, १·३८, १·२०९, २·११, २·७०, २·९०, ४·१००, ४·१६२, ६·४०, ७·२९, ९·६७, ९·१०९, ९·२४८, ९·४१२, १०·१८५, ११·२२५ (१), ११·२८४, १४·३९१, १५·१३७, १५·४५४, १६·११०, १६·२५२, १६·२८१, १७·५, १८·३९४, १८·३९७, १८·५२९, १८·५६६, १८·११६८, १८·१४४९; **न पांतां हिं दीसे** ११·२२५ (२); **दशेची वाट न पांतां** ६·४५१: **पांतासि** ११·३६०; **पांनि—**गरुडाचेनि मारुतें। सांडे पांनि ॥ १·१२४, ६·२०२, ११·८५, १३·६४० (१), १५·२४३, १७·३६५, १८·११८; **पांतु** १·१३३, **कुपथ्याचें नीस पांतु** १३·८१; **पांतें,** पाहणारें, आरिसा पाऊं जांतां कोडें। जैसें पांतें चि रिघे पुढें। १८·५३३ (२), **पांतेपण—**पांतेपणें विण उमा। पांत ठाके ॥ १८·९७० (१). **पाणें—** पहाणें, पैं दर्पणातें दर्पणें। पाहिलेयां होये न पाणें। १८·११६९ (२); **पावी,** पहावी, १६·२३; **पावेया,** पहाण्यासाटीं, १८·२८१.

**पाहणें—**उजाडणें, पहाट होणें. **पाहला-ली-लें—** कां मनगा दुकाळु पाहला। ११·४२३, दुष्काळ संपून सुकाळाची पहाट व्हावी. **पाहला—सुकाळु पाहला असे** ३·२६, ज्ञानदेवी–'पाइला' ३·२६; देखी अद्वैतदिवसें पाहाली। रात्रि जैसी ॥ ६·३९९, द्वैताची रात्र अद्वैत दिवसानें उजाडली; **उखा पाहाली** १६·२६३; **पाहालिं गेलें,** उदय पावलें, ९·४७४, **पाहालीं**–१८·१५०१; जीवीं सुखाचें सुयाण पाहलें। ११·३३३, ५·३१, ६·१३६, ११·१८५; **अद्वैत दिवसें जेया पाहलें** ६·१०५; **पहालेनि पहाटे,** जो प्रकाशून पहाट झाली असतां, १६·७; **पाहालेनि सुयाणें,** सुकाळ, धान्याची विपुलता झाली म्हणजे, १४·२१४; **पाहालेयां** १३·९३, १४·४७, १५·५२५, १८·२६१, १८·१६०६; **पाहलें,** पहाट, तैं नक्षा(क्ष)त्रांतें पाहलें। गिळी जैसें ॥ १८·१९४. **रात्रि पाहलें** १४·३६०; **पाहालें** २·३५४, ११·९६, १४·३५२, **नातरि जात्यंधा पाहालें प्रमाण नोहे** ३·१९४; **ज्ञानाचें पाहिलें,** उजेड, प्रकाश, ४·१९१; **पाहिचा-चें,** उद्यांचा-चें, **पाहिचा वेळु** ९·४०१; **आजिचें...पाहिचें** १३·७५८; **पाहांती,** उजाडणारी, उजाडती, ७·१२७; **पाहे,** उजाडत, तरि विद्युत्स्फुरणें कां

न पाहे। जगामाजि ॥ ५·११२, कां राक्षसांसि दिवो पाहे । राति होउनि ॥ १८·७२१, राक्षसांचा दिवस रात्र झाली म्हणजे उजाडतो; **सूर्यें सकल दिवो पाहे**, सूर्याच्या उगवण्यानें सगळा दिवस उजाडतो, १८·३५४; **पाहे, उद्यां**, पुढें लगेच, पाहे चि ना पुढ्तिं आलें। १३·७३४.

**पाहाट**—पहाट, प्रभात, प्रातःकाळ, सूर्योदया-पूर्वीचा काळ. ते पाहाटेविण पाहाटवित। ९·२०० (१). ८·१५९. **पहालेनि पाहाटे** १६·७; **उन्मेखा पाहाट फूटे** ६·४५०, **पुण्याची**–४·५५; **सुखपाहाट**, पाहाटेचा आनंदाचा काळ, १६·२३८; **पाहाटि–अवसिपाहाटि** १३·३०; **पाहाटवणें**, उदय करवणें, ज्ञानाचा प्रकाश पाडणें, ९·२००(२).

**पाहार**—प्रहर. जिये गाविंचा पाहारु दियां वेन्हीं। ८·१५३. **आठ पाहारिं**, दिवसभर, १७·२०१; **आठां पाहारां भीतरी**, एक दिवसांत, १२·१०५; **आठै पाहार**, सर्व दिवस, ११·१६७, ११·६७०, १३·३६५, १३·५४९; **चौपाहारी**, चार प्रहरांचा काळ, अर्धा दिवस, ११·४८९; **देहाची चौपाहारी**, येथें आयुष्यकाळ, ८·१५९; **रातिची चौपाहारी**, १८·९६२; **दुपाहारी, दुपाहारी कां दिवसें**, दोन प्रहरभर किंवा दिवसभर राहिलेलें, शिळें, १७·१५४; **ब्रह्मेयाचिया ही पाहारातें आपुलां डोलां देखते**, ब्रह्मदेवाच्या प्रहरांची ज्यांना जाणीव आहे, ब्रह्मदेवाच्या दिवसारंभीं सृष्टि उत्पत्तीचा आरंभ होतो व रात्रीं लय होतो हें जे जाणतात, ८·१५७.

**पाहुणा**—अतिथि. आम्हीं भावांचे पाहुणे। भलेतेया ॥ ९·३९१. ६·२, १३·६४२, १४·२१४. **पाहुणर**, पाहुणचार, जें वैरियांचा पाहुणरु। ८·१४७, हा पाठ **पाहुणेर** असा संभवतो. ज्ञानदेवी–'पाहुणेर' ८·१४९. **पाहुणेर**—**शाकांचा पाहुणेरु** १६·२२; **पाहुणोर**, पाहुणचार, १०·११; **पाहुणोरा आला आहे**, पाहुणचारासाठीं आला आहे, ११·२.

**पाहूती**—पायरी (राजवाडे). **पुण्याची पाहूती सरे**, पायरी संपते, शेवटच्या पायरीवर येतो, ९·३२५.

**पिकणें**—पीकणें पहा.

**पिंगला**—(१) पिंगट. **पिंगला दीठी** ११·२०१. (२) नाभिचक्रापासून उजव्या नाकपुडीपर्यंत जाणारी सूर्य-नाडी. ६·२४४. **इडा** पहा.

**पिचडि**—थुंकी. तैसें पिचडिं तोंड। सरांडैल ॥ १३·५६०.

**पिंजरी**—बारीक पूड. **धूमरजाची पिंजरी** ९·१२४; **चंदनपिंजरी** ११·२१९.

**पिंड**—पुंज, गोळा, लिंगदेह, शरीर, अहंपदविशिष्ट जीव (राजवाडे). पिंडें पिंडाचा ग्रासु। तो हा नाथ-संकेतिचा दंसु। ६·२९१, पंचमहाभूतांनीं पंचमहाभूतांचा लय करावा हें आदिनाथ शंकराच्या अंतरंगाचें मर्म. हें पद होतां चमत्कार। पिंडु-जनीं ॥ ६·२९६, पिंडु जनीं असा पाठ घ्यावा, शरीर आकाशविहारी होणें हा लोकांना मोठा चमत्कार वाटेल. **पिंडाचेनि आकारें**, शरीराच्या आकारांत, ६·२५०, –**मीसें**, शरीराचें निमित्त करून, शरीरद्वारें, ६·३०८; **कोण्हें एकें पिंडें**, एकादा मातीचा गोळा घेऊन त्याचें भांडें बनवावें, पृथ्वीच्या घडण्यावर हें रूपक आहे, १८·३०८; **मृत्पिंड** १५·४७२.

**पिडी**—पाया (राजवाडे), बैठक या अर्थी. **आदिलाची पिडी तेयातें करी** १३·८१०, एका देवाची बैठक उठवून, त्या जागीं दुसरा देव मांडतो यास उद्देशून. ज्ञानदेवी 'आदिला चि परवडी' पहिल्यासारखाच प्रकार करतो या अर्थी, १३·८१२.

**पिंडी**—मंदिरांतील शिवलिंग. जे शून्यलिंगाची पिंडी। ६·२७३, निराकाराचें चिन्ह असणारी पिंडी.

**पिणें–पीणें**—नेहमींच्या अर्थी व शोषून घेणें, नाहींसें करणें या अर्थी हा शब्दप्रयोग आलेला आहे. **पिणें**—जेव्हलि कुंडलिणी चांद्र पिए। ६·२५९. हलाहल आगी पियालें। ११·३५३. ४·२२०, १०·१७६, १२·६३, १८·९४२. **कांजी पियाला** ९·१५०; **कोश पियालीं** १३·६०३; **पियों न लाहे**, पिऊं शकत नाहीं, १६·४४७; **पियों ये** १८·१४७३. **पीणें**—जें पाणी पीउनि असे पाणी। १३·९२७, जें सर्व पाणी व्यापून पाणीपणें राहतें, या अर्थी. **पीउनि घाली** १६·१९३; **पींतां** ९·१५३,

१६·२३९; **रोहिणी पींतु** ११·५३; **पवनू** चि पींथि, वाऱ्यावरच जगतात, ७·३७; **प्रेम पेडनि** ५·१७१, ज्ञानदेवी–'पिऊनि' ५·१७२. प—शब्दास जोडून पिणारा या अर्थी, **मद्यप** १३·५३१; **सोमप** ९·३०६.

**पितर–पितृ**—आईबाप, परलोकांतील पूर्वज. **पितर**—तरि पितर काइ करिति । कैसेनि स्वर्गी वसति । १·२५४. १३·८१५(२). **पितरांचीं व्रतें** ९·३५२(१); **पितरोद्देशें** ३·१२०; **पितरकार्यअवसरीं** १३·८१५(१); **मातापितर** १३·७८६, १७·२०६, –**मरणें** १८·१०९. **पितृ**—पूर्वज, **पितृगण** १०·२२४(१), **पितृदेवता** १०·२२४(२); **पितृपक्ष** १६·१०६; **पितृव्य** वरि, पितृलोक मिळतो, ९·३५२(२).

**पित्त–पीत्त**—पोटांतील एक अन्नपाचक रस. **पित्त**—आणि जंगमा हिं ज्ञात । काढिनि काढिलें पित्त । १३·२२१, हालचाल करणाऱ्या (जिवंत) प्राण्यांचें ही पित्त काढतात. **जें देहीं कफवात परिहरौनि पित्त आटोपे**, शरीरांतील कफवात या दोघांना मागें सारून जेव्हां पित्त देह व्यापतें, १४·१९५. **पीत्त—पीत्त कुरूपे** १६·३९२, कुरूपणें पहा. सं. वा. शा. **त्रिकुटी, त्रिदोष, त्रैधातुक** पहा.

**पिलें–पीलें**—पशुपक्ष्यादिकांचें पिलूं. **पिलें**—नागाचें पिलें ६·२२२. **पीलें**—नांसि पीलें धरी तोंडें । १३·२५१, **पीलु** १३·३९९; **कूर्मिचेया पीलिया** १८·१३३४, **पीलेयां कूर्मांची दीठी** १६·१६९, **पीलेयाचें पोखण** १३·१४०, हे तिन्ही संदर्भ कासवी आपल्या पिलांचें पोषण फक्त नजरेनेंच करते या समजास उद्देशून आलेले आहेत.

**पिशाच**—भूत. **पिशाचाचें चित्त** ५·५७.

**पिशित**—मांस. **कुहिलें पिशित** १३·५२०.

**पिसें–पींसें**—वेड, अज्ञान. **पिसें** २·९३; **पिंसें**—पहिलिये बाळदशे । आई वा हें त्रि पिंसें । १३·७०८, १०·२६७, ११·५९. **पिंसा—वेडा**, पथ सनकादिक वेडे । पिंसे जाले ॥ ९·३६७, १८·६६४; **देवपिंसे**, देवखुळे, १६·२९६; **पिसें**, वेडा; **पिसे(सें) आलव घाली** १८·२६. **पींसें**, वेड, वेडा, पींसें आणि न भुलवी । ६·१२४, वेड आहे तरीही भ्रम पाडीत नाहीं असें होत नाहीं, भ्रम पाडतेंच; नवल पींसें लागलें आहे । पार्थाचें कृष्णा ॥ ११·१७२, १४·२५०, १६·३८०, १८·२२०, १८·५४८, **पींसा लोकु** १५·१३७; **पींसे लोक** १८·४४४; **पांचपींसें**, पंचमहाभूतें, १८·१८; **प्रकृतिपींसें**, हा पाठ **प्रकृति पींसें** असा घ्यावा, १६·३६१; **पींसेपण** १३·१९१.

**पिकणें–पीकणें**—पक्व होणें, भर देणें, तयार होणें. **पिकणें** १४·६६. **पिकविजन आहे** ९·२०; **पिक—प्रमेयपिक** ९·५२८. **पीकणें**—आणि श्रवणेंद्रिया पीकलें । ४·१. पेरीति नगपुरां । तें त्रि पीके ॥ १७·९८. ५·१४६, ६·१४५, १३·६६१, १४·२६२, १८·११३. **अभिप्राओ पीके** १०·२१, **आत्मसिद्धि** – ६·३५५, **पाप** – १३·३२, **पापपुण्य** – १३·१५६, **मति** – ९·२५, **सारस्वत**–१२·८; **सेन पीकलें** ८·२५१; **पीकलीं पडवलें** १३·५५८, –**फलें** १२·१२८; **पीकनें सुक्षेत्र** १८·७०; **इंद्रियें पीक(क)लें** १८·१००८, ज्ञानदेवी – 'केले' १८·१०१४; **बरड...पीकें** १३·१३; **पीकलेया** ७·१७१, १८·२३५, **पीकलेया मुक्ताचा परिमलु** ८·५६; **पीकावेया** १७·२४७; **पीक** ४·८, १०·५४, १४·२६१, १६·९९; **पीक तें सुक्षेत्र** ८·११०, हा पाठ **पीकतें सुक्षेत्र** असा घ्यावा.

**पीटणें**—मारणें, ठोकणें, वाजवणें. तानलें लोह पीटितां । १३·१०१०. **एकताळी पीटली** १·१५७; कपाळ शब्दाबरोबर आलेल्या पीटणेंच्या संदर्भा-करितां कपाळ पहा; **विधिचेनि दंडें आंडें पीटुनि**, १८·८३२.

**पीठ**—(१) धान्याचें. ११·४१०. (२) स्थान. **इंद्रियपीठ** १८·३४८, **नासाग्र**– ६·२०४, **मूल–**, उगम, मुख्य स्थान, १·३०, ११·२१५, १७·२७३; **योगपीठिचा भैरवु**, योगरूपी आसनावरील जणूं भैरवच, ६·४६०; **वैकुंठपीठिचें लिंग**, वैकुंठस्थानाचें आराध्य (पूज्य) दैवत, येथें श्रीकृष्णास उद्देशून, १७·४६; **वैकुंठपीठनायक**, विष्णु, १०·१८; **पीठिका**, **आत्मनिवेदनातलिची पीठिका**, नवविधा भक्तींत आराध्य दैवताशीं

सख्य संपादन केल्यावर भक्त आत्मनिवेदन करतो, येथें आत्मनिवेदनाखालची सख्यभक्तीची भूमिका, ६·१२७.

**पीडणें**—त्रास देणें, दुःखी होणें, नेट करून दाबून बसविणें. तुह्मीं व्रतनियम न करावे। शरीरातें न पीडावें। ३·८९. १८·१३२५. **कांवरूमूला पारणी पीडूनियां**, गुद व उपस्था-मधील शिवणीचा मध्यभाग टांचेनें दाबून, १८·१०३०, हें मूलबंधाचें वर्णन ६·९२ ते ६·९९ ओव्यांत आहे; **सीवणिमध्यु पीडिजे**, दाबून ठेवावा, ६·१९४; **पीडित** १७·२८६; **तृषापीडितें मृगें** ५·११०; **पीडा**—अथवा प्रवासें कां पीडां। सीणलें(ले) जें(जे) सांकडां। १७·२०५, **भूखेची पीडा** १३·२१९; **आत्मपरपीडा** १७·९८.

**पीत**—पिवळें. **पीतांबर** ११·२१७.

**पीन**—पुष्ट, लठ्ठ. **पीनावयव मांसले(लें)** ११·१३९.

**पीयूख–ष**—अमृत. **पीयूख**—**पीयूखांचे अर्णव** १८·१७७६; **पीयूखु वरिखौनि** १८·१०३३; **पीयूखधारा** १३·३८०; **गंगापीयूख**, गंगेचें पाणी, १६·१९४. **पीयुष**—मृत्या जैसी वृष्टि। पीयुषाची ॥ १७·३९५, **पीयुषाचा महापूर** १४·२८; **पीयूष**—पैं आवविंयां जगीं जें विष। तें कीडेयाचें पीयूष। १८·९२६, २·१९५; **पीयूषिं जैसी रुचि न विटे** १७·२१९; **कृपापीयूष सजलु**, हे शब्द एकत्र घ्यावे, कृपामृताच्या पाण्यानें भरलेला (मेघ, श्रीकृष्ण), ११·११३.

**पीळणें**—पिळणें, वळवणें. वायां चि मान पीळी। ६·७७. ९·४९४.

**पुंज**—सांठा, समुदाय, ढीग. **अक्षरांचे पुंजे** १३·१५२; **क्रिमिचा पुंजा** १३·११००; **पापपुंज**, पापांचा सांठा, १८·६८५, **पुण्य–** ९·४७९; **पुण्यपूंज्य(पुंज)** १०·२१४, ज्ञानदेवी – 'पुण्यपुंज' १०·२३४; **पुष्पपुंज** १८·३५२, **रश्मि–** १६·९; **पूंज**—मग क्षीराब्धितें सांडितु। गगनीं पूंजा मंडितु। १८·१५३६, **पूंजा मंडितु** हा अपपाठ संभवतो, ज्ञानदेवी – 'पुंजमंडित' १८·१५५०.

**पुजणें–पूजणें**—पूजा करणें, आदरसत्कार करणें, मान देणें. **पुजणें**—जैसा पुजुनि देऊं पाहिजे। पेरुनि सेता जाइजे। १६·१४७, जसें पेरलें तर शेत पीक देतें, तसा पुजला तर देव पावतो हा भावार्थ. **पूजणें. पूजि**—निफजे तेया महापूजा। पूजि तो मातें ॥ १८·११७३(२), **पूजिजे**—देवा संतवृंद नमस्कारिजे। कां घडे तरि पूजिजे। २·३३, **पूजिजति** ८·४९, **–सि** १७·६; **पूजितां** ३·९६ (२); **पूजिति** १७·७९; **पूजितें**—पूजितें दैवतें जोगावी। १३·७९४, **पूजितेया**, पूजा करणाराला, ११·५८९; **पूजिला**—ईश्वरबुद्धी पूजिला। १४·३५९, **पूजिलीं** १२·५०; **पूजी** ३·१२०, १३·२०७, १८·१७६०, **–जीं** १२·२२१; **पूजणें**—तेया चि नांव पूजणें। खुणेचें माझें ॥ १८·११७२, यावर श्लोक १८·५५ वरील ओव्या, विशेषतः १८·११६८ ते १८·११७३ पहा; **पूजनें** १७·४४; **पूजा**—पर्वविशेषें भोजें। पूजा आन ॥ १३·८१४, स्तुति काहिं न बोलणें। पूजा काहिं न करणें। १८·२५, १७·७, १७·२४४, १७·२८६, १८·९१३, १८·९१४, १८·१२४१; **तो करी तेतुली पूजा**, तो जें कांहीं करील ती माझी पूजाच समजावी, १८·११७५; **पूजाबंध**, बांधलेली पूजा, ११·२१६; **महापूजा** १८·९४७, १८·११७३(१), **वाक्य–** १५·५६५; **पूज्य** २·३४, ६·४७५, १६·२२८, **स्वधर्मु–** ३·९६ (१); **पूज्यता**—पूज्यता डोळां नेदखावी। १३·१८८, स्वतःच्या गौरवाची आवड नसावी, हा उद्देश. **सपूजित** ८·१४४.

**पुंजाळणें**—पसरणें. ६·२०३.

**पुट**—(१) लेप, मुलामा, मूस, भट्टी. गाभिणीं उकडलीं। पुटां माझि ॥ १३·२२७, क्षार देऊन उकडणें. सोनें जैसें पुटीं तूंक। तूटलेयां॥ १८·६३८. **पुट देउनि** १३·१०३१; **पुटीं पडिलें** १७·५४; **भांगारा पुटें देणें** १८·१५६, **–देतां** १०·५५; **आवृत्तिपुटीं**, वारंवार स्वधर्माचरण करून, १७·२०८. (२) सांधा, गांठ. कां पुटीं वळलां उंसीं। गोडी जेवि ॥ १८·८३९, गांठीकडे जरी ऊस वळला, वाकडा झाला, तरी त्याची गोडी सारखीच असते. (३) दुमडून झालेली पोकळी, संकुचित जागा, पूड, पुडी. तैसी सुबद्ध आडली। पुटीं होती दाटली। ६·२२५. **ज्ञातृत्व पुटीं पडे** १६·१३९; **करपुट, कर** (१) पहा; **कर्णपुट, कर्ण** (२) पहा; **गर्भपूटें, गर्भ** पहा;

नासापुट, नाकपुडी, ६·२३६. सं. वा. श. त्रिपुटी पहा.

**पुडा**—पुढें. ११·३०४. पुड याचा अर्थ पुढें असा दाते कोशांत दिला आहे.

**पुडत-डुत-तिं-ती-तीं**—पुढें, नंतर, वारंवार, उत्तरोत्तर, अधिकाधिक. **पुडत**—पुडतपुडुतीं १६·२०४, ज्ञानदेवी–'पुडुतीं पुडुतीं' १६·२०६; **पुडुतिं**—मातलेया सरडा। पुडुतिं वृढ पुडुतीं सेंडा। १३·६८८ (१), १३·७२८, १३·७३४, १३·७६२, १३·९४७; **पुडुतिं पुडुतिं** १३·९५९, १३·१११६, १८·१८६; **पुडुती** (१) ६·५०, ज्ञानदेवी–'पुढती' ६·५०, (२) १४·२४१, ज्ञानदेवी–'पुडुतीं' १४·२४३; **पुडुतीपुडुतीं** ११·३८१, ज्ञानदेवी–'पुडतपुडती' ११·३८६; **पुडुतीं**—अर्जुना हें चि बीज। पुडुतीं सांचिजैल तुज। ९·३४, पुडुतीं मुई पडे। पुडुती उठी॥ १८·२५१, आणि रुतु बरवा शारदु। शारदिं पुडुतीं चंद्रु। १८·३४२, ४·१७६, ६·१०५ ६·२४२, ६·३१८, ६·४५६, ८·१४९, ८·१६०, ८·१७१, ८·२०४, ८·२६१, ९·२३, ९·७३, ९·९१, ९·९४, ९·१०४, ९·१२९, ९·१४२, ९·२९४, १०·५३, १०·५६, ११·१४१, ११·४८५, ११·४९६, ११·५१८, ११·५२०, ११·५२३, ११·५६०, ११·६३४, ११·६४२, ११·६९५, १३·४२१, १३·६१३, १३·६८८ (२), १४·४१, १४·८५, १४·२९५, १५·१२८, १५·२४७, १५·२८५, १५·२९८, १५·३२२, १५·३३६, १५·४८४, १६·१७, १६·५१, १६·१३९, १६·४२९, १७·२५२, १७·३६७, १८·१७५, १८·२३०, १८·२७५, १८·२८७, १८·३३५, १८·५३४, १८·१२३९, १८·१३९८, १८·१४०७, १८·१५८९, १८·१५९६, १८·१७७०; **पुडुतीं...पाठिं** ८·१५९; **पाठिं...पुडुतीं** ११·५१९; **पुडुतीं पुडुतीं**—तैसा पुडुतीं पुडुतीं तो चि। मिया वंदिला श्रीगुरु चि। १·२७, मज हा चि विस्मो पुडुतीं पुडुतीं। ११.१६५, २·९४, ३·११८, ३·१६८, ४·१८०, ९·४२६, १०·५५, १०·१७४, ११·२७५, ११·३९६, ११·६२७, १४·२६५, १६·१०१, १८·२८; **पुडुतीं पुडुतीं पुडुतीं** १८·१७८८.

**पुढां**—(१) समोर, पुढें. मार्गिं अंधासरिसा। पुढां देखणा हीं चाले जैसा। ३·१५५. हें बोलों काइ तूझें। तुज चि पुढां॥ ४·३३. क्रिया फलेंसीं उभी ठाके। पुढां जेयां॥ ९·३०५. ह्मणौनि बोलतेया पुढां। त्रष्टा ही नेगु होये॥ १०·२७४. १·१४३, १·२३७, ११·४७, ११·८० ११·१९२, १३·४१७, १३·४२४, १३·९३४, १५·३८७, १५·५४४, १६·२८७, १६·३८७, १६·४५५, १७·४२, १७·१७१, १८·२०९, १८·२८१, १८·४६५, १८·७३३, १८·१०१४, १८·१०२३, १८·१०३५, १८·१०६४, १८·१११३, १८·१३२५, १८·१४९८, १८·१७००, १८·१७४१. **उपमन्यूपुढां** १०·१७; **गायी पुढां** १६·३८४, **चर्मचक्षू**– ११·१५९, **दीठी**–९·३७५, **पायां**– १५·२४८, **नाद्दा**– ९·१०; **प्रिया पुढां**, पुढयांत, शेजारीं, १५·८५, **माये**–१३·३६०, **वाचे**– ९·२०५, वानी–, काळोख पळतो, १४·२०८; **पुढां मावौनें** १५·७५; **मागां पुढां** १६·३१९, १७·३३०; (२) पूर्वीं, आधीं. नर्सी पुढां प्रकटे। प्रकाशु जैसा॥ ६·४५०, पुढां स्नेह पांझेर। नागां चालति अक्षरें। १२·२६१. १३·४२९, १३·५८६; **पुढां अथवा पाठिं**, पूर्वी किंवा नंतर, ११·५४९. (३) नंतर, यानंतर. पेनीति मग पुढां। तें चि पीके॥ १७·२८, १·२७३, ६·३०४, ६·४८६, ८·२६९, १३·१३०, १५·१५९, १५·१९२, १५·२३८, १८·६२; **पुढां मृत्यु आहे** १३·५४३; **पुढां वृद्धाप्य आहे** १३·७५३; **मागां...पुढां** ११·३१८; **मागीलु...पुढां** ७·१९७. **पुढपुढां**, हळूहळू, नंतर, ९·३३८.

**पुढारणें**—पुढें मांडणें, बोलणें. **पुढारलासि**, जें तूं बोललास, १८·१९७; **पुढारलों तें तुह्मीं आइकां**, जें मीं (सांगेन म्हणून) म्हणालों तें ऐका, १८·३०१.

**पुढारिं-री**—पुढारिं, अग्रस्थानीं, १५·१७१; पुढारी कथा, पुढें येणारा वृत्तांत, ५·१७८.

**पुढिल-पुढील**—(१) पुढें येणारी, भविष्य-

**मूर्छणें**—परिणामकारक होणें, भोंवळ येणें. नादब्रह्म मूर्छेलें । १३·२६८, ज्ञानदेवी–'मुसे आलें', कुंटे–'मुसें आलें', मूर्तिमान झालें, १३·२६९. **मूर्छीत** १४·८३; **मूर्छना**—पर मूर्छने नांव रोगीं । विसांवां (वा) जैसा ॥ १८·२२८.

**मूर्त-मूर्त्त**—साकार. **मूर्त**—का तेज चि मूर्त बैठलें । आसनावरि ॥ ६·२५८. **कृपा ते मूर्त** २·४२; **प्रतापें मूर्तु उदो केला** २·१९२; **अमूर्तीं**, निराकार ब्रह्माचे ठिकाणीं, ८·२०; **अमूर्तु** ४·४७. **मूर्त्त**—तैसें सकळ हें मूर्त । जाण पां मायाकारित । २·१६८. ९·६५(२), ११·६८२, १३·८५३, १३·११०४(१), १४·२८०, १८·१४४६. **भू(मू)र्तु अवतारु** १३·८२१; **दोख हे मूर्त्त** १·२४१; **पापपुंजु मूर्त्तु** १८·६८५; **रस बोध मूर्त्त** ११·७; **मूर्त्त जालें** १५·६८, **–होंति** १३·८२८; **अर्थ...मूर्त्त होउनि** १७·८५; **मूर्त्तु चि होउनि** ५·८१(१); **अमूर्त्त**—तैसें अमूर्त्त मूर्त्त मियां विस्तारलें । त्रैलोक्य जाणें ॥ ९·६५(१), कुंटे–'अमूर्तमूर्ति,' निर्गुण असून साकार झालेला, ९·६७, मूर्त्तु ना अमूर्त्तु । १३·११०४ (२), २·१६४, ४·११, ६·१३१, ६·४६८, १३·९९४. **अमूर्त्तपण**—पैं मूर्त्तिचेनि मेळें । तो मूर्त्तु चि होउनि खेळे । परि अमूर्तपण न मैळे । दादुलेयाचें ॥ ५·८१(२).

**मूर्ति-मूर्ती-मूर्त्ति-मूर्त्ती**—प्रतिमा, आकार, रूप, अवतार. **मूर्ति**—माझी मूर्ति आपजवी । ते वराचां कोनिं बैसवी । आणि देवादेवीं । यात्रे जाए ॥ १३·८१३. १·३. **मूर्तिंचा मेळावा करूनियां** १२·८९; **मूर्तिं(र्ति)मंत** ३·१०१. **मूर्ती**—**अमूर्तीचा कडवसा** ४·१७२. **मूर्त्ति**—अमूर्त्तु ही मूर्त्ति आवंगे । ६·१३१. तेया अमूर्त्ताची मूर्त्ति । होउनि ठाके ॥ ६·४६८. तेया अमूर्त्ताची मूर्त्ति । १३·९९४. ४·५५, १०·२५५, ११·१४८, ११·५१९, १३·८७५, १७·२७२, १८·७९, १८·२१६, १८·१४५६. **मूर्त्तिचेनि मेळें** ५·८१; **अभिलाषाची मूर्त्ति** २·२११; **ज्ञानाची मूर्त्ति धरीं** १३·६०९, ज्ञानदेवी, कुंटे–'मूर्तधारी' १३·६११; **मूर्त्तिफळीं** ११·२८० (२), **–मंत** १·१४१, **–मय** ११·२२३, ११·२६७, **+(मू)र्त्तिवंत** १०·२३५, **मूर्त्तिवंतें** १७·२९५; **गुरुमूर्त्ति** १३·३९४, १३·४०२, **श्रीगुरु–** १८·१६८२, **महा–** ११·२७९(१), ११·३२९, **मानुषी**–१३·६१२; **अमूर्त्तिचे गुण** ५·३९. **मूर्त्ती**—जी विश्वरूपाचां सागरीं । होंतां तरंग मवीतु वांव वेन्हीं । तो इये मूर्त्तीचां तीरीं । निगाला आतां ॥ ११·६५९. ११·२७९(२), ११·२८२, ११·६९२(१). **कर्माचिया मूर्त्ती** ३·१३७, **महेशाचिया**–९·१४; **कृष्णमूर्त्ती** ११·६९२(२), १२·२२, **तरंग**–११·२८० (१), **विश्व–** ११·१५२, ११·२६६, ११·२९०, ११·३८१; **श्रीमूर्त्ति-र्त्ती** ११·५९८, ११·६२६, ११·६५६, ११·६६४, १८·१६६३.

**मूस**—(१) धातूंचा रस करण्याचें पात्र. नातरि लेणेयांचे ठसे । आटौनि गेलेयां मूसे । नामरूपभेदें तैसें । सांडिलें सोनें ॥ १८·११०३. **तातलिये मूसे** ६·२४९, **देहाकृतिचिये**–६·३२७; **गर्भमेदमूसे**, गर्भांतील मेदाच्या मुशींत, १६·१७९. (२) **मुस-मूस—मुसिं** 'ओस्यांत, पदरांत' (राजवाडे), मूर्छना. स्त्रिया ह्मणति विंव(व)सी । बाळें जाति मुसिं । १३·५७२, मुलें भीतीनें आईच्या पदरांत लपतात, ज्ञानदेवी–' बाळें जाती मूर्छीं,' कुंटे–' बाळें जाती मूर्छेसी' १३·५७४; **मूस**—सीणु जाये मूसीं । साणे(सीणें) जेणें ॥ १६·४१५, ज्ञानदेवी, कुंटे–शीण जाय मूर्छी । शिणें जेणें ॥ १६·४१७.

**मृग**—(१) हरिण, जंगलांतील इतर सावजें. काइ मृगीं हीं मृगजळा । भावावें ना ॥ १८·३८६ (१). ३·२११, ५·११०, ११·४३०, १३·१८६, १३·७०६, १३·७३८, १४·१४७. **मृगसेवडी**, हरणाचें चामडें, कृष्णाजिन, ६·१८२; **क्रीडामृग**, पाळींव हरण, ११·१७०; **जीवमृगें** १३·६४. (२) जलनिदर्शक शब्दासह. **मृगांभ, अंभ** पहा. **मृगजळ**—जैसें रश्मीविण उरलें । मृगजळ नाहीं ॥ ३·२३५, तें रश्मिजाळ काढिलेयां । मृगजळ जाये लया । १८·१००९, ८·१४८, ९·६०, ९·८४, ९·१४६, ११·१७९, १३·९०४, १५·२४०, १८·३८६ (२), १८·१३८५; **मृगजळाचेनि उल्हासें** ९·१३६; **मृगजळाची गंगा**—तरावेया मृगजळाची गंगा । डोणी लागि धांवतां द्रांगा । माजि वाहलें

बुडिजे पैं गा। साचें जेविं ॥ १५·२२९; **मृगजलिचे तरंग,** दुरून पहावे, ९·१७१; **मृगजलाचा पूर, पुर-पूर** (२) पहा, **–हेलावा** १४·३३७; **मृगजलें वृष्टि केडति** ११·६६; **रवी आणि मृगजला** १३·११२०; **रश्मि हान मृगजला** १५·४९७; **सूर्या आणि मृगजला,** वेगळीक नसते या अर्थी, १८·२६८; **मृगतृष्णालहरी,** आभासच दाखविते, १३·१०५; **मृगतृष्णिका**—कां नुरे चि सांजोळे । मृगतृष्णिका॥ १५·२८३.

**मृत**—मेलेला. कां मृत ही जीवित लाहे । अमृतसिद्धी ॥ १·७७. **मृता उभेया,** मेलेल्या व जिवंत असलेल्या, १३·१०९५; **मृतावस्था** १८·१०४७; **अमृत** पहा. **मृत्य**—मृत्या जैसी वृष्टि । पीयुषाची॥ १७·३२५, **मृत्या** हा अपपाठ असावा, ज्ञानदेवी, कुंटे–'मृता' १७·३९८. **मृत्यं लोक,** मृत्युलोक, ९·३२५, ज्ञानदेवी, कुंटे–'मृत्युलोका' ९·३२८.

**मृत्यु-मृत्यू**—मरण, प्रेत, यम, सर्वसंहारक ईश्वरी विभूति. **मृत्यु**—मृत्यु उदयाचां परिवरीं। गर्भ गिवसी ॥ ९·४९८. शेषिं सकळातें संहारीं । तेव्हलि मृत्यु ही मीं चि ॥ १०·२५३. आणि रुद्रु जेया वासिपे। मज भेण मृत्यु लपे। ११·३४६. मृत्यु जैसा श्रिंगारिला । १३·४६७. ११·३८३, १३·७०७, १३·७३६, १३·७४१, १३·७५०, १३·७५२, १८·७११. **मृत्युचेनि अवसरें** ८·७१, **–चां...घरीं** ३·२४०, **–चां भागीं** ९·२९५; **आण वाउनि मृत्युतें धरुं** ११·४५५; **मृत्युकथा,** मरणाची वार्ता, ५·९०, **–काग**—जें हें मृत्युकागासि कुरोंडी । सांडिली आहे॥ ८·१३८, मृत्युरूपी कावळ्यास द्यावयाचा उतरून टाकलेला घांस आहे, **–चिंता** १३·७३५, **–चिन्हें** ८·११९, **मृत्युचें...चिन्ह** १८·५६०; **मृत्युजन्में, जन्ममृत्यु-त्यू, जन्मणें** पहा; **मृत्युबल** १३·२३, **–लोक** ६·४५४, ९·३२७, ९·४९२, ९·४९५, ९·४९६, ९·५१०, १४·१०४, १४·२७०; **स्वर्गीं नां मृत्युलोकीं** १८·८१०; **जन्ममृत्युची कातरी** १८·८२१, **महामृत्यु** ११·३४३, ११·३५९; **मृत्युसूचना** १३·५५०. **मृत्यू**—मरतेया मृत्यू दीधली। आयुष्यरिद्धी ॥ १८·१६०, १३·२४. **मृत्यूहूनि** तिख १२·६८; **देहमृत्यू,** शरीरपतन, १३·४९१.

**मृदु**—मऊ, कोमल. **मृदु आणि कठिन** २·११५. **मार्दव,** मऊपणा, जें कालसर्पाचें मार्दव (व)। ८·१४६. **मार्दव**—कां भूमिचें मार्दव । १३·१८०. १६·१७३. **मार्दवें,** हळूच, तैसेनि मार्दवें पाए। भूमी ठेवीतु जाये । १३·२५४.

**मेकलणें**—पाठवणें, टाकणें. निद्रालस्य न मेकली। आसन तैसें ॥ १८·१०२१. **देहातें मेकलीति,** देह टाकतात, ८·६७; **घरी मेकली,** घेतो टाकतो, ३·५९.

**मेघ-मेहु**—प्रचारांतील अर्थी, ढग. **मेघ**—नातरि पवनु मेघासि बिहे । २·१४. मेघु उदारु परि ओसरे। ९·२०४. जैसा न लोटतां क्षणु । मेघु होए नानावर्णु । १५·१११. कां वारिषिया आणिजे मेघु । मेघीं वृष्टिप्रसंगु । १८·३५३. ८·१६७, ९·२३४, १०·५२, ११·९५, १४·३१७, १८·७३१, १८·१५१०. **मेघाचें आंगझील** १३·२१३; **मेघांचेनि तोंडें** १५·११८; **मेघाचेनि मुखें,** समुद्र भरतो, ६·३०७; **मेघांचिं भरणें** १३·५५; **मेघांचा हुडा** ११·६६०; **अनाहताचेनि मेघें** ६·२७९; **वरिषात्यागें मेघ** १६·१३२, **वार्षी विण मेघ** ९·१७१; **मेघौनि धारा सूटति** ६·८७; **सुवायें मेघु सांवरे** १३·११४६; **आखाडमेघ** १६·३६४; **मेघांनदींचि फुळी** १५·११९, **नद-दी** पहा; **मेघरंगें** १३·४७६; **मेघवृंद**—वर्षाकालिचे जैसे। मेघवृंद ॥ १८·६३१. **मेघौडें,** मेघांचा समुदाय, वादळ, तेथ मनाचें मेघौडें विरे। ६·४६६. **मेहु**—मेहु चातकासि रिचवी । १५·२०. **मेहुडें** ८·९९; **मायारात्रिचें काळें मेहुडें** १४·१७३, **वरिखाकालिंचें** – ११·१९३; **तमाचीं मेहुडीं** १०·१२७; **मेहो**—येणें सात्विकें रसें। जंव देहिं मेहो वरिसे। तंव आयुष्यनदी उससे। देहाची देहा ॥ १७·१३१.

**मेच**—'प्रीति अथवा आवड' (हंस कोश). तैं मधुरिं रासिं घडे। मेचु तेया॥ १७·१२४. १७·१६३.

**मेचणें**—'आटोपणें' (हंस कोश); मोजणें, मानणें, जमेंत घेणें (दाते). बुद्धि मेचुवे ना ढोंडी। १४·२४५, बुद्धि जडपणांत धोंड्यालाही जमेंत

घेत नाहीं, मागें टाकते, बुद्धि अत्यंत जड होते या अर्थी.

**मेंढ्र**—शिश्न. गुदमेंढ्रा आंतौतीं । च्यारि चि आंगुळें निरुतीं । ६·१९५, गुद व शिश्न यांमधील जी बरोबर चार बोटें जागा आहे.

**मेण**—प्रचारांतील अर्थी. ६·२४९.

**मेद**—चरबी, सं.वा.श. **सप्तधातु** पहा. मेदाचे पर्वत फेडी । ६·२१८. **गर्भमेद्मूसे** १६·१७९, **मूस** पहा.

**मेदिनि-मेदिनी**—पृथ्वी, जमीन. **मेदिनि**—जें मेदिनियेची मेदिनी । १३·९२७ (१), जें (ब्रह्म) जमीन होऊन पृथ्वीरूपांत दिसतें. **मेदिनी**—आइकैं सकळदोषतृणीं । अंकुरैजति मेदिनी । १५·२५९. ३·१८७, १३·९२७(२).

**मेध**—यज्ञ. **अश्वमेध** १७·४१२, १८·१५२५; **मेध्य**, यज्ञांत हवन करावयाचे पदार्थ, पवित्र पदार्थ, तोंडा आवडे तें मेध्य । ऐसा बोधु ॥ १८·५५७; **अमेध्य**, अपवित्र या अर्थी, **अमेध्योदकाचा बुडडा**, विषयांस उद्देशून, १६·३१५.

**मेधा**—बुद्धीची धारणा शक्ति, बुद्धि, इच्छा. पैं स्थैर्यताअनुजिनी । मेधा ते मीं ये जनीं । १०·२५६, स्थैर्यता अनुजिनी असा पाठ तोडावा, ज्ञानदेवी, कुंटे–'स्वहिता अनपायिनी,' स्वहिताला बाधक न होणारी, १०·२७९. १४·१८३, १७·७६. **मेधारस**, धारणारूपी रस, १५·१८५; **तपभक्तिमेधा** १८·१४९४. **मेधावी**, बुद्धिमान, **भक्तु मेधावी तपिया** १८·१४९५.

**मेर**—मर्यादा, सीमा, तीर. परि भोगाचिये अइली कडे मेरे । ९·५१. जे नादाची पैल मेर । परब्रह्म जें ॥ १३·१०६८. तरि ब्राह्मण करूनि धूरे। क्रियादिक पैली मेरे । १६·९३. **आगरा मेरे** १८·४३५, **मरणाचिये**–८·७३.

**मेरु-मेरू**—पुराणांतील सोन्याचा पर्वत, मध्यस्थानीं असणें, स्थिरता व उंची या विषयीं प्रसिद्ध. **मेरु**—जो सुनिश्चलु आंतरीं । मेरु तैसा ॥ ५·१९. मेरु पसणें दिसाल । ६·९२. शिखराथिलेयां सर्वा उपरि । मेरु तो मीं ॥ १०·२०६. तो मध्यस्थु गा गिरिवरा(रां) । मेरु जैसा ॥ १५·४६९. ११·६६५, १२·२०२, १३·३४७, १३·१०१७, १४·१६३, १४·३३७, १८·८७२. **पाखांचा मेरु जैसा**, अर्जुनाच्या रथास उद्देशून, १·१३९; **मति मेरु होये**, स्थिर होते, १३·६११; **जैसें पन्हरेनि मेरुतें मढिलें** ११·२१७; **जरि मुंगी मेरु उल्लांडी** ७·९२, **मुंगिये मेरु नोलांडवे** १३·२५९; **मेरु-मंदार आंदोलत**, स्थिर असून सुद्धां डगमगले, १·१५५; **महामेरु** १८·१७६०. **मेरू**—नातरि मेरूवरि सपूर । परमाणु बैसले ॥ ११·२३९, विश्वरूपापुढें सर्व सृष्टि मेरूवर बारीक कण पसरल्यासारखी दिसूं लागली. **मेरूपासौनि थोरें** ६·३६८.

**मेल**—मेळ, जुळवणी, समुदाय, साधन, संगति. कां स्नेह-सूत्र-वन्हि । मेलु एकी स्थानीं । १३·१५४. ६·११४, ६·३८८, ११·३७४, १३·३५८, १६·२१३, १७·५३, १८·६६४. **आलिंगन-मेळीं** ५·१३२; **ज्ञातिगोत्राचा मेलु** १६·३५६; **पात्रमेलु** १७·२८३; **मुखमेलेविण**, पिलांच्या तोंडाला तोंड न लावतां, १३·१४०; **येरयेरांचां मेळीं** १३·१०४६; **रविचंद्रा राहु-मेलु** १७·२७१; **सुसंगाचा मेलु** १८·९९४, **सृष्टिचा**– १०·२५२; **मेलिं-ली**—**संचरौनि सुये मेलिं**, येथें मौलिं पाठ असणें संभवतें, १३·१००४, ज्ञानदेवी, कुंटे–'मैळीं' १३·१०१०; **धरी मेलीसि करणें**, घेणें व सांठवणें, १३·३६३, ज्ञानदेवी–'धरी मोकळी' १३·३६४. **मेलें**, साधनानें, बळानें, त्या त्या योगानें. पैं मूर्त्तिचेनि मेलें । तो मूर्त्तु चि होउनि खेले । ५·८१. ५·९९, ८·३८, १३·४६३, १३·१०२७, १५·३०६, १८·३६८, १८·१०१७; **इंद्रियांचेनि मेलें** १३·४७७, **इंद्रियवृत्तिचेनि**–१३·८४; **स्थैर्याचेनि मेले(लें)** ६·३८२; **आंगमेलें**, स्पर्शाच्या योगानें, १८·१२४८, **मर्याद**–८·२२८, **मर्यादा** पहा, **स्त्रीपुत्रादि**–१३·७६७.

**मेलणें**—(१) एकत्र करणें. जे हे मेलौनियां मेले । फूगत वीरवृत्तीचोनि बलें । ११·४५४. **हाता फली मेलौनि** ६·४१३. (२) मलीन करणें. **वाचा मेलैल**, हा **मैलेल** चा अपपाठ असणें संभवतें, ९·५१९, ज्ञानदेवी–'मैळैल,' कुंटे–'मैळेल' ९·५२४. **मैलणें** पहा.

**मेलवणें**—एकत्र करणें, मिळवणें, मिसळणें,

जुळवणें. ऐसीं अक्षरें चि रसिकें । मेळवीन ॥ ६·१४. इये शरीरि(रिं)ची माती । मेळवीन तिये क्षिती । १३·४३०. दंभमानाचा मेळावा । मेळवीति ॥ १६·३२२. ३·२०१, ७·६४, ७·१०३, ८·१३३, ११·४२९, ११·४४२, १३·४१६, १४·३९, १६·३४५, १६·४६०, १८·५५, १८·८१४, १८·९९०, १८·११५०, १८·१५०२, १८·१७६३. **कुमारें चि सुलग्नीं मेळविलीं** १६·३०१, कुमर पहा; **खागें मेळवी**, साधकाला आपल्या मुक्कामावर ईश्वर आणतो, १८·९४९; **डांगा मेळवितां** १५·२२८; **दूधा पाणी मेळउनि** १३·८४९; **मनेंसिं करणें योग-धारणें(णे) मेळविलीं**, मनासह इंद्रियांना योग-धारणेला लावलीं, १८·१०१२; **लोकत्रया श्रवणसुखा मेळविलों** १३·८५४; **हे(दे)शकु मेळविजे**, दहा आवरणाग्नि जोडावे, ११·२३५, दशक, सं. वा. श. पहा; **मेळवणी** १७·१७८, **रसांतराची**–१७·१३९; **मेळवणें—अपारु लाभु मेळवणें** १८·८७७.

**मेल्हावणें**—संयोग (राजवाडे). तरि भयदुःखा होआवें मेल्हावणें । ११·३१५, ज्ञानदेवी, कुंटे–तरि भयदुःखासि कां मेळवणें । ११·३२०.

**मेळा-प-वा**—मेळा, समुदाय, जमाव. **मेळा**–जे हे मेळौनियां मेळे । ११·४५४, समारंभ (हंस कोश). १६·३९४, १८·३४७. **जळधरांचा मेळा** १३·१५३; **पुण्यांचा**–८·२६०; **यमदमाचे मेळे** १३·२४. **मेळाप, सज्जनाचां मेळापिं** १८·१५११; **मेळापक—तत्वमेळापकिं** १३·९९. **मेळावा**, वरील अर्थी व मेळ, संयोग याही अर्थी; रथांगा(गां)चा मेळावा । रथु म्हणिजे पांडवा । १३·१५१. १·१९३, १२·८९, १३·९६२, १६·३४०, १८·१०३५, १८·१५०६. **अखरांचा मेळावा** ७·१९४, **इंद्रियांचा**–१८·४९०; **उपद्रवांचे मेळावे** १३·३४३; **जूझाचा मेळावा** ११·४७०, **दंभमानाचा**–१६·३२२, **पांच**–३·२०३, **पांचमेळावेयाची** १३·१०६३, सं. वा. श. पहा; **तपोव्रतांचा मेळावा** १३·५१७, **द्वादशादित्यांचा**–११·२३३, सं. वा. श. पहा, **यमदमाचा**–१८·७७८; **रुद्रादित्यांचे मेळावे** ११·३२७; **विजूंचा मेळावा** ११·२३५, **सकळा-थींचा**–१५·९, **सतिसां सतिसांचा**–१३·१४९; **दुर्मेळावे** १८·६५.

**मैत्र-त्रि**—मित्र, आवड, सख्य. **मैत्र**—इष्टा मैत्रा दुरावी । १३·७९२, मित्र या अर्थी. जरि मैत्रें चि वैरी मरे । ४·२२०, मित्रभाव दाखवून या अर्थी. **जीवाचें मैत्र** १८·१७७३, **पण्यांग-नेचें**–८·१४४, **भक्तिकथेसि**–१२·२३२, **संव-चोरां**–१८·७९४; **मैत्र केलें** १८·७५३; **अति मैत्रें, अतिमैत्रें** असा पाठ अत्यंत मित्रभाव दाखविणारीं या अर्थी घ्यावा, ११·१२९. **मैत्रि-त्री**, मित्रभाव, जिव्हाळा, **मैत्रियाचें अर्धबिंब**—जंव मैत्रियाचें मावळे । अर्धबिंब ॥ ८·११३, ॐकाराच्या अर्धचंद्राकृतींत दिसून येणाऱ्या अर्धबिंबांत मात्रात्रयाचें ऐक्य झालें असतां, हा अर्थ बरोबर वाटत नाहीं, **मावळणें** पहा; **मैत्रियेची कळा** ४·२८, **मैत्रिएचा कुवांसा** ६·१२५; **मैत्री** १३·५९८; **कपट–गुर्विणी मैत्री** १८·१४९३, **येकपणाची**–१२·१४८, **संव-चोरां**–१८·२४८; **वैरी कां मैत्रिया** १८·१०६७.

**मैळणें**—मळकें होणें, दूषित होणें. पैं मूर्तिचेनि मेळें । तो मूर्तु चि होउनि खेळे । परि अमूर्तपण न मैळे । दादुलेयाचें ॥५·८१. आणि जनाचेनि पाएरवे (वें) । मैळे चि ना ॥६·१७२. परि आकाश धूमें न मैळे । तैसा असे ॥ १३·१०२७. **पन्हरेपण न मैळे** ८·३८, **बोधु न**–१४·३०७, **मळु जेणें**–१६·४१६; **बोलतां वाचा मैळैल (मैळेल)** ९·५१९; **सरे ना मैळे** १२·४५. **मैळ**, मळकें, **हें चोख हें मैळ** १६·२४८, **हें मैळ हें चोख** १३·८६; **मैळा**—कनकाचेया फळा । आंतु माजु बाहिरी मैळा । १८·६५५, **मैळी... शुद्धत्व** १७·१९५; **मैळणें—शुद्ध प्रमेय मैळणें**, शंकेचा परिणाम, १३·३२३.

**मोकट-मोकाट**—स्वैर, मोकळा. **मोकट**—वसो जैसा मोकट । १३·६९६, मोकट हा मोकाट चा अपपाठ संभवतो, ज्ञानदेवी–'मोकाट,' कुंटे–'मोकाट' १३·६९८. **मोकाट**—मोकाट कोणां नांतुडे । १३·६९८.

**मोकलणें**—मोकळें करणें, सुटें करणें. परि जें पांचै पालव मोकलिले । मजप्रति ॥ ११·६३, देवा, तूं माझ्यासाठीं आपले पंचप्राण मोकळे केले आहेस,

मला अर्पणच केले आहेस. जो न मोकली मारुनि। जिवों नेंदी उपजौनि। १८·१०४५, जो देहाहंकार मारून (देहान्त करून) मोकळें करीत नाहीं तर पुनः जन्मास घालतो, पुनः जन्मास घालून जगूं देत नाहीं, पुनः मारतो. **मोकलुनि घालावें**, चित्त स्थिर झालें नाहीं तर सुटें सोडावें, ६·३८०, यावर ६·३८१ पहा. **मोकलवणें**, सुटका करणें, आणि संसारदुःखा मोकलवणें। विकृतीविण॥ ४·२१९, येथें घालवणें या अर्थी, कुंटे–'संसार-दुःख मूळवणें' ४·२२२. **मोकला-ली-लें**, सुटा-टी-टें, स्वैर, अफाट, कांहीं निर्बंध नसलेला-ली-लें. सुंदर आंगिं लेणें न सूए। तैं तो मोकला श्रिंगारु होये। १८·१७१७, आणि जेयाचां मनिं गांठि। वरि मोकली वाचा दीठि। १३·६६७, मग मोकलें जेथजेथ जाइल। तेथौनि नियमू चि घेउनि येईल। ६·३८१, **मोकलें अंतराल** १६·१६७, **मोकली गोठि** १८·१६७५; **मोकलां हिं चवडां**, पंजे मोकळे असतांहि, १८·३९०, **मोकलेयां चवडा** ६·७८; **मोकली चवरी** १८·३२५; **मोकलें पेटवण** ४·१३३; **मोकलीं वोवीफुलें** ११·६९८; **मोकले शाखिये** १८·८६५; **आंगाचें लेणें मोकलें मिरविसि** १७·७; **पांचै पालव मोकले**, पंचप्राण मोकळे असतात, १३·३६५; **भ्रुकुटी मोकलिया सांडिलिया**, रागानें भिंवया-सुद्धां वर केल्या नाहींत, १३·२७२; **मोकला ना बद्धु** १३·११०५; **गुंफिलीं कां मोकलीं** १८·१७१९; **मोकली**, मोकळीक, मतभेदाचें स्वातंत्र्य, **शास्त्रां मोकली** १७·२६; **मोकळ(ल)-वांदि**, निराशेनें वाटणारी सुटका, १·१५७, ज्ञानदेवी–'मोकळवाडी', आश्रयाभाव, कुंटे–'मोकळवादी,' आश्रयरहित, १·१५७.

**मोक्ष**—संसारांतून सुटका, जन्ममरणाच्या फेऱ्यांतून सुटका; धर्म, अर्थ व काम या नंतरचा चौथा पुरुषार्थ; परमानंदाची प्राप्ति. जैसा पापियांचां ठांइं। मोक्षु न वसे॥ २·३४५. २·२३३, ३·४३, ३·८०, ४·२२१, ६·४३६, ७·८७, ११·९९, १२·१७४, १३·१०६९, १४·२८२, १५·३५, १६·१५२, १७·३१८, १७·३६२, १८·११२९, १८·१६७३. **मोक्षु फुका** १२·१७६; **मोक्षाचिया आंगा** १२·१८४, **–चा एकांतु** ६·३२१, **–चां ऐली द्वारीं** १८·८९२, **–चा कलशु** १८·१२१४, **–चां गावीं** १७·३१९, **–चा प्रसंगु** १६·४५०, **–चिये भेटी** १७·३२३, **–ची योग्यता** १८·९०१, **–वारी** १८·६७, **–सींव** १८·८९५, **–सोडि बांधि** १२·२१८, **–चा सौरसु** १५·३२; **मोक्षाचा आघवा होउनि ठाके**, संसार सर्वज्ञांनीं मोक्षासारखा सुखकर होतो, ८·१९६; **मोक्षास हीं काम सरे** १८·९९७; **मोक्षु जोडे** १८·७०४; **–ठेविला ऐसा जोडैल** १८·७००, **– तंव त(तै)चें चि ठेवला आहे** ६·४३९; **मोक्षीं प्रवर्त्तलेयां** १८·१०३९; **मोक्षु हाताइता होये** १४·४८; **मोक्षोपादान** १८·१२३७, **मोक्षउपाय** १८·१२२४; **मोक्षकर** ५·१५, **–काम** ४·१४६, **–चक्रवर्तिचें अग्राहार** १६·२०५; **मा(मो)क्ष, तीर्थिचें मुगुतें** ७·४८; **मोक्षदान** १८·१४२६-**मोक्षुधर्मु** १८·१५१४; **मोक्षनिधान** १६·८७ **–पद** ६·४३०, १८·१४२७, **–पर्वत** ५·३२, **–फल**, फल पहा, **–मय** १५·२४, **–मार्ग** १६·२५९, १६·४३७, **–रूप** १८·१४४१, **–रेखेचा आवो** १८·३८, **–लक्ष्मीचें भुवन** १८·५३४, **–लाभ** १८·८९७, १८·९१८, **–विजयश्रिये वरैतु** १८·१०४३, **–श्रियेचां पाटिं** ९·४६, **–सिद्धी** १८·६९८, **–सुख** ३·१५१, ६·११५, १६·२६३, १८·१४५२, **–सुरवाडु** १८·९२२, **–हेतू** ४·८२; **धर्ममोक्षाची शाखा** १५·१९२; **बंदिं मोक्षु** १६·४; **बंधमोक्ष** १८·३१७; **वैराग्यमोक्षद्वारीं** १८·८९६; **इहिक...मोक्ष** २·२३३; **भोग व मोक्ष** यांचे संदर्भ ११·५९८, १२·८१, १५·८; **स्वर्ग मोक्ष** १०·१२२, **स्वर्ग**–१०·२२५; **स्वमोक्ष** १७·३५.

**मोगर**—पायदळ (हंस कोश), निवडक लोक (राजवाडे), मुद्गर (कुंटे). **पद(दा)तींचे मोगर**, ११·३९०, कुंटेंचा अर्थ ग्राह्य वाटतो.

**मोघ**—व्यर्थ. ९·१७१. **अमोघ**, निष्फळ न होणारे, ६·४४१.

**मोचक**—सुटका करणारें, मुक्ति देणारें. जैसें कर्म चि मोचक। आपैसें असे॥ ३·७९. १८·१४३०. **भवबंधमोचक** १७·३०८.

**मोट**—(१) गांठोडें. कां लेयावेया चोखट । टीक भांगार एकवट । घालूनु बांधली मोट । गळां जेवि ॥ १७·३४५. (२) किंचित्. **मोट वलला** किंचित् वांकला, ११·४८२, कुंटे–'वळली मोट' ११·४८७, वरील (१) अर्थी.

**मोटक**—थोडें, लहान, एवढेंसें. तैसी ते कुंडलिणी। मोटकां औठे वलणीं । अधोमुख सार्पिणी । निदैली असे ॥ ६·२२३. ६·४५०, ९·४९, १०·१४४, १३·८१७, १४·१४४, १७·३६५, १८·१०२०. **मोटके येवी करीं पाहिले दीठी,** एवढी मोठी भूतसृष्टि पण विश्वरूपाच्या हातांत लहानशी दिसली, ११·३४२, हा पाठ व अर्थ संदर्भांत बसत नाहींत, या पाठांत अर्थासाठीं **मोटकी** व **पाहिली** अशीं रूपें घ्यावीं लागतील, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील पाठ संदर्भांत बसतात, ज्ञानदेवी–'मोटकी येवी पाहिली दिठी,' कुंटे–'मोटकीयेचि पाहिली दिठी' ११·३४७, ही भूतसृष्टि तूं अंमळ (वांकड्या दृष्टीनें) पहातांच ती दुःखकालिंदीच्या तटावर (करपलेलें) झाड बनून राहिली; **मोटकें आइकिलें** ११·४८१, **मोटकी निंदा आइके** १३·६६५; **मोटकें कले,** पुढची गोष्ट थोडीशी कळते, १३·५७८, **–देखिलें** ११·३७६, **–रिगे** १४·१५९; **खलाल मोटका सोसे,** अंमळसा सुकला, आटला तर, १५·४६६; **ज्ञान ज्ञातेया मोटकें डा(दा)वी ना जंव,** जरा दाखवितें न दाखवितें तोंच या अर्थी, १८·४७६; **मोटकें म्हणे ना तंव,** थोडेसें सांगतो न सांगतो तोंच, १८·१५८४; **युगसहस्र मोटका पाहे,** युगसहस्रांची रात्र थोडीशी उजाडते, ८·१६२.

**मोटा**—मोठा, नेहमींच्या अर्थी. **मोटे सायास** ८·२४३; **सानें मोटें** ७·९.

**मोडणें**—(१) तोडणें, नाहींसें करणें, बंद करणें, फेरफार करणें, थांबवणें. इंद्रियांची कसमस मोडे। ६·१८८. पाखांडाचे दरकुटे । मोडीं वाग्वाद अव्हांटे । १२·१४. तो वाढौनि मोडला । भेंडु जैसा ॥ १८·५७२. जें खलांची वांकुडें मोडे । १८·१७७३. ३·२४७, ५·७८, ६·२२६, ६·२२७, ८·६५, ८·९९, ८·१०९, ९·३७१, ९·४०४, १३·६३, १३·११४, १३·२१९, १३·२३०, १३·२३१, १३·२५६, १३·२६५, १३·४८४, १३·५८२, १३·१०५६, १४·३५६, १५·३५६, १६·२२६, १८·२८५, १८·६१३, १८·६४३, १८·११०१, १८·११६५. **अनादिपणें नोमोडे** १५·३१८; **आकार न मोडतां** १८·५०; **आंगिचें तारुण्य मोडावें** ११·४८८; **आंगें जीवें मोडौनि** १८·८९०; **आड मोडूनि बोलें,** पडदा दूर करून सांगतों, १८·१४३५, कुंटे–'आड मोडूनि बोले' १८·१४४५, विरुद्ध मत खंडन करून गीताशास्त्र सांगतें, हा पाठ व अर्थ ग्राह्य वाटतात; **आण न मोडी** १३·७९९, १८·९५५; **आशा मोडे** १८·९२१; **करचरण मोडलें(ले)** ८·१११, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील 'करचरणीं' पुढें **मोडलें** पाठ बसतो, ८·११३; **खुण न मोडे** ११·२९०; **गूढपण...मोडो** ९·३७; **घृताचें थिनलेपण न मोडितां** १४·३७५; **तागा मोडेल,** संबंध सुटेल, ३·२६४, कुंटे–'थारा मोडेल' ३·२६९; **त्राये मोडित जाये** १३·१२८; **–मोडूनि** १७·६४, **–मोडे** ६·२११, **थाउ–** १४·१४; **थारा मोडला** ३·११०, **–मोडूनि** १८·१०४६; **दाघु मोडे** ११·२२०; **द्वैत न मोडितां** १८·१४१२; **पवाडु मोडौनि** ११·२८३; **पैकु न मोडे, पैकु** पहा; **प्रवृत्तिचे पाये मोडी** १३·१६९; **बगा मोडता(तां)** ११·४६३; **बीक मोडे** ६·१५, **बीज–** १७·५९; **भांगाराचा रवा मोडूनि** ११·६३४; **भेदु मोडे** १८·१५७८, **मनपण–** १३·३०१; **मार्ग मोडथि** ६·२४३, **मार्गु मोडे,** वाट नाहींशी होते, ४·२०३, ६·२००; **लल्हाटिचें लिहिलें न मोडे** १८·१०१; **वाट मोडली** १३·८६८, **–मोडे** ९·९५, **–मोडोनु** १५·२८८; **शशविषाण मोडावें,** अशक्य बाबतीचें उदाहरण, १५·२१३; **संचलु न मोडितु** १३·२४५; **सुख न मोडे** ५·८, **सोनेपण न–** ९·७६, **सौरसु–** १८·१२०७, **स्वतंत्रता न–** ४·४५; **मोडतु मांडतु** १५·१३७, १८·१५३८, **मोडितमोडितां** १८·१०९२; **घडतां मोडतां** १८·४३३; **घडे मोडे** १५·१३३; **वाढौनि मोडौनि** १४·२७२; **आंगमोडामोडी,** आळसानें पिळोखे देणें, १४·१७९; **आडमोडी** १३·६९३

–डीं १३·२२७, कुंटे–'आड मोडविलीं' तोडून टाकलीं, १३·२२८ आड पहा. (२) मोड येणें, फुटून वर येणें. सोहंभावमहुरें । मोडौनि आलें ॥ ६·१४९. ९·४३४; **मोडौनि आलें** ११·२६५, **–ये** ८·२१; **मोडवणें**, हिरमुसला होणें, **मोडवला ठाए** १८·१५९४, ज्ञानदेवी, कुंटे–'मोडावला ठाये' १८·१६१४. **मोडी**, पद्धत, आकृति, मुरड, **कृष्णाकृतिचिया मोडी** ११·६४१, **प्रणवाचिया–** ६·२७६; **अमोडी**, सलग, अखंड, ६·१८२.

**मोद्**—आनंद. आनंदमोदबहल । सात्विकाचें मुकुल । १५·६, येथें सुवास. **मोदक**, (आनंद देणारा) एक खाद्य पदार्थ, १·११.

**मोद्ला**—मातीचा गोळा. मातिये विण मोदला । १८·८११.

**मोल**—किंमत. कां येकें मोल अपार । वेचुनु बांधलें ढवळार । १७·८८. **परावेया मोला**, दुसऱ्याच्या किंमती वस्तूची, १८·६५१; **पृथ्वियेचे(चें) मोल** ६·९३; **ना मोलें तरि उणें**, किंमत कमी होत नाहीं, १८·१७१६; **मोला तरि सरिसा** ७·२३; **मोले(लें) तीर्था जाये**, पैसा खर्चून तीर्थयात्रेला जो जातो, १८·१६५; **मोल देंतां** १८·५९६; **मोलें पुरुषु**, विकत घेऊन, १८·९४२; **मोलें वणिजूनि घेंति**, पैसा खर्चून विकत घेतात, १८·२३३; **मोले(लें) वीकी** २·२५४; **मोल वेचणें**, द्रव्य खर्च करणें, १७·३०५; **कूडा थोर मोला न सरे**, मूळची वाईट वस्तु चांगल्या किंमतीला विकली जात नाहीं, १३·४७०; **मोलमान केलें काइ**, किंमतीचा अंदाज करतां येईल काय?, १५·३६३.

**मोह**—भुरळ, भ्रम, प्रेम, माया. मग ते मोहाची तुगुटी । नाचों लागे ॥ ६·१२१. मोहो अज्ञाना प्रमादा । एयां मिळलेयां दोषवृंदां । १४·२६५. २·२७, २·५५, ११·४९, ११·६६, ११·६८, १२·१७०, १५·५५१, १८·१५४४, १८·१५४८. **मोहाचां अवसरीं** १४·३२९, **–चे कांदे** १८·१५४९, **–चि पैली थडी** ७·९२, **–ची मदवी** १८·६८७, **–चेनि महापूरें** ७·६९, **–चा माहारोगु** १४·४०८, **–चें माहियेर** १३·२६१, **–चेनि सांगडें** १३·२५१; **अहंमानाचेनि मोहें** १६·२३३, **आपुलेपणाचेनि –** ९·१७, **उपमन्युचेनि –** १८·१७६७, **चलवलेचेनि –** १५·३४१, **स्वज्ञानजनितें –** १८·१५३२; **मोहें आडाइले** १७·१०२, **–उठी** ११·४०, **–कवलिला** १·२००, **–लां** ३·१०, **–सैरा धांविजे** १५·३२१, **– नासिला** ६·६, **–निष्टंकिति** १५·३४८, **–भूलला** १५·४२३, **–मानिजे** ३·२४४, **–माल्हां(ल्हा)थिलें** १४·२५१; **मोहां मूके** १५·५४९; **मोहो वाढवी** १४·१०७, **–वाढीनला** ४·२५, **–वाढे** १६·३६८, **–वाढों लागे** १६·३६७; **मोहाते-(तें) सांडिसी** २·२८०; **मोहें हृदय व्यापलें** १·१९८; **मोहांधकारु जाइल** ४·१६९; **मोहार्णवगवाक्षें** ११·६१, **मोहार्णवीं पडिलों** ११·३२४; **मोहफणिग्रसित** २·७४; **मोहबलें मनोधर्मे** ९·१५४; **मोहभ्रमें गीलिजे** १४·३२८; **मोहमदिरा भ्रमले** ३·१९३; **मोहमलें न लिंपे** ३·७१; **मोहमहिषभुक्ती** १८·१६४५; **मोहोरात्रिची धर्मदिवी** १६·६४; **मोहवनिची माधवी** १३·९८६; **अर्जुनमोहें** ५·१७१; **देहमोह** १३·१०२८; **द्वंद्वमोहो** ७·१६२; **महामोहातें गिवसी** १३·१७१; **महामोहें ग्रसिला** २·७०, **–निर्भरु** २·५; **मोहमान** १५·२५५; **लोभमोह** १६·२६४; **शोक मोह** ७·२०; **व्यामोह** पहा; **मोहादिक**—तम मोहादिकीं। वर्तत असे ॥ १४·३४१.

**मोहणें**—मोहांत पडणें. **मोहित** १·८५, १·१९२, ५·१७४; **मोहन**, **मोहविणारें**, १३·९९०, **मोहनास्त्र** ११·१९१, ११·४६४, १४·१७५; **मोहिनी**—**विश्वमोहिनी** १·२१.

**मोहरणें**—पुढें होणें, चळणें, वळणें. प्रवृत्ति मागौति मोहरे । समाधि ऐलाडि उतरे । ६·१९१. आकाश हें ओसरो । पृथिवी वर वीरो । परि नेणे मोहरों । चित्तवृत्ती ॥ १३·४९४. मग मन बुद्धि मोहरी । अध्यात्मज्ञानिं ॥ १३·६१८. **मोहर**, पुढें, बाजू, दिशा, मार्ग. घ्राणाळ हिरव चारिवें गोरुं । विसरे मोहर धरुं । १३·३१४, घराच्या वाटेला लागावयाचें विसरतें; **एया चि मोहरा**, आयुर्वेद याच धोरणाचा आहे यास उद्देशून, १३·२२४; **एरी मोहरे**, त्या पोपटाच्या पुढें नळी फिरते यास

उद्देशून, ६·७६; एरी मोहरा, तीं ज्ञानपदें पुढें उलट केलीं असतां अज्ञानाचें रूप उघड होतें, १३·८४७; कर्माअकर्मांचेया मोहरा १६·६९; त्वचेचिया –, त्वचेकडे वळवून, १५·३२४, माझिया – ९·३५६, माझेया – ९·३९६, स्फीतीचेया – १३·६५८; अभ्यासाचिये मोहरे ठाके ६·३५५, अभ्यासाचिए मोहरे लाविलें ६·४१८; जन्मलेयानि मोहर नाहिं, जन्मलेल्यांना दुसरी गतीच नाहीं, ११·४१४; तिनि मोहरा जालिया, आहार तीन प्रकारचे कसे झाले यास उद्देशून, १७·११९; तिया मोहरा न व्हावें १६·४२०; तूझी मोहर धरूनि ११·३२३; तेया मोहरा न व्हावा, मनोरथास फळाच्या वाटेकडे पाहूं देऊं नये, १८·१६९; विश्व हें मोहरे लावावें, जगाला सरळ मार्गाला लावावें, ३·१६९; विश्वरूपाचिया मोहरा चालावेया ११·६७३; येरी मोहरा ठाके १५·४१; मोहरें— विजयलक्ष्मी एक मोहरें। केलें त्रैं(त्रे)तीं॥ १०·२३२, त्रेतायुगांत रामानें विजयरूपी लक्ष्मीला आपल्याकडे वळविलें; मोहिरें—कृत्यजातावें मोहिरें। सारिजति ॥ १८·१६८, पुढें आलेलें कर्तव्य करीत जावें, हा संदर्भ बुद्धिबळांतील मोहऱ्यांस उद्देशून असणें संभवतें, ज्ञानदेवी –'निरहरें सारिजती' बुद्धिबळांतील मोहरें, १८·१७०; मोहोर— निगिजे पूर्विली मोहोरा। किं येइजे पश्चिमाचेया घरा। ६·१५९, परमपुरुषाची मोहोर लावि(विं), परमपुरुषाकडे ध्यान लाव, ८·८१; मोहो रे (मोहोरे) जालेयां वोघा, मार्गानें आलेल्या ओघाचें, १८·५८१, ज्ञानदेवी–'मोहरे जालया वोघा', कुंटे–'मोहरें जालियां वोघा' १८·५८४.

**मोहलणें**—मोहांत पडणें. वांचूनि मूर्खांची गोठि काइसी। एथ मोहलले गा क्रांतदर्शी। ४·८७.

**मौ–मौआल–मौवाल**—मऊ, मृदु, कोमल. मौ —कां वसंतिचा स्पर्शे। मारुतु मौ ॥ १६·१६८. १६·१२२. मौपणें १६·११६. मौआल—ते वेंचिति मनें मौआलें। चकोरतलगे(गें) ॥ १·५६. मौवाल—आकारें नव्हंति ढगलें। स्पर्शि अति मौवालें। १७·१२६. १६·१६७, १६·१६९. चोख होउनि मौवाल १६·११४; साच आणि मौवाल १३·२६९; मौवालें, मऊपणा, १४·२४५.

**मौढ्य**—मूर्खपणा, मूढ पहा. सर्वेंद्रियां जाड्य। मना माझि मौढ्य। १४·१७८. केवल मौढ्याचेनि जीवें। जियाला जो ॥ १८·३८७. १४·२४६, १६·३२४, १६·३८९. मौढ्यमदाचेनि बळें १६·३८१, ज्ञानदेवी, कुंटे –'मौढ्यमद्याचेनि' १६·३८३; मौढ्यमद्याचें पात्र १४·१७५.

**मौन**—मुकेपणा, न बोलणें. आघवेयां गूढां। माझि मौन मीं सुहाडा। १०·२७४. मूंकेनि घेतलें। मौन जैसें॥ १३·२७९. तें मौन तंव गोमटें। स्तवन माझें ॥ १८·११४७. २·८३, ११·६०७, १२·२०७, १२·२०८, १७·१५, १८·२४, १८·११४८. मौनाचिया मिठिया वर्णिजे, मौन धारण केलें असतां ज्याचें वर्णन केलें जातें, १६·१९; सिंधु मौनें घेउनि ठांति, अगस्तिऋषीला पाहून, १८·७३२.

**मौल**—शिखर. आशाढिचेनि जलें। जैसिं झिरपांति मौलें। १३·५६६. मौली १७·७९, हा अपपाठ असावा, ज्ञानदेवी, कुंटे–'मैळीं' १७·८०.

**म्लेंछ**—अनाचारी, दुर्जन. म्लेंछांचें(चे) वसैठे १७·२९३; म्लेंछधर्मांचां डोंगरीं बोलविलेंसे, म्लेंछधर्माच्या डोंगरावर बोळवण केली, घालवून दिलें, १८·५४७.

## य

**यकसर**—येक पहा.

**यक्ष**—एक देवयोनि, कुबेराचे सेवक. यक्षरक्षगणांआंतु (यक्षरक्षगणां आंतु)। शंभूचा जो धनवंतु। तो कुबेरु मी अनंतु। ह्मणता जाला ॥ १०·२०५.

**यजणें**—यज्ञहोमादि करणें, पुजणें. जें यष्टा यज्ञ यजावें। हें हविमंत्रादीक आघवें। तो देखे अविनाभावें। आत्मबुद्धी ॥ ४·११९ (२). ३·९१, ३·१२०, ४·१२३, ४·१४०, ७·१४५, ९·२२७, ९·३४५, ९·३९४, १६·९४. ज्ञानयज्ञें यजित सांते ९·२६२; मातें यजिलें ९·३०९, – यजूनि ९·३१५; यजिलेया ही मातें चुकउनि, माझें आराधन केलें असतांही

मला विसरून, ९·३०७; मद्याजी, मला पुजणारे ९·३६२, ९·५१३; **यजिता**, यज्ञ करणारा, ४·१४८, ९·२४३; **यज्वा**, ज्यानें यज्ञ केले आहेत, येथें यज्ञ करणारा, संयति चि सक्स्रुव। जीउ यज्वा ॥ ९·२४१, संयम (व शांति) हींच यज्ञपात्रें आहेत व जीव हाच यज्ञ करणारा आहे; **यष्टा**, याच अर्थी यज्ञ करणारा, ४·११९ (१); **याज्य**, यज्ञास योग्य, यज्ञाचा विषय, जें भजतेयांसि भज्य। याज्ञिकांचें याज्य। ६·४७५.

**यजन**—यज्ञक्रिया, पूजन. ह्मणति संसारीं जन्मिजे। यज्ञादि यजन कीजे। २·२८६. यजन करिति पवित्रीं। इंद्रियद्रव्यीं ॥ ४·१२५. तेथ अज्ञान सरौनि जाये। आणि यजिता यजन हे ठाये। आत्मसमरसें न्हाये। अवभृत जेव्हां ॥ ९·२४३. ३·८३, ४·१३८, ९·३०५, ९·३४८, ११·५८६. **अग्निहोत्रादि यजनें**, १७·४४; **यजनक्रिया**—एकें यजनक्रियेचीं पेटीं। घातलीं बांधौनि पोटीं। ७·८६, **यजनमीसें** १७·१८०; **यजनशील** ४·१२२, ४·१४६.

**यजु-यजुस्**—यजुर्वेद. **ऋग्यजुसामु** ९·२७६; **रुग्यजुःसामे(में)** १५·१६५, ज्ञानदेवी—'ऋचायजुःसामें', कुंटे—'ऋचा यजुःसामें' १५·१६६.

**यज्ञ**—आहुती देणें; ईश्वर, स्वर्ग किंवा इतर लाभासाठीं केलेले होमादिक धर्मविधि; ध्येय-प्राप्तीसाठीं सतत केलेलें आराधन. तुह्मां वर्णविशेषवर्से। आह्मीं यज्ञु स्वधर्मु विहिला असे। एयातें उपासा मग आपैसें। काम पुरती ॥ ३·८८. आतां अवधारीं सांघैन आणिक। जे ब्रह्माग्निक साग्निक। तेयांतें यज्ञें चि यज्ञु देख। उपासिजे ॥ ४·१२४. ३·८६, ३·१२१ (२), ३·१३२, ३·१३५ (१,२), ३·१३७, ४·११८, ४·११९, ८·४५, ९·२६५, ९·३०७, ९·३९४, ११·६०७, ११·६७४, १६·९८, १७·१२२, १७·१६८, १७·१८३, १७·१८४, १७·१८८, १७·३३६, १८·१३५० (१). तीन प्रकारचे यज्ञ १७·१६८ ते १७·१९४ पहा; **यज्ञाची आदि**, यज्ञांचा आरंभ, यज्ञांचें मूळ, ९·३४८, **—ची गोठि कायिसी** १६·३८०, **—चें रूप** ९·३०६, **—चें वर्म** १७·१६९; **यज्ञीचें विधान** ४·१४८; **यज्ञाचें खेत चि पीकलें** ८·२५९; **यज्ञार्थ** १६·९२; **यज्ञावशिष्ट** ३·१२३; **यज्ञांग**, यज्ञरूप श्रीकृष्णास उद्देशून, १६·१३४; **यज्ञादि** २·२४६, **—किं** १७·३५३, **—कें** १७·३१६, **—कें कर्मै** ४·११५; **यज्ञोपकरण** ३·१२८; **यज्ञोपचार** ९·३४७, **—भरण** ९·२३९; **यज्ञकरणें** १६·९६; **यज्ञक्रिया** ३·१२१ (१), ४·१३८, १७·७७; **यज्ञदानादि** ९·३६५, **—क्रिया** १७·३६४; **यज्ञदानतपादिकें** १८·१४८; **यज्ञदानतपें** १७·३६२; **यज्ञद्वारीं** ४·१४६, **—पुरुष** २·२५०, **पुरुष** (२) पहा; **यज्ञभावितीं** ३·१०४; **यज्ञभास** १७·१९४, **—मूढ** १६·२९६, **—विद्या** १४·१५५, १७·१८०; **वेदयज्ञादिसाधनें** ८·२६२; **अधियज्ञ** पहा; **अभियज्ञ**, महत्त्वाचा यज्ञ, **कैवल्यमार्गीचा अभियज्ञ** १६·९८, १६·९२ ते १६·९८ पहा, ज्ञानदेवी—'अभिज्ञु' १६·९९; **जपयज्ञ**—समस्तां हिं यज्ञाचां पैकिं। जपयज्ञु तो मीं इये लोकिं। १०·२१३, **ज्ञानयज्ञ**—ज्ञानें ज्ञेय गमिजे। तो ज्ञानयज्ञु ॥ ४·१४०(२), ४·१५७, ९·२२७, ९·२३८, ९·२५२, ९·२६२, यावर ९·२३८ ते ९·२४३ पहा; **ज्ञानयज्ञां(ज्ञा)वशिष्ट** ४·१५०; **दैवयज्ञ**—तिहीं योगाग्नीकिं यजिजे। तो दैवयज्ञु बीजे। ४·१२३, **द्रव्ययज्ञ** ४·१३९; **नित्ययज्ञ**—स्वधर्मु जो बापा। तो नित्ययज्ञु जाण पां। ३·८१, ३·८४; **वाग्यज्ञ**—येकिं शब्दीं शब्द चि यजिजे। तो वाग्यज्ञु ह्मणिजे। ४·१४० (१), १८·१७७२; **स्वधर्मयज्ञ**—देवतांतरा भजावें। हें सर्वथा न करावें। स्वधर्मयज्ञ यजावें। अनायासें ॥ ३·९१, ३·१३०; **याज्ञिक**, यज्ञ करणारा, आपुलां अथवां(वा) परावां। ठांइं उपकरिसि पांडवा। तेणें यज्ञें होये बरवा। याज्ञिकु माझा ॥ १८·१३५० (२), ६·४७५, १३·२२३, १६·४००.

**यंत्र**—साधन, हत्यार, तोफ. वज्राग्नीचां ज्वालीं। करुनु अपारां धातूंची होली। व्याधिचां सीसालीं। पूजिलीं यंत्रें ॥ १२·५०, वज्राग्नीनें शरीरांतील धातूंची होळी करून शरीरस्थ (योगांतील) यंत्र-देवता पुजल्या. ऐसें शरीराकारें। यंत्रीं भूतें अवधारीं। वाउनि हालवी दोरी। प्राचीनांची ॥

१८·१२९९, शरीराकाररूपी यंत्रावर प्राण्यांना बसवून प्रारब्धकर्मांचें सूत्र ईश्वर हालवतो. **वांहांती (वाहातीं) यंत्रें,** तोफेसारखीं संहार-साधनें, ९·२१२; **अपाययंत्र,** हानी करणारें साधन, १६·३४२, **काल**—१०·१३६, **घटिका**—, **घटिका** (१) पहा, **दारु**—, लाकडाची कळसूत्री बाहुली, १·८१; **विषयविज्ञानयंत्र,** विषयांचा अनुभव करून देणारें यंत्र, शरीरास उद्देशून, ८·१४४; **संहारत्रिपुरेचिं यंत्रें,** संहार करणाऱ्या शंकराचीं यंत्रें, ११·३३८, ज्ञानदेवी, कुंटे—'संहार-त्रिपुरारीचीं यंत्रें' ११·३४३.

**यथा**—ज्याप्रमाणें, ज्याप्रकारें. **यथार्थ—अर्थणें**(३) पहा; **यथावसरें** १८·१६८; **यथागम—विधी,** शास्त्रांत सांगितलेल्या विधीस अनुसरून, १६·९४; **यथोचित** ४·७०; **यथाकाळें** ११·४९४, **—निगुती,** वर्णिलेल्या युक्तीला अनुसरून, योग्य रीतीनें, १८·१५५, **—लक्षणीं,** जसें ज्याचें लक्षण होतें, १८·५७९, **—लाभें** १२·२०९, **—लिंग,** योग्य लक्षणांसह, १८·७२९, **—वत** १५·४०२, **—विधि —धी** ७·१३९, १८·५९९, **—संपन्नें,** अनुकूलतेप्रमाणें, १६·८४.

**यमणें**—नियमन करणें, शासन करणें. यमु ह्मणे काइ यमावें। ९·१९८ (२). **यम**—(१) यमराज; तेयां नियमितेयांतु यमु। जो कर्मसाक्षि धर्मु। तो मीं ह्मणे रामु। अर्जुनातें॥ १०·२२६. यमू तूं नियमिता। ११·५१५. **यमेंसिं जूझ** १२·६७; **यमलोक** ९·१९७. (२) संयम, योगांतील पहिली पायरी. ९·१९८(१). **यमदम** १३·५०६, १३·५१६, **दम** पहा; **यमनियम** ४·१३३, **नियमणें—नीयमणें** पहा.

**यऱ्हविं**—**एऱ्हविं** पहा. ह्मणोनि विश्व संवरलें। यऱ्हविं युगांत होतें ओडवलें। १·१६०, नाहींतर. यऱ्हविं माझां चित्ति जें होतें। २·५२, बाकी माझ्या मनांत जें होतें. यऱ्हविं तत्वता वस्तु असे। अविनाश चि॥ २·१०५, वास्तविक पाहिलें तर. आत्मचर्चे चतुरु। यऱ्हविं वेडा॥ १३·२११, इतर बाबतींत. यऱ्हविं येणें चि जाये। निरयासि॥ १८·६६, तसें झालें नाहीं तर. यऱ्हविं कणा भूसा। कांडितां हिं सोसु सरिसा। १८·९३५, सहज पाहिलें तर. २·३१८, ३·७३, ३·९४, ३·२०५, ४·१२, ४·४५, ४·९१, ५·२७, ५·४०, ५·१००, ५·११२, ६·२६, ६·३९, ६·७२, ६·७५, ६·१४०, ६·२९४, ६·३६३, ६·४११, ६·४२०, ७·१५५, ७·१५८, ७·१९८, ८·१५०, ८·१५२, ८·१६५, ८·१८१, ९·२०, ९·८८, ९·१२६, ९·१३६, ९·१४०, ९·१४४, ९·२३१, ९·४४३, १०·१३९, १०·१४१, १०·१९६, १०·२४३, ११·५८, ११·३१५, ११·३६३, १३·११०, १३·२०९, १३·२३९, १३·३१८, १३·५४७, १३·५९८, १३·६०८, १३·६२४, १३·६५२, १३·६८९, १३·९४३, १३·१०१३, १३·१०७८, १५·७३, १५·११५, १५·१२१, १५·१७५, १५·२२८, १५·३४०, १५·५०७, १५·५५७, १६·२९१, १६·३७४, १७·३४२, १८·७६, १८·८९, १८·१९१, १८·२५५, १८·४३४, १८·६१३, १८·७१९, १८·९८६, १८·११०७, १८·१३३६, १८·१३६१, १८·१४७२, १८·१५३५, १८·१५७०, १८·१६०९. **यऱ्हविं काइ** १·६७, ४·४६, १२·१५९, १७·२५; **यऱ्हविं तरि, तरि-री** पहा; **यऱ्हविं-वीं तऱ्हि—ऱ्ही—ऱ्हीं—ऱ्हैं, तऱ्हि—ऱ्हीं—ऱ्हैं** पहा; **येऱ्हविं** ८·२४१, ८·२५१, ९·४४८, ११·१७३, ११·२७७.

**यवडा—यव्हडा—येवडा—येवढा**—आकार किंवा प्रमाण दाखविणारा शब्द. **यवडा**—कीं यया साठीं यवडेया। आणिलां यशा॥ १८·१७४१. **यवडी योग्यतेची सिद्धि** १८·१००३. **यव्हडा—यव्हडे दुर्मेलावे** १८·६५. **येवडा**—तेया विश्वरूपा येवडी दशा। ११·६३३. वेदां हि येवडें बोलणें। नेघसि कानीं॥ १७·१४, वेदांनीं एवढें मोठें वर्णन केलें तेंही तुझ्या कानापर्यंत पोहोंचत नाहीं. **येवडां गुंपिरां,** जीवास एवढें बंधन असतांना, १४·२८२; **येवडें** ११·२८८, ११·६३१; **येवडेनि दारुणें,** १८·१२७०. **येवढा**—तरि तुह्मां मानें येवढा। होईन मीं॥ १६·४६९, तुम्ही मजवर कृपा कराल तर तुमच्या पसंतीस पडेल इतका (एवढा मोठा) मी होईन. ९·५३, १२·२२७, १३·११२६; **येवढिया प्रतीती** १४·३३५.

**यश—येश**—सफलता, विजय, कीर्ति. **यश**—आणि

पुण्य यशासि आलें । ३·२७. ६·१०९, १६·३१. **कोरडें यश** ११·४६६; **यशा आणिलां** १८·१७४१; **यश घेईं** ११·४६५, –**फावलें** ११·६४, –**भोगिं** ११·४७४; **यशश्रीऔदार्य** ६·३७; **अपयश** २·२०१. **येश—येश कां अपकीर्ति** १०·८४.

**यष्टा**—यजणें पहा.

**यष्टि**—यज्ञ, काठी. **पर्जन्ययष्टि**, पावसासाठीं करावयाचा यज्ञ, १३·२२१; **आंगपुष्टी** १७·२०३, **आंगयष्टी** पाठ संभवतो, **पुष्टि-ष्टी** पहा.

**या**—हा, ह्या, ह्याला, इ. या शब्दाच्या अनेक रूपांपैकीं कांहीं येथें दिलीं आहेत. **इ** व **ए** पहा. या बोला आन नाहिं । सत्य माझें ॥ १३·६७०. धिगी बोलिया या न लजे। प्रज्ञा केवि ॥ १८·१३९३. **या कारणें** १२·८, –**भंगीं** १८·२४६, –**लागि** ११·७, १४·६६, –**वरि** १०·२७, १२·१९५, –**ही वरि** ११·५२(१) –**वेगळें** १३·८४५; **यां आठां पाहारां भीतरी** १२·१०५; **यां कौरवांतें** २·९४, ११·५१; **यां दोहिं माजि पहिली** १६·२६३; **याचां विरामीं** १८·१३५८; **यांचां काजीं** १·२१७; **जग यांचिया प्रजा** १०·९५; **याची काकुलती** ११·३६२; **याचेनि सोसें** ११·१६७; **यांचेनि सावाये** ११·३८८; **यांतें मीं मारीन** ११·५२(२); **यया—यया चि अनुभवा** ११·५८५; **यया कारणें** १८·१४०७, –**परौतें** २·५२ –**पैसारु** १५·१०७ (२), –**प्रेमाचें मुख** ४·८(१), –**लागि** १४·१६६, – **शरीरा** १५·१८०, –**हीना** २·१७; **ययां** १·१११, १४·११६, **ययाचा**—आतां ययाचा हा विस्तारु। हा चि यया पैसारु । १५·१०७ (१). **ययाचिये**—ययाचिये वाफेचिया आगी जाले । ११·३४९; **ययाची स्थिती** १५·११३ (१), –**चें हृदय** २·४०; **ययाचेनि बळें** १·११६, १२·१११, –**चेया कर्मपंथा** १८·८२०; **ययातें**, ४·८ (२), १५·१०९, १५·१२०(२); **ययांतें** १·११४; **ययावरिं(रि) यावर**, ४·१८२; **ययांवरि शस्त्र न धरिजे** २·४७; **यियाचि परीं** ४·१२९; **यियें वोझें** १२·१२२; **ये—ये अध्याइं** १६·४६, –**खोडां** १६·३१५, –**मती** १८·१२७३, –**महामारिचा** ११·३७८, –**विषिचा** १८·२१३; **यें**—यें अशेषें हीं भूतें । ४·१६८, तें वन्हि यें तृणें । एरें ज्ञानें ॥ १४·४३, तें ज्ञान अग्नि आहे, बाकी इतर ज्ञानें तणकुटें आहेत; यें तिन्हि येकें मिळति । १७·२६८, **यें**, **हीं**, १३·५३४; **यें हिं सविसें** १६·२०५; **येणें**, यानें, **येणें** (३) पहा; **येया** ३·३२, ९·३१, १३·५४, १४·५९, १४·११०, १५·७२; **येया कर्मा प्रवर्त्तता** १८·७०४; **येया कारणें** ८·२५४, १४·११५, १४·३७९, १८·१४९५, –**पाठिं** १८·६५९; **येयां** ४·५६, १०·११६, –**येरयेरां** १२·३३, आपण येंया उचिता। स्वधर्मातें चि राहटतां। २·२२८, आपण येंया ऐवजीं आपणेय पाठ ग्राह्य वाटतो, ज्ञानदेवी, कुंटे–'आपणयां' २·२२८; **येयांचां जिव्हारीं** २·४८; **येयाचेया प्रीति** ४·११; **येणेंसिं** १८·१६७२, **येणेंसीं कवण भीडे** १·११९. **येयातें**—येयातें चि अचिर(रा)मागुं ह्मणिजे । ८·२२३.

**याग**—नित्यनैमित्यिक किंवा विशिष्ट हेतूनें केलेला यज्ञ; हवन, होम इ. **यज्ञ** पहा. जैं अदृष्टिचेनि उपद्रवें । गादैल विश्व चि आघवें । ह्मणौनि पर्जन्ययष्टि करावे । नाना याग ॥ १३·२२१, अदृष्टिचेनि हा अपपाठ वाटतो, अवृष्टिचेनि पाठ संभवतो. तैसें यागाचेनि नावें। जगा वाउनि ह्यंवे । नागवीति आघवें । ऐहेरा वान्हीं ॥ १६·३८५. ४·१५४, ९·४७३, १४·४४, १४·१६६, १६·९५, १६·२९६, १६·३५८, १६·३८१, १७·१८१, १७·१८६, १७·१८७, १७·१९४, १७·३५९, १८·९७, १८·४७९. सात्विक, राजस व तामस यज्ञयाग—१७·१६८ ते १७·१९४ पहा. **यागादिक** १६·३७४, १८·१३७, १८·१५१; **यागसंकटे(टें)** १८·७७६; **द्रव्ययाग** ४·१५७; **नित्ययागसहितें** ३·८६; **महायागप्रमुखें** १८·१६४; **योगयाग** ४·१३९, ४·१५२; **विविधयागवितानें** १५·१८७; **याग अथवा दानें** १७·४०३; **दानयागतपें** १८·१५२.

**याचणें**—विनयपूर्वक मागणें. यजूनि मातें याचित। स्वर्गभोग ॥ ९·३१५. **याचक** ११·११७; **याचकाचें मिथुन**, बुद्धि व बोधरूपी मागणारे, १६·६.

**यातना**—कष्ट, हाल. एया परौतें जेवी । ते जेविती वोज न ह्मणावी । पोटीं भरती जाणावी । यातना ते ॥

१७·१६५. १६·३७२, १६·४२६. **नरकयातना** १३·७७७.

**यातायात**—जाणेंयेणें, जन्ममरण. जेथ यातायात निमाले । वनानंद जे ॥ ८·८४. २·२७८.

**यात्रा**—पवित्र स्थानास जाणें. तेया तीर्थें यात्रे आर्णी । त्रैलोकिचीं ॥ १३·४४७. तैसा मीपणें हालों ठेला । तो आघवेया चि मज आला । इया यात्रा होये भला । कापडी माझा ॥ १८·११६६. **यात्रा करणें** १८·११६२, **–करावेया** १७·२४३, **–करीतु आहें** १८·१६५; **यात्रे जाए** १३·८१३; **यात्रादिकें** १७·२०१.

**यावा**—(१) येण्याचा प्रकार, प्राप्ति, उठाव. **परागांचा यावा** १८·३४४, **फलाचा –** १५·१७०, १८·१६९. (२) **येणें** क्रियापदाचें रूप. **येणें** पहा.

**–युक्त**—शब्दास जोडून. त्या त्या सहित. **अंतष्करण-युक्त** ७·१७९, **आत्मबोध –** २·३१७, **नित्य–** ८·१३७, **प्रज्ञा–** २·३००; **बुद्धि युक्तां (बुद्धियुक्तां) जालेयां** २·२३१; **बुद्धियोगयुक्त** २·२७९; **योगयुक्त**–तो जितेंद्रियु साहाजें। योगयुक्तु चि ह्मणिजे । ६·९१, २·२६७, ५·३९, ५·४९, ७·१, १२·३९; **योगयुक्तां होआवें** ८·२५४; **श्रद्धायुक्त** ७·१४१; **अयुक्तपण**—ह्मणौनि अयुक्तपण मनाचें । तें चि सर्वस्व दुःखाचें । एया कारणें इंद्रियांचें । दमन नीकें ॥ २·३४७.

**युक्ति-क्ती**—योजनेचें कौशल्य, निष्कामकर्म करण्याचें कौशल्य, नियम, नियमितपणा. **युक्ति**—ह्मणौनि युक्ति हे पांडवा । घडे जेया सदैवां(वा) । तो अपवर्गिचिया राणिवा । अलंकरेजे ॥ ६·३५६, नियमितपणा या अर्थी. **युक्तिची कडसणी**, योगयुक्त होण्याचा विचार, २·३४२; **युक्तिघोषें**, इंद्रियसंयम, नियमितपणा, व योगांतील तीन बंध या योगमंत्रानें, ८·४९, यावर ८·४७ ते ८·५२ पहा; **युक्तित्रय** ४·१२५, सं. वा. श. पहा; **युक्तिपंथें**, निष्काम कर्मयोगाच्या मार्गानें, ५·३२; **युक्तियोगाचें (युक्ति योगाचें) आंग पावे**, जेव्हां नियमितपणा योगाशीं संलग्न होतो, नियमितपणानें योग साध्य होतो, ६·३५७; **योगयुक्तिचा उद्देश** ५·१६०; **संन्यासयुक्ति सोपारी**, कर्मरहित होण्याची सोपी युक्ति, ९·४१. **युक्ती**—**युक्ती जो गा (युक्ती जोगा)**, वर सांगितलेल्या युक्तीनें मिळण्यासारखा, १०·१५८, ज्ञानदेवी, कुंटे–'मती जोगा' १०·१७४; **योगयुक्ती**, योगयुक्त या अर्थी, २·३४१. **युगुत-ति-ती** पहा.

**युग**—काळाचें एक मान. पूर्णचंद्रेंसिं राति । युग एक असौनि पांति । तरि काय पाहाताति । चकोर ते ॥ १३·६४०, पूर्णचंद्रासह रात्र एक युगभर सतत राहणारी अशी असली तरी ती उजाडावी असें चकोरांना वाटेल काय ?. १३·३७८. **चहुं युगांचीं डालें** १५·१२८ (२); **युगावृत्ति** १४·११२; **युगसहस्र** ८·१६२, **युगें सहस्रावधी निमति** ८·१६१; **युग बुडणें, बुडणें** पहा; **युगीं युगीं** ४·४८, **– युगीं** ४·५६; **युगांत**, १·१६०, २·२१५, ७·१७७, १३·५१७, १८·४८४, १८·७८४, **–चक्र** ११·३३८, **– विघूचां पालवीं** ११·२९६; **कलियुगांतीं** १५·१२८(१), **कलि युगीं वरि** १८·१७८१; **कृतयुग** १५·१२८(३).

**युगुत-ति-ती**—युक्त, योजना, तर्क. **युक्ति-क्ती** पहा. **युगुत**—युक्त, **योगयुगुत** ६·३५८. **युगुति**, युक्ति, **युगुतिची कांबि** ६·४२२, **कांबि** पहा, **–चेनि मापें** ६·३४९, **–चेनि हाथें** ६·३५२; **युगुति निमले**, तर्कास पटत नाहीं, १८·१६९६; **युगुतिमंत**, नियमानें वागणारा, ६·३५५. **युगुती**—ऐसा ज्ञानाचिया युगुती । पालटु पडे गा सुमती । डोळेयांची शोभा राती । पालटे जैसी ॥ १८·४९२, **पालटणें** पहा. **युगुतीची मुद्रा पडे**, नियमितपणाचें वळण पडतें, ६·३५३.

**युगुल**—जोडी. **अंघ्रियुगुलीं**, दोन्ही पायावर, ११·६९८; **चरणयुगुल** १·१९; **नेत्रयुगुलिचेनि अ्लें**, दोन्ही डोळ्यांतील अश्रुप्रवाहानें, १८·१५४१.

**युग्म**—जोडी. **स्त्रीपुरुषयुग्में**, स्त्रीपुरुषांचीं जोडपीं, १६·३०८.

**येक**—**एक** पहा. हा चि येकु रक्षावा । १·१२४, भीष्मास उद्देशून. सर्वभावें भजावा । हा चि येकु ॥ ३·१४३, स्वधर्मास उद्देशून. यऱ्हविं इये प्रकृति विकारीं । येकु मीं चि असे (सें) अवधारीं । ९·१२६. जंव आकारु येकु देखति । तंव हा देवो ऐसें ह्मणति । ९·१६९, एकादा. आतां ह्माइक सांधो आग । जें करिति येक ॥ ९·२१८, कित्येक. कां शाखा सानिया

थोरा। परि आहाति येका चि तरुवरा। ९·२५०. तैसि (सें) मज येकाची सकल जनीं। आज्ञा पालिजे॥ १०·२८४. नाथिलें आपणपें एक मानिलें। ११·५९, आपण कोणी एक नसून (खोटेंच) मी कोणी एक (अर्जुन) आहें असें मानलें. आघवेयां येक। सेव्य जैसें उदक। १२·२०४. २·६७, ४·१३९, ४·१४५, ४·२०२, ५·१३४, ६·१११, ६·४३७, ७·१०८, ७·१५६, ८·१२६, ८·१५३(१), ११·२८०, १२·९७, १३·७३६, १४·७६, १७·८८, १७·१७०, १७·३४१. **येक चि दीसे** दुसरें, आरशामुळें, ४·४६; **येकाचां पोटिं बांधालें** १२·९२; **येक जि(चि)मान** १२·२०१; **चैतन्य येक** २·१६९, **तूंचि (तूं चि)** – १२·२३; **बुडणें** – १२·१७३; **येकु आणिकु** १०·२९५, **आणिक येक-कु** ६·१७२, ६·४२९, **– ही येक** १४·७२; **कव्हणां येका** ८·६९, **कव्हणी येकु** ६·४३०, **कव्हणें येकें** ३·१६०, ९·४५९, ९·४६९; **काइयेक** १२·८२; **कांहिं येक** ६·३५९; **कोण्हि येकु** ९·१५०, **कोण्ही येकि दशा** १४·७९; **कोण्हें येकें उपायें** १६·१५०; **क्षणा येका** १·२४०, **क्षणु येकु** १४·१९७; **नाव येक** १·१७०, ३·२२९; **बहु येकें,** पुष्कळांनीं, १६·४९; **येकु वेलु** ४·२५, १०·१७२; **येके-कें वेले-लें, वेळ** पहा; **येका—येकातव** ८·१७०; **येका पांती** १२·२०७; **येका रानी(नीं) धांवे** ११·४१; **येकां—अंतरालें येकां गती** १२·१११; **येकां... सर्वां** १७·२१७; **येकि,** एकच, एकाच प्रकारची, ऐक्य, या दोघां येकि चि साउली। १२·१९८, जेणें आपणेयां आह्मां सेज। येकि केलि॥ १३·६०४, **येकि अष्टसेद्व्यक्ति** ९·९७, **– चाड** ४·१९३, **–ही चिंता** १२·९४; **येकिचियें(ये) तुंबिणिये फलें** १३·१०५५; **सात येकि** १०·२५४; **येकिकडे** ११·२३८; **येकिं (कि) होआवेया,** ऐक्य होण्यासाठीं, १७·३५३; **येकी—येकी चि रूपिं** ११·२०२; **येकी हातवटिया** १८·१६२, **–हेला** १०·२८०, **–हेलां** ४·३८; **येकिं,** कांहीं जणांनीं, ४·१४०; **येकीं—ज्ञानयोगा माझि येकीं,** ज्ञानयोग व अष्टांगयोग यांपैकीं एक, १६·८०; **येकु—मी जगीं येकु** अर्जुनु, व्यक्तीच्या अभिमानास उद्देशून, ११·५१; **येकु चि पाडु** १२·१९९; **येकु बोलु** ११·६२७; **येकुं(कु) दीपुं(पु) सायासें लावी** १७·८७; **येके ठांइं** १२·४२, १२·२१०; **येकें चि उडाणें** १०·२३०; **येकें चि परिसें केलें** ८·१९९; **अवसरें येकें** ८·७१; **तिन्हि येकें मिलति** १७·२६८; **येकमेक** ९·२७३, १०·२७०, १७·१५०; **येक येका** ११·१३१; **येकायेक** ९·२४८; **येकि...येकि** ८·२३६; **येक दोनि चि वेल** १३·७६४; **येका दोनि वोखद,** सत्त्वरजतमांपैकीं एक (सत्त्व) गुण वाढला तर त्याला दुसरे गुण मारक होतात, १७·६२; **येकां दों** ११·३९; **येकि दोनि** ११·६९४; **येकु येकु** ७·११, **येकें येकु** ११·४६९; **येकाकी** १२·२०५; **येकांतीं** १०·११०; **येकायतन** ४·६१; **दैवगुण—येकोपजीवी** १६·६६; **येकदेशी व्यापका** १२·२५; **येकत्व—** पिंडाचेनि मीसें। पदीं पद प्रवेशे। तें येकत्व होये तें(तै)सें। पांडुकुमरा॥ ६·३०८, **येकनिष्ठ** ८·१९०; **येकपणाची मैत्री** १२·१४८; **येकपत्निव्रतें** ८·१८७; **येकवंकिचिया स्थिती,** एकरूपतेची स्थिति, ४·११, **येकवंकैयेचा ठाओ** ८·१३४; **येकवला,** ऐक्य, ११·५, १८·६३४, **एकवला** पहा; **येकवाक्यता, वाक्य** पहा; **येकलरा, एकसर** पहा, आत्मा तूं य(ये)-कसरा। १८·२३, ५·१४३, **येकसरेया आहारा** १७·११९, **येकसरी** ८·१५३(२), **य(ये)कसरें** १६·४१४; **येकसारिखें** ११·३५०.

**येकला-ली—एकला-ळी-ळें** पहा. तैसी सर्ववृत्ति-वैभवीं। बुद्धी चि येकली बरवी। १८·३४६. ६·३००, ६·३७९, १६·२७५. **येकलां नवमीं** १०·३०.

**येकाध—**एकादा, कोणीएक. कांहिं येकाधेन वैकुंठा जावें। तेंतिहिं (तें तिहिं) वैकुंठ चि केलें हे(हें) आवघें। ९·२०२. १६·२७५, १७·२२२.

**येकावटणें—एकवटणें** पहा. इयें पुनरावृत्तिचीं घराणीं। आघवीं येकावटति जेयाचां प्रयाणीं। ८·२३२. ८·१२४. **येकावटें** ९·४५५. वरील तिन्ही रूपें ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'एकवटणें' चीं आहेत. **येकवट** ११·१४३.

**येकेक-येकैक—**प्रत्येक, कित्येक. **येकेक—**हें

येकेक केती सांवावें। ७·५१, ज्ञानदेवी – 'एकैक', कुंटे – 'एकेक' ७·५२. **येकैक**—गुण येकैक काइ तेहाचे। कल्शील तूं॥ ६·१११. ८·१९४, १८·७७४, १८·१३५१. **येकैकाचां आंगप्रांतीं** ११·२८२; **येकैकें** १४·३३४.

**येकोल**—एक वेळ, कदाचित्. पथ तूझेनि गोसांविपणें। येकोल बुद्धीचेया ठाया येणें। ११·६२. तरि वाघाचिये अडवे। येकोल चरौनि आला दैवें। १३·७६२. ८·१०६, ८·२४३, ११·३७७, १८·१२३२.

**येणें**—एणें पहा. (१) (क्रि.). **आयंत,** आणलेलें, हें रूप **आयत,** विस्तृत, या अर्थी योजलें असावें, **ग्रंथायंत,** ग्रंथांत आणलेलें, विस्तृत रूपांत दिलेलें, १३·३२८; **यंता—ह्मणों यंता** १५·४८४ (२); **यंतां**—येतां, आणलें असतां, येतांना, यें आंगा न यंतां देखे। दूरौनि जो॥ १३·५३४, **उदया यंतां** १८·१०९१, **बिंबा**–, बिंबाशीं ऐक्याला येतांना, १८·१३५६, **मोक्षाचिये भेटी**– १७·३२३, **स्वराज्य जवळिके**– १८·१०६६; **यंति,** येतात, येतील, जेया ठाया यंति मार्ग। १८·१५९१, सुखां ह्मणों यंति वेद। १८·१६२४, **यंति नयंति** १५·२९५; **यंतिया,** येणाऱ्या, **यंतिया वाटा** १८·६९४, ज्ञानदेवी – 'येतियां', कुंटे – 'येतिया' १८·६९७; **यंतें – अवधान यंतें** १३·३२३, **मोक्षा**–१६·१५२. **यावा**—(१) यावयास पाहिजे असेल तर, हें असो आपुला ठेवा। जरि हाता आथि यावा। १६·४५५, (२) येत रहावा, परि टाकिलेयांहि सागरु। जैसा मागील यावा अनिवारु। १२·३७, **यावाजावा,** येणें जाणें, लाभ हानी, १४·३३७; **यावें**—आह्मीं योगजात अभ्यासावें। तेणें यया चि अनुभवा यावें। ११·५८५, **कैवल्याचा उवाया यावें** १६·२६८; **नाशु यावें,** हा पावे चा अपपाठ आहे, २·९७; **विश्वरूपीं यावें** ११·६६३; **यावेया**—जें जन्मशतीं उल्लंगिजे। एकोल यावेया॥ ९·२०५, **शांती यावेया** १२·१३९; **ये**—पाठिं अवसांत ये चेऊं। ६·६९, कूर्मिचेया पीलिया। दृष्टि पान्हा ये धनंजया। १८·१३३४, **अविचार ये** ६·४६५, **आकारिं** – १३·८८६, **आया** – ७·६६, १४·९६, **ऐक्यते – १३·९३२, गिवसित** – ८·१८९, **ठेविली ऐसी** – १८·६७८, **देवत्वासि** – ७·१४५, **पढियंतें** – १४·२१४, **पुसूं** – १८·२२१, **पूरु** – १६·९, **प्रकृतिदशे** – १३·१००२, **फला** – २·५७, **मोडौनि** – ८·२१, **लागों** – १८·१६८३, **ह्मणों** – ८·१७७, ८·१८७; **मीठातें बुडऊं ये** १६·७१; **चित्ता येचिना (ये चि ना)** ४·३५; **न ये**—कां दीधलें मागौतें येइल। किं न ये हें पुढिल। न पांतां दे भांडवल। मूर्खु चोरा॥ १६·२८१(२), **उपाया न ये** १३·८६१, **गर्वा** – १८·१६६, **हाता** – १३·९४७; कांहीं ठिकाणीं **न ये** चे प्रयोग **नये** असे घेणें इष्ट वाटतें, **येवों जावों न ये (नये)** १८·६७१, **राहाटों** – ३·१२६, व कांहीं ठिकाणीं **नये** तोडून **न ये** असें घेणें इष्ट वाटतें, **मना नये (न ये)** ११·६३५, **हाता नये (न ये)** ९·१३५; **मना नै ये** ४·२०० **येइजताहे** १६·१७; **येइजे**—ज्ञानें येइजे भेटी; ध्यानाचिये॥ १२·१३६, ९·५०; **पुनरावृत्ती येइजे** ८·२४४; **येइल** १६·२८१(१), **येईल**—**आपणपां येईल** ८·२५४; **घेउनि येईल** ६·३८१, **बोलों** – ७·१४; **येंतु**—हर्षाचा येंतु चित्ता। महापूरु॥ १४·४०९, **येतां**—**जेया येतां,** जेथें पोहोंचलें असतां, ९·४८, **येंतां, उपमे येंता(तां)** १६·१७१; **येंति—आया येंति** २·३५१, **संसारा** – ८·२०४; **येंती—उपमूं येंती** ११·२३४, **एषा** – ४·९(२), **स्वर्गा** – ९·३१६; **येयावें**—(१) यावें, **मना रूची येयावें** १३·७७६, (२) यावयाचें, **येयावें असे** १४·३३१; **येयावेया** १८·१३४८, **येयावेयाचि** ८·१०९; **येऊं-ओं-वों, येऊं नेदिजे** १४·२८९, **येओं लागति** ९·३२५; **येवों पाहे** १७·३१३; **यों,** येवो, **न यों कां** १७·३२२; **येयों**—येऊं, २·९९; **नैयंतां**–तो मरण नैयंतां निमौनि गेला। ८·२१६, **वयसेचिया गावां नैय(यं)तां** ६·४५१; **नैयंता,** आला नसता, १५·४८४ (१), ज्ञानदेवी – 'न येता' १५·५१७, कुंटे १५·५१८; १८·१६८०; **नैयंति** ९·४५८, १५·२९०, १५·२९१, १५·२९८;

**नैयवे,** येववत नाहीं, ६·४३२; **नैयावें** २·२२६; **नैये** १·२०८, २·४५, ४·१६६, ५·१५३; **अव्हेरुं नैये** २·६०, **चित्ता**— १०·१४१; **नैयेईल** ५·१७२; **नैयेसि** १·२३२, ११·३१८; **नैयों,** न येवो, १५·२४७.(२) (ना.) तैं मावीतें येणें पडे। देहासि चि ॥ ८·२०३. **बुद्धीचेया ठाया येणें** ११·६२, **मरणा**— १६·१०५, **शरीरा**— १२·१३५(२). (३) ह्यानें, एवढ्यानें, ह्या प्रकारें. तैसें येणें शरीरें। शरीरा येणें सरे। १२·१३५ (१). ८·८०, ९·१३२, ११·५८६. **येणें अवसरें** २·२३,—**हीं कारणें** ८·१८७,—**चि देहें** १३·१०७०,—**नावें** १·१९५, ८·३५, १६·३१, १६·७२,—**पार्थे** ४·१०,—**फलत्यागें** १२·१३४,—**बोलें** ६·५,—**मानें, मान** (१) पहा,—**रुखें** १५·७२,—**व्याजें** १४·६६; **येणें बहुत जोडलें नाशैल** २·२२; **येणें येणें प्रकारें** १३·१०३५.

**येतुक—इतुक** पहा. तरि गा येतुकें करीं। यां आठां पाहारां भीतरी। एक निमिषभरी। देंतु जाये ॥ १२·१०५, (देंतु पुढें पडलेला दंड निमिषभरी पुढें असावयाला पाहिजे, हा मुद्रणदोष सुधारला आहे) चित्तास उद्देशून.

**येतुल—इतुल** व **एतुल** पहा. **येतुला-ली-लें.** देवी लक्ष्मी येतुली जवळिक। परि तेही यया प्रेमाचें नेदखे चि मुख। ४·८. ६·६५, ६·४३७, १०·१८४, १०·२९५, ११·३३, ११·४२२, ११·४४२, १३·७७६, १४·३२१, १८·१११७. **येतुलां अवसरीं** १·८७; **येतुलिया साठिं** १३·७६३; **येतुली दशा** ८·२३०, —**प्रीति** ९·१९१, —**वेन्हीं** ६·२६१; **येतुले दीह्या** ६·४२७; **येतुलेन हिं मापें** १६·४०९; **येतुलेनि,** इतकें केलें असतां, येतुलेनि सर्वकालीं साम्यता। आपणपां येईल ॥ ८·२५४, ४·९०, १८·६९८; **येतुलेया कारणें** १०·६०, —**वेगला** ११·३६४; **येतुलालें** १८·१४२६.

**येथ—एथ** पहा. येणें संग्रामाचेनि अवसरें। येथ कृपालुपण नुपकरे। २·२३. २·५३, २·५५, ७·३, १३·७६४, १३·८४७, १३·१०७६. **येथिचें वर्म** १७·३९७. **येथें** १८·३८२, —**सांघिजैल** १५·१०९; **येथौनि याची श्रद्धा** १७·४०९, ज्ञानदेवी— 'एथुनियां चि', कुंटे—'येथुनि याचि', ब्रह्मनामास उद्देशून, १७·४१२.

**येर—एर-री-रें** पहा. येर गगन तें गगनीं चि आहे। घटत्वा ही आर्दी ॥ ८·२५२. ७·१३५, ७·१४६, ९·३४६, ९·३७६, १०·१४१, ११·५०१, १२·४०, १२·७५, १३·१३३, १३·५६३, १३·१०४३, १६·२४२, १६·२९१, १७·६२, १७·३०८, १८·८९५, १८·१०८२, १८·१५७२. **येरा** १२·१८७, १३·५८; **येरां**—आणि येरां हिं रसां पांतिकरां। जाला मानु ॥ ११·२, १६·१०३, १८·५९५; **येरां सर्वां भूतजातां** १०·६७, —**सुरगणांची नवाई** ८·१५६; **येरिं** दो, या दोघां पेक्षां, १७·३९४, ज्ञानदेवी—'येरां दोहींपरिस' १७·३९७; **येरिं रसिं** १७·११७; **येरीची** (**येरी चि**) **गोठि** १७·४२९; **येरी विरुद्धा दोन्हीं सांडाविया** १७·८२; **येरीकडे** १७·२७८; **येरी मोहरा** १५·४१; **येरीं वृत्तीं,** इतर वृत्तींत, १७·२३०; **येरु**—तो, दुसरा, अर्जुना तेया नांव ज्ञान। येरु प्रपंचु हें विज्ञान। ७·६. ९·३६७, ११·४२, १३·६३५, १४·४०६, १८·२३२, १८·६५९; **येरु फलभोगु** ७·१४४; **येरें,** दुसरे, इतर, दुसऱ्यानें, श्रीकृष्ण किंवा अर्जुन यांस उद्देशून, तैसी ज्ञानिं मति न फांके। येरें जल्पति नेणों केतुकें। १३·६३७, माझीं होंति कामारीं। तियें वांचौनि येरें मारीं। १६·३५१, ५·१४, १३·६४, १७·३१२; **येरयेरां** १२·३३, —**चां मेळीं** १३·१०४६; **येरएरीं,** परस्परांनीं, १·८७; **येरयेरै**—एकमेकांचे, हे येरयेरै आथवे। गोत्र आमुचें ॥ १·२०७.

**येरझार—एरझार—एरिझार** पहा. **लाटाचां येरझारिं** १३·८०३. **येरिझारि**—तेथ येरिझारि लागि। जन्ममृत्यूंची सुरंगी। सुवाळली चांगी। संकल्पें एणें॥ १३·४९. **यरिझारे** १२·१३५, ज्ञानदेवी—'येरझारे', कुंटे—'येरझारें' १२·१३६.

**येवडा-ढा-ढी-ढें**—इतका-की-कें. **येवडा... थोरु...उपकारु** १७·४२७. **येवढा धिंवसा** १३·११२६; **येवढी वस्तु** ९·५३; **येवढें अहोरात्र** ८·१५५.

## र

देखिलें १३·३८१; **जैसा निधानातें रंकु,** ठेवा घ्यावयाला धांवतो, १८·४७७; **भोगा-लागौनि...रंक** ७·१३८; **महेंद्राचे ही रंक होंति** ९·३७१; **रंकु...राउ** १४·८३; **राया रंका** ९·२०१, १०·१११, १२·२०३, **रायाचें... रंकातें** १२·१४५; **रंकपणीं** १८·३२१, **–णें,** राउ जैसा स्वप्नीं। रंकपणें रिगाला धानी। १४·१५३.

**रक्त**—(१) आवड असलेला, ओढा असलेला. **विरक्त** पहा. (२) शरीरांतील रक्त या अर्थी. **रक्ता मांसा** १७·९५, **प्राणिति** पहा; **रक्तमूत्ररसे(सें)** १६·१७९;

**रक्ष–रक्षस्**—राक्षस. **रक्ष—यक्षरक्षगणांआंतु (यक्ष रक्षगणां आंतु)** १०·२०५. **रक्षस्—रक्षोगण** ११·३२८.

**रक्षणें**—राखणें, जपणें, सांभाळ करणें. जेयां उपकार होंते केले। जे आपदीं होंते रक्षिले। १·१८३. जें धर्मजात आघवें। युगीं युगिं मियां चि रक्षावें। ४·४८. १·१२४, २·७३, ९·५२०, ११·५६४, १८·४४, १८·१५६३, १८·१७४४. **तुह्मीं रक्षिलां** ११·५९; **रक्षणें मरणा येणें** १६·१०५; **रक्षणीय** ३·१६८; **रक्षिता** २·५९.

**रंग**—वर्ण, शोभा, आवार. आकाशा रंगु लावित। ११·५९०. आणि शब्दादिक सुहावे। साहाजें रंगें हवावें। १५·१६०. गीतें विण रंगु दावी। १८·१७२०. १·३८ (१). **गगन रंगीं,** आकाशाच्या अंगणांत, १०·२०३, **रंगण** पहा; **संध्यारागिचे रंग,** संध्याकाळच्या रंगीत आकाशाचे रंग, ६·२५४; **साहित्या रंगाचें वाणें** ६·१३३, ज्ञानदेवी, कुंटे – 'साहित्य-रंगाचें', साहित्यांतील अलंकारशास्त्राचे प्रकार, ६·१३३; **मऱ्हाटे बोल रंगें गीतांगें कवलितां,** मराठी शब्दांच्या रंगानें (मार्मिक शब्दयोजनेनें) गीतापदें समजून घेतां, १८·१७१५; **जैसें मेघरंगें व्योम न घटे** १३·४७६; **प्रमाण आणि रंगु,** कापडास उद्देशून, ११·६४२; **रंगाथिलें,** रंगयुक्त, रंगामुळें सुंदर दिसणारें, १·६; **सुरंगता**—रंगीं सुरंगतेची आगलिक। १·३८(२).

**रगडणें**—चिरडणें, रेटणें, नाश करणें. जिहिं परोपतापु घडे। परावा जीउ रगडे। १६·३२५. **विकल्पाचिया भाली रगडूनि** ७·१६८, **भाली** पहा; **रगडा,** चुराडा, १७·२५९; **ज्ञानाचा रगडा करिती** ९·१८२.

**रंगण**—आवार, प्रदेश. **गगनरंगणी(णीं)** ११·५९३; **हृदयरंगणीं** ११·६६२.

**रचणें**—व्यवस्थित ठेवणें, मांडणें, जुळवणें, उभारणें, तयार करणें, एकावर एक थर लावणें. हे रचिले आहाति बुद्धिमंतें। द्रुपदकुमरें॥ १·९४, पांडव सैन्यास उद्देशून. पार्था तें गा तम। रचूनि ऐसें वर्म। चौखुरी देहात्म। मानीयातें॥ १४·१७६, तो तमोगुण अशा युक्तीनें तयार करून देह हाच आत्मा आहे असें समजणाराला जखडून बांधतो. तैसें मनावाचे देहाचें। कर्म मनादि हेतु रचे। १८·३५९, मन, वाचा व देह यांचे व्यापार मन, वाचा व शरीर या हेतूंकडूनच होतात. ५·१०५, ५·१४०, ६·१०८, ६·२०५, ८·२५, ८·६१, ८·१६२, १३·९४१, १७·३३६, १८·४२६, १८·१७६०. **अहंकारत्व रची** १४·९१; **आकार रचावेया** ९·२९३; **आसन रचावें** ६·१८१; **उतरडी उतरी रची** १३·११४; **खलें रचूनु** १३·४०; **डोलां चि पटल रचे** ७·६१; **त्रिभुवनाचा विस्तारु रची** ५·७६; **धर्मनिधानें रचिलीं** ११·९; **ध्यान रचिलें** ११·६०२; **नगरें चि रचावीं** १४·२३१; **पद्मासन रचूनि** ८·९१; **बुद्धि रचूं,** तर्कानें सिद्धांतांची मांडणी करूं, १३·१०४४; **मनोरथांचिया श्रृष्टी रची** १३·४१३; **वेदी रचे** ८·४८; **स्रिष्टिचां रचलां रचे ऐसें नाहिं,** सृष्टीच्या रचनेमुळें प्राणी तयार होतात असें नाहीं, ते सत्त्वरजतमादि गुणांमुळें होतात, १८·८१२; **सृष्टिचां होणां न रचे,** सृष्टीच्या घडण्यानें तो (आत्मा) घडत नाहीं, १३·११०७; **आयिता ना रचला** १३·११०६; **रचलेपणा**—रचलेपणा· पडैल । झोंति ह्मान॥ १३·२५६, स्वस्थतेला धक्का बसेल. **रचना—चित्ररचना, चित्र** पहा, **भोग–** ३·२०१, **विश्व–** २·९५, १५·३६६.

**रज–रजस्**—(१) **रज,** धुळीचा कण, धूळ. आहाच अहंकाराचें रज झाडूनि। ८·१३३. पैं रज

आरिसा उजळी । १३·४६४. कां आरिसेया लागि सांचावें । अधिकें रजें ॥ १८·१३९. आरसे साफ करण्याकरतां धुळीचे बारीक कण सांठवून ठेवावे. **रजें डोळे जाति** १३·७६७; **चरणरज** ९·४७६; **धूमरजाची पिंजरी** ९·१२४; **धूम्ररजाचें गगन** ८·१४८; **विषयसुखरजें** ४·१९६. (२) **रज—रजस्**, सत्व, रज, तम या गुणांपैकीं दुसरा गुण, यापासून अहंकार, काम, क्रोध व लोभ इत्यादि उत्पन्न होतात. **रज—**हे रजाचे फिर जाले । परि तमां(मा)सि पढियंते भले । ३·२३९, यावर ३·२३५ ते ३·२६० पहा. १४·१५८, १४·१६०, १४·२३५, १४·२४१, १४·२६४, १४·२७०, १४·३४१ (१), १८·८०२; **रजाचिया झुलुका** १५·१५४, **–चें बळ** १३·१०८, **–चेनि माजें** १४·३२५, **–चा वारा** १५·१६२; **सत्व, रज व तम—**आणि रज परि सात्विक । तेया ठेविले वैश्य लोक । रज चि तमें भेसक । तेथ शूद्र जाला ॥ १८·८२६; **रजतमें** १८·२०७, इतर रज व तम यांचे संदर्भ **तम** (२) पुढें पहा; **सत्व रज** १४·१९९; **सत्वरजद्वारें** १४·१४२. **रजस्—रजोगुण,** रजोगुणु पेरी । तेतुलें सत्व सोंकरी । एकलें तम करी । सावगणी ॥ १३·३९. ३·२३८, ७·७६, १३·१०४, १३·९६८, १४·१७२, १४·२००, १७·६४; **रजोमय** १७·७१(२); **रजोवातप्रचंडें** १५·१६१; **रजोविशेषीं** १४·३४१(२); **रजोवृद्धि** १४·२४०; **राजस—**रजोगुणासंबंधीं, रजोगुणविशिष्ट व्यक्ति, राजसां तामसां होइजे । येरिं रसिं ॥ १७·११७, आहारामुळें व्यक्तीवर होणाऱ्या परिणामांस उद्देशून; तें काम्य कर्म सक्लेश । जाणावें एथ राजस । १८·६०७, १४·२६०, १४·२६१, १७·७८, १७·१३७, १७·१४०, १७·१४१, १७·१४६, १७·१५०, १७·१५१, १७·१८७, १७·२४६; **राजसाचें चिन्ह** १८·५३४; **राजसु कर्त्ता** १८·६५८; **राजसा कर्त्तेया** १८·६४६; **राजसी जीविं** १७·७१(१); **राजस ज्ञान** १८·५३५, १८·५४४, **–तप** १७·२५१, **–दान** १७·२९२, **–धृति** १८·७४५; **राजसी बुद्धि** १८·७२०; **राजसाचें लक्षण** १८·५९१; **राजसें सुखें,** रजोगुणापासून झालेल्या सुखामुळें, १३·७४१; **राजसा तामसा** १७·११८; **राजसैं,** राजसपणा, **राजसैं त्यागु** १८·१९६.

**रंजणें—**रमणें, मोहित होणें. तो रंजे केवि पालिवणें । भिलांचेनि ॥ २·३६२. **इंद्रियार्थीं रंजले** ५·१०९; **जीवातें रंजौं जाणे** १४·१६०; **लोकातें न रंजी** १३·२०७.

**रडणें—**अश्रु गाळणें, कष्टी होणें, असमर्थ होणें. आहा सांवतां वाचा रडे । १६·४१८. ९·५०८.

**रण—**युद्ध. हें असो काळें आवंतिलें रण । कां सर्वसंहारें मातलें मरण । ११·३४१. १·१७१, २·४५, २·१९७, २·२२०, ११·४६५. **रणाचा ठाऊ** १३·५४५; **रणांगण** १८·८६३; **रणकोल्हाळ** १·१३३; **रणतुरें,** युद्धापूर्वी वाजवावयाच्या तुताऱ्या, वाद्यें इ., १·१३०; **संसाररण** १८·१०४३.

**–रत—**उपसर्गास किंवा शब्दास जोडून, रमलेला या अर्थी. **वेदवादरतां** २·२५५; **निरत, निमग्न, उचितीं कर्मीं निरतां होआवें** ३·११८; **स्वधर्मैकनिरत** ३·१०२; **सुरत,** स्त्रीसंभोग, ५·१३३, १५·७४.

**रति-ती—**आवड, आसक्ति. **रति—**हा निजधर्मु जैं सांडे । कुकर्मीं रति घडे । ३·८२. **रतिचेया बेटा** ७·७२; **सत्संगीं रति** १८·१७७३. **रती—वालभाचिये रती** १६·३०३.

**रत्न—**हिरा, माणिक, पाच वगैरे, किंमती वस्तु. देखैं शवाचां हातिं दीधलें । जैसें रत्न कां वायां गेलें । ३·१९४. चोखाळपण रत्नाचें । रत्नावरि नाचे । तैसें पुढां मन 'जेयाचें । करणें पाठिं ॥ १३·३६२. कां तळहातिचेनि दीपें । रत्न पाहिजे ॥ १७·१७६, ज्ञानदेवी, कुंटे – 'तळहातीचें' १७·१७७. रत्ना भरूनि पृथिवी दीजे । १७·४१२. रत्नीं घडे रत्नाचें । दळवाडें जेवि ॥ १८·३५९(१). १·८, ११·७२, ११·२०७, ११·४११, ११·६३२, १७·३२५, १८·८८५, १८·११७८, १८·१५९४ (१). **रत्नाचिया खाणीं(णी)** १०·१४५, **–चें दळवाडें** १३·४६१, १८·३५९(२); **नवां रत्नांचा हारु** १८·८४९(२); **रत्नाचां रूपिं** १८·११३९; **अनर्घ्य रत्न** ६·१३, १७·२६७, **तळहातिचें–** ७·२, **हस्तगत–** १८·१३१४; **जैसा रत्नीं**

कीलाऊं **रत्न चि**, जसें रत्नाचें तेज रत्नांतच असतें, १४·३७०; **वालू चि रत्नें परौतें(ते)** १५·२२, **परौतणें** पहा; **रत्नाकर**—तो नवगुणरत्नाकरु । ययां नवां रत्नांचा हारु । १८·८४९ (१), ब्राह्मणाच्या नऊ गुणांस उद्देशून, यावर **१८·८३०** ते **१८·८५१** पहा, असा ब्राह्मण (नऊ) गुणरत्नांचा समुद्रच आहे; **रत्नकलिका**, जणूं रत्नांचीच कळी, ६·२६२; **रत्नकील**—रत्न कां रत्नकीला ए। झांकोलें जैसें ॥ १८·१५९४ (२), **कील** पहा. **अनिंदरत्न**, **निंदणें** पहा, **उचित**– १२·११, **गीतापद**– १८·१४४०, **गीतापद्य**– १८·१५११, **गुण**– १८·८६७, **चिंता**–, **चिंतामणि-णी** पहा, **चूडा**– १४·३९७, **द्विज**– १७·२७३; **निगम-रत्नाचल** १८·३५; **प्रमेयरत्न** १·५, **भूषण**– १८·१४२३; **लावण्यरत्नभांडार** १·३१.

**रथ**—जुन्या काळांतील एक वाहन. तेया बाणाचेया मांडवा आंतु । तैसा चि रथु आहे निवांतु । धूरे बैसला लक्ष्मीकांतु । आपणपें तळीं ॥ ११·६५२. १·१७६, ३·६०, ३·१८६, १३·१५१(२), १८·१२८६. **रथाचे गुण**, अर्जुनाच्या रथास उद्देशून, १·१४०, **–चें चक्र** १५·१२२; **मनाचां रथें** १५·३२३, **मनोरथ**, **मन** पहा; **रथु पेलावा** १·१६९, **–पेलिला**, १·१७४, **–सांडूनि** १८·४८७; **रथौनियां खालां उडी घातली** १·२६७; **रथांग**—रथांगा-(गां)चा मेळावा। रथु ह्मणिजे पांडवा। १३·१५१(१), **गीतारथ**—**गीतारथिचे तुरंग** १८ १६५३; **महारथी** १·९८, १·१०२, १·१६४, **महारथीयां वरगण** १·१२२.

**रथ्या**—राजमार्ग. **रथ्योदक**, **उदक** शब्दापुढें पहा.

**रंध्र**—छिद्र, भोंक. **अधोरंध्र** १८·३३६; **अपानरंध्रद्वय**, **अपान** (२) पहा; **कर्मरंध्र**—तिये कर्मरंध्रीं गुंडे। नियमाचे दाटी॥ १३·५८९, इंद्रियद्वारा कर्में करीत असतांना दोष लागूं नये म्हणून नियमाचे धोंडे बसवितो, इंद्रियनिग्रह करतो; **नासारंध्र** ३·५५, **ब्रह्म–**, **ब्रह्म** (६) पहा, **मूत्र**–१३·५३८.

**रमणें**—आसक्त होऊन राहणें, आनंदानें तल्लीन होणें. जें अपेक्षिजे विरक्तीं। अनुभविजे संतीं। सोहंभावें पारंगतीं। रमिजे जेथ॥ १·५३. २·२४३, २·३३२, ३·१४५. **तिया स्थिति मानसिं रमत** १२·२२९; **स्वरूपिं रमसि** १८·१३११; **रमणिक**—**रमणिकाचीं राजभुवनें** ११·१९४, ज्ञानदेवी, कुंटे–'रमानायकाचीं' ११·१९७; **रम्य**—पयां विषयांवांचूनि काहीं। आणिक सर्वथा रम्य नाहीं। २·१२०, **रम्य गोठि** १२·२२८; **आत्मानुभवरम्य**, आत्म्याच्या अनुभवामुळें रममाण होण्यास योग्य, ११·७३; **पवित्र होये आणि रम्य** ९·५४; **रम्यपणा** ६·१६६.

**रयणी**—रात्र. **चडतिये रयणीं** १६·३६७.

**रळी**—थट्टा, विनोद. तेथ सोयरिकी करुनि आधीं। रळीं बोलों ॥ ११·५३७.

**रव**—शब्द, ध्वनि. **जनाचेनि पाएरवे(वें) मैळे चि ना**, लोकांच्या वर्दळीनें शांतता भंग होणार नाहीं असें, ६·१७२, ज्ञानदेवी–'पायरवें मैळे चि ना', कुंटे–'पायरवें रुळेचिना' ६·१७२.

**रवा**—बारीक कण, तुकडा. १३·८९१(२). **काश्मिरीचा रवा**, केशराचा तंतु, १५·३१७, **भांगाराचा –** ११·६३४, **सोनेयां(या)चा –** १३·८९०, **सैंधवाचा –**, मिठाचा कण, १४·३९०; **रवेपणा**—परि रवेपणा माझिवडें। तंव रवा ऐसें आवडे। वांचूनि सोनें सोनेया सांगडे(डें)। सोनें चि जेवि॥ १३·८९१(१). सोन्याचा तुकडा सोनेंच असतो, १३·८९०, पण त्या तुकडेपणांत तुकडा आहे असें जरी दिसलें तरी तें वास्तविक सोनेंच असतें; ब्रह्मापासून झालेली चराचर सृष्टि वरवर निराळी दिसली तरी वास्तविक सर्व सृष्टि ब्रह्मच आहे, यास उद्देशून

**रश्मि–रश्मी**—किरण. **रश्मि**—हें रोहिणीचें जळ। तेयाचें पांतां जैं मूळ। तैं रश्मि हीं नव्हति केवळ। होये तें भानु॥ ७·२९. रश्मिचेनि आधारें जैसें। नाहिं तें चि मृगजळ असे। ९·८४. आघवें चि आकाश सूनि पोटिं। बिंब चि जैं आते खोटी। तैं प्रतिबिंब कैं उठी। कें रश्मि सिरे॥ १५·३०४, सर्वच आकाश पोटांत घालून (व्यापून) सूर्य आपल्या बिंबानें सर्व ब्रह्मांड व्यापून टाकतो, तेव्हां सूर्याचें बिंब कोठें उदयाला येईल व किरणें कोठें शिरतील ?. तरि जीवसूर्यबिंबिचे। जे रश्मि श्रोत्रादिकिं पांचें। धावौनि विषयपद्माचे। फोडिति मढ॥ १८·४६०.

असा असणें संभवतें, एकसर पहा; दोहीं रसिं ११·१, दोन्ही रस, शांत व अद्भुत रस, ११·७, द्विविधु रसु, प्रीति व त्रास, २·११८, षड्रस १८·१००१, आठां रसांची ओलावणी ४·२१०, अ्लणें, ओलणें पहा, नवरस, यांचे संदर्भ सं. वा. श. त दिले आहेत; रक्तमूत्ररसे १६·१७९; रसें वर्णें परिमळें १८·४७०; रूप-गंधरसु १८·४६९, रूप रसु गंधु १३·११७; रसु...नीर १३·२९४; रसज्ञ १३·११४४; रसमय १८·१५८६; विरस १४·३५५, सु- १·४८, १७·१२५; अति सुरसें २·९०; सुरस-पणें १७·१५८; रसाल, रसाळ, गोडी, गाढें रसाल, दाट व रसानें भरलेली, केळीस उद्देशून, १३·२१२; धान्यजाति रसाला करीं १५·३७३; संवादसुखाचें थितें रसाल नासैल, संवादसुखाची जमलेली गोडी नाहींशी होईल, १५·४२४; रसालकथा १२·२४३; नानार्थरसरसालें ७·१८१(२); कोवला आणि रसालु ८·५६; सीतली आणि रसाल १३·२६९, ज्ञानदेवी– 'मितली परि सरळ', कुंटे–'मितले आणि रसाळ' १३·२७०; रसालपणा १·३३(२), –चेया लोभा ६·१६, –णें १३·६४१; रसिक, रसयुक्त, रस जाणणारा, ऐसीं अक्षरें चि रसिकें। मेळवीन ॥ ६·१४, तुह्मां रसिकां जोगें १३·३३३; रसिकत्व १८·३४५ (१,२); अरसिकां हिं १५·५६१, हा पाठ आणि ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील–'अरसि कांहीं' १५·५९४ पाठही संदर्भांत बसत नाहींत.

**रसना**—जीभ. परि रसना ह्मणे कां रसु चि हा आमचा। ६·१७. वमिलेया अन्ना। लाल न घोंटी रसना। १३·५१२. २·३०४, १३·४२७, १८·१६८१. रसनेचिया वाटा १५·३२६; विचाराचिया रसना न दाटति, विचाराच्या तोंडांत तीं फळें मावत नाहींत, ७·१८८; त्वचा श्रवण चक्षु रसना घ्राण १८·४९६; रसन—श्रवण नयन त्वचा घ्राण रसन १३·९८; रसनेंद्रियांचा आंकला, जिव्हेला व इतर इंद्रियांना लंपट झाला, ६·३४५.

**रससोप-य-रसोय**—स्वयंपाक. रससोए १८·१०८६,–न सरो ये, स्वयंपाक संपला असें होऊं नये, १३·६४२. रससोय १३·६३५, समरस्याची–१३·३८९. रसोय– अमृताचां ताटीं वोगरुं। ऐसिं रसोयें केंचीं ॥ ९·९. २·२५४, ९·३४४, १५·३८.

**रहवर–राहवर**—उत्तम रथ. रहवर १·१३९. राहवर १·२७०; राहंवर—सजोडियां राहंवरा, घोडे जोडलेल्या रथांना, ११·३९२.

**रहस्य**—गुपित. १८·१३३६. गीता माझेयां भक्तां मंत्ररहस्य मेलवी १८·१५०२; रहस्यें बोलिलें १०·२९५.

**रहित**—त्याखेरीज, तें वर्ज करून. रीता ना भरितु। रहितु ना सहितु। १३·११०४. रसें रहित ७·१५५; आदिमध्यरहित ११·३०५, आदि-मध्यां(ध्यां)त– ११·२७८, आशापाश– ३·७४, कर्म– ३·१९०, ४·११३; काम–, सकल शब्दास जोडून घेणें इष्ट वाटतें, ३·१४९; क्रिया–, स्वधर्मु शब्द तोडावा, ३·१०७, गुणत्रय– २·१४९, गृहव्यापारप्रवृत्ति– ९·१२८, निर्देशदेश– १२·३२, भयोद्वेग– १२·१६९, हर्षशोक– २·३००, हेतु– ३·७८; रहितें—व्यभिचाररहितें भक्तियोगें, अनन्यभक्तीनें, १४·३६८, विधिविधानरहितें ४·११७.

**रहिवांस**—वस्तिस्थान, वस्ती. १३·५२२.

**राइतें**—रायतें. हें असो उगें आगितें। ह्मणे तैसें राइतें। १७·१४६, आगीलाही उगें बस म्हणणारें, इतकें तिखट, रायतें.

**राउत**—घोडेस्वार, अंमलदार. पदिचे राउत ९·३२३.

**राउनि**—हा रोउनि चा अपपाठ असावा. कृपणाची चित्तवृत्ति जैसी। रा(रो)उनि घातली ठेवेया पासिं। ११·६२३, घट्ट बांधून या अर्थी, ज्ञानदेवी – 'रोवूनि', कुंटे–रोंवोनि' ११·६३३, रोवणें पहा.

**राउल**—राजवाडा, देऊळ. तेणें वैकुंठापासौनि विशालें। मज लागि केलीं राउलें। ९·३८५. ११·५३८. आनंदाचां राउलिं, राजवाड्यांत, १३·३८६; सामरस्याचां राउलीं, मंदिरांत, ६·३८८, पूर्व दिशेचां–५·८६; प्रसादाचीं राउलें करिति ११·६५; रानिचें राउला नेलेयां

१८·१६०६; **श्रियेचिं राउलें उवडितु,** घरें, १६·१९८; साधुहृदयराउलीं ५·१४१.

**राउव**—पोपट. **कवतिकें राउवें बोलाविति होंती,** ११·१०७, **बोलवणें** पहा.

**राउ-ओ-य-वो**—राजा, अग्रणी, श्रेष्ठपणा दाखविणारे शब्द; धृतराष्ट्र, अर्जुन, दुर्योधन, श्रीकृष्ण, विश्वरूप, ईश्वर यांनाही उद्देशून हे शब्द आलेले आहेत. **राउ**—जैसा रंकु भ्रमला। ह्मणे जा रे मी राउ आलां। १४·८३. तरि विश्व हा अनादि ठावो। पथ नियंता ईश्वरु राउ। १६·२९३. ८·१८३, १४·१५३ १४·२१८ (१), १४·२७५, १४·३५९, १८·५०१. **अज्ञानदेशिचा राउ** १३·७५१, **अनुभवियांचा –,** अर्जुन, १५·४१२, **आत्मस्थितिचा –** १८·४१०, **क्षत्रियांमाझि –,** अर्जुन, २·९, **गुणा(णां) माझि –,** ईश्वरभाव, १८·८६९, **तीर्थ –** ६·१०२, **देवांचा –,** विश्वरूपास उद्देशून, ११·१७६, **निजधामव्योमिचा –,** आत्मस्वरूपरूपी आकाशांतील सूर्य, १६·१४, **निजात्मपदिचा –,** आत्मस्थितीचा स्वामी, ८१·१३१३, **परचित्तलक्षणाचा –,** अर्जुन, ५·१६२, **पवित्रां –** ९·४७, **प्रज्ञापृथिवियेचा –,** अर्जुन, १५·२८९, **ब्रह्मविद्यां –,** गीता, १०·१९, **भोगभूमीचा –,** एक गर्वोक्ति, १६·३५२, **महाकाव्या–**१·३३, **यादव–**१०·२७१, **विश्वेसरु–** १८·१७८०, **श्रीकृष्ण–** १८·१६१९, **सदेवांचा–,** अर्जुन, ११·१३, **सव(र्व)ज्ञांचा –** १३·८६०, **सिद्धांचा –,** श्रीकृष्ण, ३·२६८(१), **सुरवरांचा –,** श्रीकृष्ण, १०·२६३; **रंक** पहा; **राउ आवंतिला** १७·१८४, **– परिवाण नेणे** १३·१३८, **परिवाण** पहा, **– हो,** स्वामी हो, १६·५१, **– होए,** संजयास आपण धृतराष्ट्रच आहों असें वाटलें, १८·१५९४. **राओ—कृपालुवांचा राओ,** श्रीकृष्ण, १०·५३, **पुरोहितांमाझि –,** बृहस्पति, १०·२०९, **भक्तांमाझि –** ७·१३३, **सिद्धांचा –** ९·५३०. **राय**—आगा हे (हें) नगर रायें केलें। पया ह्मणणेया किर साचपण आले(लें)। परि निरुतें पांतां काइ सिणले। रायाचे हात ॥ ९·२०९. तेया संजया येणें बोलें। रायाचें हृदय चोजवलें। ६·५. नाना हुडपें विडा राया। दीवला जैसा ॥ १७·२७५. १·१००, १·१२५, १·२०३, २·१, २·८१, ३·२६८ (२), ४·७, ४·२०८, ६·१, ८·२६९, १०·३०३, ११·१७४, ११·१८४, ११·२३१, ११·३८०, ११·३८८, ११·६४०, ११·६५८, १२·२३९, १३·११४७, १४·९६, १४·२६९, १५·२१७, १५·५५६, १७·११, १७·४०८, १८·१६६, १८·३२१, १८·१०६१, १८·१३९४, १८·१५४६, १८·१६०२, १८·१६२३, १८·१६४७. **परिसणेयांचेया राया,** अर्जुनास उद्देशून, ८·५७; **कासविएचेनि तूपें राया अगारिलें,** कासवीला दूध नसतें या समजास उद्देशून, अशा दुधाच्या तुपाची राजाला मेजवानी द्यावी, हें अशक्य कोटींतील उदाहरण, १५·२१७; **रायें अधिष्ठिली प्रजा** ९·११३; **कौरवराय** १७·४२४, **गुरु–** १०·५, १३·११५९, **श्रीगुरु–** १४·१६, **श्री–गोरख –** १८·१७३३, **दानि–** १८·१३६९, **देव –** ११·६४, **प्रज्ञा–** १४·७०, **वीर–** १६·१६१, १७·२८२, **वेद–** १८·२७७; **राय व रंक** यांचे संदर्भ **रंक** पुढें पहा; **रायेपणें**—सांघ पां धनुर्द्धरा। राउ रायेपणें डोंगरा। गेलेया(यां) अपुरा। होये काइ ॥ १४·२१८(२), १५·३०८; **रायाप्रति** १·१७३. **रावो**—रावो तेथ कटक। सौजन्य तेथ सोइरिक। १८·१६१४. १८·११३८, १८·१३६४, १८·१६०४. **दोषांचा रावो** १८·१०४८.

**रांक—रंक** या अर्थी. तेथ चक्षुरादि रांकां–। चा कवणु पाडु ॥ ८·१२३, ज्ञानदेवी, कुंटे, 'चक्षुरादि रंकां', ज्ञानदेवी ख पाठ 'चक्षुरादिकां' ८·१२५.

**राक्षस**—असुर, दानव, मनुष्य व देव यांचे शत्रु, हे वश झाले असतां अचाट कामें करतात. राक्षसु ही मांसा। विटों सके ॥ १६·२८३, कधींही विटत नाहीं या अर्थी. आणि श्रद्धा राजसां। घडिजे वीरेशा। ते भजति राक्षसां। खेचरां हान ॥ १७·७८. कां राक्षसांसि दिवो पाहे। राति होउनि ॥ १८·७२१, रात्र झाली असतां राक्षसांचा दिवस उजाडतो, त्यांच्या निशाचरत्वास उद्देशून. ११·५००, ११·५०२, १८·७४७. **राक्षसी, तमोगुणिची राक्षसी** ९·१७८.

**राख**—नेहमींच्या राखुंडी या अर्थी. परि नेणे जळों विझों। राख जैसी ॥ १४·३५७. **राखेहूनु कोरडें** १७·१४३. **राखोंडि**—काइ राखोंडिया फूंकितां। दीपु लागे ॥ ९·४९३. **राखौंडी**—जाला आगि तरि राखौंडी। जालील काइ॥ १३·५८४. अग्नि नेणोनि राखौंडो। चेंपिलें पोली॥ १८·१०४, राखेखालीं विस्तव आहे हें न कळतां वर दिसणाऱ्या राखेवर पाय दिला असतां चटका लागतोच. ५·२३. **त्रैलौ(लो)क्य राखौंडी करी** ११·३५१.

**राखणें**—रक्षण करणें, दुःख निवारणें, ठेवणें. जरि भुकेची राखे वेळ। जगन्नाथु॥ १५·२३. परि जांतें जीवित राखे। तृणाचें हिं॥ १६·१५५. तैसें कर्मिं बांधतां। मुमुक्ष सूटले पांडुसुता। जैसा रसरीती मरता। राखिला विखें॥ १८·१६१, कर्मे बंधक असलीं तरीं तीं कर्मे (कर्मयोगानें) करीत असतां मुमुक्षु सुटतात, जसें विष मारक असलें तरी तें रसायन पद्धतीनें दिलें असतां मरणाऱ्याला वांचवतें. ११·५५, ११·४१२. **राखों नेणसी**, कांहीं एक लपवीत नाहींस, १८·१३४२; **गोधनें राखौनि**, गुरें बाळगून, १८·८७८; **जळतें गोकुळ राखिलें** १०·२६७; **जियालें राखे** १८·६६५; **प्राणु राखे** १६·१४२; **भूखेची पीडा राखिजे** १३·२१९; **मीतूंपण राखत आहों चि** १८·३००; **राखता**—राखणदार, पहारेकरी, १८·४३५.

**राग**—(१) क्रोध, आसक्ति, आवड. सिसाराचां रागीं लाणें। सीस चि जैसें॥ १८·१७७, अर्धशिशीच्या त्वेषानें डोकेंच तोडून टाकण्यासारखें आहे. **प्रतिमल्लाचां रागीं**, जोडीच्या पहिलवानाबरोबर कुस्ती खेळण्याच्या आवडीनें, १८·४८७; **मारिलेयाचेनि रागें** १३·५४१; **रागद्वेख**, आवडनावड, २·३३२, **—द्वेष**, त्याच अर्थी, २·३३१, १६·३३९, १८·१०१५, काम व क्रोध, ३·२५९, ३·२६६; **उपरतिरागें**, उपरति आवडून, १५·१९२; **वीतराग**, ज्यानें आसक्ति टाकली आहे असा, ४·६०, १५·२४८, १८·१३३, १८·७८४, १८·१०३७; **रागी**, आसक्त, ६·४३, ७·९०; **विरागीं** १७·१७५; **रागिठ** ११·३४८, १३·६०, **—पणें** ११·४४३, **रागीठ** ११·३३९. (२) रंग. **संध्यारागिचे रंग**, संध्याकाळच्या आकाशरंगाचे रंग, ६·२५४; **सरागें**, रंगयुक्त, ११·१३२. (३) संगीतांतील स्वरयोजना. **रागेंसिं उमटतां** १०·१४१. **रागेचे—लोकपाल रागेचे** ९·३२३, हा पाठ **रांगेचे**, बरोबरीचे, असा असणें संभवतें, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'रांगेचे' असा पाठ आहे, ९·३२६.

**रांजण**—पाणी किंवा धान्य ठेवण्याचें मोठें पात्र, डेरा. १३·६८९.

**राजा**—नेहमींच्या अर्थी, अग्रणी, श्रेष्ठत्व किंवा स्वामित्व दाखविणारा शब्द. इतर शब्दांस जोडून अनेकदां या शब्दाचें **राज** असें रूप आलेलें आहे. येयां नरा(रां) माझि राजा। तो विभूतिविशेषु माझा। १०·२१९. जें राजा जरि धरासि ए। तरि बहुतु उपेगु होये। १७·१८५. १३·१००६, १६·१७४, १७·३३९, १८·७२१. **अकरा हीं राजां**, सप्तर्षि व चार मनु, १०·९५; **कुरुराजा** १८·१५७१, **शास्त्र**–१८·१४७०; **श्रीनिवृत्तिराजा** १५·५६५; **राजागर**, उत्तम बाग, १८·९३; **राजादेश** १०·७; **राजाज्ञा** ९·४४९, ९·४५०, १८·७३०; **राजकुमरु** १·२६८, **—तनया**, अर्जुना, १७·३०७, **—धानी**, **धानी** पहा, **—पंथें** १३·६१७, **—पुरीं** १४·२३७, **—बीदी**, राजमार्ग, **बीदी** पहा, **—भुवन** ११·१९४, **—मुद्रा**, राजाचा शिक्का, १८·८४६, **—योगुतुरंगीं** १८·१०४१, **—रुषी** ४·१८, **राजर्षी** ९·४८५, **—वंटा** ८·१८२, **—वळि**, राजचिन्ह, १७·३२०, **—सूय**, यज्ञाचा प्रकार, ११·१०१, **—हंस**, परिशिष्ट (८) पहा; **आत्मराज**, **आत्मा** (१) पहा; **गुरुराज** १४·२५; **देहराज**, आत्मा, १४·२०१, १५·३३५, **धैर्य** – १८·७३८; **श्रीनिवृत्तिराजें** १५·२६; **पंथराजु** ६·१५२, **पुरुषार्थ**–१८·९४४, **भक्त**–४·२, **भगत**–१८·१४०९; **यदुराजें** १३·८३, **रश्मि**– १४·४६; **विघ्नराजु**, १·१५; **श्रीराज**, श्रीकृष्ण, १८·१४६०; **सकलवीराधिराज** १२·२०, **अधिराज** पहा. **राज्ञ**—राजा याच अर्थी, **सकलदेवराज्ञा** १८·१५५९; **राज्ञत्व** १८·११३८; **राज्य**, राजाच्या सत्तेखालचा प्रदेश, राजाचा अंमल व अधिकार. आतां राज्येंसि संचलें। यश तूं भोगिं॥ ११·४७४,

अमंत्रिया राज्याची परि होये । बलासिया (बलासिया) ।। १३·५५५, १·२१०, ६·१७०, ६·४४८, ११·४६६, १३·२५, १६·४५७; **राज्य करणें** १३·९०६, **– जोडैल** १·२२६, **– भोगिजे** १·२१३; **राज्यभूषणगज** १०·२१८, **–भोगसमृद्धी** २·६८, **–सुख** १·२६२, २·४५, **आत्मानुभवु-राज्यसुखा** ९·२१७; **राज्यसेव्या** १५·३३०; **स्वर्गराज्यसंपती** १८·१५२६; **स्वराज्य,** ब्रह्मैक्यास उद्देशून, १८·१०६६; **स्वाराज्य** ३·२६६, ज्ञानदेवी, कुंटे–'स्वराज्य' ३·२७१; **स्वानंदराज्य** १७·४२३; **राज्य कां मरण**—स्वप्निचेया राज्य कां मरण । नोहे हर्षशोकासि कारण । प्रबोधलेयां जाण । जिया परी ।। १५·२६४.

**राणा**—राजा पहा. **वैकुंठीचा राणा** १·१४०, **षड्गुणा(णां)चा –** १४·३२०, **सिद्धांचा –** १३·९६६; **राणिव,** राजवैभव, राज्यपद, स्वामित्व अधिकपणा, भरभराट याही अर्थी, ह्मणौनि युक्ति हे पांडवा । घडे जेया सदैवां(वा) । तो अपवर्गिन्त्रिया राणिवा । अलंकरेजे ।। ६·३५६. अंत्यु राणिवे बैसला । १३·७२३. **संतोषाची राणिव** ६·३७२, **सुखाची –** ८·१९२; **इंद्रियें राणिवा करिति** ७·२०४; **दिष्टि भेदाचिये राणिवे बैसली** १८·२६६; **प्रकाशाची राणिं(णि)व दे** १५·१२; **धर्मु राणिवा करी** ९·१८८; **विवेकाचिये राणिवे बसे** ६·४६४; **वैकुंठिचिये राणिवे योग्य केले** १२·९३; **श्रवणसुखाची राणिव जोडली** ११·११; **श्रवणाचिये राणिवे श्रोते बैसवीं** १२·१५; **समग्ज्ञानाचिया राणिवा उगाणून,** यथार्थज्ञानाचें वैभव साधकाला अर्पण करून, १८·१०६२; **सर्वस्वें राणिवा गाजति** ८·२५८; **राणीव—ब्रह्मानंदाची राणीव जीवा फावली** ११·२४७; **सौंदर्या राणीव जोडली** ११·१९५.

**राति-ती-त्र-त्रि-त्री**—नेहमींच्या रात्र या अर्थी, अंधार, अज्ञान. **राति**—तरि प्रबोध जंव नोहे । तंव नीदे काइ अंतु आहे । किं राति सरैल पाहे । तेया आरौतें ।। १५·२२०. सूर्योदया सरिसी । राति पळौनि जाए आपैसी । गेली देहाहंता तैसी । अविद्ये सवें ।। १५·२६०. ८·१५४, ९·४३५. **रातिची चौपाहारी** १८·९६२; **अंवसेचिये रातिचें गगन** १४·२४३; **जाणणेयांची राति** १६·२७९, **पूर्णचंद्रेंसि –** १३·६४०, **माया –** १६·११. **राती**—पाहालेयां राती । आंधारें उरे ।। १८·२६१, रात्र सरून पहाट झाल्यावर अंधार रहातो काय?, १८·४९२. **अज्ञानाचिये राती माजि** १०·१२७, **अविद्यागर्वाचिये –** १७·३२७; **जाणीवेचि राती** १८·५६३; **शरीरसंयोगाचिये राती माझि** ७·१२७; **सदिन्द्रियेचिये राती** १८·८३४; **अविद्ये राती रुसौनियां,** अज्ञानरूपी रात्रीचा नाश करून, १६·२; **अहोराती** १५·३७६. **रात्र—अहोरात्र,** कां अहोरात्राची गोवी । आंधळें नेणे ।। १८·७१५. ८·१५५, ८·१६३, ११·४१९, १८·३७८. **अहोरात्राचा पैलकडु** १६·१६; **अहोरात्रत्यागें** १७·३१३, **–विद्** ८·१५७, **–त्रिं** १६·३३८ (२), **–त्रें** १३·११११. **रात्रि**—काथि रात्रि चांदिणें । धाकु धरिजे ।। १६·२६५, **धाक** पहा. विचित्र काइ रात्रि देहातें । डुडुल करी ।। १८·३८२, ज्ञानदेवी, कुंटे–'न करी' १८·३८५, घुबड दिवसाची रात्र करतें हें विचित्र (नाहीं) काय?. कां रात्रिचेया पोटा आंतु । रिगाला जो कां भास्वतु । तो रात्रि ऐसी मातु । आइके काइ ।। १८·४१४. ६·३९९, १८·७२६, १८·१४९०. **रात्रिचा अवसरु** ८·१६२, **–चां अवसरीं** १६·२७०, **–चा समो** ८·१६६; **रात्रि पाहलें** १४·३६०, **–...पाह्यलें** १४·३५२; **अहोरात्रि** १२·६३, **–ची जोडि** १३·७४२; **कालरात्रि** ११·३४०, काल (१) व (२) पहा; **मध्यमरात्रि** १८·३७९, **माया –** १४·१७३, **मोहो –** १६·६४. **रात्री**—पाहे पां देउ आघवा चि भरे । मग रात्री चि वोत्रि उरे । १३·६५३, रात्रीचि, असा पाठ रात्रीची या अर्थी घ्यावा, **वोवणें** पहा; **दिहा...रात्रीं** १६·३३८ (१); **कालरात्रीचीं कटकें** ११·१९६; **रात्रीसमैं,** रात्रीच्या समयीं, ३·११३. वरील सर्व शब्दांचे इतर कांहीं संदर्भ **तेज, दिव्-उ-य-यो-वो, दिवस, दिह, देउ-ओ-वो** (१) या शब्दांपुढें दिले आहेत.

**रांधणें**—स्वयंपाक करणें. अमृत केउतें रांधावें । १०·१२. भोजनसुख महाग । रांधितां ठांइं ।। १८·१८५. १५·३८. **अन्न विषें रांधिलें**

१३·७४०; **विखें रांधौनि वाढिलें** १८·७११; **रांधितिए उणे(णें)** १८·१४१; **रांधणें** १८·९३५; **रंधन,** स्वयंपाक, १८·४८८; **रांधवण,** स्वयंपाकघर, १३·५६१; **रांधवणि,** स्वयंपाक करणारी, जैसी रांधवणि रसोय नीकी। करूनियां मोले(लें) वीकी। २·२५४.

**रान**—जंगल, बहु योगाभ्यासिं ह्मंव। राना कडे धाव। १३·५१८. ९·४३०, ११·४१ (नीं), १३·४८, १३·४८५, १५·४८०, १६·४३८. **रानिचेयां पालेखाइरां,** वानरांस उद्देशून, ११·२३; **रान वळघले,** रानोमाळ झाले, ११·६५४; **बोलणेयांचां रानीं हींडतां** १०·२०; **भवस्वर्गाचिया राना धांवतु** १५·४६०; **शब्दांचेया राना माजि रिगे** १५·३२३; **स्वैराचाराचें रान रिगाला** १६·४४५; **झाडरानें** १८·९३३; **विषयरानिचे वाघ,** काम व क्रोध, ३·२३६; **ही रान भीजे** हा पाठ **हीरा न** असा पाठ तोडावा, १३·४८१, **भीजणें** पहा.

**राबणें**—परिश्रम करणें, मेहनत करणें. **राबता,** मेहनत करणारा, जें प्राणाचां घरिं। आंगें राबते भाऊ च्यारी। १३·२९, सं. वा. श. पहा. **राब**—मेहनत, व्यवहार. मग तो इंद्रियकदंबु। करविजे तंव राबु। जंव कर्तव्याचा लाभु। हातासि ए॥ १८·४९९, **कुकर्मांचा राबु करवी** १३·३१; **स्वैरत्वाचा राबु करी** १४·२२८; **राबाउणें (राबा उणें)** १८·९४, **उणा-णी-णें** पहा. **राबणी**—सर्वेंद्रियां आंगणीं। विवेकु करी राबणी। १४·२०४.

**राभस्य**—अविचार. १८·१०२२, विषयसुख (हंस कोश); **राभस्याची गती** १७·३८६; **तैसें तुह्मीं राभस्यें बोला,** तसें बोलणें अविचाराचें होईल, १०·२९८; **राभस्यें सीमा सांडे** १७·३९३.

**राल**—आसक्ति (राजवाडे), आवड. फलहेतुची राल नाहीं। अंतष्करणीं॥ ६·६४, ज्ञानदेवी, कुंटे–'चाड नाहीं' ६·६४.

**रावणें**—रंग लावणें. कैसीं नीलोत्पलातें रावित। आकाशा रंगु लावित। तेजाची वोज दावित। इंद्रनील॥ ११·५९०. तांबोलें वोंठ राउं। १३·५६२, **येथें** रांपविणें या अर्थी (राजवाडे). मग राविले सीणत। आणिक जीव॥ १३·२२९, **राविले** हा **राखिले** चा अपपाठ आहे. ज्ञानदेवी, कुंटे – 'राखिले शिणत' १३·२३०.

**राशि-शी**—(१) ढीग, समूह. **राशि**—मी राशि आहे (हें) समस्ता (स्तां)। अपराधांचा॥ ११·५४८. **अवकणाचा राशि** ९·४५, **कापुराचा** – २·२५१, **जल** – १०·२११ (१), **तपो** – १०·२११ (२), **तेजो** – ११·३०१, १५·२८०, **पयो** – १०·२१८; **वेदराशिचेया सामां आंतु** १०·२५८; **शिळाराशि** १६·३७७; **सूर्यकणाचा राशि** ८·८९. **राशी**—**ग(गु)णराशी** १६·२१०, **जीव** – १३·१०५७; **तपोतेजाचे राशी** ४·६१; **धातुराशी** १७·३६१; **सुखाचा...राशी** १६·३५४; **राशि-शी**—**शब्दराशि** ११·७२, १८·१४२१, **–राशी** १८·१४१८; **रासि-सी** पहा. (२) नक्षत्रांच्या बारा राशी. **राशि**—मीन गा तूझें राशिनांव। १७·१५. **राशी**—क्रूरग्रहांची जैसी। मांदी मिळे येकी राशी। १६·२५५.

**-राष्ट्र**—शब्दास जोडून. **महाराष्ट्रमंडळीं** १८·१७८१.

**रासि-सी**—**राशि-शी** (१) पहा. **रासि**—**पातकांचा रासि** ३·१४०; **आनंदरासि**—अहो अलुमालु अवधान देआवें। इतुलेनि आनंदरासिवरि बैसावें। ९·५२९. **रासी**—साकरेचिये रासी। बैसली तुडे मासी। १३·७८१. **लवणकणाचिया रासी** १३·९१४; **अपारमोहरासी** १८·५१९.

**रासौभा**—सडा, झडण, वर्षाव. तेथ रासौभा होंत। नक्षत्रांचा॥ १·१५६, ज्ञानदेवी, कुंटे–'सडा', १·१५६.

**राहटणें-राहाटणें**—आचरणें, वागणें, व्यवहार करणें. **राहटणें**—पया लागि पुढां अथवा पाठिं। जियें राहटलां विरुद्धें गोमटीं। तियें मायेचिया परी पोटीं। सामावी प्रभू॥ ११·५४९. **कर्मेंद्रियें कर्मीं राहटतां** ३·७०; **जतना राहटताति** २·३१०; **स्वधर्मातें चि राहटतां** २·२२८, **स्वधर्में**– २·१८८. **राहाटणें**—इंद्रियें गुणाधारें। राहाटति निजव्यापारें। ३·१८१. घरिचीं चि राहाटति घरीं। घर काहिं न करी। १३·१०७५. १·२४६, ३·७७, ३·१२६, १३·३०२, १३·३६४, १३·४७८,

१३·८०७, १३·९२३, १८·६६६, १८·१६८८. **इंद्रिय राहाटे** १८·४६२, **इंद्रियग्रामु राहाटला** १८·४३८; **उचितु धर्मु राहाट** ३·१४९; **कर्म राहाटे** ५·४४; **कर्माधारें...राहाटिजे** २·२३४; **कवण कवणी परी राहाटे** ९·१२७; **केधवां कैसें राहाटावें** १४·१८९; **मन चि राहाटें(टे)** ५·५३; **श्रीनिवृत्तिनाथु राहाटतसे** १८·१७०७; **स(सं)बंधधर्मीं तुर्सी राहाटलों** ११·५३०; **राहाटावया** ६·४११, **–वेया** १८·१४५३; **राहाटणें—शरीरें वाचा मानसें राहाटणें** १६·११३; **राहाटि—राहाटिचा उजरा** १६·२६९; **कर्मिं राहाटि** १८·६५८, **घरींची**– १३·१११८, **सरिसी**– १३·१३७; **राहाटी—**या कारणें किरीटी। स्वधर्मांची राहाटी। न विसंबिजे संकटीं। सिद्धमंत्रु जैसा॥ १८·९४५, १५·३३८, १६·२७१, १८·३१०, १८·३३८, १८·१४६९; **आश्रमधर्मांचिया राहाटी** ९·३०४, **बाह्यांचिये**– १३·३८, **भूतमात्रिं मौवाल**– १६·१६९, **मनाचिये**– १३·३०९, **मनोबुद्धिचिया**– ९·४२०, **रथिचिये**– १८·१५६५; **राहाटवणें**–जें इंद्रिय राहाटवी। तें कतृ(र्तृ)त्व गा॥ १३·९६५. ह्मणौनि विचारावेया शास्त्र। राहाटवावें जें वक्त्र। तें वाचेचें हीं सूत्र। हातीं न धरी॥ १७·२३१, १८·५०१, १८·१३०८; **ज्ञाता इंद्रियांचा मेळावा राहाटवी तेथ कर्त्ता होए** १८·४९०; **हातपायांतें राहाटवी** १८·१०२३.

**राहणें—**असणें, थांबणें, समाविष्ट होणें, स्थिर असणें, स्थिर होणें, बाकी उरणें, बाकी ठेवणें. तंव गुरु ह्मणति राहीं। हें तुज बोलावें न लगे काहीं। १·८३, थांब या अर्थी. पाइकु पाठिसिं घातला। आपण पुढां राहिला। १·१४३. कां राहे ह्मणितला राहिल। महावातु॥ ६·४१२. लक्ष्मीये ही परि राहिलें। जिन्हार जें॥ ११·११८, बाकी ठेवलें, दाखविलें नाहीं. ६·१८१(२), ६·१८३, ६·१८९, ६·२१५, ६·२४०, ६·२५१, ६·२९७, ६·४१६, ९·२३६, ९·२९३, ११·७८, ११·८०, ११·५०३, ११·५८४, १३·७९, १३·९५, १३·३९३, १३·६२०, १६·७४, १७·१२८, १७·१५७, १८·१९, १८·२१९, १८·४१३, १८·१०६२, १८·१२४४, १८·१३७०. **अमृतांतु मरण केवि राहिल** ९·४२१; **आत्मतोषीं मनें राहे** २·२९३; **आत्मस्थिती राहुनि,** स्वरूपांत स्थिर झालों, ३·१६४; **उगला राहे** १८·७६, **उगा चि**– ११·२२३, **उगा न**– १३·८२०; **उगे कां पां राहाति** १७·६३; **उमाळे कडवसां राहिले,** प्रवाह कडेला लागून (दडून) राहिले, ११·३५९; **एकें चि श्लोकें राहे,** एकाच श्लोकावर विश्वास ठेवून राहील, १८·१६४२; **काइ राहों,** काय बाकी दडवून ठेवावें? ४·२९; **क्षारता तोयत्वें राहे,** समाविष्ट होते, १८·१२०२; **गीत राहातां,** गाणें थांबलें असतां, १८·१०८७; **घडी राहांतु असे काइ,** कांहीं वेळ तरी थांबतो काय?, १७·२५०; **घणवट राहे,** घन भाग तेवढा बाकी राहतो, २·१३०; **चित्त राहलेयां,** स्थिर झाल्यावर, ८·११२; **चेइलेयां राहांत पावें,** जागें झाल्यावर लाभेल काय?, ९·३२८; **जालें जग जेथ राहे** ९·२७०; **तिहीं राहिजे ना,** त्यांनीं, सद्गुरूंनीं, कांहीं बाकी ठेवलें नाहीं, १८·९९१; **दीठि आंतुलीकडे राहुनु** ६·२०४; **द्रुति राहे,** वास राहतो, १८·४२०; **निवातु राहे,** स्तब्ध राहिला, १०·३०३; **निवांतु जऱ्हीं राहे,** ७·१२९; **पडिसादा होउनि राहिला** १·१६१; **पण्यांगना वडीलपणें राहे** १३·२०४; **परमात्मरूपीं बुद्धि राहे** २·३४०; **भीष्मातळिं राहिजे** १·१२३; **मन...निश्चल राहील** ६·४१६; **मन राहांतें पावें,** मन स्थिर राहील असें पाहावें, ६·१८१ (१), **मन स्वरूपीं राहे** १७·२२६; **सिद्धांचे मनोरथ कृतार्थ होउनियां राहिले** १३·२७८; **महाबोधु राहे** ५·७४; **मौन करुनु राहिला** २·८३; **राहौं नेणें(णे),** धरून ठेवतां येणार नाहीं, १०·१११; **लक्ष्मी मुकुंदिं राहिली** १६·८२; **संकटीं केवि राहों** ११·३१७; **विवेकें राहौनि ठाके** १०·७३; **श्रोते ह्मणति राहे** १३·८५१; **समाधि राहे,** स्थिर होते, ६·६०; **राहाणें—दीठिचें राहाणें आधिं ए** ६·२०५, **आधिं पहा; राहाणें...हींडे** १३·६८९; **जाये...राहे** १४·७३; **वीरें अथवा राहे** ९·२५४; **राहविणें—**परि विश्वरूप हें राहविलें। दावि चि ना॥ ११·३५,

**राहावी** ६·१६९(२). **न्हाणें, राहणें** या अर्थी. आणि दडपिलेयां धूंवें। न्हाइजे काइ ॥ १८·९५७. ४·२७, ६·३८०, १५·४२३; **नन्हांति (न न्हांति)** १५·३५०; **निवांत हिं न न्हावे** ११·५२२; **लक्ष्मी न न्हाय** ३·१०९; **हृदय न न्हावें** ११·५६७; **न्हातेआतें राहावी** ६·१६९(१).

**राहु**—चंद्रास ग्रासणारा ग्रह, सूर्यासंबंधींही या ग्रहाचा उल्लेख केलेला आहे. **राहूनि, राहूनें**, १८·१००६; **राहुग्रस्त**, सूर्यास उद्देशून, १·२६८; **रवि-चंद्रा राहु-मेलु** १७·२७१.

**रिकामें**—उद्योग नसलेलें. **रिकामें तोंड**, बडबड करतें, १५·२१.

**रिखि-खी-षि-ह्षी**—ऋषि पहा. **रिखि-खी**—आतां वाक्यसूर्यकर फांकलें। आणि रिखिं मार्ग होंति जे कथिले। १०·१४६. हे बहू उखीखिखी। रिखीं केली नैमिषिं। १३·६७. **रिखीकेशी** ११·२५८, ज्ञानदेवी, कुंटे–'हृषीकेशी', ११·२६२, हृषीकेश शब्दांतील हृषीक शब्दाचा ऋषीशीं संबंध जोडून हें रूप बनविलें असावें; **महारिखीं माझि**, भृगु, १०·२११; **महारिखीचें ज्ञान** १०·६५, **महारिखी अथवा सिद्ध** ११·३२६; **रिखि(खिं) आणि देवां** १०·६७; **रिखीं अथवा देवां** १०·७०. **रिषि**—**रिषीश्वरीं** १०·१३७; **देवरिषि**, नारद, १०·१४१; **रिखी-षि, सप्तरिखी** १०·९९, **सप्तरिषि** १०·९०, सं. वा. श. पहा. **रुषी**—**राजरुषी** ४·१८; **सप्तरुषी**—अलंकृत सप्तरुषीं। आकाश जैसें ॥ १८·८७०, सं. वा. श. पहा.

**रिगणें-रिघणें-रीगणें**—शिरणें, प्रवेश करणें, आरंभ करणें, पुढें येणें. संदर्भानुरूप या क्रिया-पदाच्या इतर अर्थांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. **रिगणें**—आणि जेथ शांतिचा जीवाला नाहीं। तेथ सुख न रिगे चि कहीं। २·३४५, ज्ञानदेवी, कुंटे–'सुख विसरोनि न रिघे कहीं' २·३४५, राजवाडेंच्या कांहीं प्रतींत 'विसरौनि' पाठ आलेला आहे. कां सूर्यबिंबा माझारि। आंधारें रिगे ॥ ९.१२४. आणि रिगौनियां शयनीं। सरिसा पहुडे ॥ ११·५४५. आंतु रिगौनु वेगळें। आकाश हें ॥ १३·१४५. आगा आकाश कें नाहिं। हें न रिगे चि कव्हणिये ठांइं। १३·१११४. नाना देउळा रिगाला देउला–। चेया कामा॥ १८·४८९. २·२५८, ३·१८४, ४·५, ४·९६, ४·१४९, ५·७१, ६·५५, ६·६८, ६·१७३, ६·३५४, ६·३७०, ७·१३, ७·८८, ७·१४९, ७·१७६, ८·२३८, ९·४८६, ११·८, ११·६१, ११·२१२, ११·३५५, ११·४७२, १२·२४, १२·३५, १२·९८, १३·६३, १३·१२४, १३·४८३, १३·५३८, १३·६०५, १३·६९९, १३·७७२ (१, २), १३·१०२०, १३·११५६, १४·१५३, १४·१५९, १४·१७०, १४·३१०, १५·३२३, १५·३६९, १५·३७०, १५·४८०, १६·५३, १६·४४८, १७·१९, १७·१४०, १७·२३८, १७·२७४, १७·३६५, १८·१९६, १८·४०६, १८·४१४, १८·७३५, १८·१०९६, १८·१२६१, १८·१३१० (२), १८·१४१४, १८·१४५५, १८·१४७२, १८·१५२१, १८·१७०७. **अंकीं रिगे** ११·५१२; **अधिकारिया गावों रिगतां** १८·७९२; **अर्थज्ञानाचां गाभारां रिगति** १८·४६; **अर्थें मनिं रिगौनि** १८·१४५०; **आंगा रिगाली**, गंगेस उद्देशून, १४·३५०, –**रिगे** ९·१०७; **आशे न रिगे** ६·६३; **इंद्रियें पदार्थीं रिगतां** १८·९८८; **उफकेन जो रिगे**, उफका पहा; **कंदर्पु शरण रिगाला** ११·१३७; **कर्त्ता कर्तुत्वाचां कामठां रिगे** १८·३५६; **कांताचां मानसिं रिगौनु** १३·८०७; **गंगा उदधी रिगाली** १३·३७१; **गाउ न रिगिजे** १८·१२५०; **चंद्रबिंबाचां गाभारां रिगालेयां** १०·२९८; **चित्त मजमाझि रिगतां** १२·१०९; **जाणणें अनुभविं रिगे** १८·११९९, **जाणणेयां आड रिगौनि ठाके** ९·१४४, **जाणीव जेथ न रिगे** ७·५; **डिरिया रिगति** १५·१८४; **ताटीं रिगे** ९·१५(१); **दीठि रिगे** ११·७४, –**न रिगे** १२·४१; **दृश्यपंथीं न रिगतां** १८·१६८२; **दृष्टि जै(जैं) रिगे** १३·१०८१; **पाणी गंगे स्नाना केवि रिगे** १८·११६१; **बालका माये पुढां रिगतां** १३·३६०; **भक्तिपंथीं रिगाला** १२·२१७; **मन्वंतर मनू पुढें रिगे** १५·१२७; **मानुषे योनी हीं रिगे** १४·२३६; **मोक्षफला रिगे** १७·६३, **मोक्षुफल घर रिगे** १८·१९७; **लोह चि वेढां रिगे** १८·१३०२;

विरक्ति मानसीं न रिगे १५·३६०; शंका मनीं रिगे १३·२६४; शरण रिगालेयां १८·१४००, –रिगिजे १८·१३९३; सिंधुगर्भीं भरितें रिगालें ११·६४०; सूक्ष्मतेचिये सुरंगीं एक रिगति, कित्येक सुषुम्नेच्या भुयारांत शिरतात, १३·१६५; स्वयंबुद्धिचां बाहीं रिगाले ७·८०; हृदइं चि रिगे १८·९५४, –रिगौनि पांति ११·८५; रिगतां निगतां १३·४१५; रिगणें—संसारदुःखां रिगणें नाहीं २·३३८; रिगता, पुढें होणारा, सरसावणारा, कवणी भंगीं रिगता होईल, कोणत्या पद्धतीनें विचारण्यास सरसावेल, १०·३१०; रिगतें—डोळां रिगतें झाडावें, डोळ्यांत शिरणारीं चिलटें इत्यादि झाडावीं, १३·२८२; निरिगती, प्रवेश करीत नाहींत, ६·४२०; रिगवणें—विष खाणें नागवे। जळतां घरिं न रिगवे। १३·५१३, आगी माझि न रिगवे १८·७०८; रिगवणें, प्रवेश, वसंताचें रिगवणें १३·१७८; रिगवणी १३·१६८; रिगावा—रिगावा होए १५·४९; रिगांवा ७·१३६, १२·१७२, १३·९२९; सुखाचा रिगांवा १८·७७८; रिगिनिगा, ये जा, १८·३३५; रिगिनिगि १३·१०२. रिघणें—बाळ बापाचां ताटीं रिगे। रिघौनि बापातें चि जेवऊं लागे। ९·१५ (२). १७·१९२, १८·५३३; कर्मिं न रिघे १८·२३६; कृपेचां गाभारां रिघौनि ११·६७; नानारसीं रिघौनि, पळीस उद्देशून, १६·२४६. रीगणें—आत्मानुभववाटे रीगति १६·७; शरण रीग १८·१३१० (१).

रिचवणें—ओतणें, वर्षाव करणें. एरी कळशिचें एरीं। रिचविलें जेया परी। १३·११३९. मेहु चातकासि रिचवी। १५·२०. जळतां कुंडीं रिचवीति १७·९६.

रिझणें—संतुष्ट करणें, संतुष्ट होणें. कां करविलेनि चोजें न रिझे। बाळका माए ॥ ११.१७. येया बोला संत रिझले। ११·२१. ५·९, १६·२२२. तिये पूजे आत्मराजें रिझलेनि १८·९१४; रिपुचेया गुणा रिझों ये १७·४२४. रिझव—णेंहें (हे) रिझवितील आणितें। जाणांचिए ॥ ६·४९२. नाचें नटें रिझविती। १६·३५९. माउली रिझवी ९·६.

रिण—ऋण, कर्ज, उणेपण. सत्छब्दु रिणा दोसें। ठेविला देवें ॥ १७·३७४, उणेपण नाहींसें करण्यासाठीं. कां रिणावरि विवाहो। विस्तारिला ॥ १८·७९२. रिण फेडिता (तां) १८·१०२; रिणायित, कर्ज देणारा, १७·३०३; रिणियां(या) १६·१६१, १८·२९९; समर्थु कां रिणियां(या) १८·२५०; रिणियेपण, कर्जदारपण, ८·१२९, ज्ञानदेवी, कुंटे–‘ऋणवैपण’ ८·१३१.

रिता-रीता—ज्यांत कांहीं नाहीं असा, रिकामा, पोकळ. रिता—भरिजे तंव अधिकु। रिता होये जो ॥ १८·१०५२, कामास (इच्छेस) उद्देशून, जितका विषयांनीं भरावा तितका तो रिकामा होतो, काम जितका तृप्त करावा तितका तो वाढतो. रिति(तिं) सोपें, पोकळ सोपटीं, ११·४७१. रीता—न भरलेला. रीता ना भरितु। रहितु ना सहितु। १३·११०४. आतां रीता समुद्रीं रिगे। तो उचंबळतु कुंभु निगे। १७·१९, न भरलेला कुंभ समुद्रांत पडला तर तो उचंबळत रिकामाच निघेल काय? ज्ञानदेवी–आतां रिता कुंभ समुद्रीं रिगे। तो उचंबळतु भरौनि निगे। १७·१९. वांझें आकाश रीतें, वायु उत्पन्न होण्यापूर्वीं आकाश जसें रिकामें असतें, १४·७५; रीतिं पोकळें १३·२९०; रीते श्रवण—माझेया कीर्त्तीविण। जेयांचे रीते नाहीं श्रवण। ९·४४२.

रिती-रीति-ती—पद्धत, तऱ्हा, प्रकार. रिती—रीतीनें, प्रकारानें. किंबहुना ऐसा नृपा। पार्थु जाला असे कृष्णकृपा। तो जिया कडे साक्षेपा। रिती पाहे ॥ १८·१६३२, राजा, अधिक काय सांगूं, अर्जुन कृष्णकृपेनें कृतकृत्य झाला आहे, तो श्रीकृष्ण साक्षेप दृष्टीनें, ज्या बाजूला पाहील तेथें, १८·१६३३·१६३४ पहा, ज्ञानदेवी–‘साक्षेपा रीति आहे’, कुंटे–‘साक्षेपा रीती आहे’ १८·१६५४. रीति–१७·३१८, इया रीतिं १७·३७०. रीती—आचरती रीती १३·७१५, कवणां–१४·३६, तामसैयेचिया रीं(री)ती १७·२५२; दोनी रीति, (स्वरुपाचें ऐक्य पाहतां) भिन्नाभिन्नत्वाचे दोन प्रकार दिसले तरी तें तसें नाहीं, १५·२९८, यावर १५·२९९ ते १५·३०२ पहा, नागरा–१७·४०७; सांघतियां चि रीती, सांगण्याच्या पद्धतीवरून, ६·३३०, ज्ञानदेवी –‘सांगतिया चि रीति’, कुंटे–‘सांगतियाचि

रीती' ६·३३०; इया, जिया, यया, या, यांसह रीतीचे संदर्भ—८·९६, १३·४५३, १६·८१, १८·२२४, १८·१५३१; **रसरीती** १८·१६१; **रुखाकारुरूपकरीती** (रुखाकारु रूपकरीती), १५·४५२, रूप पहा.

**रितु-रुतु**—ऋतु. **रितु**—साइं रितुं समान। जैसें कां हें गगन। १२·२०१. **रितुत्रय** १४·२८९, सं. वा. श. पहा, **-पति**, वसंत ऋतु, ३·१००; **षडरितू** १४·३६१, सं. वा. श. पहा. **रुतु, रुतु बरवा शारदु** १८·३४२; **रुतुकालिं** १३·५२८; **रुतूं आंतु**, सर्व ऋतूंत, १०·२६०.

**रिद्धि-द्धी-रुद्धी**—संपत्ति, समृद्धि, तप किंवा योगसाधनेनें मिळविलेलें ऐश्वर्य. कांहीं संदर्भांतील सामान्यरूपें रिद्धि किंवा रिद्धी चीं असणें संभवतें. **रिद्धि**—कां रागी सांडी रिद्धि। आली सांती ॥ ७·९०. **अज्ञानाची रिद्धि** १३·७००; **तपोबळें रिद्धि पातलेयां** १·१८८; **साम्याची रिद्धि उपनली** ७·१२८; **आत्मरिद्धि** १८·१००३; **रिद्धिसिद्धी** २·३६४. **रिद्धी**—न करीति सिद्धिंचे पाड। न धरीति रिद्धींची भीड। योगा ऐसें दुवाड। हेलासति ॥ १३·१६३. २·३६१, १६·२७८. **आयुष्यरिद्धी** १८·१६०, **वाग्-** १८·२७; **रिद्धिसिद्धीचिं बाललेणीं** १२·६, **-सिं द्वंद्वें** १२·६१, **-चीं वृंदें** १८·१०६५, **-चा संभ्रमु** ४·१३२. **रुद्धी** २·३६३.

**रिपु-रिपू**—शत्रु. **रिपु**—म्हणौनि आपणेयां आपण चि रिपु। जेणें वाढविला हा संकल्पु। एरु स्वयें म्हणां वंधुबापु। जो नाथिलें नेघे ॥ ६·८०, ज्यानें देहाभिमान वाढविला आहे तो आपणच आपला शत्रु होतो, जो खोट्याचा अभिमान (देहाभिमान) धरीत नाहीं त्यास स्वतःचा बंधुबाप म्हणावें, ज्ञानदेवी—'येर स्वयंबुद्धि म्हणे बापु' ६·८०. ११·४६५, ११·४७५, १७·४२४, १८·१०५१. **रिपू**—रिपू पाठि नेंदिजे तैसी। रणांगणीं ॥ १८·८६३.

**रुख-रुंख-रूख-रूंख**—झाड. **रुख**—अथवा नावे हान रिगे। तो थडियेचे रुंखजात देखे वेगें। साचोकारें पाहों लागे। तंव रुख म्हणे अचल ॥ ४·९६ (२). जें वाढि अधोमुख। रुखा पया ॥ १५·५१. १५·५५, १५·७२. **रुखाकारुरूपकरीती**, रूप पहा; **कां रुखाचेनि आर्यें वारा मांडला**, ह्या संसारवृक्षाचा एवढा विस्तार झाला आहे कीं वाराच विस्तारला आहे कीं काय?, १५·६१; **रुखाकारें** १५·४०. **रुंख**—रुंख कवण पेरी। कोण समुद्र भरी। १३·५७. तैसा व्ययें चि हा रुंखु। अव्ययो हा ॥ १५·१२१. पै रुंखु डोलतु देखावा। तरि वारा वाजतु मानावा। रुंखु नसे तेथ पांडवा। नाहिं चि काइ ॥ १५·३४४, झाड हालत आहे असें पहावें तरच वारा वाहत आहे असें मानावें, जेथें झाडच नाहीं तेथें वाराही नसतो काय?. १३·२९६, १५·११०, १५·१२०, १५·२१४, १५·२२६, १५·२५८, १६·८५. **प्राकृतां...रुंखां** १५·१९९; **पीकलेया रुंखाचें फल** १८·२३५; **रुंखाचा ये वांका**, बीजास पाणी लागतांच वृक्षाचा आकार येतो, १४·९४, ज्ञानदेवी, कुंटे—'आवांका', आकृति या अर्थी १४·९५; **रुंखजात** ४·९६ (१); **रुंखातलिं** १३·५९५; **भवरुंख** १५·१४२, १५·२०६, १५·२३९, **संसार-** १५·२१८; **संसाररूपा रुंखा** १५·४८६. **रूख—उर्धमुलु रूखु** १५·६२. **रूंख**—आगा वारा जऱ्हीं वाजों सरे। तऱ्हीं तो डोलु रूंखीं उरे। १८·४२०. गीते माझि असे रूंखु। बीजीं जैसा ॥ १८·१४२१. १४·३७२. **रूंखपण** ९·२९०.

**रुचणें**—आवडणें, मानवणें. कां चंद्राचा उदयो जैसा। उपेगा न वचे चि वायसां। मूर्खां विवेकु हा तैसा। रुचैल ना ॥ ३·१९५. तिये रसने जो रसु रुचैल। तो आपण चि होइजैल। १३·४२७. **प्रमादु रुचे** १४·१९१; **न रुचे** १३·१८४, १६·१६५; **योगशास्त्र न रुचे** १३·८२४; **रुचलेपणें** १६·७९; **रुचि—जैसी पीयूषिं रुचि न विटे** १७·२१९; **रुचिकर** ३·१९; **रुची**—प्रेम रुचीसि आलें। १·३५, ज्ञानदेवी, कुंटे—'प्रमेय'. आंगा मना रुची येयावें। येतुलें कृत्याकृत्य नाठवे। १३·७७६, **जेव्हणाराचिया रुची** १७·१२०; **इंद्रियरुची सारिखे**, इंद्रियांना येथें जिभेला आवडतील असले, ३·१२९. **अरोचक—अरुचि.** जें अमृत ही परि नावडे। ऐसें संवियां चि अरोचक जें पडे। ४·१९५, १८·६५४.

**रुणुझुणणें**—घंटि किंवा घुंगुरांचा मंजुळ ध्वनि होणें. **क्षुद्रघंटिका रुणुझुणिति** १·७.

**रुतणें-रूतणें**—अडकणें, अडून राहणें. **रुतणें—भुइं रुतलें असे** १५·१२२; **सहस्त्रवेरी लोही रुतलिया आहाति,** हजारों मोहोरा पुरलेल्या आहेत, ९·५८. **रूतणें**—जैसा कर्दमीं रूतला। राजहंसु ॥ २·४.

**रुद्‌णें**—रडणें, शोक करणें. ऐसें आदी चि जें नाहीं। तेयालागि रुदसी काइ। २·१६९. **रुदतां,** कितीही शोक केला तरी, ३·११५; **रुदन** २·१, २·१२; **हांसेया रुदना** १८·६६६.

**रुंधणें**—अडविणें, वेढणें, व्यापणें. गजबजों लागे कैसा। व्याघ्रें रुंधला मृगु जैसा। १३·१८६. सिंहुं रोगें रुंधला। १३.१००६. १५·५३. **अवरुद्ध—तिमिरावरुद्ध** २·५६, **तिमिर** पहा. **उदकें उदक रुंधलेयां** १८·११६०; **द्वार रुंधलें** १८·१४९२.

**रुपणें-रूपणें**—खुपणें, टोचणें. **रुतणें-रूतणें** पहा. **रुपणें**—शस्त्रें हाणितलेयां छाया। आंगीं न रुपे ॥ २·१४०. कां चिखलीं रुपली गाए। १६·१४१. **रूपणें**—आपणेयांसि चि रूपावें। शस्त्रें केविं ॥ १५·२९३. किं शस्त्र रूपें( पे ) आपणेयां। आपणचि काइ ॥ १८·४४८. ६·८७, १४·२४७; **रूपों सके** १३·२७३; **साबलाहुनु रूपे** १३·६६१.

**रुळणें-रूळणें**—मोकळेपणें पसरणें, वावरणें. **रूळणें**—प्रेम रुळतसे बोलतां। १५·२७. **रूळणें**—कंठिं रूळताति अलौलिक। मालादंड ॥ ११·२१६. ८·६३.

**रुसणें-रूसणें**—रागावणें, रागावून दूर जाणें. **रुसणें**—जैसें चोर पाहे झोंबती। तंव आजी चि रुसिजे संपत्ती। १३·५८०, उद्यां चोर संपत्ति लुटतील म्हणून आजच ती दूर करावी. जें रुसतां बांधे ठांवों (ठावो)तें प्रेम गा हें ॥ १८·२९२. १०·१८, ११·१००, १४·३३३, १६·४०४, १७·२५२. **रुसौनियां** ११·५३८, १६·२; **रुससि... पालीसि** ११·३०६; **रुसे तरि बुझावितु जाये** ११·१७२. **रूसणें**—आतां ते चि हातवटी। तुज ही सांवों गोमटी। जेया कर्मासि किरीटी। कर्म चि रूसे ॥ १८·१६३, कर्मच कर्मावर रुसतें, कर्म नाहींसें होतें, अशी सुंदर हातवटी तुला सांगतों; **रूसौनियां** ६·३८६.

**रूढणें**—प्रचलित होणें, लोकमान्य होणें, वाढणें. दर्पु कामक्रोधीं रूढला। १६·३९४. **अज्ञान हें रूढे** १५·३१०, **मनुष्यलोकु पृथ –,** त्याला मनुष्यलोक म्हणण्याचा प्रचार आहे, १५·१६१; **वेव्हारु रूढला** १८·१२१९, **साधकदशे –** ६·४६२; **रूढ**—लोकमान्य, प्रसिद्ध, बाह्ये(ह्यें) तरि रूढु। लौकिकु जैसा ॥ ३·६८, १०·१९५, १५·३२०, १६·२३४; **जे रूढ वीर** १·१०३; **मी चि सर्वज्ञु एकु रूढु** १३·७१६; **रूढपण** १·३६; **रूढि** १·१०९, **ध्यान – १८·१०२७;** **रूढी** १८·१३१५, **सद्भावाचिये – १७·३८९;** **रूढवणें**—जगीं कीत्तितें रूढवीं। स्वधर्मीचा मानु वाढवीं। ३·१८७, ३·२४५, ९·१६७.

**रूप**—सौंदर्य, मूर्ति, आकार, देखावा, वर्णन. भयासुर आणि सुवेख। हें रूपाचें स्वरूप देख। जें उपजवी सुखदुःख। नेत्रद्वारें ॥ २·११६. का रूप नव्हे वायां। रूपा लागली छाया। १३·९५५. रत्नाचां रूपिं मिरवे। गुंजांचें लेणें ॥ १८·११३९. ४·५८, ६·२०६, ६·३९६(१), ७·४३, ९·१५९(२), ९·२९५, ९·४२३, ९·४४१, १०·२२८, १०·२६३, १०·२६९, ११·११५, ११·१२३, ११·१३७, ११·१४५, ११·२०२, ११·२२४, ११·२७१, ११·२७४, ११·२७६, ११·२८१, ११·२८७, ११·३१६, ११·५८१, ११·६२२, ११·६२९, ११·६३७, ११·६४३, १३·७४३, १३·८०२, १४·७१, १४·८२, १४·८९, १४·१२४, १४·३५८, १५·३८६, १५·४०९(२), १५·४७१, १५·५११, १५·५२०, १५·५६२, १६·१०८, १६·१२६, १७·३३८, १७·३७९, १८·१२, १८·८०, १८·२६२, १८·३७६(१), १८·४०७, १८·४५६, १८·७७४, १८·८५७, १८·१०८२, १८·१२०४, १८·१२४०, १८·१२५४, १८·१२५८, १८·१३०६, १८·१४०२, १८·१५११. **रूपांची खाणि** ६·१८; **रूपाचां डोंगरिं** १५·३२५, **–चा सुजाणु डोळा** १८·१४८५; **अक्षराचें रूप** १५·४७६, **अधिकाराचे(चें) –** १८·११६, **अहिंसे –** १६·११३, **क्षेत्रज्ञाचें –** १४·८०, **गुणाचे(चें) –** १८·८३५, **नादासि –**

११·६४१, ११·६४७, ११·६४९, ११·६५९, ११·६६३, ११·६६८, ११·६७१, ११·६७३, ११·६९२, ११·६९८, १२·२१, १८·१४३४, १८·१५९७, **–दर्शन** ११·९३, ११·११९, ११·३६७, **–मय** ११·११६(२); **वृक्षरूप, वृक्ष** पहा, **वेद–** ३·१३५, **व्यापार–** १३·३०३, **शांति–**१६·२१०, **सरूप, स्वरूप** पहा; **सत्तारूप** १४·२९५, **संध्या–** १७·३१३, **सर्व–** २·१४९, १८·१४०८(१), **संशय–**४·१९४, **संसार–,** अश्वत्थास उद्देशून, १५·४८६; **सुख-दुःखरूपिं** १५·२६५; **सुखरूप** ९·४०२, **स्त्री–** १६·३३२, **स्नेह–**५·१७२, **स्वधर्म–, स्वधर्म** पहा; **स्वरूप** पहा; **अरूप**—बोली(र्ली) अरूपाचें रूप दावीन । ६·३६(१), ९·१५९(१), १८·११९३, **—पणें**—अल्पु ना बहुवसु । अरूप-पणें ॥ १३·११०३; **तिन्हीं रूपें** १७·७५, **त्रिरूप** १७·१९६, **सं. वा. श.** पहा; **येणें रूपें** २·१९२; **आदि ना अंतु स्थिति ना रूप** १५·२२४; **स्परिसु आणि शब्दु रूप रसु गंधु** १३·११७; **रूपें वयसा माजा** ९·४२८; **रूप अथवा नाहिं** ११·५१७; **रूप ना वर्णु** १३·९७७; **रूप वर्णु व्यक्ति** १३·८६६; **शब्दस्पर्शु रूपगंधरसु** १८·४६९; **हें रूप हे छाया** १३·१०२५; **रूप-पत्रपेलांवेलिं,** रूप हेंच पान वाढीस लागल्यावर, १५·१०१; **रूपक,** एकादें रूप देऊन साम्यता दाखविणारा भाषालंकार, रूपकाचिया कुसरी। १५·४२, ७·२७(१), १८·१२९३; **रुखाकारु-रूपकरीती,** वृक्षाकाराचें रूपक देण्याच्या प्रकारानें, १५·४५२, ज्ञानदेवी – 'वृक्षाकाररूपकरीति', कुंटे – 'वृक्षाकार रूपकरीती' १५·४८५; **रूपडें,** सुंदर रूप, तैसा विस्मितु पाहे कोडें। तंव पुढां चतुर्भुज होतें रूपडें। ११·१९२, ११·१३३, ११·३३४, ११·६६६, १३·३८४, १८·१३४७; **नाद-चित्रांचीं रूपडीं** ६·२७६; **कृष्णरूपडें** ११·५९७, **श्रीकृष्णसूषाचें चि रूपडें** ६·१२०; **रूपता—एकरूपता** १८·१०२८; **रूपस,** सुंदर, देखणा, रूपसा उदैलें कुष्ट। १६·१७७, १८·१७०६; **माझेनि रूपें रूपसु** ६·३९६(२); **सर्वरूपें रूपसें** १८·१४०८(२); **रूपसै,** रूपयुक्तता, सौंदर्य, मग गर्भगोला तेया। कैसी रूपसै ये आया। १८·३६, ज्ञानदेवी – 'कैसें रूप तैं ये आया', कुंटे – 'कैसें रूप तें ये आया' १४·९८.

**रूपें**—रुपें, चांदी. जैसें सिंपीपण हारपे। तंव तंव खरें होए रूपें। १५·२७८. कां कथिलाचें कीजे रूपें। रसभावनीं॥ १८·७७१. १५·१०५, १५·५१७(२). **रूपेयाची भ्रांति,** शिंपल्यास उद्देशून, १३·११३३; **सोनें रूपें प्रमाण नोहे** ९·४५०; **रूपेपणा**—पैं नेणतेया प्रती। रूपेपणाची प्रतीती। रूपें नोहोनि शुक्ति। दावी जेविं॥ १५·५१७ (१).

**रे**—अरे. गेली रे सृष्टि गेली। १·१५७. एक एकातें ह्मणति। सावध रे॥ १·१६३. हे ह्मणती गेला रे गेला। अर्जुनु आह्मांसि भियाला। २·२०८. **जा रे मी राउ॰ आलां** १४·८३; **जैत रे जैत** ९·२१६; **बा रे अर्जुना** १४·१६३.

**रेखणें**—रेघ आंखणें, मर्यादा घालणें. प्रणवाचिया मोडी। रेखिली जैसी॥ ६·२७६. **रेख** १५·१३६; **सुरेख** १·३, **–ता** १·३६; **रेखा**—(१) मर्यादा, जें साहित्य आणि शांती। हे रेखा दिसे बोलती। ४·२१५, साहित्य व शांती यांचें इतकें ऐक्य झालें आहे कीं त्यांचीं क्षेत्रें निराळीं दाखवितां येणार नाहींत, त्यांना मर्यादा आहेत असें म्हणावें इतकेंच; **रेखा नोलांडितां** १८·१२४, **कर्मरेखा नोलंडिता(तां)** ६·५१; **मोक्षरेखेचा मांडणियां** १८·३८; (२) रांग, आंखलेली रेघ, **धूमाची रेखा उठिली** १६·१९२; **पाडिवेयाची चंद्ररेखा** १५·४३७; (३) काव्यरचना (राजवाडे), कवित्वरचना (कुंटे), स्मृति ते चि अवयव। रेखा अंगिकभाव। १·४; **बोलतिये रेखेची वाहाणी,** कवित्वाची सरणि, पद्धत, ६·१८.

**रेघ**—ओळ, सीमा. समुद्रीं रेघ नोलंडावी। ९·२८१. **तोयाचां पोटीं रेघ काढिलेयां** १८·६०९.

**रेचणें**—सोडणें, टाकणें. आणि फूंके भाति फुगे। रेचिली सवें चि उफगे। १३·६६३. **रेचक,** प्राणा-यामांतील नाकांतून सोडावयाचा **श्वास,** १८·२४४.

**रेव**—वाळू, गाळ. ७·८५.

**रेवणें**—रोंवणें, रुतणें. पाठिं मरणाचिया रेवा रेवले। ७·८५. **आस्थेचे अवगाले रेवले** ७·७६.

**रोकडा-डी-डें**—रोख, उघड, प्रत्यक्ष. रोकडेया आणि लाहिजे। मोक्षु फुका ॥ १२·१७६. ११·१२, ११·३८६, ११·४१३, ११·५३४, १३·९३७. **रोकडी आशसंतति** १६·३३६, ज्ञानदेवी—'कोरडिये चि आशेचि संतति', कुंटे—'कोरडियेचि आशेचि संतती' १६·३३८; **पशुहिंसा तंव रोकडी** १३·२२२; **रोकडें आलें** ११·३६०, —**दाउं** १७·११९.

**रोख**—खोंच, बळ, संताप. तंव तंव रोखु दुणावे। क्रोधु तो जाण ॥ १६·२४०, संताप, ज्ञानदेवी—'रोपु दुणावे' १६·२४२. **आंधाराचेनि रोखें** १८·१७६; **धृतिरोखें** १८·१००९, ज्ञानदेवी—'धृतिरोधें', कुंटे—'वृत्तिरोधें', अंतर्मुखतेनें या अर्थी, १८·१०१५; **अविद्यातिमिररोखें**, अविद्यारूपी अंधारावर चाल करून, १८·१६४७; **सरोख**, कटाक्षपूर्वक, २·८८, ज्ञानदेवी, कुंटे—'सरोप' २·८८, राजवाडे पाठ ग्राह्य वाटतो.

**रोग**—आजार, व्याधि. देखें रोगातें जीणावें। ओषध तरि घेयावें। ३·१९. रोगु जाये दूधें ओंगरें। तरि नींबु कां पियावा ॥ ४·२२०. रोगु न गणिजे घ(घ)रिं। पथ्याचिया ॥ १६·६८. एरु मूर्छेने नांव रोगीं। विसांवां(वा) जैसा ॥ १८·२२९. १३·७६६, १७·१३३, १८·१२८८(१). **रोगाचां आवर्ती** ७·८४; **रोगां उदयो** १६·३१६; **रोगाचें निदान** ११·९०(२); **नाना रोग** १३·५८६,—**रोगीं** १८·७९३; **रोगीं आहालली** १३·२२५; **रोग उठिलि** १७·१५०; **रोगु दवडुनि** १५·५५०; **रोगिं दाटिला** ९·४८७, **रोगें**—१८·७०३; **रोग पडिघांति**, रोग झडप घालतात, १६·२५६; **रोगु फेडूं शके** १६·११५; **रोगें रुंधला** १३·१००६; **प्राचीने रोग खवलले** १६·१९०; **रोगांसि भाणें वाढलें**, रोगांचें वाढलेलें ताट आहे, ८·१४१; **पांडुरोग** ५·११८, **महा**—१८·९४६, **माहा**—१४·४०८; **सरोगु**—तरि सरोगु काइ जाणे। निदान रोगाचें ॥ ११·९०(१); **रोगी**—जराचेनि आटोपें। रोगी भलेतैसें जल्पे। १६·३६३, **क्षयरोगी** ९·४९७, **महा**—३·१२३; **रोगिया**—हांगा (हां गा) रोगु काइ रोगिया। आवडे दरिद्र दरिद्रिया। १८·१२८८ (२), ३·८, ११·४२३, १७·१००, १७·३९०; **जिव्हालंपटु रोगिया** १८·१३५.

**रोड**—कृश. **देहिची आइति रोड**, कृशता, १३·२१०.

**रोप**—कोवळें झाड. ना तरि वृक्षाचिं पानें जेतुलीं। तेतुलीं रोपें नाहिं लाविलीं। ६·३९९. **लाहाला-हाल रोप** १३·३९८, ज्ञानदेवी, कुंटे—'सेवा-वृत्तीचें...रोप' १३·३९९, **संतोषतरुचें**—६·२५६; **आनंदरोप** ३·२४८.

**रोम**—शरीरावरील रंध्र, आंगावरची लव. जैसें देह वाहूनि रोमा। वाहणें नेणे॥ १६·१८९, ज्ञानदेवी—'रोमां वाहणें नेणें' १६·१९०, कुंटे —'रोमा वाहणें नेणें' १६·१९१. **रोमेचिया अणियां** ६·२६४, ज्ञानदेवी, कुंटे—'रोमांचिया' ६·२६४; **रोमा जालिया**, रोमरोमांत झाल्या, ११·२८२; **रोमांचीं जालें** ९·५२२, ज्ञानदेवी, कुंटे—'रोमांच आले' ९·५२७; **रोमांच** ११·२४३, १८·६३९, १८·१५८५, **रोमांचित** १३·९५०, १८·१५०८; **रोमावली** १३·२८५, १८·१५३९; **रोमबीजाची विरुढि** ६·२३४; **रोम मूळीं** ९·५२४, ११·१४८, —**शुद्धि** १७·२३४.

**रोवणें**—खुपसणें, पुरणें. जैसा रोविलेयां उणें। रांजणु बैसों नेणे। १३·६८९. ३·२५४, ११·४६. **डोळां नाखें रोविजति** १८·१७६; **नास्तिकपणाचें हाड जीभे रोविलें**, नास्तिकपणामुळें त्याच्यावर बहिष्कार घातला, १६·३१३. **राउनि** पहा.

**रोस**—राग. रोसें प्रेम दूणावटे। ९·१८. **रोसें निगालें** १४·१८८, १८·३६७.

**रोहिणी**—मृगजळ. रोहिणीतें ह्मणिजे जलु। ५·११५. **रोहिणीचें जल** २·१२१, ७·२९, —**ची माव**, मृगजळाचा मिथ्या भास, १३·७०६; **रोहिणी पींतु**, पाण्याच्या आशेनें मृगजळ पीत होतों, ११·५३.

**रोहो**—आरंभ, वाढ. आणि वाढे जंव मोहो। तंव तंव विषइ रोहो। १६·३६८. **चांगु रोहो मांडी** १८·६४९.

**रौद्र**—उग्र. रौद्रें अति मैत्रें। लयस्थें एकें॥ ११·१२९.

**रौरव**—एकवीस नरकांपैकीं एका नरकाचें नांव, परद्रव्यावर पोट भरणाऱ्यांकरतां. रौरवाचा रूढु। मार्गु हा॥ १६·२३४. १६·४२५.

**ऱ्हाणें**—राहणें पहा.

# ल

**लक्ष**—(१) ध्यान, नेम धरलेली वस्तू. कां सेतीं वीं विखुरिजे । परि पीकीं लक्ष ॥ १६·२९. १३·३४१. **लक्ष भेदिलियां हिं वरि** १८·४२३; **अलक्षपणें**—बोलता ना उगला । अलक्षपणें ॥ १३·११०६; **लक्ष्य**—पैं लक्ष्याहूनि अनारिसे । बाण लक्ष्य सिरौनि जैसे । मावौतें(तें) पडति तैसे । एंति चि ते पैं ॥ १५·२९२, १३·९५९. (२) शतसहस्र, सं. वा. श. पहा.

**लक्षण**—विशेष गुण, खूण. ते ही सांवों व्यक्ती । लक्षणीं गा ॥ १३·६५१. ४·८४, ५·१०१, ६·११२, ६·१४०, १२·१६४, १३·३४१, १३·५९१, १३·६७२, १४·३४५, १५·४९१, १८·४९४, १८·५०८. **अपैशून्याचें लक्षण** १६·१५२; **निष्पन्नाचीं लक्षणें** ६·१०७; **मानसतपाचें लक्षण** १७·२३६, **मूलबंधाचें**–६·१९९, **राजसाचें**–१८·५९१, **वर्णविहिताचें**–१८·८२९; **आहारलक्षण** १७·१२३, **उप**–६·३५८, **एवंगुण**–१७·१३०, **किं**–१५·६३, १५·४४४; **ज्ञानलक्षणें**, सं. वा. श. (१८)पहा; **परचित्तलक्षण** ५·१६२; **यथालक्षणीं** १८·५७९, **–णें** १८·३१३; **सर्वबंधलक्षणें**, सर्व प्रकारें बंधन करण्याचें लक्षण असणारीं, १८·१४०५; **सुलक्षणें** १४·१८.

**लक्ष्मी**—(१) विपुलता, समृद्धि. **वनलक्ष्मीविलास** १४·२९३, **विजयलक्ष्मी** १०·२३२. (२) विशेषनाम. परिशिष्ट (६) पहा.

**लखलखणें**—चकाकणें. **तेज जें लखलखीत दीसे** ७·५७; **लखुलखूनि**—कां लखुलखूनि हारतली । विजु गगनीं ॥ ६·२८५.

**-लग**—शब्दास जोडून. जवळ, लागून असलेलें. **आंगलगें**, संसर्गानें, संतांचेनि आंगलगें । पापातें जिणणें गंगे । १२·१७७, **आसलगें**, कळण्यास सोपीं, उघड, पर्के घूर्णितें सावधें । आसलगें पर्कें अगाधें । ११·१२६, १२·१३३, १८·६४९; **कडेलग** ६·५६; **टिकलग लेणें** १८·८५१; **पाणिलगें हंसें** ६·१७७; **वारेलगें**—कां वारेलगें पाखिरुं । गगनीं भरे ॥ १३·३१४, वाऱ्याच्या वेगानें पक्षी जसा आकाशांत दूर उडतो; **अलग**, दूर, ६·४३४, **विलग**, उदग्र, १२·६२.

**लगणें**—लागणें. या क्रियापदाचीं **न** सहित आलेलीं रूपें **लागणें** या क्रियापदाचीं असणें संभवतें, **लागणें** पहा. कां जीभे लगतां मद्दुर । १६·१२१, ज्ञानदेवी, कुंटे–'कानीं लागतां' १६·१२२.

**लगबग**—घाई, धांदल, धडपड. **खलालांची लगबगा** १४·३५०, **–चेयां लगबगीं**, आपलें प्रतिबिंब खळखळणाऱ्या पाण्यांत अस्थिर दिसलें तरी, १५·३५४; **प्रयाणिचिया ही लगबगा**, अंतकाळाच्या धडपडींत, ७·१७८; **शरत्कालिं भरतिया लगबगा गंगा सांडिजे**, शरदृतूंत भरतीची लगबग गंगेला सोडते, १८·१०८७.

**लग्न**—विवाह, एकत्र येणें. आणि तद्रूपतासी चि लग्न । लागौनि ठेलें अभिन्न । ६·४७०. ८·११४, १८·१५६२. **संलग्न** १३·८७७; **सुलग्नीं** १६·३०१; **लगिनघटिका** ६·४६९.

**लंघणें**—ओलांडून जाणें, पलीकडे जाणें, उपोषण करणें. तूझेनि नांवें आपेसि । दिशा लंघी ॥ २·८, ज्ञानदेवी, कुंटे–'अपयशीं दिशा लंघिजे' २·८. भीडेची तरि लंघो (घों) नेदी सींव। ७·१९८. जेउं नेणतां वालक । लंघे चि तें ॥ १७·३४७. **आडवें लंघी**, रानें ओलांडतो, १५·३२७; **आडी लंघितां** ६·४६३; **उल्लिंबे पाताळ लंघीति**, वाळवी पाताळांत जाते, जमिनींत फार खोल जाते, १८·६०६; **वनौकें दिशा लंघीति** १८·१५२१; **लांघिजैल**, हा पाठ **सांघिजैल** असा घ्यावा, १०·५३; **लंघणें—कालातें न लंघणें** १८·६३३; **लंघन**१८·१७९; **लंघविणें**—जेणें लंघविलें दिशा । मनोमल ॥ १२·१७८.

**लघिमा**—हलकेपणा. ऐसिया लघिमा चालता(तां) । १३·२५५, हलूवारपणानें.

**लचकणें**—घसरणें. **दीठी लचकलिया**, दृष्टि तरळली, चळली, तर, १४·८४.

**लज्जा**—लाज. १२·१८२. **सलज्ज** १६·१४३. **लाजणें** पहा.

**लटका-की-कें-लटिकें**—खोटेपणा किंवा आभास दाखविणारे शब्द. **लटका-की-कें**—आणि हा संसारशब्दु नव्हेल । लटका जगीं ॥ ५·१२४. परि दूजेपण हें लटकें । आरिसा करी ॥ १८·१११६. ७·६०, १३·१३७. **लटकेयां अक्षरांचे सांचे** ११·२०५; **लटकी प्रकृति** १३·११३०; **लटकेया भूतग्रामां(मा)** ९·८३; **लटकें वाग्जाल** १३·२१; **साच तें लटकें** १८·७२३, **साचल टकें (साच लटकें)** १४·३२१, **साच लटकें** ८·२३७. **लटिकें**—हे आदि विश्वरचना । तें लटिकें काइ ॥ २·९५. मूळ अज्ञान तें चि लटिकें । मा तयाचें काज केतुकें । १५·२१८. ४·३८, ६·४२४, १८·५६९. **साच लटिकें** १२·२०८, **साच आणि लटिकें** ४·१९९.

**लता**—वेल, पात. १८·१२३. **उन्मेखलता** १५·५४९, **कर्म**—१८·३११, **कल्प**—१०·२०, **निजजनकल्पलते** १२·१०; **खड्गलता** १५·२४१; **भ्रूलतां** ६·३१३, ८·९५, ११·१४३; **विद्युल्लतेची विडी** ६·२२४; **श्लोकाक्षरद्राक्षलता** १८·१६४८.

**लंपट**—लुब्ध, आसक्त. **जिव्हालंपटु रोगिया** १८·१३५.

**लपणें**—(१) दडणें, नाहींसें होणें. मज भेण मृत्यु लपे । ११·३४६. आणि जागतिये दशे । स्वप्न लपालें असे । १३·७८. नाना मुग्धां पट्ट लपे । दाउनि चित्र ॥ १८·५४१. ६·२९३, १५·५१८, १६·१०, १८·१४२०. **जेया प्रतिलपसि (जेयाप्रति लपसि)** १४·४, ज्ञानदेवी—'जयां प्रति', कुंटे—'जयाप्रति' १४·४; **लपाले नि** १५·२७७. (२) लपवणें. कारुण्या माझि पाउलें। लपौनि चाले ॥ १३·२४८, कुंटे—'लपवूनि चाले' १३·२४९. **लपौं नेदु,** ९·४१; **लपवणें** १३·१९१, १३·२०५.

**लपी थपी**—लपंडाव. नभ तुज माजि खेळे । लपीं थपीं ॥ १४·९, ज्ञानदेवी—'लपींथपीं', कुंटे—'लपिथपि' १४·९.

**लभणें**—या क्रियापदाचीं रूपें **लाभणें** पुढें दिलीं आहेत.

**लय**—शेवट, नाश, समावेश, समाधि. **लया जाति** ४·११५, ८·१०६, १०·२००, ११·७०, १३·९६, **—जायिजे** १६·१८, **—जाये,** गगनीं गगन लया जाये । ६·३१०, तैसें मोक्षीं प्रवर्त्तलेयां। वृत्ति ब्रह्मीं जाये लया । १८·१०३९, ६·३८५, ६·४७१, ८·१६२, १४·४७, १८·१००९, **—जाए** १५·५५२; **लया नेईन** १३·४३१; **लयाकाशीं** १३·४३४, ज्ञानदेवी, कुंटे—'लया आकाशीं' १३·४३६; **लयस्थ** ८·९५, समाधिस्थ, ११·१२९.

**ललणें**—(१) ळळळळ करणें. **जीभ लले** ११·३०८. (२) लाड करणें, प्रतिपाळ करणें. **ललन, ललनलीला** १०·२, **लोकललनलील,** लोकांचें पालन करणें हीच ज्याची लीला आहे असा, १२·२३३; **लला—बहू ललां लालिलां** ११·५७३; **लला दीधलेयां** १८·७९९, **—दे़उनि** ३·१९१, **—पाळावा** ११·५८३; **लले पालित** ११·१७१, **—पाळीसि** १२·४, **—सरति** ९·३ (१); **ललेय**—लाडका, कां जे ललेयाचे लले सरति । ९·३(२), लाड पुरविले जातात; **ललेयाचिया बालका,** आवडत्या मुलाला, १०·११८.

**लवंघा**—दाह. **लवंघा सूदे** १७·१४८.

**लवटी**—पीळ देऊन दोरीचें बंधन आवळण्यासाठीं गांठींत घातलेली काठी. **मुरुडिलिं यालवटीं** १२·४७, **मुरडणें—मुरुडणें** पहा.

**लवणें**—वांकणें, नम्र होणें. मग लवों नेणति कैसे। आटिव लोहखांब जैसे । १६·३७७. ह्मणौनि मान्याचेनि नावें । ईश्वरा हि परि न लवे । १८·६६८. **शाखांचेनि भांगभरें लवौनि** १५·१५२; **लाठी ऐसा न लवे** १३·७२४. **न** सहित आलेलीं रूपें **लावणें** पुढें दिलीं आहेत.

**लवलट**—एकास एक जोडून. **लवलटें** १३·९५६, ज्ञानदेवी—'जंवटें', कुंटे—'जवटें', जोड गव्हासारखीं जुळीं, १३·९६२.

**लवलव**—टवटवी, ताजेपणा. **अवधानाचेया लवलवा,** अवधानाची अत्यंत उत्सुकता पाहून, १३·११४५; **कोंभाची लवलव** १३·१८०.

**लवलाहीं**—जलदीनें. १८·४९८. **लवलाहें** ७·१९६.

**लहरी**—लाट, आवेग. १३·२४५, १३·६०८. **लहरिया** १३·१०७९; **अमृतलहरी,** अमृतसमुद्राच्या लाटेंतील, १२·२६, **मृगतृष्णा—**

१३·१०५; शोकदुःखलहरीं ११·३४३.

**लंहिद्वडी**—पळापळ, धांदल. अहंममतेचिया लंहिद्वडी ९·६१, ज्ञानदेवी, कुंटे–'लवड-सवडी,' लगबगीनें, ९·६२.

**लाए**—लाहणें पहा.

**लांकण**—बंधन, लेप. लांकण लागे १४·१५१.

**ला-लांकुड**—नेहमींच्या अर्थी. लाकुड—मग आविष्कारला लाकुडें । पावकु जैसा जोडे। १६·२७६. लांकुड—सर्वेंद्रियां लांकुड पडे। स्मृति भ्रमा माझि बुडे । ८·२२५, ताठ, जड होतात.

**लाखौली**—देवादिकांस वाहावयाचीं एक लक्ष फुलें इ., विपुलता दाखविणारा शब्द. सुखाची लाविती । लाखौली जीवा॥ ६·४९३. १३·३८७. स्वकर्माचां लाखौलीं मज पूजा करुनि १८·१२४१.

**लाग–लागु**—आवड, आसक्ति, बंधन. आसेचे लाग तोडिले । १२·४९. न लगावा तेथ लागु । १३·७७४. हां जी संन्यासु आणि त्यागु । यां दोहीं एकिं अर्थि लागु । १८·८६. ५·६५, ९·३९२, ११·६४२, १२·२०५, १३·७६४, १८·२९७, १८·८१७, १८·१६२७. अशेषा लागां १३·१०१५; जीवीं चांगु लागु, निद्रेच्या आवडीस उद्देशून, १४·१८५; ज्ञानिं लागु १३·६४३, ज्ञानाचा– १७·१६६, निर्गुणिं– १३·९०७, पापाचा– १३·६७४, फलाचा– १८·६४९, फलिं– १८·१७४, भूतभेदाचा– ९·८६, महत्त्वाचा– १७·१८१, सात्विक– १७·११०; लागसर, संबंध लागेल असें, सयुक्तिक, लागसर न लभे १३·३२१, कुंटे– 'लाग सर न लभे' १३·३२२; कथालागु ५·६६; निलागु, निलाग पहा.

**लागणें**—स्पर्श करणें, आरंभ करणें, परिणाम होणें, आवश्यक होणें, कष्ट होणें. या क्रियापदाचे इतर अनेक उपयोग केलेले आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. जैसा नखाग्नि व्यालु लागे । तो शिखांत पावे वेगें । १·२५५. जें अपत्य थानौनि निगे । तेयाची भूक ते मायेसी चि लागे। ८·१२. आमचा प्रकृती पैलीकडील भाउ । जरि कल्पना विण लागसी पाउ। ९·७०, मायेच्या पलीकडे असणारें आमचें शुद्धस्वरूपाचें अस्तित्व जर पहाशील. तरंगाउं लागे बुद्धि । विवेका वरि ॥ १४·२२०. तैसें तिखट खाये । जं वायें विग लागे ॥ १७·१४२. १·६३, १·२३६, २·५१, ३·१४८, ३·१५३, ३·१५८, ४·३०, ४·८८, ४·९६, ४·१६५, ६·१८, ६·३१, ६·५७, ६·८८, ६·११५, ६·१२१, ६·१६३, ६·२००, ६·२३०, ६·२४२, ६·२७९, ६·३६५, ६·३७३, ६·४५८, ७·३, ७·२३, ७·१४१, ८·२७, ८·१५९, ९·१५, ९·१०७, ९·११६, ९·१५०, ९·३२५, ९·३३८, ९·३८२, ९·४९१, १०·४५, १०·६८, १०·१०९, १०·१८०, १०·१८१, १०·२८६, ११·१०८ ११·१८३, ११·३५७, ११·३८५, ११·४११, ११·४३३, ११·४५०, ११·५२२, ११·५३९, ११·५४०, ११·६५०, ११·६६९, १२·१०७, १२·१७४, १३·८५, १३·१८६, १३·२५१, १३·२५४, १३·३३३, १३·६३९, १३·६९७, १३·७०९, १३·७१३, १३·७५५, १३·९६५, १३·११३१ (२), १४·९५, १४·१४९, १४·१५९, १४·१६२, १४·१६५, १४·१७७, १४·१८४, १४·२०८, १४·२५५, १५·१६८, १५·१७७, १५·५५७, १६·१२, १६·५३, १६·३६७, १६·३८३, १७·१४४, १८·४१, १८·२२४(लें), १८·३३०, १८·३६२, १८·३७०, १८·४७९, १८·६५७, १८·६६०, १८·७६६, १८·१०२२, १८·१०५९, १८·१४००, १८·१६८३, १८·१६९२. लागत खेउ ८·७२, १८·२०७; अबोट लागलेंसे १५·३; अवस्था लागे, अवस्था पहा; आंगा लागलें, चिकटून राहिलें, ६·२७५, आंगिं लागली, डसली, १३·१०६४; आगि लागला, आग लागली, १६·३९३, आगींत सांपडला, १६·४४८, – लागलेया, पेटलेल्या, १५·४०६, – लागलेयां १५·२५८, आगी आगि लागलेयां, एकमेकांना भाजत नाहींत या अर्थी, १८·४४८; उटणें लागतसे काइ, आवश्यकता असते काय?, १०·१०; उभी लागे, पूर्णतेनें जाणवते, १३·१३५; कणिसें लागलीं आथि ९·४२९; कलभा लागे ६·१६; कवाडें लागों पांति ६·२०२; कांटी लागली, कुंपण लागलें, ११·३७१; कानिं-नीं लागणें,

कान पहा; कासे लागणें, कास पहा; क्षयव्याधि लागली १३·१७५; जियालें लागलें, तमोगुण हा अज्ञानाचा जिव्हाळा आहे, १४·१७४; जीभे लागलीं, चवीस उद्देशून, १७·१२६; झटे लागे, लगट केली, दुसणी दिली, ९·१८; टीक लागली, सोन्याची टिकली जशी सोन्यावर बसवावी, १४·२८०; डोला लागोनि १५·१३३, डोला पहा; डोलों लागले १२·१६३, – लागे १४·१८७; तागा लागैल काइ, थांग लागेल काय?, वांबू पाण्यांत रुतून नाव पुढें ढकलतात त्यास उद्देशून, ६·३१५; तारुं लागे, बंदरास लागतें, १३·१०८१; तूझें आह्मीं काइ लागों ११·५४२; दीपु लागे, दिवा पेटेल काय?, ९·४९३; दीस लागलेयां, परत येण्यास जास्त दिवस लागले तर, १३·३२६; दूण लागली, दुप्पट झाले, १६·२५३; धारा लागलिया १४·३८६; नख अंबरा लागैल, खुपेल या भीतीनें, १३·२८१; पाठिं लागे १३·५४१, पाठी(ठीं) – १५·३९, पाठीं लागतां १८·९३८; पिसें लागें(गे) २·९३, पिसें लागलें होतें ११·५९, पीसें लागलें आहे ११·१७२; फावा जावों लागे ७·१८६, फावों लागे ९·४९; फुलीं लागले, फुलांत गुंग झालेले, १५·२९१; ब्रह्माचिये अभिवानीं कां लागे, ब्रह्मावर आसक्ति कशी जडेल?, १८·६३; भरीं लागला, दंश झाला या अर्थी, २·७१; मोक्षिं लागावेया-चिया आशा ७·८७; रूपा छाया लागली १३·९५५; लग्न लागलें १८·१५६२; – लागोनि ६·४७०; लांकण लागे १४·१५१; वन्हि लागला १·२५७, – लागे १८·४०८, १८·११६१; वर्मी हान लागे १३·२६४; वाटिं लागलिया आहाति ११·४१५, वाटे लाग ९·५११, – लागति १७·३५५, – लागला ६·४३१, – लागे ८·२५१; वाति ही लागे १७·१४१; वायकांड लागे १८·१०३; वारा वाजों लागे १५·१६२, – झणें लागैल ८·१३०; विस्फुलिंगु इंधना लागे २·३२९; वेलु लागला ११·४९५, – लागे १३·३३५, १८·९९४; श्रवणीं लागत खेऊं १८·१७२३; सावेरीचे(चें) वन लागलें १८·५७३; स्वार्थी लागलें, स्वार्थाला जें जें पोषक होईल, १६·३०९; हों चि लागति ८·२०, – लागे ६·११०, १८·१३००, हों लागे ८·७३, ९·५०७, ११·४११, १४·१५४, १७·६५; होआवी लागे १४·३६९, – वें लागे ६·२४, हृदइं – ६·४९०; निगाला...लागला १४·३८१; नोहिजे... लागिजे १७·१७; वीजिला...लागला १३·७१९; न सहित आलेलीं लागणें चीं रूपें:— न लगतां १३·५४५; न लगति १०·१५९; वांझोलें न लागति १०·३०८, ज्ञानदेवी, कुंटे – 'न लगती' १०·३३३; न लगती ११·५०२, १३·११३१(१), १८·१०६९; नलगा ९·४२७; न लगावा तेथ लागु १३·७७४; न लगावें १३·५४, १३·७७२; न लगे १·८३, ६·२७, ६·८३, ६·२७०, ९·२११(१,२), ९·१२५, १०·१०६, ११·४६३, ११·४९३, १२·१६६, १२·२०६, १३·४७९, १३·६२९, १३·८४३, १४·३७४, १८·१११, १८·६८४, १८·१२२०, १८·१७२२; कसे न लगे १८·३७३, नाखि – १२·४१, वाति – १७·३०९, विवेकाचा तागा – ७·८८, हाता – १८·५३२; नलगे २·३०, २·१५६, ५·२२, ७·१५३; न लगैल ६·१५०; लागणेयां(या) देखिलें, उत्कट इच्छा आहे असा पाहिला, ९·२३०, ज्ञानदेवी – 'लागटा', कुंटे – 'लागट' ९·२३१; लागतें, संबंध, आक्षेपाचें लागतें १३·३२७, क्रियेचें – १३·५९४.

**लागि–गी**—करितां, साठीं, संबंधीं, कारणामुळें. हे शब्द इतर शब्दांस जोडून किंवा सुटे आलेले आहेत. लागि—परि सर्वप्राणें मज चि लागि। आराइले॥ १·११०. मग चंद्र चेंडुवा लागि मागावा। ११·५७१. तरि पुण्या लागि प्रवृत्ति। पापा लागि निवृत्ति। १६·२७९. तो दीपु प्रभे लागि। द्वेषु करी काई॥ १८·२१८. इया लागि १८·१४५५, १८·१६९९, इया चि – २·४९, एआ – ६·४१६, एया – ९·१९, ९·४०, ९·१७१, ९·३७७, ९·४१६, ९·४७०, ९·४८६, १०·२८०, १०·२९३, ११·५४९, ११·५८३, १३·७०, १३·८७६, १३·१०५०, १५·२२३, – चि

**विश्वलाघवा,** तूं सूत्री विश्वलाघवा। ११·४९६, विश्वाचें सोंग घेणारा सूत्रधार; **लाघवि**—ऐसें आपें आपु लाघविया। नमो तूज॥ १४·६, कां लाघविचे विचित्र। विनोद ते॥ १८·७९४, ज्ञानदेवी–'लाघवियाचे', कुंटे–'लाघवीयाचे' १८·७९७; **ब्रह्मगोल लाघवी,** हे शब्द जोडून घ्यावे, १३·१०२१.

**लांच**—स्वार्थ साधण्याकरतां दिलेलें गुप्त धन. १८·७४०. **लांचकर,** लांच खाणारा, लांचकरु ह्मणौनि कोलिसा। कामु केला॥ १३·२६, **काम** (३) पहा. **लांचवणें,** चट लागणें, सवकणें. **गुणीं लांचवलां,** गुण वर्णन करण्यास चटावलों म्हणून, १६·३०; **सुखें लांचावलेयां(या) साहावैल कां,** आत्मसुखाला चटावलेल्या अर्जुनाला संवाद थांबणें सहन होईल काय?, १८·८१.

**लाजणें**—नेहमींच्या अर्थी, शरम वाटणें, भीड वाटणें, विनयानें असमर्थ होणें. इये लाजसि ना घोरीं। कर्मीं सूतां॥ ३·३. लाजिलों बाखाणुं न निगे। देखौनि जेयातें॥ ९·२१. ११·५५८, १३·६७१, १६·१७७, १६·२०३, १८·१६. **लाजिलें ऐसें ठाके** १५·४०२; **वानणां लाजें** १८·१२; **न लजे** १८·१३४१, १८·१३९३; **न लजें** ९·३३६, १२·८६; **लाजणें**—प्रीतिची जाति लाजणें। आठवों नेदी॥ १८·१३६०, १६·१७९; **लाजवणें**—आवडि म्हणौनि न लजवी। ६·१२४; **लाज**—लाजा कंदर्पु रिगाला शरण। तैसिं सुंदरें रूपें॥ ११·१३७, १३·५४२, १६·१७५, १६·१८१; **लाजेचा पेंडवला** १३·६९४; **लाज नेणवे** ७·१०१; **लाजा कदर्थिजे** १६·१७४; **लाजिरवाणें** ९·३२६, **लाजीरवाणें** १६·१७६, १६·१८०.

**लाट**—(१) पाण्याचा तरंग, लहरी. ७·७२, १३·८०३. **जन्मृत्युचां (जन्ममृत्युचां) लाटीं** १२·८७. (२) बळवान, जोरकस. ऐसा स्वयंभु जो जीव लाढु। सावायें विण उद्भडु। १८·८५४, ज्ञानदेवी–'जीव लाढु', कुंटे–'जीवें लाठ' १८·८५७.

**लाठी**—(१) काठी. जो लाठी ऐसा न लवे। १३·७२४. (२) **बळवान.** द्वैत जेणें उठी। अविद्या जेणें लाठी। १३·११३, दांडगी या अर्थी.

**लाठेपण**—बळ, शौर्य. **लाठेपणाचा आवो** २·९; **लाठेपणें** २·२१९.

**लाडैजणें**—लडिवाळपणा करणें. तैसें संत माहियर माझें। तुह्मि मीनलेयां मीं लाडैजे(जें)। १५·५६४.

**लाढु**—हा पाठ **लागु** असा घ्यावा. ११·६७३, **भार** पहा, ज्ञानदेवी, कुंटे–'लाग' ११·६८३.

**लाणि-णी**—शेवट, मर्यादा. **लाणि** २·२४२, ३·१६६. **लाणिचें खागें,** अखेरचें निवासस्थान, ९·४६६; **कर्मांची लाणि** ४·१५९, **जाणणे-यांसि**–८·९८; **लाणि करूनि** १८·१४४४. **लाणी**—आणि समुद्रीं वोघांचें जाणें। सरे लाणी पासि धावणें। १८·४७२.

**लाणें**—कापणें, तोडणें. **लाइलें,** 'हकालिलें' (राजवाडे), १३·७२८. **लाणें**—सिताराचां रागीं लाणें। सीस चि जैसें॥ १८·१७७.

**लात**—नेहमींच्या अर्थी, दुगाण्या. खरी टेंकों नेंदी उडे। लातौनि फोडी नाकाडें। १३·७०४, दुगाण्यांनीं.

**लाधणें**—मिळणें, प्राप्त होणें. पैं लाधलेयां अर्जुना। मेरु ही आवडे साना। ११·६६५, मिळाल्यानंतर मेरु एवढा पर्वत ही लहान वाटतो, त्याचें महत्त्व रहात नाहीं. एवं गुरुक्रमें लाधलें। समाधिधन जें आपुलें। १८·१७४२. ६·४८८, १०·१३१, ११·५९२, ११·६००, १८·१३७७, १८·१४७६, १८·१५८९. **लाधलेनि आत्मबोधें** १८·१५४९, – **सौरसें** ९·३१६; **वानुं लाधलेंति,** वर्णन करण्यास आरंभ केला, १६·३१, ज्ञानदेवी–'वानूं लाधलां', कुंटे–'वानूं लाधलों' १६·३१.

**लांब**—नेहमींच्या अर्थी. **चक्षु लांब तें कांडें** १५·१०१. **लांबिजति**—बांधें लांबिजति जालु। आपणपां चि॥ १७·२५५, लांब उभें टांगणें (राजवाडे), गळाचें बंधन घातल्यावर, शरीराचे अवयव स्वतःच भाजून घेतात, ज्ञानदेवी–आंग जाळिती इंगळ। जळतभितां॥ १७·२५६, कुंटे प्रतींत असाच पाठ आहे, 'जळतमीतां' याचा अर्थ कुंटे यांनीं काष्ठ असा दिला आहे.

**लांबा**—भाताचें रोप, पीक. लांबा उगवे आगरीं। विभवश्रियेचां॥ ६·४४२. **लांबे राजागर,** भाताचीं

पिकें व उत्तम भाग, १८·९३.

**लाभ**—प्राप्ति. जेथ तो श्रीवल्लभु । जेथ तो भक्तकदंबु । जेथ सुखें तेथ लाभु । मंगलांचा ॥ १८·१६३६. १·२०९, १·२३९, २·२२६ (१), ६·१०४, ११·६९२, १३·१२९, १३·४४८, १५·५०९, १६·३४८, १६·४४१, १८·६०६, १८·८७७, १८·१२१० (१,२), १८·१२५३, १८·१५६०. **लाभाचिआ आशा** ६·४७२, **–चा उपावो** १६·५१, **–ची गोठी** ८·२३०, **–चा तोषु** ११·६००; **लाभमात्रें** १४·१४९; **आत्मलाभ, आत्मा (१) पहा; कर्त्तव्याचा लाभु** १८·४९९; **क्षीराब्धिलाभ** १८·७८५; **ज्ञानलाभ** १३·६२४, **तृप्ति –** १८·११९, **देह –** १८·२४०, **मोक्ष –** १८·८९७, १८·९१८; **यथालाभें** १२·२०९ (१); **वैराग्य-लाभ** १८·९९५, **शुक्ति –,** तोडिला परिसु बांधला गळां । शुक्तिलाभें ॥ ९·६०, **सुख –** १८·१६०३, **सिद्धप्रज्ञेचेनि लाभें** ६·४५२; **हाणि लाभु** १३·७९०, **हानि–** १६·७८; **अलाभ** १२·२०९ (२), १४·२२८, **लाभालाभ** २·२२६(२); **दुर्लभ –** ऐसें जें पद । दुर्लभ आणि अगाध । ८·१०५, २·१४८, २·२३९, २·२४१, **अति –,** महात्म्यास उद्देशून, ७·१३४; **सुलभ** २·२४७, ६·१७४, ९·५१, **सूलभू** ८·१३७.

**लाभणें**—मिळणें. जेथिचिया कृपा लाभे वरु । तेथ चि मनें व्यभिचारु । तरि काइ भी भस्मासुरु । अर्जुनु ह्मणे ॥ २·३८. म्हणौनि अंतरिं ज्ञान होआवें । मग बाह्य लाभैल स्वभावें । १३·४७१. ९·४३७, ९·४४३ (भे), १०·७, १०·३०, १२·२६, १५·५३६, १५·५५७, १६·४३५, १७·२७, १७·३७९, १८·१४१, १८·२४५, १८·३९४, १८·९९०, १८·९९२; १८·११२२, १८·१२२०, १८·१२२२, १८·१७४९. **न सहित आलेलीं लाभणें चीं रूपें, यांपैकीं कांहीं लभणें चीं असणें संभवतें**—कां अपुष्प मकरंदु । न लभे जैसा ॥ १६·२७४, १८·१९३, १८·१६७८; **शुद्धि न लभे** ९·४९९; **न लभें** ११·१६, १३·३२१; **लब्ध, मिळालेलें, श्रीगुरुकृपालब्धीं** १८·९७८; **श्रीगुरुसंप्रदायलब्धें** १८·१४३६;

**लभ्य,** मिळण्यास योग्य, **सर्वशास्त्रैकलभ्य** १५·५३७.

**लाल**—लाळ, तीव्र इच्छेनें तोंडाला सुटलेलें पाणी. वमिलेया अन्ना । लाल न घोंटी रसना । १३·५१२. १३·५६६. **आशेचिये लाले** ९·१८०.

**लालणें**—लाड करणें, पालन करणें. तैसीं प्राप्तें हीं पुरुषें । इंद्रियें लालिलिं जरि कवतिकें । तरि आक्रमिला देहदुःखें । संसारिकें ॥ २·३५०. बहू ललां लालिलां तुह्मीं । ११·५७३. ३·१९८, १६·१३. **महावनें लाला(वा)वीं** १४·२३१; **लालन**—लालनीं मौ जैसें पुष्प । १६·१२२, **लालनि विषयविषाचां बांधि,** हा पाठ **लाउनि,** असा घ्यावा, १६·१८६.

**लालसा**—उत्कट इच्छा. १८·२९०. **लालस,** उत्कट इच्छा करणारा, एकें पालनशीलें लालसें । ११·१३०, प्रीतियुक्त (कुंटे).

**लाव–लांव**—हडळ. **लाव**—जें लावेचा कलवला । ८·१४५. **लांव**—ते वाचा नव्हति सुंदर । लांवा चि कां तिया ॥ १६·१२१.

**लावणें**—जोडणें, जुळविणें, लागवड करणें, हांकून देणें, पेटविणें, बंद करणें. या क्रियापदाचे इतर अनेक उपयोग केलेले आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. देखें इंद्रियीं कामु असे । तो लावी सुख दुरासे । ३·२०८. सुखाची लाविती । लाखौली जीवा ॥ ६·४९३. तूं करणें न करणें दोन्हीं । लाउनि प्रकृतिचां मानीं । प्रकृति ही कां आधीनि । हृदयस्था जेया ॥ १८·१३०९. तैसी पाठाची ते वाटी । लाविजे ना जंव वोंठीं । १८·१६७१. ३·१७२, ६·४९, १८·५००. **अग्नि लाउनि** २·२५१, **–लाविला** ३·२००; **आराम लावितां** १८·१७५७, **आराम(२) पहा; उद्यानें लावीं** १२·१३; **कवाडा लाउनि** १२·४८; **कांटि लाविली** ९·२१२; **कानीं लाउं** १८·१३९५; **कान्ही लाउनि,** दावें बांधून, १४·१५७; **कासे लाविले** १२·१०; **गांठी लाउनि** ९·४६; **गोडी लाविती** १८·५७०; **चाड लावी** ६·४१४; **झाड लाविलें** ११·१९, **झाडें लाविसि** ११·५७०; **टीला लाविजे** १८·२२१; **डौंडिचें(चे) तोंडीं लावी,** प्रसिद्ध करतो, १८·६००; **तटें लाविलीं** १८·१०११; **तोंडीं लावीति,** बळी देतात,

१७·९६; दीपुं(पु) लावी १७·८७, दीपें दीपु लाविजे ९·४२४, –लाविला १८·१४१२, दीवा लावी १८·३५५; दूध लाविजे, मुळाशीं दूध घालावें, १८·५९३; पाणी(णी) लाविलेयां १६·१२४; पिंसें लाविलें १०·२६७; पूंस लाउनि, उडवून, घालवून देऊन, १३·२३३; भेरी निसाण लाउनि, वाजवून, १६·३८७; महावनें लाला(वा)वीं १४·२३१; मुक्ताफळें प्राणें लाविजति १५·३६३; मुदी लावीं, शिक्का मार, १८·२७; मुद्रा लावावेया १०·३१; मोहरे लावावें, सरळ मार्गाला लावावें, ३·१६९, – लाविलें ६·४१८, मोहोर लावि(विं) ८·८१; रंगु लावित ११·५९०; रोपें लाविलीं नाहिं ६·३९९; लाउनियां सांडी, टाकून देतो, १३·५८७; वंगु लावावा १०·२८९; वाचेचिये वाटे लावीं १८·१३४८; वांसुरवां दावें लाविलें १३·३७७; वेधु लावी १३·४१०, वेधीं लावीति १३·९६३; सिचडी लावावेया १४·६०; हात लाउनि, हात घालून, १३·२२९, हातीं लाविला, स्वतः पेटवला, ९·३८७, हातु लावी १८·४५३; लावणें—आड लावणें ६·११४; न सहित आलेलीं लावणें चीं रूपें—न लविजे, सांधें सूर्याचां घरीं। काइ प्रकाशु वातिवेन्हीं। किं न लविजे चि तरि आंधारीं। कोंडैल तो ॥ २·३६०, वात, दिवा लावला नाहीं तर; न लवितां १८·४२६; न लवी १८·१२३, १८·४५२, १८·१७२३; न लवीसि ११·३९२; लावणी—लावण्याची क्रिया, रोपणी, गणना, विवेका वेलीची (विवेकवेलीची) लावणी। होंदे (हों दे) सेव ॥ १२·१२, १२·१९८, १६·६२; कर्मलतांची लावणी १८·३११; दिवेलावणी १३·९२७, १५·३८१; कल्पतरूची निर्विकल्पलावणी १८·१६५५; हरिषलतांची लावणी ११·६६२.

**लावण्य**—सौंदर्य, शोभा. अल्गे फलभार। लावण्येंसीं ॥ ३·१००. तैसें देशियेचें लावण्य। हरौनि रसां आणिजैल तारुण्य। १०·४६. लावण्याची देव १·४, – नव्हाळी १·४२; लावण्यांचीं निधानें ११·१९४; उन्मनियेचें लावण्य, मन लय पावल्यावर वाटणारा आनंद, ६·३२०; लावण्यगुणयुवती ४·२१५; लावण्यरत्नभांडार १·३१; लावण्यसाकारें, आकार पाहतां सौंदर्याचींच बनलेलीं, ११·१३८; गुणलावण्यें आथि, गुण व लावण्य यांनीं संपन्न, १·१८६.

**लांसि**—भाटी, मांजरी. पैं मोहाचेनि सांगडें। लांसि पीलें धरी तोंडें। तेथ दातांचें आगरडें। जैसें लागे ॥ १३·२५१, दांतांनीं हलकेच धरते, दांत लागत नाहींत, यास उद्देशून.

**लांसें**—डाग, कलंक, दोष. त्रिविधपणांचें लांसें १७·७३, यावर १७·६४ ते १७·७५ पहा.

**लास्य**—नृत्य. वानांगिचा लास्यविलासु। जो हा जगद्रूपु आभासु। १७·८, माया हीच स्त्री, तिची नृत्यक्रीडा हाच जगद्रूपी आभास.

**लाहणें–लाहाणें**—मिळणें, प्राप्त होणें, इच्छा करणें. संदर्भानुसार निरनिराळ्या अर्थीं हे शब्द योजलेले आहेत, त्यांपैकीं कांहीं उदाहरणें दिलीं आहेत. कांहीं शब्दरूपांत मूळ शब्द लाहणें किंवा लाहाणें असणें संभवतें, म्हणून या शब्दांचे विभाग पाडले नाहींत. कां मृत ही जीवित लाहे। अमृतसिद्धी ॥ १·७७. ह्मणौनि मीं प्रवर्तों लाहें। ग्रंथीं इये॥ १·७९. क्षत्रिं बहुत पुण्य कीजे। तैं जूझ ऐसें लाहिजे। २·१९४. तैसा गुरु प्रसन्न होए। शिष्यु विद्या ही किर लाहे। १८·१४७४. १·६६, ५·१०, ५·१७, ६·४५५, ८·२४४, ९·५५, ९·३७६, ९·४५०, ११·३५०, १३·१३१, १३·४४८, १३·७६४, १३·१००९, १३·१०७०, १४·२१७, १४·२२३, १४·२५७, १५·१०, १५·१७, १५·३२, १६·३, १६·५६, १६·२७५, १६·४३७, १७·१६, १७·३१९, १८·१६, १८·६६, १८·७९, १८·११३, १८·१७३, १८·५२४, १८·५९६, १८·६५६, १८·७०३, १८·९१७, १८·९५०, १८·१००१, १८·११०५, १८·१२५३, १८·१३७४, १८·१५२४, १८·१५२६, १८·१७०३. लाए—पैं भीके परीतें न लाए। १८·६०५, अतींद्रिय लाहिजे ६·३३; आश्रयो ...ल(ला)हांसील १८·१३५२, ज्ञानदेवी – 'लाहासी', कुंटे – 'लाहसी' १८·१३६१; गीतार्थु ह्मणों लाहें, गीतार्थ सांगण्याचें सामर्थ्य

लाभलें आहे, १३·११६०; गीतेचां गाणांवाणां तो लाहे १८·१५१७, गाणावाणा पहा; जवळीक लाहे ९·१०८; देहें लाहिजति १८·२४२; नांव लाहे ६·३०१, १८·३३६; निंदा ही करूं लाहाती ३·१९६; निर्वी लाहुनि, (योगाचें) फळ प्राप्त करून घेऊन या अर्थी, ८·२१९; पावो सीतळ लाहे, पायांना थंडावा मिळतो तो, १६·१५९; बोलों लाहांति ७·१९३; महत्वाची फरारी लाहांति १८·२८९; मोक्षु लाहिजे १२·१७६; वांछिल तें तें लाहो १८·१७७४; वोल्हायों लाहों ९·५; शास्त्रांचे डोळे लाहे १८·३६८; सींव टाकूं लाहे, वेशीवर पोहोंचतो, १८·८९५; सुखें पूर्सो लाहासि १४·३२४; लाहे तैं सरे १७·३२०; न सहित आलेलीं कांहीं रूपें—न लाहांती १७·३९, —लाहासि १३·१०५४, —लाहे, देखां प्राप्त ही न लाहे। भोग भोगुं॥ ३·१०८, ९·४४८, १४·२३३, १६·४४६, १६·४४७; लाह—प्राप्ति, शांतिचेनि लाहें होतें १८·१०८३, हा अपपाठ असणें संभवतें, ज्ञानदेवी—'शांतीचेनि लवलाहें होत,' कुंटे—'शांतिचेनि लाहे होतें' १८·१०८९; लाहा, तीव्र इच्छा व त्यामुळें होणारी घाई, ७·१८६; लाहातलाहात, कोंवळी, लुसलुशीत, १५·१९२, ज्ञानदेवी—'लाहलाहात', कुंटे—'पाल्हाजत' १५·१९४; लाहालाहात, अत्युत्कंठित (राजवाडे), १३·३९८; लाहणा—मिळणारा, प्राप्त होणारा, अनुभवु लाहणा आइता। १३·१०४३, लाहाणां—आतां गुरुशिष्यां दोहीं। स्नेहो लाहाणां॥ १६·४६, प्रेम लाभणार या अर्थी, ज्ञानदेवी, कुंटे—'लाहणा' १६·४६; ल्हाणें—मानूं न ल्हाए १८·३८३; स्वप्न साच हों ल्हाए १८·३८५; मागुं न ल्हातां १८·८८६; पव्हों न ल्हांति १८·१६९७; ल्हाये—जावो (वों) न ल्हाये ११·३८८, बाहिरा निगों न—१३·४११.

**लाहरी**—हा पाठ लहरी असणें संभवतें, विषाचा आवेग. २·७१, ११·५४, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत या दोन्ही संदर्भांत 'लहरी' असा पाठ आहे.

**लाहान**—लहान. ९·१०६, १४·३८३, १८·५४४.

**लिंग**—चिन्ह, स्वरूप, पूज्य, दैवत, शिवलिंग. आणि बेलेंसि लिंगा धांवे। १३·८१९. तरि एक-रसाचें जी तूं लिंग। १८·२०. अंतर्ज्योतिचें लिंग ६·२५४; इहीं तिहीं लिंगीं १७·८१; इहीं लिंगीं १४·३९५; जियें लिंगें, जीं लक्षणें, १४·२४२; तामसाचें लिंग, खूण, १८·५४५, वैकुंठपीठिचें—१७·४६, शांतिचें जी—१६·१३५; लिंगु जाला, पूजनीय झाला, ११·१०३; लिंगा पात्र जाली १८·३३५; लिंग कां प्रतिमा १७·२०३; लिंगदेहकमळाचां पोटीं १६·४; लिंगभेद, पूज्य माणसांचा उच्छेद, २·३१; आत्मलिंग, स्वतःच्या पावित्र्यास उद्देशून, आत्मलिंगातें शिवणें, स्वतःची शपथ घेणें, १८·१३६०; आराध्यलिंग, पूजनीय देव, १०·३, १७·१७; गुरुलिंग १३·३८६, १८·१५५५, गुरुनें लिंगा मराडा होए १३·३८९; दानलिंग, दानांचें चिन्ह, १७·२६३; परत्म(परमात्म)लिंग ६·३०५, पर-मात्मलिंग १८·६३२, यथा—, योग्य लक्षणांसह, १८·७२९, शून्य— ६·२७३, श्रीगुरु—१८·१७६०.

**लिगटणें**—चिकटणें. अंतष्करणें मज लिगटलें। ८·१२४.

**लिपणें**—दडून राहणें. लिपे—विसांवां(वा) तेयां लिपे १६·४०९, हस्तलिखित माडगांवकर प्रतींत 'विपें' असा पाठ या संदर्भात आहे, ज्ञानदेवी, कुंटे—'तयां नाटोपे' १६·४११.

**लिंपणें-लींपणें**—आच्छादणें, माखणें, माखला जाणें, दोष लागणें. लिंपणें—एथ कर्में तो चि लिंपे। जो गुणसंभ्रमें घेपे। प्रकृतिचेनि आटोपें। वर्त्ततु असे॥ ३·१८०. षडरितू येतां आकाशें। लिंपिजे चि ना जैसें। तेवि वैषम्य मानसें। जाणिजे चि नां॥ १४·३६१. संगदोषें लिंपतु काइ २·३३३; लिप्त १३·१११५, वि—२·४९; लिंपवणें—बुद्धितें लिंपवी काइ १८·४४९. लींपणें—द्वेष्यभावादि-मळीं लींपे चि ना १०·२२७; न सहित आलेलीं लिंपणें चीं रूपें, यांतील कांहीं लींपणें चीं रूपें असणें संभवतें—देहीं देहें न लिंपे १३·१११३, मळीं न लिंपिजे १८·१३९८; मोहमळें न लिंपे ३·७१; हातुपाऊं न लिंपे ५·७७.

**लिहिणें**—नेहमींच्या अर्थी. आगा जगाचीं शुभाशुभें लिहिति । प्राणांचा उग(गा)णां घेति । मग केलेया अनुरूप देंती । स्वर्गमोक्षु जे ॥ १०.२२५. १७.४२. **जैसा मोक्षाचिया आंगा लिहिला** १२.१८४; **विश्वाचां वाक्पटिं लिहुनि घालीं** ११.४७६; **लिहिलें**—लेख, दोषांचें लिहिलें फेडीं । ४.५१, ज्ञानदेवी–'लिहिलीं फोडीं', कुंटे–'लिहिलीं फाडीं' ४.५२; **लल्हाटिचें लिहिलें न मोडे** १८.१०१; **लिही**–लेख, **द्वैताची लिही सरे** १३.९३३; **लीहुनु**–गीता लीहुनु वाहाणें । पुस्तकमीखें ॥ १८.१४५१, ज्ञानदेवी–'लिहुनि' कुंटे–'लिहोनि' १८.१४६१.

**लीन**—नम्र, विनयशील, समाविष्ट. **लीनें केलीं**, एकजीव या अर्थी, १८.१०९४; **लीनता**, **तत्** शब्दास जोडून, तत् पहा; **सुलीनता**, **सुलीनतेचिये तूलिये**, पूर्ण नम्रतेच्या गादीवर, १३.४३.

**लीपि**—लिखाण. **सुखाची लीपि पूसिली** ३.२४९.

**लीला**—खेळ, क्रीडा. जेयां भक्तिची येतुली प्रीति । जे कैवल्यातें पर्‍हां सर ह्मणति । जियांचिये लीले माझि नीति । जियाली दीसे ॥ ९.१९१. ११.१४५, १७.३२, १८.३४७. **लीलाकमलें खेळणें**, लीलेनें कमळाशीं खेळणें, १३.२८४; **कोपप्रसादलीला**, क्रोधाची व कृपेची लीला, ११.३०६; **जनलीलाविलासें** ११.१३०; **लीला**, **लीलेनें**, सहज, जगा आदि प्रलयो दोन्हीं । लीला चि करिसी ॥ १७.५, **लीला धनुष उचलिलें** १.१६८, –**चि नाशिलीं** १०.२६८, –**परजवें** १५.२३२, ज्ञानदेवी, कुंटे–'परजवे' १५.२५५,–**विदारतु** १.१६२; **स्वलीला** ९.४८३; **अवलीला**, याच अर्थी, जो कृपावसें अवलीला । रक्षील आतां ॥ २.७३, १.३७, १.१४३, ६.४५६, १८.२२१;–**लील**, शब्दास जोडून, लीला करणारा, ज्याला लीला प्रिय आहे असा, **लक्ष्मीलील** १०.२५२; **ललनलील**, पालन करण्याची ज्याची लीला आहे असा, १०.२; **लोकललनलील** १२.२३३, **ललणें** (२) पहा.

**लुगडें**—वस्त्र. वधुवरांचिये मीलणीं । जैसिं वर्‍ह(र्‍हा)डियां हिं लुगडीं लेणीं । ११.३. १८.१४०, १८.७३७.

**लुंचणें**—तोडणें, केंस उपटून काढणें. पाखंडाचेया कडे । नागिवें लुंचिति मुंडें । १३.२२.

**लुंठणें**—लोळणें, लोटांगण घालणें. देखिलिये वस्तू लुंठति । मी चि ह्मणौनि ॥ ९.२२१. नाना अवकाशु नभीं । लुंठतु जैसा ॥ १८.११४२. **लुंठवणें**—लुंठवीत काठी । पडिली जैसी ॥ १७.२०३, ज्ञानदेवी, कुंटे–'लोटिजे' १७.२०४.

**लुब्ध**—आसक्त. ३.१०३. **लुब्धक**, पारधी, तेवि सत्वें लुब्धकें । सुखज्ञानाचीं पाशिकें । वोढिजतां खुडुके । जैसा मृगु ॥ १४.१४७, सत्वगुणरूप पारध्याकडून सुख व ज्ञानाचे पाश ओढले जातात, मग हरणाप्रमाणें तो त्या पाशांत अडकतो. **त्रिगुणलुब्धकीं**, त्रिगुणरूपी पारध्यांकडून, १४.६४.

**लुलुलित**—लुसलुशीत, कोंवळें. १५.९८.

**लूति**—लूत, एक त्वचा रोग, कुष्ट. देहाची लूति जींति । १३.७३०, शरीराला झालेलें कुष्ट प्रत्यक्ष दिसत असतां.

**लूसणें**—विसकटणें. **चोपि लूसिली** ३.२४९, **चोपि** पहा.

**लेंक–लेंकी–लेंकरुं**—मुलगा, मुलगी, मूल. **लेंक**—जैसें बापें जोडिलें लेंका । १८.८२३. **लेंकी**—जैसा बापु नातले लेंकी । १८.२०४, जसा बाप आपल्या मुलीवर विषयवासना धरीत नाहीं तसा. **लेंकरुं**–**लेंकरुं प्रसवली** १४.१०५; **लेंकुरुं**—**नंदाचें... लेंकुरुं** १०.१९२; **लेंकुरुवाचेनि बोलें** ९.१९; **लेंकुरुवें**, मुलें, १५.२१५; **लेंकुरुपणें** ११.३५.

**लेखणें**—गणतींत धरणें, समजणें, मोजणें, मापणें. कृष्णा ह्मणौनि हाकारिजे । यादवपणें तूतें लेखिजे । ११.५४६. **इहिकिचें भोगणें लेखी** १३.५१९; **न लेखी** १८.१०१९; **नलेखितां** १३.२५८; **लेखणिये**, गणतींत, जेथ स्वर्गसुख लेखणिये नाहीं । २.३६४; **लेख**—मोजमाप, आकार, मर्यादा, लिहिलेला मजकूर. तें लेखें तरि मियां तुरंबावें । परि मुखीं चिं(चि) घालीं ॥ ९.३८०, सातें शतें श्लोक । अध्यायां अठरांचे लेख । १८.५७, १८.१४३७, १८.१६७२; **लेख चढे**, फुलें व फुलांचे सर मोजतां येतील, १८.५६, –**धरी**, त्याची गणति प्रकृतिच ठेवते, ७.२५, –**नाहिं** १०.२७७, १०.२७९, ११.५८१, –**नेणिजे**,

गणति नाहीं, ८·२२, – **सरलेयां** १३·९३२, **आंख** पहा, – **होईल,** मोजतां येतील, १०·२७६; **लेखा आणी,** आकार देते, करून दाखवते, १३·९८०, पाणी वळणावर आणील या अर्थी, १८·१२७९; **लेखा नेए** १५·४८; **आंखें लेखें,** हिशेब करून, टिपणें करून, लिहून, १३·८४३; **दानलेखिं,** दानाच्या गणतींत, १८·३७०.

**लेंडी**—लहान ओहोळ. लेंडिये आला लोंढा। न मनी वालुवेचा वरंडा। १३·६९२.

**लेणें**—(क्रि.) धारण करणें, अंगावर घालणें. **ले**—ऐसा देहीं देहा वेगळा। ले तृष्णेचिया सांखळा। १४·१७१. **वैराग्य दिव्यांजन जीवें ले** १८·९००; **व्यासोक्तिकुसुममाला ले** १८·१६८९; **न फेडित ले,** अखंड धारण करतो, १८·८४९; **न ले**—**चंदनाचे खोडे न ले** १८·८९४; **न लै**—**वाहाणां न लै चि,** पादत्राणें घालीत नाहीं, आशेस उद्देशून, ७·१२६, ज्ञानदेवी–'न ले चि', कुंटे–'न लेचि' ७·१२९; **लेइजे**—जैसें वज्र-कवच लेइजे। मग शस्त्रा(स्त्रां)चा वरिषाऊ साहिजे। २·२३२, **चिंतामणि लेइजे** ११·६१६; **लेइला-ली-लें**—लेइला मोतियांची कडियाली। आवडे तैसा॥ ९·५२४, **आर्त्तिचें लेणें लेइला** ११·१५३; **भूषणं लेइलें असे,** १८·१४९१; **लेणिं लेइली असे** १८·१४४०; **संयतिचीं लेणीं लेइले** ९·१९२; **श्रिंगारु... देऊ आपणपें लेइला** ११·२१०; **ना लेइलें,** शृंगार केला नाहीं, १८·१७१७; **लेइलासि**—**मुकुट लेइलासि** ११·२८९; **वाणे परिची आंगी लेइलासि** ११·२७९; **लेउनि**—दुःख लेउनि सुखाची आंगीं। सलित जगातें॥ ९·४९७, **अक्षरें लेउनि** १०·६१; **आडवस्त्र –,** पडदा पुढें लावून, १८·१२९४, **लेणीं**–१८·६, **लेणें**–१८·१५०४; **लेउनियां**—**तास लेउनियां** ११·५७२, **तास** पहा; **लेतें,** धारण करणारें, अनर्घ्य रत्न हातु चढे। तैं भांगाराची वोढि पडे। दोन्हीं जालीं तरि न जोडे। लेतें आंग॥ १७·२६७, अमोलिक रत्न मिळालें, तर सोन्याची टंचाई पडते, हीं दोन्हीं मिळालीं तरी अलंकार घालण्यास योग्य असे शरीराचे अवयव मिळत नाहींत; **लें(ले)तेयाचेनि भावें,** (सोन्याहून वेगळे असे जे अलंकार दिसतात ते) दागिने घालणाराच्या दृष्टीनें आहेत, ९·७६; **लेयाविया**—अलंकार घालण्यासाठीं, परब्रह्म आपुलेनि आंगें। लेयाविया आपण चि जाला जिथें अनेगें। तिये लेणीं मीं सांवें। काइसेया सारिखि॥ ११·२०८, **लेयावेया** १७·३४५; **लेणें**—धारण करणें, माझें नृसिंहत्व लेणें। जेयाचिये महिमे॥ ९·४४६; **लेववणें**—**लेववं,** लेववं सुकुमारें। पदें तियें॥ १५·४, **इया दोन्ही पाउवां श्रीचरण लेववं** १५·८; **गुणाचीं(चीं) लेणीं लेववं** १२·२२०; **लेववि**—**स्तोत्रांचें लेणें लेववि** १६·२१; **लेवविजे**—**बालक लेणें लेवविजे,** मुलाच्या आंगावर दागिने घातले तर, १०·५७; **लेववी** १४·१०७; **लेववीन** १४·१८.

**लेणें**—(ना.) भूषण, अलंकार. लेणेयांसि हें लेणें। केहीं आहे॥ ९·१०. जरि सोनें लेणें होउनि घडे। तऱ्हीं तेयाचें सोनेपण न मोडे। ९·७६. जैसें आंगिचेनि सौंदर्यपणें। लेणेयांसि आंग चि होये लेणें। १०·४३. ९·३८५, १०·५७, ११·१५३, ११·२०८, ११·६३४, १४·१०७, १५·३०१, १५·५२८(१), १७·२५, १८·२४, १८·९५, १८·५०५, १८·५३१, १८·१००३, १८·१४४०, १८·१५०४, १८·१७१७. **लेणेयांचे ठसे,** दागिन्यांचे आकार, १८·११०३; **गुंजांचें लेणें** १८·११३९; **गुणाचीं लेणीं** १२·२२०(चीं), १३·४१२; **जाइंयांचें लेणें,** उसना मागून आणलेला दागिना, परत द्यावा लागतो यास उद्देशून, ९·४०८, ज्ञानदेवी–'जायांचें जेणें', कुंटे–'जायांचें जैसें लेणें' ९·४१२; **देशीकार लेणें** १८·१७८४, **पढियंतें**–१३·३४२, **ब्राह्मणाचें**– १८·८५१; **संदेहाचिं...लेणीं** १८·६८७; **संयतिचीं लेणीं** ९·१९२; **स्तोत्रांचें लेणें** १६·२१; **लुगडीं लेणीं** ११·३; **आंगाचें लेणें...मिरविसि** १७·७, **–लाधलें** ११·५९२, **आंगातें लेणिं पातलिं** १७·१७९, **आंगिं लेणिं मिरवी** १३·७०५; **साहित्यासि लेणें होंति** १०·४१; **बाललेणीं** १२·६; **लेणेपण**—लेणें सोनें चि जो जाणे। तो लेणेपण तें वाऊ(ऊ) ह्मणे। १५·५२८(२).

**लेप**—रंग, सारवण, उटी; रंगित चित्र किंवा बाहुलें; दोषकारक संसर्ग. आकाशा न लगे । लेपु जैसा ॥ १२·२०३. तेथ शुद्धिचेया आशा । तो लेपु न मनावा जैसा । १७·१०७, दोष नाहींसा करण्याकरितां त्याला स्पर्श करावा लागला तर तो संसर्ग दोषकारक आहे असें मानूं नये. **लेवा हातिचें शस्त्र** १३·५३१; **आनंदचित्रिचें लेप** ६·२५६, **गुणत्रयादि—** २·२३६; **लेपाचे गमले** ११·४५९; **लेपु झांलौनियां** ६·४९, **झांलगें** पहा; **लेपासि स्नपन करणें** १३·७४४; **अनुलेपन** ११·२२१ (२); **निर्लेप—**ब्रह्म, जेयां(या)चें निर्लेपु अनुलेपन करी । जे निर्लेपु ही सर्वांगि धरी । ११·२२१ (१, ३), ज्याची उटी ब्रह्महि आंगास लावतें, दुसऱ्या चरणाचा पाठ ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'जें अनंगही सर्वांगीं धरी' असा आहे, ११·२२५; ५·१५९.

**लेवा**—पुट. जैसें लेवे दीधले तमा । काजलाचे ॥ १६·३८८.

**लेश-लेस**—अगदीं थोडा भाग, कण. **लेश— उदकलेश** ९·३८९, **कर्म—** ३·५, **पुण्य—** ९·३२४, **भ्रांति—** ३·१२४, **सुख—** १८·७७३. **लेस—अमृताचा लेसु** २·२४०, **अमृतलेसा लागि** ११·५७२; **ज्ञानलेसादोसें**, अल्पसें ज्ञान मिळावें म्हणून, १३·६३८; **विषाचा लेसु** २·३१९.

**लेसां**—हळूहळू, सहज, 'बरे रीतीनें', 'बऱ्या बोलानें' (राजवाडे). मग प्रमेयांचिया गांवा । लेसां जाइजो ॥ ७·२०४. १३·२२२. **वेगें आणि लेसां** १३·२४६.

**लेहणें**—(१) लिहिणें. **वोलि लेहे**, ओळी लिहितो, १३·३०७. (२) लावून घेणें, 'लेहे—चाटी' (राजवाडे). तैसी दशा माथें श्रवण वरि । सव लेहें ॥ १३·५५७, डोकें व कानांपर्यंत सर्व शरीराच्या भागांची तशी अवस्था होईल, ज्ञानदेवी— ते दशा मा या शिरीं । पावैल गा ॥, कुंटेंचा पाठ असाच आहे, 'पावेल' एवढाच फरक आहे, १३·५५९.

**लै**—**लेणें** (क्रि.) पहा.

**लो**—लय. जेव्हलि गगनीं लो मना । पवनें कीजे ॥ ५·१५४.

**लोक**—मनुष्य, जनता, जनव्यवहार, जग, निवासस्थान. अविट नाथिली आस्थाबुद्धि । विषयसुख त्रि परमावधी । जीउ तैसा उपाधि । आवडे लोकां ॥ ४·२०. जैसा नचलतेनि रवी । लोकु चले ॥ ८·१८५. जिये लोकिंचा चंद्रु क्षयरोगी । जेथ उदो होये अस्तवाचिया चि लागि । ९·४९७. हा जीतु ना नव्हे । लोकु कल्पी येणें भावें । तैसें जीणें होआवें । ऐसी आश ॥ १३·१९५. २·१५७, २·२०९, ३·१५३, ६·४४०, ९·३५९, ९·५०२ (२), १०·९३, १०·९४, १०·१०० (२), ११·२६१, ११·३४४, ११·३४५, ११·३९७, ११·४२०, ११·४३०, ११·४९५, १३·१८८, १३·३६०, १३·९७६, १३·१०११, १५·१२०, १६·६५, १६·३१७, १६·४६३, १७·२०४, १७·३३७, १७·३५२, १८·३१, १८·२८१, १८·४३७, १८·४४४, १८·४५५, १८·१६६१. **लोकाचेन आधारें** ५·९७; **लोकाचिं दर्शनें**, लोकांचें पाहणें, १५·३३४, **—चीं धवलारें** ३·२१८, **—चिया विविधा पूजा** १७·२४४; **आपुलालां लोकीं** ११·३२९; **पींसा लोकु** १५·१३७; **प्रकृतिचां लोकीं** १८·८१०, ज्ञानदेवी—'प्रकृतीचां आलोकीं', आभासांत या अर्थी, १८·८१३; **विचारपर लोक** २·१२५; **विविध लोक** १०·१००(१); **लोक आसंसीति** १२·२०४; **लोका एउनि** ९·४८८, **लोकिं येउनि**, लोकांनीं येऊन, १८·४३६; **लोकु कर्मैं बांधला** ३·८४; **लोकें गिविसावा** ३·२०३; **लोकाचिं बालें ग्रासिलिं** ११·४१२; **लोक पायवणियां मानु करिति**, चरणतीर्थास मान देतात, १२·२१३; **लोकु प्रकटवी**, सूर्यास उद्देशून, १३·११२१; **लोकांतें व्यापूनि** १०·१७०; **लोकानें न रंजी** १३·२०७; **लोकाचिया राहाटी होंतु** १८·३१०; **लोकु संहाशवेया** ११·४४६; **लोकु न सिणें(णे)** १२·१६६; **लोकाचल** ८·१५२; **लोकापवाद** १३·७९०; **लोकाकार** ११·१८८; **लोकोत्तर** १७·४७; **लोककृपालु** १२·२३९, **—चेष्टा** ९·१३०, **—चेष्टि** १५·३८५, **—त्रय** १·११६, १·१६५, ३·२४३, ४·२०४, ५·३६, १३·८५४, **लोकत्रयाकारु** २·१३४; **लोक दृष्टिसि (लोक-**

प्राणापानाचे लोंढे १८·७८१, मरणरसाचे– ११·३७३.

**लोण**—कुरवंडी. लोण करी सकळा । जीविताचें ॥ १३·४४०. लोण उतरिजे, ओवाळून टाकावें, ९·३७७; जीवें लोण करिति १३·१०३९; प्राणें लोण कीजे १२·१८९; सुखाचें लोण कीजताये १८·१०६३; शरीरें लोण कीजे १७·२०६.

**लोथ**—मोट. तैं गगनाची बांधावी । लोथ जेवि ॥ १०·२३९. तमाचिये लोथे संकल्पातें बांधौनियां १४·२५६.

**लोपणें**—नाहींसें होणें, दिसेनासें होणें, मावळणें. जैसा उदैला दिनकरु । लोपी नक्षत्रांतें ॥ १·१४४. तैसा स्वधर्मु जरि लोपला । तरि सर्व सुखाचा थारा मोडला । जैसा दीपासवें हारतला । प्रकाशु जाय ॥ ३·११०. जैसी शंका जात खेओ लोपे । सर्पपण माळेचें ॥ ९·७२. ना तरि आकाशाचिये खोंपे । वायु निवांतू चि लोपे । आणि तरंगता हारपे । जळिं जेवि ॥ ९·१०२. कां दोरी लोपतां सांपे(पें) । फारां होइजे ॥ १५·२७८. तेथ रज्जुज्ञानें लोपे । व्यालशंका ॥ १८·२२६. ७·५९, ९·३७५, ११·३९७, १३·९३, १३·११५२, १४·४६ (ती), १४·१२२, १४·१३१, १८·४३९, १८·१३८४. लोपला अभिचारु १६·३५८; लोपलें अभ्र ६·४७०; लोपली बाळदशा ६·२६०; उपाधि कृतकर्मांचां पोटीं लोपे १३·९४; घंटिका लोपे ६·२०८; यातायात लोपति २·२७८; योगु ...लोपला ४·२५; वंशजधर्म लोपे १·२४४; वारा लोपें (पे) १५·२३०; सत्व रज लोपूनि, तम वाढतो, १४·१९९; संभ्रमु लोपिला १·१५९; स्वप्न जाग्रती लोपूनि, सुषुप्ती येते, १४·१९७; लोपावें...उद्दीपावें १४·२९४; लोपे हारपे ६·२९३; लोपो...हारपो १३·१९७; हारपे ... लोपे—आणि सूर्याचेनि प्रतापें । कोडि ही नक्षत्रें हारपे । ना तो तऱ्हीं न लोपे । सचंद्रीं तिहीं ॥ १८·८५५, सूर्याच्या प्रतापानें कोट्यवधि नक्षत्रें दिसेनाशीं होतात, पण चंद्रासहित कोट्यवधि नक्षत्रांनीं (तिहीं) सूर्याचें तेज नाहींसें होत नाहीं, ५·१३३; हारपे...गुणत्रयलोपे (गुणत्रय लोपे) १३·९२०; न लोपीति २·२४९; लोप—कां तो परौता केला आरिसा । लोपु जाला तेया आभासा । १५.३४६, ६·२९८; शरीराचां लोपीं २·१४३; अहंकारलोप ११·६८४, आकार– ८·१७, ८·१६९, ८·१७८, कल्पना– ९·९०; तरंगलोपे(पें) ८·२४८; वायुलोपें १८·९७३; विश्वलोपिं १५·५२१; संकल्पलोपीं ६·८२; लोपक, लोप करणारा, द्रोही या अर्थी, गुरुलोपक १३·६७४.

**लोंबीझोंबी**—झोंबणें पहा.

**लोभणें**—एखाद्या वस्तूच्या प्राप्तीची आधाशीपणें इच्छा करणें. लोभलेपणें १७·२३२; लोभविणें —पाळणें लोभविलें, पालन करून आपल्याकडे त्यांना आकर्षून घेतात, १८·८६८; लुब्ध पहा; लोभ—आसक्ति, कृपा, भक्ति, हांव, लोभासि रज कारण । १४·२६४. ९·३५८(२), ९·५०९, ११·१६, ११·८७, ११·५४४, ११·५६३, १३·२६७, १४·२२८, १५·२२, १८·२९०, १८·१५४७; लोभा करवि, लोभाकडून १३·४१०; लोभपर, अनुरक्त, १८·१३२; लोभाचां बंधु १८·१७२०, ज्ञानदेवी – 'लाभाचा बंधु', कुंटे – 'लाभाचा प्रबंध' १८·१७४२; ईश्वराचेनि लोभें १८·१५०७, देहाचेनि– १८·१९३; रसाळपणाचेया लोभा ६·१६; हिताचेनि लोभें ७·११६; वृद्धिलोभें १५·१५८; सर्वस्वाचा लोभु १३·३३१; स्वर्गसुखलोभें १८·६०६; लोभमोह १६·२६४; काम शब्दासहित आलेले लोभाचे संदर्भ काम (१) पुढें पहा; लोभिया—कां लोभिया दूरि जाये । परि जीउ ठेवां चि आहे । १३·४८६, लोभियाचें मन १३·२०२; लोभिणि १३·५०१; लोभिण्ये, लोभी (अ. व.), लोभिण्ये एक चि जगीं । माझेनि लोभें ॥ ९·३५८(१), लोभी १३·७९२; प्रलोभ, अति लोभ, १५·१०३.

**लोम**—रोम, केंस. लोम नव्हे वांकुडी । मानसाची ॥ १३·४९३, मनावर यत्किंचित्ही परिणाम होत नाहीं या अर्थी.

**लोलणें**—लोळणें, झोंपणें, चूर होणें, तरंगणें. हें असो पवनाचेनि मेळें । जैसें जळिं जळ चि

लोले । ५·९९. ते साउली देखौनि लोले(लें) । श्रांतु जी मी ॥ ९·४. भुइं लोलौनि गेलें अंभु । बोल थारे ॥ १८·४२१. ११·१८६, ११·४९८, १४·१८३, १८·७९७. आनंदाचेया दोंदावरि लोले १३·१७३; उत्संगिं अंका वरि लोले १३·३९५; क्रिमि नरकीं लोलतु १६·३०६; जीभ लोले, हिंसेस उद्देशून, ९·१८०; विषयां वरि लोले १३·४७७; लोलतें—लोळणारें, लोळत असलेलें, अंकिं मलमूत्रपंकिं लोलतें बालकें १३·७३३; लोलतीं भूतें १३·२२५; लोलणें—पूयपंकिं लोलणें, जगांतील भोगांस उद्देशून, १३·५११.

**लोलुपता**—आसक्ति. ११·४२६. **लौल्य**, ७·१३८; अलौल्य १६·१६६.

**लोंव**—लोंकर. कैंचा लोंवे विण कांबला । १८·८११.

**लोहित्व**—तांबडेपणा. कुंकुमें स्फटिका । लोहित्व होए ॥ १३·१०१२. **लोहिव**, तांबडें, पुढां उपरतिरागें लोहिविं(वि) । १५·१९२, वैराग्याच्या आवडीमुळें (पक्षीं रंगानें), तांबड्या शाखेस उद्देशून. लोहिवां गमे १५·३१७.

**लोही**—मोहोर. ना तरि निदेवांचां परिवरीं । लोही रुतलिया आहाति सहस्रवेरी । ९·५८, दुर्दैवी माणसाच्या घरांत हजारों मोहरा पुरलेल्या असतात पण तो उपासमारच करून घेतो यास उद्देशून, दैव पहा.

**लौकिक**—जगांतील व्यवहारासंबंधीं, लोकांचा आचार, लोकांसारखा. जें संगदोषें हें लौकिक । अंश पावे ॥ १·२५६, लोकांचे आचारविचार. बाह्ये(ह्यें) तरि रूढु । लौकिकु जैसा ॥ ३·६८, लोकांत व्यवहार करणारा. जिहिं लोकाचेन आधारें । लौकिकें चि व्यापारें । सांडिलें निदसुरें । लौकीक हें ॥ ५·९७ (१). ६·४०७, १३·६०८, १५·११५. **लौकिका**, जगांत घडणारी, १४·३४२, —आंतु, लोकव्यवहारांत, १०·७७, —चा उद्वेगु १३·११२, —भागु, लोकांना दिसणारा, १०·७५; लौकिकस्थिति ३·१६५; **लौकीक**—निदसुरें लौकीक, लोकांच्या अज्ञानास उद्देशून, ५·९७ (२); **अलौकिक**, लोकोत्तर, लोकबाह्य, चमत्कारिक, स्वर्गीय, मार्गाधारें वर्तावें । विश्व हें मोहरे लावावें । अलौकिकां नोहावें । लोकाप्रति ॥ ३·१६१, लोकबाह्य वर्तन नसावें; अलौलि(कि)क करणें, प्रकृतीच्या चमत्कारिक कृतीस उद्देशून, १३·९८४; अलौकिकु ग्रंथु १५·११६; अलौकिक गांभीर्य ११·२६१; अलौकिकें दीठिचेनि हाततुकें, लोकोत्तर दृष्टिपातानेंच अजमास घेऊन, ८·२६४; अलौकिक भोग, स्वर्गभोगांस उद्देशून, ६·४४१, —स्पंदें १८·१६०१, स्पंद पहा; अलौकीक जूझ १८·८६१; पारलौकिकें फलें, स्वर्गभोगांस उद्देशून, १७·२९०.

**लौल्य**—लोलुपता पहा.

**ल्हासणें**—चमकणें. ल्हासत कांचन पीवळें । ११·१३५.

## व

**व**—हो या अर्थी हा पाठ आला असावा. ह्मणौनि ते पुरुषोत्तमा । कैसें व ह्मणों ॥ ११·५५२, माडगांवकर प्रतींत—'कैसेनि म्हणों,', ११·५५२, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'विनवूं तें थोडें' ११·५५९, असे पाठ आहेत.

**वंकणें**—एकत्रित करणें. जें एकाल एक वंकौनियां । सांघावें ज्ञान ॥ १८·१३२८, ज्ञानदेवी, कुंटे—'एकवेळ आवांकुनियां', पूर्णपणें, १८·१३३७. एकवंक पहा.

**वक्ता**—बोलणारा. ह्मणौनि वक्ता चि वक्ता नव्हे । श्रोतेनि विण ॥ ९·२९, ११·२६.

**वक्त्र**—तोंड. पेटलें प्रलयाग्निनें उजितें । तैसें वक्त्र हें तूझें ॥ ११·३०७. ११·२६६, ११·३३९, ११·३७३, ११·४३२, १३·४४६, १७·२६४, १७·२३१. वक्त्रा(क्त्रा)चा विकाशु ११·३५६; वक्त्राकाश, मुखरूपी आकाश, १८·१४६१; वक्त्रमिळणीं, तोंडांत पडण्यास ११·४१९; बहुवक्त्रें(क्त्रें) ११·३३५; लोकवक्त्रा(लोक वक्त्रा)माझि ११·४०९; हरिवक्त्र ११·१९५, १५·५५९.

**वक्तृत्व**—भाषण, भाषणसामर्थ्य. साहाजें तऱ्हीं अवधारा । वक्तृत्वा अवधानाचा होये चारा । तैं

दोंदें पेलति अक्षरां । प्रमेयाचिं ॥ ९·२६. वक्तृत्व गोडपणें । अमृतातें पाह ह्मणे । १३·३. ९·१२, ९·२३७, १५·११; वगतृत्व, याच अर्थी, १३·६३३.

**वंग**—डाग, दोष. ज्ञानें फेडिला वंगु । अंतरिंचा ॥ १३·४७२. **भेदाचा वंगु** १०·२८९.

**वच**—बोलणें. **कृष्णवचोक्तीं** १०·३०, ज्ञानदेवी–'कृष्णार्जुनवाचोक्ति', कुंटे–'कृष्णार्जुन वचनोक्तीं' १०·३१.

**वचणें**—जाणें, नाहींसें होणें. खालील सर्व रूपें **न** सहित आलेलीं आहेत. कां समोर आणि देखौनि । जरि न वचिजे चि ऊसंडुनि । तरि क्षणा येका कवळुनि । जाळूं शके ॥ १·२४०. **न वचत** २·२६९; **न वचतांचि (वचतां चि)** १३·५८०, –**वचति** ४·५९, –ती १८·३६७, –**वचावी** १८·७७, –**वचावें** ३·८९, १३·७७३, –**वचावेया** १७·२४२, –**वचिजे** ६·४२१, १४·३३८, –**वचे** ३·१९५, ६·२०५, ६·३४७, ८·६, ८·१७८, ८·२३९, ९·५२, ११·६४, ११·४२४, ११·५७७, १२·१९२, १३·४८५, १३·५३६, १३·७३७, १३·८२४, १५·१२२, १८·४२१, १८·८९३, –**वचैल**, आणि अपयश तें न वचैल । कल्पान्तु वेन्हीं ॥ २·२०१, ६·१५१; **वचवणें**—न वचवे खोंपे आंतु । वाघाचिये ॥ १८·७०९, १३·२५७, १३·५१३.

**वचन**—शब्द, बोल. ऐ(ए)णें वचनें ज्ञानदेऊ । सुखिया जाला ॥ १८·१७८०. **वचनें गाये** १०·१३९; **वचनतेजकरें** १०·१३२; **कानावचनाचिये भेटी**, कानांनीं शब्द ऐकतांच, १८·९८५; **गुरुवचन** १३·४४६, **श्री**–१६·४५४.

**वंचणें**—फसणें, फसवणें. आंग वरि चर्ची । जनांतें वंची । १३·६५९. १३·७९३, १७·८७, १८·१३२७(१). **न वंचे**—वाटेचा न वंचे आलेयां(या) । रुंखु जैसा ॥ १६·८५, **न वंचणें** १६·८४; **वंचन** १८·१३२७(२); **अवंचकु** १८·१३२४.

**वज्र**—इंद्राचें आयुध; दृढता व कठिणपणा दाखविणारा शब्द; योगांतील आसन. वरि अमृत ही वीटे । कां कालवर्शे वज्र फूटे । परि मनोधर्मु न लोटे । विकरविला हा ॥ २·४१. २·२१६, १०·२२०. **वज्राचें(चे)यां बोलिं(लि)जे**, कठोर भाषण कसें करावें ?, १·२१६; **तोंडासि काइ वज्र पाडिजे**, तोंड बंद करावें काय ?, ७·१४८; **वज्रापासौनि कठिन** १·१९९; **वज्राग्नी**, विद्युदग्नि, मूलबंधापासून उत्पन्न होणारी उष्णता, ११·३७२, १२·५०, १४·१६१; **वज्रांगी**, चिलखत, कवच, ९·४७३, १८·१०४१; **वज्रासन**, मूलबंध, ६·१९९; **वज्रकवच** २·२३२, –**गांठ**, घट्ट गांठ, कर्माचां वज्रगांठीं । कालासे तो ॥ १८·३८९; **वज्रयोगक्रमें** ४·१४५; **वज्रांगना**, हा **व्रजांगना** चा अपपाठ आहे, ९·४६१.

–**वंट**—शब्दास जोडून, मार्ग या अर्थी. **राजवंट** ८·१८२.

**वटिका**—लहान वाट, मळा. पंचवटिकांची बांधी । १३·४७.

**वंठाऊ**—उणेपण. तो अज्ञानदेशिचा राऊ । या बोला महाबाहो । न पडे गा वंठाऊ । आणिचा हा ॥ १३·७५१, **आणि** (१) पहा, ज्ञानदेवी–'वाटावो आणिकाचा', कुंटे–'गा ठावो आणिकांचा' १३·७५३.

**वडप**—अति वृष्टि, वर्षाव. **आ(अ)मृताचें वडप** १३·३९८, **रसवृत्तिचें**–१०·४५; **सात्विकाचेनि वडपें** ६·४८७.

**वडवानल**—समुद्रांतील अग्नि. **अनल** पहा.

**वडवाली**—घांस. मांसाचिया वडवाली । आरोगुं लागे ॥ ६·२३०.

**वडिल–वडील**—बाप, पूर्वज, पूज्य व्यक्ति, मोठें, महत्त्वाचें. **वडिल**—एथ वडिल जें जें करिति । तेया नांव धर्मु ठेविति । ३·१५७. स्वयंभु मुख्य वडिल । च्यारि मनु ॥ १०·९१. १·२१४, १·२६३, ४·३६, १७·८५, १७·९३, १७·२०४. **वडिलांचेनि मुखें** १०·१५१; **वडिलांची वास**, वागण्याच्या रितीस उद्देशून, १६·२८५; **युग्म ही होन वडिल** १३·३७८, **सांघतां वडिलि गोठि आहे** ७·१४; **वडिल धाकुले** १·१८३. **वडील**—९·५०५, १४·१६४, **धाकुटा वडीलु**—दीपा आदीलु मागीलु । सूर्यासि धाकुटा वडीलु । अमृतसिंधु खोलु । उतलु काइसा ॥ १८·१६५७; **वडीलपणें**, उतारवयास शोभेल असें; कां राहे पण्यांगना । वडीलपणें ॥ १३·२०४;

तशी ती वागत नाहीं, आपलें वय लपवते यास उद्देशून.

-वडें—त्या कारणानें, त्यामध्यें. माझिवडें—एतुलालिए आणिमाझिवडें (आणि माझिवडें)। योग्यपण तूतें हीं जोडे। ६·३४३, ज्ञानदेवी–'आयणीमाजिवडें,' कुंटे–'आयणीमाजि येवडें', युक्तीनें या अर्थी, ६·३४३, माझिवडा-डें पहा.

वणणें—व्यवहार करणें, व्यापार करणें. वण—शिष्टाईस उद्देशून, ऐसा वणेसाठिं जागेश्वरा। वीकिलासी जी ॥ ११·५३५, ज्ञानदेवी–'वजीसाठीं', कुंटे–'वणिजेसाठीं' ११·५४२; वणिजूनि मोलें घेंति १८·२३३; वणिज ६·११०, १८·९०९; क्रियावणिज, क्रियारूपी व्यापार, १८·७४३.

वणवणें—वणव्यांत सांपडणें. जैसा ग्रीष्मकालीं गिरिवरु। वणवला कां॥ २·७६. वणवा ९·४८८, १४·१९०; वणवेयाचां जालिं, वणव्याच्या भडक्यांत, १३·४९६, –वेढां ११·४३०.

वत्सनाग—वत्सनाभ, बचनाग, विष. कां वत्सनागा जैसी। महुललै ते ॥ १८·७९३, महुललै पहा.

वंदणें—नमन करणें. १·२७, १३·१, १६·१. वंद्य ६·४७७.

वदंती—बोलवा, उपदेश, वचन. पैं गुरुशिष्यसंबंधु येकांतीं। जेया अक्षरा एकाची वदंती। १०·११०, गुरु एकांतांत ब्रह्मनिदर्शक ॐ या एका अक्षराचा शिष्यास उपदेश करतात त्यास उद्देशून. ९·१०४, १३·६५१, १४·६९.

वदन—तोंड. केली जैसी वदनीं। ब्रह्मशाला ॥ १७·२२१. आरिसेन विण बिंबे। वदन कें पां ॥ १८·२६२. ११·१४२, ११·१९८, ११·३०९, ११·३४०, ११·३४१, ११·३५३, ११·३८७, ११·४१५, ११·४१६, ११·४७१, १८·१४५०. वदनामृत—श्रीकृष्णवदनामृत १५·५५५; वदनज्वाला ११·४३०, –डोह ११·४१४, –दरी ११·३५७, –फलें ११·२६५; प्रतिवदनीं ११·३३६.

वधणें—ठार मारणें, नाश करणें. एयां सकलांतें वधावें। मग जे भोग भोगावे। १·२११. तेणें उपकारें काइ आभारैलां। वधिं यचांतें ॥ २·३७. १·२०६, १·२६३, २·४५, २·५४, ३·२५३, ११·४७५. वधिजति १·२३५, २·३२; वधिता २·१३८(१), –...मरता २·९९, –...मरते २·१३७; वध्य—तरि वधिता तूं न्हवसि। हे वध्य न्हवति ॥ २·१३८(२); वध—आणि मीं अर्जुनु हें आत्मक। इयां वधु करणें हें पातक। हें माया वांचौनि तात्विक। कांहिं आहे ॥ १८·१२७५, १·२२८, १·२४३, २·३६; वाटवधेया चूकले, वाटमाऱ्याच्या हातून सुटले, ७·१६९; वाटवं-(व)धें करीति, वाटमारेपणा करतात, १२·६१; वाटवं(व)धां पेणा १३·५४६.

वधू—नवरी, कुलीन स्त्री. वधुवरांचिये मीलणीं ११·३; कुलवधू, कुल (१) पहा; विशदविद्यावधू-वल्लभ, शुद्ध (अध्यात्म) विद्यारूप कुलस्त्रियेचे प्रियकर, गुरूस उद्देशून, १४·३.

वन—अरण्य, रान, रमणीय स्थान. जें स्वप्नें देखिलें स्वप्न। जें मृगजळें सांसिनलें वन। ८·१४८. वसंतु तेथ वनें। वनें तेथ सुमनें। १८·१६१६. ९·१५८, १३·६६०, १४·२९३(१), १६·१६३, १८·५५२, १८·१०५९(१) आनंदाचिं वनें ११·१९५; घोरा वना १५·३२४; दांगिचें वन १८·४२६, सावेरीचे(चें)–१८·५७३, ज्ञानदेवी, कुंटे–'सावरीचें' १८·५७६; वनलक्ष्मीविलास १४·२९३(२); वनवासियां ११·१०४, –ये २·७०, –सी ३·२३०; वनशोभा १·४३; वनश्री ३·१००; वनस्थलिया वसवी, वनांत मठ बांधतो, १८·१०१६; वनत्व, घरिं कुटं(डुं)बपणें सरे। तरि वनीं वनत्वें अवतरे। १८·१०५९(२), उद्यानवन १·२८, कमल–११·२००, १८·७३२, गाभे–, गाभेवन पहा, तपो– १३·६१०, १३·८२२; प्रकृतिवनमाधवी, प्रकृतिरूपी वनाचा वसंत ऋतु, १३·११६; बुधवनवमंत १०·२९४; महावन १४·२३१, मोह– १३·९८६; विनोदवनवाटिका ९·३१९; सज्जनवनचंदन १०·३; संतोखवन ३·२४८, संतोषाचां वनीं ६·४४८; वनौकें, वनांत राहणारे पशुपक्षी वगैरे, १८·१५२१.

वपु—देह. वपुचेनि संगें २·११५; वर्णवपु १·३.

वमणें—ओकणें. तेथ तृप्तिचेनि संतोषें। गरल जे

(जें) वमी मुखें । ६·२४१. वमिलेया अन्ना । लाल न घोंटी रसना । १३·५१२. **वमौनियां** १५·२३३; **वमन** १८·१०१०.

**वय–वयस-सा**—आयुष्य, तारुण्य, प्रौढत्व, वृद्धावस्था. **वय**—विद्यावयमाजें १३·७१४. **वयस-सा**—आइकें शरीर तरि एक । परि वयसा भेद अनेक। २·१०८. ६·२६१, ७·८२, १०·६४, १३·७७०, १८·७५५. **वयसेचिया गांवा** ६·४५१, **–चिये सेवटीं** ६·१२१; **तिहिं वयसिं** १३·९१७; **बाल्यादिकां वयसां** ९·११८; **वयासा**, हा पाठ **वयसा** असा घ्यावा, ११·२७४; **रूपें वयसा माजा** ९·४२८; **विद्या किं वयसा** ९·४९०; **वयसात्रय** १४·१३९; **प्रथमवयसाकालीं** १·४२.

**वयनीं**—हा शब्द **नयनीं** किंवा **अवनी** असावा, ११·६५०, ज्ञानदेवी, कुंटे –'अवनी' ११·६६०.

**वर**—(१) कृपाप्रसाद, लाभ. जेथिचिया कृपा लाभे वरु । तेथ चि मनें व्यभिचारु। २·३८. १३·४०७. **वरदु** १·१३. (२) नवरा. **वधुवरांचिये मीलणीं** ११·३. (३) उत्तम, श्रेष्ठ. तो ही नीका वर उभयता । दीसतसे ॥ ३·२२४, इह व परलोक या दोन्ही दृष्टीनें उत्तम वाटेल. **गिरिवर** २·७६, ५·१०२, १०·२६६, १२·११, १५·४६९, **ग्रह**– १५·१९३, **तरु**– ९·२५०, १३·४८८, १४·२७९, १६·३७१, १८·२०५, **अजातशंतृतरुवरां** १३·२२८, **जनणें** पहा; **दानवरिया** १७·२८२, **दान** पहा; **नृपवर** १·१५३; **रहवर**-**राहवर** पहा; **श्रीवीरवरनरहरी**, वीरश्रेष्ठ नरहरी, येथें श्रीकृष्ण, १७·४२०. (४) उलट पक्षीं, यापेक्षां, शिवाय, सुद्धां. तें भलेतें वर साहिजैल । १·२१२. हे वर भलेतें करितु । १·२२५. १·२०९, १·२१६, १·२६५, २·३६, २·३९, २·४६, ५·१६५, ६·१२८, ६·१७०, ९·२०६, ९·४६०, १३·४९४, १४·३६०, १६·१५५, १६·२८३, १८·१५२.

**वरगण**—वाटणी. १·१२२.

**वरंडा**—बांध. १३·६९२.

**वरणें**—पसंत करणें, प्राप्त होणें, मिळवणें. बालपणीं चि सर्वज्ञता । वरी तेयातें ॥ ६·४५१. जीवित सरतां तेयांतें । पितृत्व चि वरि ॥ ९·३५२. मनपण हिं वरुं नेणें । १७·२३२, ज्ञानदेवी–'नेणे' १७·२३३. ५·७१, ७·९४, ८·८२, ११·६७५, १३·६०९, १५·३७, १७·५८, १७·९१. **स्वयंवरें**, स्वतः होऊन, २·१९३; **वरैत**, वरणारा, लाभ घेणारा, १०·३०३, १३·१०१९, १८·१०४३.

**वरचिल**—बाहेरील. ७·१८६.

**वरता–तें**—वरच्या बाजूस, त्यावर. **वरता**–वरता लागति आकाशीं । यागाचिया ॥ १८·४७९, वरच्या बाजूस, स्वर्गांत जाण्यास, ज्ञानदेवी–'वारत्या', दोर, कुंटे–'वराता', शिड्या, १८·४८२. **वरतें**, त्या उपर, १६·३६.

**वरपड–वरिपड**—प्राप्त करून घेणें. **वरपड**–**पापा वरपडा होसील** २·२०१; **वरपडेयां होइजैल** ३·२१०. **वरिपड**—वरिपडी होये दुर्वांता। २·३४९. ६·१६८, ११·४३०, १३·७१, १३·१०९९, १७·१५७, १७·१९२. **वरिपडा जाला** ११·६१४, १८·९०५, **–जालेयां** १८·४८५, **–डे जाले** ९·१७९; **वरिपडणें** ८·२०७, १३·३४३, १३·४९३, १३·५०१, १४·३५५, १५·९९, १७·२५९, १८·८५८, १८·१०४२. **वरिपडतां**—आगा वरिपडतां पाषाण। न सुवावें केति ओंडण। ९·४८७, हा पाठ आंगावरि पडतां असा घ्यावा.

**वरि-री**—वर, वरचा, नंतर, पुनः, शिवाय, कदाचित्, पेक्षां, उलट पाहतां. हे शब्द सुटे किंवा इतर शब्दांस जोडून आलेले आहेत. **वरि**–वरि क्षे(क्ष)त्रियांमाजि श्रेष्ठु । १·११५. देहा चि वरि आदरु । ४·१९. तेयाचें जियालें ह्मणों काइ । वरि मेलें चांग ॥ ४·१९१. परि हें आकाश वरिचा वरि जालुं । ११·४५६ (१). दों वरि दोनि । भुजा आलों घेउनि । १२·२२२. ग्रंथु नेघा वरि कोपाल । १३·३२६, ज्ञानदेवी–'नेघाल' १३·३२७. ऐसें युगीं वरि कलि । १८·१७८१. १·२१२, २·४१, २·४४, २·२०४, ३·१०, ३·६५, ५·१६९, ६·१३, ६·२२, ६·१६२, ६·१८२, ६·१९४, ६·१९६, ६·२०८, ७·१३८, ८·४१, ८·२३१, ९·४३, ९·५२, ९·५४, ९·१७९, ९·४३७, १०·१०८, १०·१८३, ११·५७,

११·२१७, ११·२४५, ११·२६५, ११·३५८, ११·३७३(१), ११·४६७, ११·४९८, ११·६०१, ११·६३१, ११·६५१, १२·५६, १२·१६२, १३·१७९, १३·२०७, १३·२४७, १३·२५७, १३·३८०, १३·३९२, १३·४२३, १३·४७१, १३·५५७, १३·६२३, १३·६५९, १३·६६७, १३·६७५, १३·८०९, १३·११४०, १३·११६१, १४·२८, १४·१४८, १४·१८२, १४·२११, १५·१, १५·६, १५·१०६, १५·११०, १५·१७१, १५·१९७, १५·३१७, १५·३७५, १५·४३५, १५·४६३, १५·५१६, १६·२५, १६·५९, १६·१५०, १६·३२४, १६·३७९, १७·१२७, १७·१४५, १७·१६६, १८·७७, १८·२२३, १८·३८२, १८·४२३, १८·५४३, १८·६१६, १८·८०५, १८·८८९, १८·९४१, १८·९९५, १८·११३२, १८·१२२३, १८·१४१४, १८·१४९१, १८·१४९७, १८·१४९८, १८·१५४७, १८·१५६६, १८·१७१२, १८·१७३९, १८·१७५८. **वरिवरि**—जैसी वरिवरि पाल्वी खुडिजे । २·३०५, **अंका वरि** १३·३९५, **अझुई**—१·२६१, **अद्वैता**—१५·४१७, **अवचितेया**—१०·५१, **अहंकारा**—१३·१०९, **आंगा**—९·४०८, **आगियला**—११·३३७, **आसना**—६·१८९, ६·२५८, **आहाचु**—६·२५२, **ऐ(ए)कांता**—१३·६१२, **कंद्रा**—६·२२७, **करतळा**—१३·६५०, **कल्पतरू**—१०·११, **काइसेया**—८·११८, **काइसेया**—११·२७१, **कीले**—१४·१२२, **कोडि**—, **कोडिडी** पहा, **खडकां**—११·९५, **गगना**—१०·१२, **गृहपरिग्रहा**—१३·५९२, **घरा**—१३·५९३, **चेइलेयां**—१८·९६८, **जगा**—३·२३७, **जंत्रां**—११·३९०, **जमा**—११·४५४, **टकेयां**—१५·१६५, **तलवटु**—९·२२३, **दुणे-दूणे**—**दुण-दूण** पहा, **धडेया**—९·८, **ध्वजे**—१·१४१, **पदां**—११·४८४, **पृथ्वी**—१८·१४५३, **पृथ्वी**—९·४३२, **प्रत्यक्षा**—२·१९०, **बाण**—११·४५६ (२), **बैळा**—१३·५३१, **बोटां**—१३·२८५, **बोल**—, **बोल** पहा, **मती**—९·२७, **मस्तका**—१·१७, **मागिला**—१६·६२, **माथेया**—१०·७२, **मुकुटां**—११·२१६, **मेरू**—११·२३९, **रत्ना**—१३·३६२, **लक्ष**—७·११, **ललाटां**—११·३११, **विवेका**—१४·२२०, **विवेका**—१०·२०, **विषयां**—१३·४७७, **विषयां**—५·१२२, **शास्त्रां**—१३·१९२, **संयमा**—१३·५०५, **सहस्र**—११·११७, **सागरा**—९·४५७, **साधन**—७·१५२, **आह्मा**—९·७, ११·३७३ (२), **एया**—१२·२१२, १७·१६८, **एया**—१०·११७, ११·१, १३·७२, **एया ही**—१०·२८२, १२·१६९, **ऐसिया**—१३·१२२, **ऐसेया**—१५·३७९, **जेया**—१०·९, **तेया**—१०·३०५, १६·१४६, **तेया चि**—१४·२९८, **तेया ही**—१२·१६१, १७·२९७, १८·४१, **तेया**—९·२१६, ९·२३६, **यया**—१८·१३६६, **यया ही**—१८·१५२४, **ययां**—२·४७, **या**—१३·१२७, १३·३६८, १३·६४५, १३·६४७, १३·८५५, १३·१०८५, १६·४६७, १८·५९१, **या**—१·२७२, १०·२७, ११·६९१, **या ही**—११·५२; **रिणावरि विवाहो** १८·७९२; **वरि बोलणें हीं बोलावें घडो** ९·३७; **हें चि काइसें वरि होये** ८·७९; **पाना वरि पानें** १५·१८७; **वंशा वरि वंशाचे(चें)** १५·१२७; **व्योमा वरि व्योम** १५·४५५; **शृष्टिवरि शृष्टि** १०·३५, ११·४५५; **सुख वरि नसुदें सुख** १८·१२०९; **सुलभ आणि सोपारें वरि परब्रह्म** ९·५१; **वरि...आंतु** २·९०, ९·१७३, १४·२६१; **तळिं—ळीं वरि** ६·२३०, १५·४८; **बाहिरि...आंतु...वरि** ९·२१२. **वरी** ४·१३०, १७·३७५, **एया**—१२·२४२, **यया**—१८·१३२३, **पाठी**—१०·२२९, **पाए...पाठी**—६·३८९, **बोल**—४·११२; **वरीं**—दीपु ठेविला परि वरीं । ९·१२७, **परिवर** पहा.

**वरिचिल-चील**—वरच्या बाजूस, बाहेरच्या बाजूस. **वरिचिल**—जन्मासवें श्रम । वरिचिल ही गेले ॥ ९·४००. ८·२२२. **वरिचिली** ७·२०३, **—कडां** १३·४७०, **—कडे** ९·७६, १३·४८४, **—वाढि** १५·४९; **वरिचिलें...तळिचिं** ६·२०३. **वरिचील**—**वरिचील गवसणी** ८·१३३, **— झळाळ** १३·४६९.

**वरिल**—वरच्या बाजूच्या, वर असणारें. वरिल

कोंडेयाचा गुंढाला । संडुनु केलेयां वेगला । कणु घेतां विरंगुला । असे काहिं ॥ १५·४३३. कां कांटिये वरिला सरडा । व्योम नीच ॥ १६·२२३. ११·२९०, १८·१२१४. जळा वरिलु तरंगु १८·११६३; पद्मइला वरिला १५·११२; पाटेया वरिलें आखरें १८·१०९३; या वरिल, ह्या वरच्या मारलें बोलणें, १३·३३७; वार्ते वरिल धावणें, दोरीवर धांवणें, १८·६४; आंगावरिलें १३·२८२, खांबा–११·४६२; डोलेया वरिलें १३·७५७; स्वाधिष्ठानावरिली कांठीं ६·२१०; वरिलीकडौनि ६·२४७.

**वरिख-ष**—वर्ष. **वरिख—वरिखशत** ६·४६३. **वरिष**—वर्त्ततें वरिष जाए। १५·१२९. **प्रतिवरिष**—प्रतिवरिषिं क्षेत्र पेरिजे । १०·५४.

**वरिखणें-पणें-सणें**—पाऊस पडणें, वर्षाव करणें. **वरिखणें**—परि वरिखती नवल । घनवटीतें ॥ १३·२१३. या लागि नवरासें । वरिखैन मीं ॥ १३·११६३. ११·९५, १५·२६७, १८·३२०, १८·४३१, १८·१०३३, १८·१७४०. **वरिखा**—वरिखा अंतिं १५·२५५, –काल, पावसाळा, ११·१९३. **वरिषणें**—तेथ बाणवारि धनुर्धर । वरिषताति निरंतर । १·१६६. आहा अमृताचा पाउसु वरिषला । ९·५१८. २·७९, ९·५२३, ११·६५१, १२·१३०, १४·२२, १८·१३६८. **वसे ना वरिषे** ६·४३३; **वरिषा**, पाऊस, वर्षाव, **वरिषायें वीण सागरु** १२·१५१; **वरिषा करि चि ना** १८·१५६९; **वरिषांतिं** १४·३०४; **वरिषाकाल** ६·१७४, ११·११३, १८·१७३९, –**त्याग** १६·१३२; **वरिषाॐ** २·२३२; **वरुषाकाल** १२·३८. **वरिसणें**—**मेहो वरिसे** १७·१३१.

**वरिंव**—श्रेष्ठपणा. काइ नादातें हान वरिंव । जीणौनि आले ॥ ६·१३२, बोलण्यानें नादब्रह्मास जिंकून आले कीं काय?, ज्ञानदेवी–काय नादातें हन बरव । जिणौनि आली ॥ ६·१३२.

**वरिवणें**—वरचढ करणें, चाल करणें. **एथां कौरवां** वरिवावें । १·२०७.

**वरो**—पोटगी, रोजची अन्नसामुग्री. **जैं बीं चि** वरोसी वेंचे । तैं वाढती कुलवाडी खांचे । १८·२५६.

**वरौत**—वर, वरची बाजू, पलीकडे. तेथ अध वरौतें आकुंचे । ६·२३७. ६·५५, १५·२०१. **जाणितलेया वरौतें** १३·८६२; **या वरौतें**, यावर पुनः, १३·११२२; **वरौता उठिं** ८·७७, –**उठीं** ४·२०७.

**वरौन**—वरून, पासून. वत्सा वरौनि धेनुचें । स्नेह राना न वचे । १३·४८५. **नलिके वरौनु** १४·३००; **भाणेया वरौनि** १८·७८२, **महत्वा**–१३·६५६; **ठायावरौनि** ९·१९७.

**वर्ग**—समुदाय, समूह, विभाग. **अज्ञान वर्ग** १८·१४४२, **अनात्म**–, पदार्थवर्गास उद्देशून, १५·२६६, **आसुर**– १६·४६६, **इंद्रिय**– १६·७७, **गोत्र**–१·१९३, **चेतना**–८·२०८; **त्रिवर्ग** १५·२३३, १८·३६, –**गोंपायें** १८·७४२, सं. वा. श. पहा; **रिपुवर्ग** १८·१०७०, **विष**–१६·२१४.

**वर्जणें**—टाकणें. तैसी सांडिमांडि मनें । वर्जिली असे ॥ १४·३६५. १०·७८.

**वर्ण**—(१) ब्राह्मणक्षत्रियादि जाती, जातींचे विभाग. मज वर्णहीना वर्णु । गुणातीतासि गुणु । ९·१५७(२). ९·४७१, १७·१९५, १८·८१८, १८·८२२, १८·८२४, १८·८२७, १८·८८१. **वर्णावर्ण** १·२४९(१); **वर्णाश्रम**, आश्रम पहा; **वर्णभेद** ४·८०, –**विशेष**, जातीचें वैशिष्ट्य, १२·७६, –**विशेषवसें** ३·८८, –**विहित** १८·८२९, –**व्यक्ती** ९·२९२, –**हीन** ९·१५७(१); **कुलें जाती वर्ण** ९·४५२; **अवर्ण** १·२४९(२); **वर्णत्रय, तीन्ही वर्ण, चतुर्**–, **चहू**–, **त्यान्ही**–, सं. वा. श. पहा. (२) रंग, प्रकार. समताशुभ्रवर्णु । १·१५. तेविं चि येक येका ऐसें । वार्णीं हिं नव्हे ॥ ११·१३१. रूप ना वर्णु । नांव आथि ॥ १३·९७७. **वर्णांचा वानिभेद** ११·३५०; **रसें वर्णें परिमलें** १८·४७०; **नामवर्णुआकारु** २·१३४; **रूप वर्णु व्यक्ति** १३·८६६; **नाना वर्ण, नाना–, नाना** पहा; **अंजनवर्ण** ११·१३४ (१), **कपिल**–, पिंगट, ११·१३२, **कुंकुम**–११·१३३, **कृष्ण**– ११·१३४(२), **निर्वाण**–६·९७, **निर्वाण** पहा. (३) व्याकरणांतील वर्ण, **स्वर व व्यंजनें.** मग स्वर वर्ण विसर्गु । १३·११९. आगा बावना वर्णां परौता । १८·३७१. **पदें वर्णें** १५·५४०; **वर्णत्रय**, ॐ तत् सत् यांस उद्देशून,

१७·३३५, –यात्मक १७·३५०; **वर्णवपु,** अकारादिवर्ण हेंच शरीर, १·३; **आदिवर्ण—** तो प्रणउ आदिवर्णु बुझा । १७·३३९.

**वर्णणें**—गुणधर्म सांगणें, स्तुति करणें. तेया रथाचे गुण । काइ वर्णू ॥ १·१४०. मौनाचिया मिठिया वर्णिजे । १६·१९. १५·२७. **वर्णनीय** ११·५६३; **वर्णन—गुरुवर्णन** १३·४५६.

**वर्तणें-वर्त्तणें**—करीत असणें, वागणें, होणें, दिसणें, वाटणें. **वर्तणें**—मज बहूत भीष्मद्रोणाचें। वर्ततसे ॥ २·३४. सुखदुःख वर्ते जें जनीं । १०·८२. २·२७८, ३·८१, ३·१०२, ३·१६९, ८·७९, ११·५८८. **वर्ततें आहाति** ७·३६. **वर्त्तणें**— ऐसें आइकैं तेथ वर्त्तलें। १·२७१. २·१८७, ३·७६, ३·१५९ (व), ३·१६२, ३·१७३, ३·१७८, ३·१८०, ३·१९०, ४·९२, ५·४०, ५·४८, ७·१४१, ८·८३, ९·२५७, ९·२८७, ९·४०५, १०·८४, १०·८९, ११·१५०, ११·२४७, ११·४२६, १४·३०९, १४·३४१, १५·३४२, १६·२७१, १८·३४०, १८·६६५, १८·१११५. **वर्त्तिजत आहे** ११·४९३; **वर्त्ततिये** १२·१; **वर्त्तती परी** ३·१६५; **वर्त्ततें वरिष** १५·१२९, **–आथि** ७·१५७; **वर्त्तणें** १८·८४७ १८·८७८; **वर्त्तन** १३·३५६, १३·५२७, १३·१०५३, १७·३३६.

**वर्तुल**—गोल. दीर्घें वक्रें वर्तुलें । १३·१०५५.

**वर्म**—मर्म, रहस्य, सार, जिव्हार, युक्ति. ह्मणौनि सर्वत्र सदा सम । तें आपण चि अद्वय ब्रह्म। हें संपूर्णता जाणें वर्म । समदृष्ट्यांचें ॥ ५·९५. ७·८, ८·२०१, १४·१३६, १४·१७६, १७·१७, १७·३९७, १८·९२, १८·१८०. **क्रमाचें वर्म** १८·१००४, **गीतार्थाचें**–१८·१७५७, **विनियोगाचें**–१७·३४३;**सुखदुःखादि वर्में** ६·४०४; **कोण्हां वर्मीं हान लागे** १३·२६४; **वर्मीं न घलावें** १६·१५०, **–न विंधिजे** १६·१४९; **वर्मस्पर्श,** जिव्हारीं लागणारे, १३·२७०; **सुवर्म,** स्वरूप-जागृतीचें उत्तम रहस्य, ९·९५,१०·६१, **–शिरोमणी,** अर्जुन, १७·१६९, **–हृदयकल्हार,** मर्मस्थान जें हृदय त्या हृदयकमळावर, २·७१; **सुवर्मा,** अर्जुनास उद्देशून, १६·४८, १७·६६, १८·३७५, १८·१२१७.

**-वर्य**—शब्दास जोडून. उत्तम, श्रेष्ठ या अर्थीं. **गुणवर्य,** श्रेष्ठ गुण, ६·३७, **समस्तसुर–,** सर्व देवांमध्यें श्रेष्ठ, गुरूस उद्देशून, १४·१.

**वर्षणें**—पाऊस पडणें. पावकें दाहावें । वर्षावें जळें॥ ९·२८०. ९·२५, ९·२९४, १७·४१४, १८·१५११. **वर्षतें,** वर्षाव करणारें, १८·१७७५; **वर्ष**—पाऊस, मग वर्षु एया अन्नातें। सर्वत्र प्रसवें (वे) ॥ ३·१३४, **पुष्पवर्षीं** १८·१०६५; **शस्त्रवर्षि** ९·४८६; **वर्षा—वर्षांतिं,** पावसाळ्यानंतर, १४·१९६; **वर्षाकाल** १५·१५१, १८·६३१; **ग्रीष्मवर्षा,** उन्हाळा व पावसाळा, १३·५९९; **वर्षाओ,** वर्षाव, ९·२३४. **वार्षी–वारिषी पहा.**

**वऱ्हाड**—लग्नास जमलेली मंडळी, अशा मंडळीची मिरवणूक. बैलासि कडवाडें । हें न चुके गा फुडें । नेइजो पां वऱ्हाडें । भले तैसां ॥ १४·२३८. **वऱ्ह(ऱ्हा)डियां** ११·३; **वऱ्हाडिक,** आमंत्रण, **वक्तृत्वा वऱ्हाडिक करीं** ९·२३७.

**वऱ्हीय**—इष्ट (राजवाडे), श्रेष्ठ. **क्षुद्रदेवतां वऱ्हींयां** (ऱ्हीया), क्षुद्रदेवता श्रेष्ठ आहेत असें मानून, १७·९७.

**वलघणें**—चिकटणें, चढणें, आरूढ होणें, प्राप्त होणें, प्रवृत्त होणें. पवनाचां वारिकां वलघे । ६·२७०. उतरलें उदक पर्वतु वलघे । १०·६८, डोंगरावरून खालीं आलेलें पाणी जर पुनः डोंगरावर चढलें, अशक्य बाबतीचें उदाहरण. पाऊ आपणपेयां वलघे । केवि वन्हि आपणपेयां लागे । १८·११६१, पाय (त्याच) पायावर कसा चढवितां येईल, अग्नि स्वतःलाच कसा लागेल? अशक्य कोटींतील उदाहरणें. ११·४५७, १३·६६४, १३·७१२, १४·१६३, १४·१९१, १५·१७, १५·३२३, १५·५५३, १८·६०३. **तृष्णेचिया वारेया वलघे** १४·१५९; **थाटी वलघलेयां** १२·७२, **थाटी पहा; भोज वलघे** १४·१९९; **योगाचेया आकाशा वलघिजे** १३·११२६; **योगज्ञान वळ(ल)घले** १५·२४७; **रान वलघले** ११·६५४.

**वलणें**—वळणें, वळविणें, वाकविणें, विणणें, तयार करणें. ना तरि संध्यारागिचे रंग। काढूनि वलिलें तें आंग । ६·२५४. सकरुणपणें वळला मोट। ११·४८२. ७·१८३, १४·१६९, १७·५६,

१८·६७०, १८·८३९. **रजाचें वलिलें** १८·८०२, **वायुचें**–६·२९४; **वलण** ६·२२२; **औंठे वलणां** ६·२२३; **प्रपंचाचीं वलणें** ७·७१; **वलन—चलनवलनात्मकि** १३·४८९: **वलसा,** फेरा, भोंवरा, ७·७५, ७·८७, १३·४८६; **उ्वाचांचे वलसे** ११·३००, **पुनरावृत्तिचे**–८·१५०; **वारियाचां वलसां पडिली** १३·६६४; **वलित,** मागें फिरणें, **खंगें वलित धरिलें** १३·५८२, खंग पद्दा, खग पाठ ग्राह्य वाटतो.

**वल्लभ**—प्रिय असलेला. पूर्ण तेजाला (पूर्णात जाला)। वल्लभु तो ॥ १२·१७१, **तेज** पद्दा. गांवा गेलेयां वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। १६·७८. १३·३७४, १३·६०५. **विशद्विद्यावधू–वल्लभ** १४·३; **श्रीवल्लभ** १८·१६३६; **वल्लभा**—प्रिय पत्नी, तो वल्लभा भी कांतु। ऐसा पढियें॥ १२·१५६, १६·३३०.

**वल्ली**—वेल. **वृक्षा कां वल्ली** १२·१२८; **गीतावल्लिचें ठाणें** ६·१२; **वल्लिका—नागवल्लिका,** नागवेल, जरी फळें आलीं नाहींत तरी विड्याच्या पानांच्या वेलीची पानामुळेंच सफलता होते यास उद्देशून, १८·६२९, ज्ञानदेवी, कुंटे–'नागलतिका,' १८·६३२.

**वंश-वंस**—**वंश** (१) बांबू. १५·१२७(१,२). (२) कुळ, गोत्र. **वंशवृद्धि** १·२५२; **इंदुवंश-विलासु,** यदुवंशाला शोभविणारा, १८·१७८३; **सूर्यवंशीं** १०·२३४; **सोमवंशु** १२·२०; **वंशज,** कुळांत परंपरेनें आलेले, **वंशजधर्म** १·२४४. **वंस**—वरील (२) अर्थी. **सोमवंसिचा शृंगारु** १७·३२, **सोमवंसिचेयां पांडवां माझि,** अर्जुनास उद्देशून, १०·२७०.

**वशांति**—हें संस्कृत 'विशन्ति' चें रूप आहे, प्रवेश करतात. **स्वर्गु वशांति** ९·३०७, ज्ञानदेवी–'स्वर्गु वरिती', कुंटे–'स्वर्गा वरिती' ९·३१०.

**वशें-वसें**—शब्दास जोडून. त्या त्या कारणामुळें, त्या त्या योगें. **वशें—कर्मवशें** १८·७६४, **चतुराश्रम**–१८·६२६, **जाति**–१८·८८७, **ज्ञानत्रय**–, सात्विक, राजस व तामस या तीन प्रकारच्या ज्ञानाच्या योगानें, १८·५८२, **निद्रा**–७·६०, ९·२४५, **पुण्य**–२·२३७, **प्रकृति**–७·३८, **माया**–२·१६६, ४·४४, **वर्णाश्रम**–१८·८८३, **संकल्प**–९·३५४. **वसें—अज्ञान-वसें** १८·१११८, **आंग**–१५·२०२, **आर**–१५·१०८, **इछा**–२·३०२, ५·४४, **ईश्वर**–१८·१२८९, **काल**–२·४१, **कृपा**–२·७३, **गुणत्रय**–१७·७३, **धातु**–१७·११६, **बीज-प्रकृति**–१८·१३०५, **भाषा**–१८·११, **मति**–४·६९, **योग**–१८·२४४, **योग्यता**–४·१४१, **वर्णविशेष**–३·८८, **वायु**–३·६१, १५·३१२, **वेध**–१८·९१५, **व्योमवायु**–१४·९८, **शरीरस्वभाव**–१८·११६७, **संस्कार**–१८·४४४.

**वश्य**—अंकित, वश झालेला. **वश्यु कीजे** १३·१००७; **वनवासियां वश्यु जाला** ११·१०४.

**वसणें**—राहणें, असणें. ना तरि नगरांतरीं वसिजे। तरि नागरां चि होईजे। १·४१. ज्ञाणौनि तूझा(झां) कर्णपुटीं। वसौ काज ॥ १८·२७९. १·२५४, २·२५५, २·३४५, ३·११४, ३·२५१, ९·२८०, ९·४०६, १२·१२७, १३·६१०, १४·२३७, १४·३१८, १८·३१४, १८·१०१५. **वसतसे** १६·२०५; **संतां सवें वसतां** १५·३९०; **वसावेया** १८·१४५३; **वसिजैल** ५·१२४; **वसौनियां** १८·१४५०; **वसों आदरिलीं** १३·२५,–**आले** १५·४४१, १८·१६५१; **वसे ना वरिषे** ६·४३३; **वसणें** १३·१०९१; **हातवसावें,** हातीं असलेलें, येथें धरावें या अर्थी, १५·२३५; **वसत—**असणारें, राहणारें, ११·३७९, ११·५१५, १६·४३९, १७·२२२, **वसता आणि आसलगु,** वस्ती असलेला व सोपा, ८·२३५; **वसतें करिं** १२·१५; **साधकिं वसतें होआवें** ६·१७२; **वसति-ती-स्ति-स्ती,** वस्ती, **वसति**—हें चोवीसां हि तत्वांचें। कुडुंबघर वसतिचें। १८·३१७, **सर्ववसतिचें वसैठें** १८·१३४८; **वसती** ११·५३; **वस्ति**—जैं राज्यसेन्या ठाया। वस्तिासिं ए ॥ १५·३३०, ३·१११, १५·४३८; **वस्तिकर** १३·३५, १७·८८; **वस्ती**–१३·१४७, १३·५१३, **देहा वस्ती आला असे** १४·३३५; **वास्ति,** वस्ती, १४·३५१, ज्ञानदेवी –'वस्ती' १४·३५४; **वसविणें**—जें एक परि

सर्वदेशीं । वसवी सदा ॥ १८·१५५३. ६·१६५, ९·२८६, १८·१०१६; **वसवितु असे** १५·५१२, **वसवीतसे** १३·८८; **दुर्गें वसविलिं** १३·५८२; **वसविता**, वसविणारा, ११·५८९.

**वसंत**—पहिला ऋतु. परि फळेंसीं तैं भेटी । जैं वसंतु पावे ॥ १०·१५३. कां वसंतिचा स्पर्शे । मारुतु मौ ॥ १६·१६८. ११·११३, १४·२१, १४·२०३, १४·२९३, १८·१११, १८·३४३, १८·१६१६. **वसंताचें रिगवणें** १३·१७८, **–चिया वाहाणी** १६·१६३; **वसंतागमिचिं** १८·१७१९; **वसंतसंगें** १८·१५; **बुधवनवसंतें** १०·२९४; **वैराग्यवसंत** ६·१४९.

**वसुंधरी-वसुधा**—पृथ्वी. **वसुंधरी**—नाना धारा-धरधारीं । झळंबली वसुंधरी । उठी जेवि अंकुरीं । नाना विधीं ॥ १३·१०४८. **काखे वसुंधरी सूनि**, हिरण्याक्षास उद्देशून, ११·३५५. **वसुधा**—उत्तमातें धरिजे । अधमातें अव्हेरिजे । हें कांहि चि नेणिजे । वसुधा जेवि ॥ १२·१४४. अगा वसुधेचां पोटीं । निधान सिद्ध किरीटी । १८·१२२१.

**वसुवार**—वाडा. आहावसुवारें (आहा वसुवारें) । मोडूनि केले देव्हारे । १३·२३०.

**वसैठ-वसैठा**—वस्तीचें घर. **वसैठ**—शास्त्रजातां वसैठ । अशेषांचा ॥ १·३०. **सर्ववसतिचें वसैठें** १८·१३४८. **वसैठा**—जरि वधु करुनु गोत्राचा । तरि वसैठा होइन दोखांचा । १·२२८. १५·५४८, १८·६२१. **कालाग्निरुद्राचा वसैठा** ९·४७८, **जगिचेया अभिलाखा** – १८·६४६; **म्लेंछांचें(चे) वसैठे** १७·२९३; **विद्येसिवसैठा (विद्येसि वसैठा)** १·९५; **सर्वदोषांचा वसैठा** १८·७४९, **सर्व सुखाचा** – ५·१२.

**वसो**—पोळ, सांड. वसो जैसा मोकळु । वारा जैसा अफांडु । १३·६९६. १३·७६२. **वसोवा चारु घातला** १७·२८०.

**वस्तु-वस्तू**—पदार्थ, ज्ञान, परब्रह्म. **वस्तु**—हें उपजे आणि नाशे । तें मायामय दीसें(से) । यऱ्हविं तत्वता वस्तु असे । अविनाश चि ॥ २·१०५. तरि परमात्मा ऐसें । जें एकि वस्तु असे । तें जेया असे । ज्ञानातव ॥ १३·६१४. भांडघटशरावि । जैसी तदाकार असे पृथवी । तैसें सर्व होउनि सर्वी । असे जें वस्तु ॥ १३·८६९. नामरूपसंबंधु । जाति-क्रियाभेदु । हा आकारासि चि प्रवादु । वस्तुसि नाहिं ॥ १३·९८०. ८·६६, ८·१७२, ८·२४५, ८·२४८, ९·५३, ९·२६७, ११·४८, ११·६००, १२·३१, १२·२७३, १३·६२७, १३·७९५, १३·८०४, १३·१०४१, १४·७७, १४·८२, १४·२७४(१), १४·२७६, १५·७८, १५·२५०, १५·२५२, १५·२६८, १५·२८०, १५·३८९, १५·४१४, १५·५०७, १६·१५५, १६·३५९, १७·३६६, १८·१८८, १८·३९४, १८·८१०, १८·८७८, १८·९८५, १८·९९८, १८·१६८३. **वस्तुचें आंग** १५·२८१(२), **–चां ठांइं** १५·८३(१), १५·२८४, **–चेया प्रकाशा** १५·२८१(१),**–चिया सत्ता** १४·२७३; **अव्यवहारी वस्तु**, व्यवहारांत न दिसणारें ब्रह्म, १८·८०; **भूतग्राम विषम... वस्तु सम** १३·१०५९; **असनी चि वस्तु होइजे**, अहंकार टाकून, स्वरूप ओळखून ब्रह्मरूप व्हावें, ६·७१; **वस्तुगत** १३·७८८, **– जात**, **– जात** पहा, **–प्रभा** १५·८३(२), **– मात्र** १३·८७७, **– विचारें**, पदार्थांच्या किंवा परब्रह्माच्या विचारानें, ४·४६, ९·४०७, १५·३०३, **–सामर्थ्यशक्ती** १·७८; **वस्तुस्थिती पुरता**, आत्मस्वरूपाच्या दृष्टीनें परिपूर्ण, १५·४६३; **वस्तुस्वभाऊ** १५·४१२; **वस्तुत्व**—पैं वस्तु वस्तुत्वें असिके । तें आपण चि गुणां सारिखें । देखौनि कार्यविशेषें । अनुकरे गा ॥ १४·२७४(२). **वस्तू**—तरि ज्ञेय ऐसें ह्मणणें । वस्तूतें येणें चि कारणें । तें ज्ञानें वांचूनि कव्हणें । उपाया न ये ॥ १३·८६१, ज्ञानदेवी– जे ज्ञानेंवांचूनि कव्हणें । उपायें नये ॥ १३·८६५. तैसिं भूतें अवघडें । वस्तू उजू ॥ १३·१०५६. ८·२४६, ९·२२१, ९·४४९, १३·११०. **वस्तूसि अबोधु** १५·८७, **– चें समूह** ११·१४२; **वस्तूलागि** ६·४७३; **श्रद्धावस्तूसि आदरु**, भक्तितत्वाबद्दल आदर, १२·२१४.

**वहिला-ली-लें**—पहिल्यानें, लवकर या अर्थी हे शब्द आलेले आहेत. ५·३२, ६·१५४, ९·५११, ११·४६५, ११·४७२, १८·१२६२. **वहिलेयां आणि गतिमंतां आंतु** १०·२३१; **वहिलेपणें**, तैसें यया रुखाचें होणें जाणें । तर्के होंतेनि वहिलेपणें । ह्मणौनि लोकु ययातें ह्मणे ।

अव्ययो हा ॥ १५·१२०, ह्या अश्वत्थ वृक्षाचें होणें व जाणें इतक्या वेगानें होतें कीं फक्त तर्कानेंच याचें घडणें मोडणें कळतें, म्हणून लोक याला अव्यय म्हणतात, **तर्कें** ऐवजीं ज्ञानदेवी व कुंटे प्रतीत 'न तर्के' १५·१२१ असा पाठ आहे, वेगाचा तर्कही करतां येत नाहीं या अर्थी; **अवधानाचेनि वहिलेपणें** ७·१९३, **पाणियां-चेन** –, अनेक ठिकाणाहून वेगानें पूर येत असल्यामुळें, ७·७९.

**वहिवट**—लागवड करणारांच्या नांवांची यादी, खाते-वही. आणि वहिवटीं पूसलें । नांव तेयाचें ॥ ११·४२१, खातेवहींतून नांव काढून टाकलें या अर्थी.

**वाअणें**—पेरणें, दाखविणें, देणें, घेणें, चढविणें. माथां हातु ठेविला तें फुडें । बिं चि वाइलें ॥ ६·४८९, पेरलें. तिया सुखसंपत्ती जोडलिया । मन स्वर्गा वांत वाकुलिया । ७·१८५, दाखवितें. **आपुली आण वाइजे** ११·५४६; **आण वाइली** ११·५५७; **आण वाउनि** ११·४५५, १२·१५२, **आणवाउनि (आण वाउनि)** ११·९६; **आण वाए** १३·४०९, **–वाये** १८·१३६४, **–वायें** १३·१२८, **–वांतु असे** १२·१०३; **निगडु वाउनि**, बंधन घालून, ८·१२२, **पाखाणि** – १०·३५; **बादरायणें वाइला**, व्यासांनीं चढविला, कळसास उद्देशून, १८·३३, कुंटे –'उवाइला' १८·३३; **वांकुलिया वाए** १८·६५६; **यंत्रीं भूतें वाउनि**, यंत्रावर प्राण्यांना बसवून, १८·१२९९; **जगा हांवे वाउनि**, आपल्या हांवेला सर्व जग अर्पण करून, १६·३८५; **तूझी आण वाणें**, तुझी शपथ घेणें, १८·१३६०.

**वाउग**—व्यर्थ. ९·४२७.

**वाउधण–वाउधाण**—वावटळ, वादळ. **वाउधण**– संतु जाला वाउधणा । वरिपडा जैसा ॥ १७·१९२, ज्ञानदेवी –'अग्नि जाला वावधणा', कुंटे – 'अग्नि जाला वाउधाणा' १७·१९३. १[illegible]६८७. **वाउधाण** १५·१८२.

**वाउर**—व्यर्थ, वाईट. आहा थोर वाउर जालें । ११·५३१, वाईट. संपत्ति जोडावी वाउर । १६·४१९, व्यर्थ.

**वाउल**—हा पाउल चा अपपाठ असणें संभवतें. **मागुत वाउलीं** १३·३२३; **मावौता वाउलीं** ७·५; **मावौतीं वाउलें** १५·२८५; **चोजवाउलें** १४·११२; ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत या सर्व संदर्भांत 'पाउल' चीं रूपें आहेत.

**वाएं–वाऊ–वाओ–वावो— वाएं**, व्यर्थ. **वाएं हींडिजे**, व्यर्थ भटकत होतें, १८·१७६१. **वाऊ**, (१) वारा. **सुवाऊ-ओ-य** पहा. (२) वाव, जागा. जें निरंधिलें घे वाऊ । जेया संयमू चि होये सावाओ । ६·४१५, मनास उद्देशून, ज्ञानदेवी, कुंटे –'उवावो', प्रसर, ६·४१६. (३) मिथ्या, व्यर्थ. तरि मज माझि भूतें हें ही वाऊ । जें सर्व मी ह्मणौनि ॥ ९·७०. ९·३२७, १०·१२५, १०·१८०, १३·३०१, १४·१२१, १५·४३, १५·२१८. **वाऊ जाला** १८·४१९, **–ह्मणे** १४·१८५; **वाऊ जालें** १५·५२६, **–ह्मणे** १५·५२८. **वाओ**, मिथ्या, खोटें. कां दोरी सर्पत्व वाओ । दोराचिया कडौनि ॥ ८·२४६. ९·९३, ९·४५३. **वावो**, व्यर्थ, खोटें. तरि परत्र ना देवो । न दिसति ह्मणौनि वावो । १६·३०५. ६·६९, ६·८८, १३·१०५, १८·१६३३. **इंद्र वावो**, इंद्रपदही क्षुद्र वाटतें, १६·३५२; **वावो कामिलें** १७·२८; **साच कां वांवो** १८·२६३.

**वाक्–वाग्**—वाणी, वाचा, शब्द, भाषा. हे शब्द इतर शब्दांस जोडून आलेले आहेत. **वागीश्वरी**, सरस्वती, १०·८; **वाक्चातुर्य** १८·१७२८; **वाग्जाल**, शब्दांचें जाळें, शब्दपांडित्य, पाल्हाळ, १३·२१, १३·२९१, **–देवता**, सरस्वती, १८·३६२; **वाक्पट—विश्वाचां वाक्पटिं लिहुनि घालीं** ११·४७६, **–पथ, श्रुतीचेया वाक्पथा आली** १३·८७६; **वाग्बीज**—स्वधर्मु वाग्बीजें । बांधों नेणें ॥ १३·२०७, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील 'वाग्ध्वजीं' पाठ ग्राह्य वाटतो, ज्ञानदेवी – 'नेणे' १३·२०८, **–ब्रह्म**, वेद, १२·११२, **–ब्रह्मसिद्धांत**, वेदांतील सिद्धांत, १५·१४०, **–भव**, वाचेपासून होणारें, नातरि येकाधें नांव । तें चि शैव कां वैष्णव । वाचे वसतें वाग्भव । तप जाणावें ॥ १७·२२२, **–भुवन**, वाचारूपी मंदिरांत, तोंडास उद्देशून, १७·२२१; **वाग्मी**—**वाक्** व **मी** या दोन शब्दांचा हा संधि आहे, तरि वायां चि वाग्मी । वाढों नेंदी(दीं) ॥ १३·६४७, **वाग्यज्ञ, यज्ञ**

पहा, –रिद्धी, वाचेचा विस्तार, गीतेच्या निरूपणास उद्देशून, १८·२७, –वाद, वितंडवाद १२·१४, –विलास १३·११५४, अभिनव-वाग्विलासिनी १·२१, अभिनवणें पहा,–व्यापार १८·१०२४; वागतृता, वक्तृत्व, आजि उजलली वागतृता । १४·६३, वागश्र्ष्टि, शब्दरूपी जग, १४·२०; वाङ्मई—शब्दात्मक, गीता जाणा हे वाङ्मई । श्रीमूर्ति प्रभूची ॥ १८·१६६३, वाङ्मय, वाङ्मयाची वाढि, शब्दसृष्टीस उद्देशून, १३·९८७, वाचेस उद्देशून, १७·२१४, सर्व-वाङ्मयाचें मथित, गीता, १८·१३१४.

**वाकड**—पावसाची झड. कां वाकडिया ढोरें बैठलि (लिं)। १३·५६४.

**वांका**—हकीगत, घटना. १४·९४.

**वांकुडा-डी-डें**—वांकडा-डी-डें. पैं गा वोघू चि वांकुडा । परि पाणी उजू सुहाडा । १३·८९२. १३·३४३, १३·४९३, १८·१६७२. उजू वांकुडे १३·१०५६, –परि वांकुडें १५·३०६, वांकुडेनि वोघेंसिं गंगा उजू चि १८·८३९; वांकुडां विचुकीं पाउलीं, वेड्यावांकड्या पावलांनीं, ९·६; वांकुडै, वांकडेपणा, दुष्टपणा, जें खलांची वांकुडै मोडे । तेयां सत्संगीं रति वाढे । १८·१७७३.

**वाकुली-वांकुली**—वेडावणें. वाकुली—वाकुलिया वांत ७·१८५. वांकुली—वांकुलिया दावीति १७·९३, –वाए १८·६५६.

**वाक्य**—(१)वचन, सिद्धांत, प्रश्न. तें गोप्य माझें चोखडें । वाक्य आइक॥ १८·१३४३. २·६४, २·९०, ३·१, १०·६१, १०·१५७, ११·४८०, ११·६३०, १८·१३३२, १८·१५९१. तुझीं वाक्यें न लगति, पटण्यापूर्वी या अर्थी, १०·१५९, ज्ञानदेवी, कुंटे–'तुझें वाक्य व्यक्ती न येतां,' अनुभवास येण्यापूर्वी, १०·१७५; वाक्यारूढ, शब्दांत आणलें जाईल, ७·८; वाक्यकृपा १०·१३१, –पथ १३·११५०, –पूजा १५·५६५, –फल ७·१८७, तद्-ब्रह्मादिवाक्यफलें ७·१८१; वाक्यविधीचिया ४·१२८, निरिविडी पहा, –सूर्यकर१०·१४६; कृष्णवाक्य २·३७०, –बीज ९·५२८; गुरु-वाक्य४·१२२, ४·१३०, ५·३४, १८·१०१७, १८·१०२६, –श्रवण १८·९८२; दुर्वाक्य-सेलीं, शेलक्या अपशब्दांनीं, १३·४९५; महावाक्य १८·४०१, वेद– १५·१५६, सकलवाक्यअवधि, सर्व प्रश्नांचीं उत्तरें देऊन, १०·२८; संतवाक्य १३·६४६, १३·८५६; वाक्यता—एकवाक्यता, एकार्थता, ६·५२, येक– १७·२६, १७·२७. (२) व्याकरणांतील संपूर्ण अर्थ असणारा शब्दसमूह. वाक्यें ह्मणिपति पुंजे । अक्षरांचे ॥ १३·१५२.

**वाखती**—छातीचा खळगा. मग वोडवली वक्षस्थलाची वाखती । चरणरजा जेयाचेया ॥ ९·४७६, ज्याच्या पायधुळीकरतां छातीचा खळगा पुढें केला.

**वाखाणणें**—प्रशंसा करणें, वर्णन करणें. लाजिलों वाखाणुं न निगे । देखौनि जेयातें ॥ ९·२१. पूर्वकांड विनोदें । वाखाणिलें ॥ १०·२२. २·२१२, ८·१२७, १०·३४, ११·४५४, १३·८४६, १४·२९, १५·२१९, १६·३९, १७·३७५. वाखाणिते, वर्णन करणारे, १८·१६५०; वाखाण—वर्णन, अर्थविवरण, वाखाण चढलें थांवा । चौगुणे वेन्हीं ॥ १३·११४५, १३·३२७, १३·३३३, १३·६४४; वाखाणी—आइकिलेयां वाखाणी । व्यसन न लवी ॥ १८·१७२३, ज्ञानदेवी–'वाखाणीं' १८·१७४५.

**वाखारी-वाखोर**—सांठा, वखार. वाखारी ७·१३२. वाखोर—प्रतीतीचां वाखोरां, अनुभवाच्या भांडारांत, ७·१३४.

**वागारा-वागौरा**—लगाम. वागारा—वागारे संसारावेया ११·२९१. वागौरा—तो प्रकृतिचा वागौरा । करी त्वचेचिया मोहरा । १५·३२४, प्रकृतीचा लगाम त्वचेकडे वळवून.

**वागुर-वागूर**—जाळें, पाश. वागुर—हा विनाशाची वागुर । प्राणियांसि ॥ ४·२०१. १६·३४३, १८·९५१. अंगप्रभेचिये वागुरे, आंगाची प्रभा हेंच जाळें, ११·४३२; विषयवागुर ११·३२४. वागूर—पाडसा वागूर करांडी । ७·९२.

**वाग्मी**—वाक्-ग् पहा.

**वाचणें**—पठण करणें, अभ्यास करणें. किं परिवसिलियां पोथि । वाचिली होए ॥ १५·३६२, पोथीला स्पर्श केला तर ती वाचली असें म्हणतां

येईल काय ?. **वांचौनि पढें ना वाचीं,** मी शिकलों नाहीं व वाचनाचा अभ्यासही केला नाहीं, १८·१७४३. **वाचक**—पुढें **वाच्य** पहा.

**वांचणें**—धोक्यांतून सुटणें, बचणें. मार्गें चि चालतां । पुढां सिंहु(हु) दीसे अवचिता । तो चूके तंवरि चुकवितां । वांचिजे कीं ॥ १·२३७. ११·३६२. **प्राणें वांचिं(चि)जे** ११·३७७. **वांचूनि–वांचौनि** पहा.

**वाचा**—वाणी, बोलणें, बोलण्याचें सामर्थ्य, भाषा. तंव वाचा आथि गगना । ह्मणौनि बोलें ॥ ६·२७८, हृदयाकाशांत शब्द असतो म्हणून तो अनाहत बोल घुमतो या अर्थी, ज्ञानदेवी, कुंटे –'घुमे' ६·२७८. वाचे वसतें वाग्भव । तप जाणावें ॥ १७·२२२. ९·४४१, १०·२०, ११·६३, १३·२६०, १३·२७१, १३·२९८, १५·१०, १५·१२, १६·१२१, १८·३३२. **वाचेची वाचा,** ब्रह्मास उद्देशून, १३·९२४, यावर १३·९२१ ते १३·९३० पहा; **वाचेसि अपवाडु,** वाचेला बोलण्याचें सामर्थ्य रहाणार नाहीं, १३·५६७, **–चां चौबारां,** वाचेच्या चव्हाट्यावर ठेवणें, प्रसिद्धीस आणणें, १६·२२१, **–चा दिवटा** १८·३५६, **–चा दीवा** १८·३५५, **–चेनि पालवें** १७·१०५, **–चां पिंपळिं** १३·६५७, **–चिये वाटे** १८·१३४८, **–चें वितुळणें** १८·१५४३, **–चें सूत्र** १७·२३१; **अशेषां हीं वाचां आंतु** १०·२१२; **उदारा वाचा** १०·७, **गंभीर–** २·७८; **चतुराननाचिये वाचे** ११·२०५; **चौ हि वां(वा)चा** ११·५०७; **बोबडिया वाचा** १·६४; **मोकळी वाचा दीठि,** मोकळ्या रीतीनें बोलणें व पहाणें, १३·६६७; **विशाल वाचा** ११·४७८; **वाचेपुढां,** जिभेवर, ९·२०५; **वाचाबळें** ९·१३८, १०·१०, **–बेली** १५·१४, **–सिद्धि** ३·९९; **वेदादिवाचा** १६·२९, **सत्य–** १६·३२; **वाचें(चे) निगति** ६·४५२; **वाचा निंदिजे** २·३३, **–निस्तरैल** १३·६७४, **–जें न पवे** १८·१६८५, **–पांगुलैली** ९·५२२, **–मेलैल (मैलेल)** ९·५१९, **–रडे** १६·४१८, **–वानिलां** ९·३५५, **–जेथ विसंवे** ९·१८६; **वाचेचें आंग वळघे** १५·१७; **वाचे उच्चारु** आणिति १७·३५४, ज्ञानदेवी, कुंटे –'उच्चार' १७·३५७, **–कवित्व बरवें** १८·३४५; **वाचा कामवावी लागे** १८·३६२; **वाचे दोषु आथि** १·२२४, **–पांचपींसें बांधलिं,** वाचेला वेड लावलें, १८·१८; **वाचा प्राणासि चूकली,** प्राणाचा जोर वाचेवर चालेना, वाचा बंद पडली, ११·६५५; **वाचेसि प्रायश्चित्त देऊं,** गुरुभक्ताचें नांव घेतल्यानें, १३·६७३; **वाचा बरळ होंतसे** १·२०६; **वाचा मनेंसिं मुरडली** १५·१५; **वाचेचे...ळले पाळित** ११·१७१; **वाचेसि शूद्रान्न होणें** १३·६७२; **वाचा सद्गद होंतसे** ११·५६१, **–सपोल होंतसे,** निष्फळ होते, १६·३११; **अहं वाचा आंग** १८·१३१०; **इंद्रियें वाचा प्राण** १०·१५५; **तनुवाचाचित्तें** ८·१९०; **देहें वाचा चित्तें** १६·८४, १७·२३७; **वाचा...कर चरण अधोद्वार अपायु** १३·१००; **वाचालपणें** ३·१९२; **वाचाळै**—वाचाळपणा, **वाचाळै करीं,** बडबड करतों, १८·१६८८.

**वांचूनि–वांचौनि**—ऐवजीं, शिवाय, वर्ज करून. **वांचूनि**—२·३३, २·६४, २·१८९, २·२४७, २·३३५, ३·४५, ३·१२६, ३·१८८, ४·७२, ४·८७, ४·१११, ४·१९४, ६·४८, ६·४२९, ६·४३६, ७·१११, ८·१२, ८·९९, ८·१३६, ९·८, ९·४१, ९·२१९, ९·२३४, ९·२५३, ९·२७०, ९·३११, ९·३३२, ९·३४७, ९·४०७, ९·४५०, १०·१४०, ११·७८, ११·१६६, ११·५९७, ११·५९८, ११·६०१, ११·६०६, ११·६११, ११·६७६, ११·६८६, १२·५९, १२·७९, १२·२३५, १३·२९९, १३·४४६, १३·६०३, १३·६१५, १३·८६१, १३·८८०, १३·८९१, १३·९१०, १३·१०८५, १४·१५६, १४·१६७, १४·१८६, १४·२०१, १४·२६७, १४·२७६, १४·३१५, १४·३४६, १४·४००, १५·१८, १५·३६, १५·१३९, १६·१४९, १६·३१०, १६·३१९, १६·३५३, १८·५६३, १८·८०८. **तूंवांचूनि** ११·५०, **मी-मीं–** ७·१३०, १०·१०३, १०·१२५, **विषयां–** २·१२०; **वांचूनियां** १८·५५६; **वांचुनु** १३·६०२,

१७·१७०, **वांचूनु** ८·६६, १३·४५१, १३·६५३, १३·८३२, १३·८४५. **वांचौनि**—(१) वरील अर्थी—जैसें क्षेत्रीं जें पेरिजे। तें वा(वां)चौनि आन न निफजे। ४·७३. वांचौनि मुखा लागि वालावी। गाय चि सल्गी ॥ १८·२०१, तोंड अपवित्र आहे म्हणून सगळीच गाय टाकावी काय?. ६·१००, ११·३२५, १३·१७६, १३·७८७, १३·८४९, १५·२२६, १५·३९२, १५·५४०, १६·२०१, १६·२९७, १६·३५१, १७·३५, १७·१११, १७·१७५, १८·२४, १८·१३७, १८·३०९, १८·९०४, १८·९४३, १८·१०२२, १८·११०५, १८·१२२७, १८·१२७५, १८·१३८८, १८·१५५०, १८·१५५२. **पतीवांचौनि** १·१११, **पापा**—१·२४७. (२) कांहीं संदर्भात, तसें नसतें तर, वास्तविक पहातां, या अर्थी हा शब्द आलेला आहे. वांचौनि सूलु महिषु चामुंडा। सोनें चि असे॥ १८·४४२, यावर १८·४४१ पहा. वांचौनि पदें ना वाचीं। १८·१७४३. **वांचौनि वेलु लागे चि किं** १८·९९४; **वांचौनि सागराचां पोटीं**, वडवानळ शरण गेला नसता तर, १८·१३९२; **वांचौनि सूर्यातें न घडी**, वारा ढग दूर करतो, वास्तविक पहातां नवा सूर्य घडवीत नाहीं, १८·१२२५; **वांचौनियां** १८·१४०२.

**वाच्य**—सांगण्यास योग्य, सांगतां येईल असें, म्हणतां येईल असें. जें तुह्मीं मजकारणें। वाच्य केलें बोलणें। ११·४४, जें तुम्ही माझ्यासाठीं सांगितलें. जलधरांचा मेळा। वाच्य होये अभाळा। १३·१५३, ढगांचा समुदाय ज्याला आभाळ म्हणतात. शास्त्र वाच्यें अर्थें फळे। मग आपण मावळे। १८·१६६४. १८·१३३३. **वाच्यवाचक**, वर्णन करण्यास योग्य व वर्णन करणारा, १८·१६६०, १८·१६६१, १८·१६६२; **जलवाच्यबोध** १६·१३८; **अवाच्य**—देवो देवी ह्मणती। अवाच्यातें ॥ ४·६८, **अनिर्वाच्य**, वर्णन करतां येणार नाहीं असें, ६·४६७; **अवाच्य**, त्याच अर्थी, १४·८६.

**वांछणें**—इच्छा करणें. वांछिल तें तें लाहो। प्राणिजात ॥ १८·१७७४. **वांछिजति** १७·२९०; **वांछित**, इच्छिलेलें, वांछित ही पुरैल। मानसिचें॥ ३·९८, **वांछा**—**फलवांछात्यागीं** १७·१७५.

**वाजट**—व्यर्थ. हें असो आतां वाजटा। १४·२६, हें आतां निष्फळ बोलणें असो. **वाजटां पूरिजतसे काइ** १३·६०.

**वाजणें**—आवाज होणें, गर्जना करणें, लागणें. जैसें एका चि आकाशध्वनिं। वाद्यविशेषिं अनानीं। वाजावें पडे भिन्निं। नादांतरिं ॥ १५·३८४, ज्ञानदेवी—'आकाशध्वनि वाद्यविशेषीं आनानीं' १५·४१६. १·१३१, ६·२७७, १३·२०, १५·१९०. **आंगिं-गीं वाजणें**—तैसे दोख हे मूर्त्त। आंगिं वाजों असति पांत। १·२४१, **आंगीं वाजे** १३·६२, १८·१०४९, **—वाजैल** ३·१७३; **खलाल वाजति** ११·४७८, **घाए—** १३·१००९, १६·३९७; **निसाण वाजत** ९·२१६; **वाजतेया वायुतें** ९·१२४; **वारा वाजणें**—कां वारा चि वाजे वीझे। गगनें निश्चळां असिजे। १४·३४४, **वारा वाजतु मानावा** १५·३४४; **वारा वाजों ठेला** १४·३०३, **—नेंदीं** १६·८९, **—लागे** १५·१६२, **—सरे** १८·४२०.

**वांझ**—संतान होत नसलेली स्त्री, वंध्या, निष्फळ. कां वांझां फूलीं फूललें। झाड जैसें ॥ ९·४३०, फळें लागणाऱ्या झाडाला फळाचीं फुलें येऊन फळें लागत नाहींत त्यास उद्देशून. कां वांझेची संतती। वानों ए जैसी॥ १५·७९. १५·२१५, १८·११८. **वांझें आकाश** १४·७५; **वांझ जाये**, व्यर्थ जातें, १७·२५१; **वांझे(झें) होउनि** १८·६१२; **वांझौटी**, बराच काळपर्यंत वांझ असलेली, ६·१२१; **वांझौलें**, वांझ फुलें, १०·३०८.

**वाट**—मार्ग, रस्ता. वाटा केव्हलि न वचति। क्रोधाचिये ॥ ४·५९. बुद्धी धैर्या होये वसैठा। तरि मनातें अनुभवाचिया वाटा। आणूनि करी प्रतिष्ठा। आत्मभुवनीं ॥ ६·३७७. तेव्हां तेथिचे(चें) आकाश लागे काइ येकी वाटे। मग वाटा लागे तरि गगना भेटे। येऱ्हवि चूके॥ ८·२५१ (१,२), घडा फुटला तर घड्यांतील आकाश महाकाशाला मिळतें, तें निराळ्या वाटेला लागतें काय? व तसें लागलें तर शेवटीं महाकाशांत मिळण्याचें चुकेल काय?,

यावर ८·२५२ पहा. स्वर्ग नरक इया वाटा। चोरांविया॥ ९·३१२. आणि राजा जिया वाटा जाए। तें चोरांसि अडवंतावो होये। १८·७२१. ५·१२६, ६·१५७, ७·१२५, ७·१६५, ९·५००, ११·६७२, १६·४३५, १८·२३५, १८·२७२ (१), १८·३६७, १८·६७१, १८·१००५, १८·१०९६. वाटेचा, वाटेनें येणारा, १६·८५; **इंद्रियांचां वाटीं** १८·४७३; **उजू वाट** ८·१९३, ८·२३९, **–वाटा** १८·९३३; **कृत्यजाताचिया वाटा** १८·३५६; **कृपेची वाट** १३·२४९; **निषिद्धे वाटे** १७·३११; **पाठिचां वाटीं** १८·१५६; **बरवी वाट** १८·१२१५; **भंगलिये वाटे** १३·६१७, **वाचेचिये**—१८·१३४८; **वाहाती वाट** १३·८८५; **सुधासत्वाचिया वाटा** १८·९४८, ज्ञानदेवी, कुंटे–'शुद्ध सत्वाचिया वाटा' १८·९५३; **वाट करी** १३·३४९; **वाटे जाता**, वाटेनें जाणारा, १३·५९६, **वांटे जातां**, हा पाठ **वाटे जाता** असा घ्यावा, १५·३५, **वाटे जातां** १४·१८७, १४·३३५, १७·२८८, **–जांतां** १३·५९३; **वाटे जांतिया** १८·२७२ (२); **जिया जिया वाटा जाये** ६·८६; **वाट जोडे** १२·११२; **वाटा निगति**, मार्गानें जातात, ८·२०६, **–निगाले** १०·११५, १२·६९, **–निगिजत आहे** ९·१५२, **–निगौनि** १५·३२६, **–नीगे** ७·४७; **वाट न पांतां** ६·४५१, **–पाहांत** ८·१०३, **–पाहावी** ६·२०६, **–पाहे** १३·६५५, **–न पाहे** ९·२७; **वाटा पाहों लागलों** ११·५४०; **वाट भूलिजे** १८·८०५, **–मोडली** १३·८६८, **–मोडे** ९·९५, **–मोडोनु ठेली** १५·२८८; **वाटा येतां** ६·१६८; **वाटे लाग** ९·५११, **–लागति** १७·३५५, **–लागला** ६·४३१; **वाटिं लागलिया**—इया आथविया चि शृष्टी। लागलिया आहाति वदनाचां वाटिं। ११·४१५; **वाटा न वचति** ४·५९, **–न वचिजे** ६·४२१, **–न वचे**, जैसें आहाराचेनि नावें काहीं। तोंडाचिया वाटा न वचे चि नाहिं। ११·४२४, **वाट वाहवी** ५·१२३; **वाटा वाहाति** ८·१८१; **वाटवध-वंध, वधणें** पहा, **–वाहाणी**, मोकळी वाट करणें, १६·५७; **अवाट**, मिळेल ती वाट, मोकाट, १७·१८९; **आडवाटीं** १३·२३९; **आत्मानुभववाटे** १६·७; **पाठोवाटी** १०·११८; **एकवाट** ११·५६, १३·९३०; **दोनी वाटा**, व्यक्त आणि अव्यक्त यांस उद्देशून, १२·२४, यावर १२·२३ पहा, **दोन्हीं वाटा** ८·२३६, **तीनि**–१८·६९४; **बारैं वाटिं** १५·२६८; **मरणवट—मरणवटे पडिलें** १४·२७१, 'मरणवाटे', ज्ञानदेवी १४·२७३, कुंटे १४·२७४.

**वाटणें**—(१) मनांत येणें, मनास लागणें, भासणें. जें तुज काइ लोकाचें वाटे। ११·३४४. **१३·७३४, १५·१३१, १८·४८४. कडू महुर न वटे** १६·२४९, **कांहीं संकोचु न**–११·५६६. (२) पाट्यावर रगडणें, आगा विषाचे कांदे वाटूनि। गोरसु वेइजे पीळूनि। ९·४९४. (३) विभागून देणें. **वाटणी**—वाटून देणें, १८·६९१, ज्ञानदेवी, कुंटे–'वांटणी' १८·६९४. **वाटा— दुःखाचा वाटा** १२·६९.

**वांटणें**—विभागून देणें. जें महर्षी(र्षी) वांटलें। ५·१४६. कर्में चौघां चौं ठांइं। वांटिलीं वर्णी॥ १८·८२२. ७·२०३, ९·४४, १८·५२, १८·४६४, १८·५५५. **गर्भरसें वांटलेनि** १४·९८; **सूर्य पथिकां मार्ग वांटे**, येथें दाखवितो, १८·८२३; **वांटूनियां** १२·१८६; **वांट**— वांटा, **वांटे आलें**, वांट्यास आलें, १८·१९८; **वांटा**—भाग, **सेलवांटा**, शेलका भाग, ९·४१२.

**वाटवणें**—वाढवणें. १६·२६१.

**वाटिका**—लहान वाट, बागेंतील सुंदर वाट. विनोदवनवाटिका। सुरतरूंचिया॥ ९·३१९, करमणुकीकरतां कल्पवृक्ष लावलेल्या सुंदर वाटा आहेत.

**वाटी**—लहान वाडगा. क्षीरसागराची चि वाटी। करूनि ठेविली॥ १०·१७.

**वाटुल-वाटौल**—गोल, वर्तुळाकार. **वाटुल— वाटुला आवला** १३·६५०; **वाटुलें चंद्रबिंब** ११·११४; **नभ वाटुलें गमे** १३·८९३. **वाटौल**—व्योम किं चौफल वाटौलें। हें ऐसें काइसेया हिं मिळे। १५·३०७. **वाटौलीं मोगरिं** १८·१७१९.

**वांठिव**—पुरुषार्थ, पराक्रम. वांठिवेचिया मदा।

वलवले जे ॥ ११·४५७. वांठिवांविण १·१७२.

**वाड**—फार, मोठें, थोर. नाहिं माझेनि पाडें वाडु। मी चि सर्वज्ञु एकु रूढु। ऐसा शिवमुष्टिगंडु। घेउनु ठाके ॥ १३·७१६. ११·८७, १३·११३५, १५·३३१, १७·४७, १८·५७६, १८·१४१३. **वाडें सायासें** ९·५२१; **सिंपौनि वाड कीजो** ११·१९; **वाड धाकुटें** ९·२२१; **वाडजतन**, चांगलें जतन या अर्थी, १६·५५, ज्ञानदेवी, कुंटे–'वृद्धियत्न' १६·५५; **वाडपण** १०·१६०, **वाडपणाचा गारा** १६·२१५; **गगनाचेनि वाडपणें** ११·३४९.

**वाडा**—विस्तार. दीठिचा कराल बहु वाडा। १६·४६९, पूर्ण दृष्टि ठेवाल तर, ज्ञानदेवी, कुंटे–'बहुडा', वर्षाव, १६·४७२.

**वाडि-डी**—बाग. **वाडि** ९·१२२. **वाडी**—निरालंबिची वाडी। त्रिभुवना एवढी। १३·४५. **क्लेशतरूंची वाडी** ८·१३८.

**वाडुवल**—वाढविणारा. उरोधु वाडुवलु। १३·२७०, शब्दाला शब्द लावून वाद वाढविणें, ज्ञानदेवी, कुंटे–'वादबलु' १३·२७१.

**वाढणें**—(१) उंच होणें, मोठें होणें, वर जाणें, अधिक होणें. जैं अज्ञानाचें गडदे(दें) पडे। तैं हा बहुवसु मनीं वाढे। ४·२०३. इया परिं निरालीं। वाढे संकल्पाची डाली। १३·५१. वाढौ वाढों होंति। कोशकीट ॥ १६·३३६, ज्ञानदेवी, कुंटे–'वाढऊं वाढऊं' १६·३३८. ६·३५३, ८·२३, ९·४७३, ९·५०६, १०·११७, १०·२४८, ११·७२, ११·४२७, ११·४४६, १३·३४१, १३·८४४, १३·९५५, १४·१०६, १४·१४०, १४·२१२, १४·२५२, १५·१६१, १५·२००, १६·५९, १६·३६८, १७·६२, १७·१२९, १७·१३५, १८·३५१, १८·१२०६. **वाढत आहे** ९·२७०; **वाढतां** १४·२०२, १४·२३५, १५·१०२, १५·१७९ (१), १८·१०९५; **वाढती**—वाढत असलेली, **वाढती कुलवाडि** १८·२५६; **वाढती चि असे** १५·१७१, १५·१९२; **आस्था वाढती देखसी** १८·५७१; **वाढतु असें** ११·४४५; **वाढतें**, वाढणारें, ६·३५२, ७·१०५, ८·१३९, ९·२४; **वाढतेनि प्रेमें** ९·१९४; **वाढे नाखांचे** १३·११०८; **वाढों नेणे** १८·५६४, **–नेंदी** १३·६४७, १७·१७०, **–लागे** ८·२७, १०·१८१, १६·३६७; **वाढौनि** ११·४४३, १४·२७२, **–याँ** ११·३४८; **वाढ** ११·६३३, १३·७४७, १५·१५९; **केलिचा वाढु** १८·९६३; **अद्वैतप्रमेचेनि वाढें** १५·२३९; **वाढणें** १५·२०१, १८·४७२; **वाढि**—मूलें गाढें तंव वाढि। पैसु आथि ॥ १५·१७९ (२), १०·५४, ११·६४३, १३·७२५, १३·७४२, १३·९८७, १५·४९, १५·५१, १५·९९, १५·२०४, १६·२७७, १७·११७, १८·१०७६; **वाढि...तूटि** १६·७४; **देव्हडी वाढिया** १८·५९६; **वाढी** १३·१२५, १३·८५०, १८·३६१, १८·१०९६; **अहंकाराचिया वाढी** ११·५८, **साम्याचिया**–७·१७४.
(२) जेवण वाढणें. जें सकल रोगांसि भाणें। वाढलें आहे ॥ ८·१४१. जें संतोषियां वाढलें ताट। ८·१९३. कां खंडरसीं खापरीं वाढिलें। ९·४३५ (१). १३·८१८, १८·७११, १८·१०३४. **वांती वाढलेया** १८·५५३, ज्ञानदेवी–'वांता वाढिलया', ओकून टाकलेल्या पदार्थास उद्देशून, १८·५५६, कुंटे–'वांता कां वाढिलेया', ओकून टाकलेला किंवा वाढलेला, १८·५५६, हा पाठ संदर्भात बसतो; **वाढूनि** ९·४३५ (२); **वाढती**, वाढणारी, १३·६४२; **वाढिता**, वाढणारा, **दूध वाढिता**, दूध घालणारा, १८·३६९, कुंटे–'दूध वाढितां' १८·३७१; **वाढितेया पुढां** १८·१३२५.

**वाढविणें**—अधिक करणें, मोठें करणें. स्वधर्मांचा मानु वाढवीं। ३·१८७. मग कवडा चि वाढवी। लोभी जैसा ॥ १३·७९२. २·२०९, ६·८०, ७·१६२, ९·१८५, ११·४२९, १२·५, १३·७०६, १४·१०७, १६·२८५, १६·३३१, १६·४५९, १८·७५५. **वाढउनियां** १७·४११; **वाढविजे** १७·१६२, १८·१४३७; **वाढवितसे** ११·४०४; **वाढवितु** १३·११४२, **–वीतु** १६·४४४; **वाढविताहे** ११·२०३; **इछेतें वाढवी** १३·११२; **कला वाढवी** ९·३१; **तृष्णा वाढविति** ९·५०९; **मानु वाढवीतसे** १०·३०५; **वेलु वाढवी** ७·४९.

**वाढिनणें-वाढीनणें**—अधिक करणें, वाढ होणें, वृद्धि पावणें. **वाढिनणें** ६·६४, ६·४४६, ९·४३४, १८·१५१४. **तमें वाढिनलेंनि** १४·३२८; **तृष्णा वाढिनलिया** १४·१६३; **वाढिनलेया** ४·९, ९·१७३. **वाढीनणें—मोहो वाढीनला** ४·२५.

**वाण**—वायन, वस्त्राचें पोत. जेथ साहित्य वाणें सपुर। उजलाचें॥ १·६. वाणें उमटत आहे मा आकाशीं। साहित्या रंगाचें॥ ६·१३३. वाण धाडिजे घरा। वोउसेयाचेया॥ १७·२८५. **वाणीं** १२·२२०; **वाणे परिची आंगी लेइलासि** ११·२७९.

**वाणसी**—वेश्या. वाणसिये उभलें। कोण न रिगे॥ १३·६९९.

**वाणि-णी**—(१) कमीपणा. **वाणि**—परि तैसें न करीति प्राणिये। वायां आपुलां चि सुखिं वाणिये। ७·१४७, कमतरता करतात. ३·२२, ५·१६८, १३·११५५. **वाणिचा नोहे,** अशी कमतरता नाहीं, ९·६२; **वाणिपणें—सतेचेंनि वाणिपणें** १३·५०५, ज्ञानदेवी, कुंटे–'सचेतनीं वाणेपणें' १३·५०७; **वाणेपण,** कमतरता, १८·५९१. **वाणी**—यऱ्हविं तरि वाणी। तो चि ठाउ॥ १३·२१४, कमीपणा त्याच्याच ठिकाणीं आहे. (२) **वाणीं**—वाहण्यासाठीं, किं वारेया घापत आहाति वाणीं। ९·२०, वाऱ्याला वाहण्याकरतां कोण गति देतो?, ज्ञानदेवी–'घापत आहे वाहणीं', कुंटे–'वाहणी' ९·२०. (३) **वाणी**—भाषा, ऐसी देशी आणि संस्कृत वाणी। १०·४४. तंव उच्चारफल वाणी। न पवे जेवि॥ १८·३७२, वाणीला जसें उच्चाराचें फळ मिळत नाहीं, कुंटे–'फळावाणी', फलद्रूप या अर्थी, १८·३७४.

**वाणियां**—व्यापारी. १७·४२२.

**वाणें**—आंगावर घालणें, **वाअणें** पहा. आतां जाइंयांचें जैसें लेणें। आंगावरि आहाच वाणें। ९·४०८, ज्ञानदेवी, कुंटे–'आहाचवाणें', वरवरच, व्यर्थ आंगावर घालणें, ९·४१२.

**वात**—हवा, वारा. जैसें लवण जलें झलंबलें। ना तरि अभ्र वातें हालें(ले)। २·३. **वात श्लेष्मु** ८·२२४; **वातायन,** खिडकी, ११·१४९; **वातातप** ५·११३; **वातोर्मि,** वाऱ्याच्या लाटा, झोत, १४·४५; **वातलहरिया** १५·४०१; **आंगवातें** १३·६४; **कफवात** १४·१९५; **चंड वातें** २·३२३, **चंड**–८·९९; **दुर्वात** २·३४९; **प्रलयवातें** १·९०; **महावात** १·११८, ६·४१२, ११·६४८; **रजोवातप्रचंडे, प्रचंड** पहा; **विषमवात** ८·२११, **संहार**–१५·१२६.

**वांत-ति-ती**—ओकलेलें. **वांत—वांत होणें** १८·९१५. **वांति—वांतिची वानी** १८·१२४. **वांती,** वांतीनें, १८·५५३, **वाढणें** पहा, –**सीणवी** १८·६१७.

**वाति-वाती**—वात, ज्योत, दिवा. **वाति**—झांकाझांकि कीजे वाति। न वचतांचि॥ १३·५८०. पतंगा नावडे वाति। १६·२३२. कां धूं न सांतां जैसी। वाति न लगे॥ १७·३०९. १७·१४१, १८·१६९४. **शास्त्राचां वातिं,** शास्त्राच्या प्रकाशांत, १८·६३३; **वातिवरी मनु** ६·२४५, **मन** पहा; **वातिवेऱ्हीं** २·३६०. **वाती**—तेंवि चि सटिवियेचिये राती। न विसंभिजे जेवि वाती। १८·८३४. १४·३५८. **वाती उणें** ९·२९९, –**पुढां** १४·२०८.

**वाद**—मत, चर्चा, प्रतिपादन. १०·२४७, १०·२४९, १३·१७, १३·६६, १४·७९. **अर्थवाद,** ३·१९२, **अर्थणें** (३) पहा; **अव्यक्तवादमती** १४·६९; **आशिर्वाद** १६·१४७; **जल्पवाद** ७·१०३; **दुर्वाद,** वाईट शब्द, ११·१०१; **बोलस्वस्तिवाद** ११·३२६, **बोल** पहा, **मत**–१३·१०४४; **वाग्वाद** १२·१४; **वेदवादरतां** २·२५५; **सत्तर्कवाद** १·१३; **वादी**—मत प्रतिपादणारा, **धातुवादिया हीं,** किमयेवर विश्वास ठेवणारालाही, ६·३४.

**वाद्य**—वाजविण्याचें संगीत-साधन. नादु वाद्या नेयंता। तरि कां गोचरु होंता। १८·१६८०, ज्ञानदेवी–'न येता,' कुंटे–'न येतां' १८·१७०२. **वाद्यें विण नादु,** करतां येत नाहीं यास उद्देशून, १६·२७४; **अनानीं वाद्येंविशेषिं,** निरनिराळ्या विशिष्ट वाद्यांतून, १५·३८४, ज्ञानदेवी, कुंटे–'वाद्यविशेषीं' १५·४१६.

**वाधावा**—येण्यापूर्वीची सूचना. १८·८९९.

**वानणें**—वर्णन करणें, प्रशंसा करणें, स्तुति करणें.

हें बहु असो एकैक । वानिसि काइ ॥ ५·१३२. नाना वाग्देवता वानावी । तैं वाचा चि लागे कामवावी । १८·३६२. ६·४५४, ९·१६५, १४·६०, १५·२१७, १६·४९, १६·२१९, १८·५७०, १८·१३३०, १८·१६५६. **कवणें तोंडें वानावासि** १४·१४; **कवणें वानावें** १०·१०, ११·५१३, **कैसें**–११·२७; **वानावेया** १६·३५, –**लागि** ११·१६६; **कवणें वानिजैल** १५·१४२; **वानित असो(सों)** १३·१०७३; **वानितां—गुण वानितां** १३·१८५, **प्रौढि**–१८·१३१५, **महेशातें**–१२·२१५, **मातें**–११·५६३; **वाचा वानिलां** ९·३५५; **वानिलासि** १६·२९; **कवण वानीं(नी)** ११·२२१; **वानुं** ५·१७०, ११·५५९, –**लाधलेति** १६·३१; **वानूं जाये** १६·२३०; **काइ वानूं** १६·३२४, १७·१८०, १८·२१, १८·१५९३, **काइ बहू**–१६·२१०, **तैसें**–१८·२६; **वानूनि** १४·११; **वानों**—कां वांझेची संतती । वानों ए जैसी ॥ १५·७९, **वानावे आइकावे** १८·३९७; **गांती वानिती** १६·३५९; **वानणां**—वर्णन करण्यांत, हें जाणें ह्मणौनि मी लाजें । वानणां इहीं ॥ १८·१२, **वानणें** ६·११२, १४·१०, १६·३३, १८·१३३१; **वाणिता**, वर्णन करणारा, **वाणिते जाले** ११·१७३; **न सहित—न वनिजे** ६·१२८, ६·१२९.

**वानवसें–वानिवसें**—अकस्मात्, चुकून. **वानवसें**—पैं निर्धनां घरीं वानवसें । महालक्ष्मी एउनि बैसे। तेया ही वरतें निर्द्धन ऐसें । ह्मणों ए कायि॥ १६·३६. १८·१४८४. **वानिवसें**—जैसा घरिं आपुलां । वानिवसें वन्हि लागला । १·२५७. ११·१०८.

**वानि–नी**—प्रकार, मासला, कस. **वानि**—काइ परिसाचिये कसवटी । वानिया जाणें(णे) ॥ ६·९६, परिसाच्या कसवटीला लागल्यावर सोन्याचे हें उत्तम दर्जाचें किंवा हें हलक्या प्रकारचें असे भेद राहतील काय?. **कसवटी वानियेतें सांघे** १३·२४३; **वानिभेद** ११·३५०, १५·३०९. **वानी**—कीड आगिठां पडे । मल तूटे वानीं(नी) चेढे । १८·१२०, कस वाढतो. कां सोलें पाहूनि जैसी । पन्हरावी वानी ॥ १८·१०८१, सोळा कशी सोनें पाहून पंधरा कशी सोनें जसें कमी कसाचें दिसतें. ६·२६२, १४·१५७, १७·७५. **वानी इयेया तुकां**, शंभरभार सोन्याची लगड, १२·२५; **सतीस ही वानी भेद** १३·१०३२, सं. वा. शं. पहा; **अंधकाराची वानी** ५·९०, **वांतिची**–१८·१२४; **मज ही ते चि वानीं (नी) हों पांतसे** १८·१५८३.

**वाप–वापसा**—भाजलेली उबदार जमीन, पेरणी. **वाप**—साहाजें निरोलले वापे । चतुर चित्ताचे ॥ ६·४८७. १७·२३०. **विधिची वाप** १३·३१, **विधिचेये वापे** १३·३३; **क्षेत्रा वापेचा पांगु पडे** १७·२६६. **वापसा—अवधानाचा वापसा** ६·४८८, **देहस्मृतिचा**–९·५२६.

**वाफ**—नेहमींच्या अर्थी. वदनाचिये वाफे सवें । होंत ज्वालामय आघवें । ११·१४२. **वाफेचिया आगी जले** ११·३४९; **वाफेचिये सीगे वाति ही लागे** इतका उष्ण आहार, १७·१४१.

**वाय**—वारा. **वायकांड**, न टोंचणारा बाण, ११·२०४, १८·१०३; **वायप्रसंग**, वाऱ्याच्या झोतांत सांपडण्याचा प्रसंग, १४·२५३. **वायु-यू** पहा.

**वाया–वायां–वायाणें**—व्यर्थ, निष्फळ. **वाया**—वाया चि व्याकुल काइ । आपुला निजधर्मु तूं पाहीं । २·१८६, ज्ञानदेवी–'वांयां चि', कुंटे–'वांयांचि' २·१८६. **वाया बुद्धि** १५·२९५, ज्ञानदेवी, कुंटे–'वायबुद्धि' १५·३२७. **वायां**—वायां चि धिंवसा उपनला चित्ता। १·६७. २·२४, २·९६, २·१४०, ३·३४, ३·४६, ३·५२, ३·५९, ३·१९४, ४·१८२, ४·२२०, ५·३३, ५·११४, ६·४९, ६·७७, ६·१५१, ६·३१८, ६·३६१, ६·३९४, ७·८५, ७·१४७, ८·२५, ८·१९४, ८·२१३, ८·२४१, ८·२४५, ९·१३८, ९·१४२, ९·१५०, ९·१७७, ९·१८५(२), ९·३२९, ९·३४६, ९·४१५, १०·३१, १०·१६१, १०·२८९, ११·५४, ११·६४, ११·९४, ११·९६, ११·१५८, ११·३४५, ११·४०७, ११·४०९, ११·४५३, ११·६१८, १२·१३२, १३·१०५, १३·११०, १३·४३५, १३·५८१, १३·५८३, १३·६२५, १३·६४७, १३·८५१,

१३·९०५, १३·९५५, १४·७०, १५·२४६, १५·५५८, १६·३५७, १७·१९३, १७·२५६, १८·५३९, १८·६१२, १८·६१६, १८·९८१, १८·१११८, १८·१२७४, १८·१४८२, १८·१४८३. **वायाणं**, वरील अर्थी, ४·९७, ७·१६७, १४·४०५, १८·५७५, १८·१२७७, १८·१४०५. **वायाणी** १०·१४५, ज्ञानदेवी, कुंटे – 'तरणी' १०·१६२, ११·१०८, ज्ञानदेवी, कुंटे – 'वायाणीं' ११·१०८. **वायाणीं** ९·१८५(१).

**वायु–वायू**—हवा, वारा. **वायु**—धूमरजाची पिंजरी। वाजतेया वायुनें होंकरी जरि। ९·१२४, धुराच्या कणांची पिंजर जर जोरानें वाहणाऱ्या वायूला थांबवील, अशक्य कोटींतील दाखला. आणि वायुसि येके ठाइं। विढार जैसें नाहिं। १२·२१०. नीरातें आटी तेज। तेजा वायुसिं जूझ। गगन तंव साहाज। वायु भक्षी ॥ १३·१४४(२). चलला वायु वाहुटली। चेष्टे जैसा ॥ १८·६६३. ५·१३३, ९·१०२, ९·२५९, ११·१४४, ११·३२७, ११·३५२, १४·७५, १८·२६८, १८·१२४४, १८·१३४५. **वायुचेनि अनुवायें** १३·६८५, अनुवाय पहा; **वायुची चेष्टा** १८·३४०; **वायुसिं जूझ** १३·१४४(१); **वायुचें नवविधपण** ६·२४३, सं. वा. श. पहा, – लाघव, हलकेपणास उद्देशून, ६·२६८; **वायुसिं समागमु** १८·३०६; **वायुचें स्फुरण** २·१०७, ८·१८४; **वायुचें वलिलें** ६·२९४; **वायुक्रिया** १८·३४१, – तत्व १३·१०६, १३·११५, – भेद १८·१०३१, – लोपें १८·९७३, – वसें ३·६१, १५·३१२, **व्योमवायुवसें**—आकाश व वायु यांच्या योगानें, १४·९८; **वायुस्वभाविं** १७·११३; **आकाश वायु द्योतक आप पृथ्वी** १५·९७, **पृथ्वी आप तेज वायु व्योम** १३·७७. **वायू**—वायू नांभरि उमे(गे)यां नसावें। ९·२८०. वायू आणि जेया पडे। १३·१९९, पटतें. **वायूसि विचरणें** १३·५२६; **पांगुळां वायूसिं हेवा नव्हे** १२·७३; **वायू प(पु)ढें परमाणु नुरे** १५·२७२.

**वायें–वायों**—व्यर्थ, फुकट. **वायें**—गगन गगन चि आहे। हें आभासतसे तें वायें। १५·३५३. **वायें सा(सां)डिलें** १८·९३९, **वाहणें** पहा. **वायों**—आण वायों वायों, शपथपूर्वक सांगतों, हें सर्व फुकट रे फुकट, १६·३८७, आण पहा.

**वारणें**—प्रतिबंधक सूचना देणें, नकार देणें. वैद्यु पथ्य वारुनि जाये। मग विष आपण चि सुये। तरि रोगिया कैसेनि जिये। सांघे मज ॥ ३·८. वारुकां वारुणु वारिजे। जैसें रत्नासि दूषण ठेविजे। ११·६३२, क्षुद्र घोडक्यानें हत्ती पुढें येण्याचें नाकारावें (टाळावें), चांगल्या रत्नांत खोड काढावी, ज्ञानदेवी, कुंटे – पहिला चरण 'वस्तु घेऊनि वाळिजे' ११·६४२. मान हालउनि वारी। १३·७५६, म्हातारपणांत मान इतकी हालत असते कीं जणूं ती एकसारखें नाहीं नाहीं म्हणते. १०·२६१, ११·९६, १२·२२, १८·१०००. **मुरकुटां वारिजतसे काइ**, चिलटांना नाहीं म्हणतो काय?, १८·१६९०.

**वारा**—नेहमींच्या अर्थी, हवा. वारा हिंडतु असावा। हें कोणाचें मत ॥ १३·५६. वारेयानि वालुवे गांठि। केहिं आहे ॥ १३·१०९२. ६·२३६, ७·१११ (१), ९·२०, ११·४५६, १२·६३, १३·२१३, १३·२५३, १३·२८१, १३·३७५, १३·४११, १३·५६५, १५·६१, १६·२४७, १८·३८७, १८·९५१, १८·१३०१. **वारा जैसा अफांटु** १३·६९६; **वारेया ऐसा अवाटु** १७·१८९; **वारेयाची अवांतर करणी** ९·७४; **वारियाचिया झुलुका** १५·१३०, **वारेयाचिया** – १६·१९२, **वारेयाचां धारसां** ९·४५; **वारेयाची धांव** १३·३५९, **वारेयाचें धावणें** १६·२८६, **वारेया सवें धावणें** ११·५८२; **गुणक्षोभाचें वारें** १५·१५२; **देहाभिमानाचा वारा** १४·३०३, **देहवैकल्याचा** – ८·१३०, **मूर्खपणाचा** – १७·२५३, **रजाचा** – १५·१६२, **विचाराचा** – ६·३१९; **वारा लोपें (पे)** १५·२३०; **वारा चि वाजे वीझे** १४·३४४; **वारा वाजों सरे** १८·४२०; **वारेनि शोके** १३·६६५; **वारा सूटला** १६·३९३; **वारेआचेनि आंगें झगटली** ६·२८५; **वारेनि जांत नोहे** १३·१९६; **वारेन हीं नोहावे(वें)**, त्या दिशेनें आलेला वारा ही सहन होत नाहीं, १६·३८३, ज्ञानदेवी – 'आडवारेंन हि', कुंटे – 'आड

वारेनहि' १६·३८५; **ग्रीष्मांतिचा वारा विसवों नेगे** १४·१६८; **जलतु वारा वेंटाले** ११·४००; **तृष्णेचिया वारेया वलघे** १४·१५९; **त्रिभुवनिचेया वारेया न वेंटाले** ११·३४९; **वारेयासि पाश मांडिलेयां** १८·६११; **वारेयासि वायु चलला**, वाऱ्यानेंच वायूला चालना दिली, ११·३५२, ज्ञानदेवी, कुंटे–'वारयासि धनुर्वात चढला' ११·३५७; **विषयजाताचा वारा वाजों नेदीं**, बाधूं देत नाहीं, १६·८९; **व्योमें वारेनि न वचिजे** १४·३३८; **वारे गुणें**, वाऱ्यामुळें, १३·५६८; **वारेलगें** १३·३१४; **जन्म वारा** १७·४२६, येथें वारा हा फेरा या अर्थी आला असावा, कुंटे–'जन्मवाहरा', येरझार, १७·४२९; **वोढा वारा**, घरबंध घालणारा, **विधिचा वोढा वारा** १७·१९०, **संयमाचा**–१३·६९१; **हिंडणवारा**, हिंडण्याचें वारें, भ्रमण, १३·६८८; **वारेनि कां उदकें**, दिवा विझतो, ८·२१०; **वारेपण**—जैसा वारा कां गगनीं वीरे। मग वारेपण वेगळें नुरे। ७·१११(२).

**वारि–वारी**—**वारि**—(१) वर या अर्थी. तें हीं तें वारि स्फुरे। १८·११९५, येथें वारि हा वरि चा अपपाठ असावा, ज्ञानदेवी–'तेंही तेवरी स्फुरे', कुंटे–'तेंही तयावरी स्फुरे' १८·१२०१. (२) फेरा. **द्वैताची वारि** १८·१३३६. **वारी**—तरि संकल्पाची सरे वारी। ६·३७६. **अहंकाराची वारी** ११·६८४, **क्रोधाची**–१८·१०५५, **द्वैताची**–१४·५६, **मोक्षाची**–१८·६७, **विकारांची**–१५·४८८, **संसाराची**–१५·४२.

**वारिक–वारुक**—घोडा. **वारिक**—पवनाचां वारिकां वलघे। ६·२७०. **वारुक**—वारुकां वारुणु वारिजे। ११·६३२, **वारणें** पहा.

**वाऱ्हीं**—त्याकरतां, त्या नांवानें. नागवीति आधवें। पेहेरा वाऱ्हीं॥ १६·३८५, ज्ञानदेवी–'अहेरां-वाऱ्हीं', कुंटे–'अहेरावारीं' १६·३८७.

**वार्ता–वार्त्ता**—(१) गोष्ट, कथा. **वार्ता** १२·७५, **द्वैतभावांची**–१८·२१४. **वार्त्ता**—कथिला परि ते वार्त्ता। बहुतां दिसांची॥ ४·१५. ४·३५, १०·२०, १२·१६२, १२·२३७, १३·८४०, १५·५०३. **विषया वार्त्ता**, हा पाठ **विषयवार्त्ता** असा घ्यावा, १३·५१५; **दुःखवार्त्ता** १३·६८५, **भव**–१६·७०. (२) **वार्त्ता**—दोरी. **वार्त्ते वरिल धावणें** १८·६४.

**वार्त्तिक**—ब्रह्मसूत्रांवरील टीका. तो बौधमतसंकेतु। वार्त्तिकांचा॥ १·१२, येथें बौद्धमत प्रतिपादन करणारांचा या अर्थी.

**वार्षी–वारिषी**—पावसाळा. **वार्षी**—जैसे वार्षी विण मेघ। ९·१७१. **वार्षियें घनावलि** ९·११८; **वार्षिया सांडिली** १६·७५; **वार्षियें ढेंढें फीटे** ९·१०१. **वारिषी**—**वारिषियेचिये प्रथम दशे** ११·२४३; **वारिषिया गगन क्षोभे** १८·१११, –**मेघु आणिजे** १८·३५३.

**वाल**—सोनें तोलण्याकरतां एक वजन. १२·२५, १३·१००३.

**वालणें**—टाकणें, निराळें करणें, वळणें, सुकणें, संपणें. उगवें चि वालौनि जाय। १३·३००, सुकून जातें. नाइकणें तें कानू चि वाली। १४·२०७, वर्ज करतो. अकृत्यत्व तें कुडें लोकीं। वालावें गा॥ १६·४६३, टाकावें. कां गांवा पुढें वाले। मार्गु जैसा॥ १८·१०७६, वळतो, येथें संपतो या अर्थी. तो वेडुं (दीं) अंत्यु वाळिला। तैसा वालीं हो॥ १८·१४७७. ९·४३३, १५·२४२, १५·५२८, १५·५४१, १८·२०१, १८·५५०, १८·१४८६. **जे कालातिक्रमीं वाले**, शाखा वाळते, १५·१२३.

**वालभ**—आवड, प्रेम, प्रियकर. पाहे पां वालभा-चेनि व्याजें। तियां वज्रांगनांचिं (व्रजांगनांचिं) नीजें। मज मीनलेयां काइ माझें। स्वरूप नो होंती चि॥ ९·४६१. १७·१३. **वालभाचिया उजरिया** १६·३७५, –**चें चि भोज** ६·१२३, –**चिये रती** १६·३०३; **लक्ष्मीयेचा वालभा** १८·१६२६; **वालभें करीं**, लाड करतों, ७·११६; **वालभ पडिलें** ७·१६०; **वालभणें**—आवड उत्पन्न करणें, मा आत्मेयां एवढिया प्रिया। वालभैला जो धनंजया। १८·६४०.

**वालीप**—पडदा. आद्याच बोलाची वालीप फेडिजे। ६·२५.

**वाळू**—वाळू, रेती. **वाळू चि रत्नें परौतें(ते)** १५·२२, **परौतणें** पहा. **वाळुवेचा घाणा गालि-लेयां**, कांहीं लाभत नाहीं, १८·६१०; **वाळुवे**

तिळां घाणा गाळणें एक, दोन्ही वस्तूंच्या गाळण्याचे श्रम सारखेच, योग्य कामाकरतांच श्रम करावे यास उद्देशून, १८·९३७; **वारेयानि वालुवे** गांठि, कधीं पडत नाहीं, १३·१०९२; **वालुवेचा वरंडा** १३·६९२; **वालुवंठ**, वाळवंट, ५·१०६.

**वाल्हें दुल्हें**—अपूर्वाइचें. १५·९३.

**वाव–वांव**—दोन्ही हात पूर्ण पसरले असतां त्यांतील अंतर, हात. **वाव**—ने उपरतिचां वावें सेलन । ७·९८, पोहतांना हातांनीं पाणी तोडतात त्यास उद्देशून. पवनातें वावीं मवावें । १०·१६२. **व विं वारा मवावा**, चार हातांनीं (राजवाडे), १२·६३. **वांव**—**वांव वेन्हीं तरंग मवीतु होतां**, होतों या अर्थी, ११·६५९.

**वावटणें–वावाटणें**—थकून विश्रांति घेणें. **वावटणें**—सीगली कमला जेथ वावटे । ११.२१५. मन वावटे । सुखा वरि॥ १४·२११. **वावाटणें**—ते सुषुप्तिकाळीं वावाटे । जेथ ज्ञान ॥ १८·४६२.

**वावडणें**—लीन होणें. चित्त वावडेलें आठौ घेंत । ९·५२२, ज्ञानदेवी–'चित्त चाकाटलें आंतु घेंत', कुटे–'–आठु घेत', चित्त गढून जाऊन संकोच पावतें, ९·५२७.

**वावडी**—कठीण, अवघड. ११·५८८.

**वावंदणें**—दगड, खडक (राजवाडे), वावदळ. वावंदणें पाडुनु पाए । सबलु डाहारला ठाये । १७·१४२, वावदळीला ठोकरून उडवावें, पाहारीचा घाव लागून जखम व्हावी इतकें तिखट, ज्ञानदेवी–वांवदळ पाडूनि ठाये। साबळ डाहारला आहे । १७·१४२, हे पाठ व अर्थ समाधानकारक नाहींत.

**वावरणें**—व्यवहार करणें, प्रहार करणें, विवरण करणें. देवा नव नवनिसिर्ति सरीं । वावरुनि येयांचां जिव्हारीं । २·४८, या पहिल्या चरणाच्या पाठाकरतां **नवा-वी** पहा. ७·११५, १८·१६९६.

**वास–वांस**—(१) **वास**—सुगंध. कवणें इछावें कपुरा । वासु देऊं॥ १०·११. वासु नेंदितां जैसें । चंदनीं सुगंधत्व असे । १८·११६, वासाचीं पुटें न देतां. १३·३२०, १८·१७३३. (२) **वास–वांस**—वस्ती, राहणें. **वास**—जैसें गतायुषे शरीरीं । चैतन्य वासु न करी । ३·१०९. १६·४२०. **गर्भवास, गर्भ** पहा; **वनवासि-सी, वन** पहा. **वांस**—**रहिवांस**, वस्ती, १३·५२२. (३) **वास–वांस**—वाट, बाजू, रीत, क्रम. **वास**—मग वास पाहिंजे तेथ प्रकटे । महानिधि॥ १·२३. इया आमची वास पाही। ३·१६५, मार्गाकडे पहावें. **वास पाए** १८·१०९२, **–न पाये** ६·३७०, **–पाहांतां** १६·२८५, **–न पाहवेया** १३·६०३, **–न पाहाल** १३·३२६, **–पाहिली** ११·२४९, **– पाहे** ५·७४, १३·२५२, १३·२७६, **–ना पाहे** १३·२७३. **वांस**—**वांस पाहानी** १३·३२४, **– पाहिजे** ४·१८९, **–पाहे** ७·१२९.

**वासना**—इच्छा, मनाची प्रवृत्ति. जरि चिंतामणि हाता चडे । तरि वां(वा)सनेचें कवण सांकडें । ३·२३. वासना एकावटे । प्रवृत्ति वोहटे । मन वावटे । सुखा वरि ॥ १४·२११. ऐक्यबोधाची वासना । निर्मोनि गेली ॥ १८·५४२. ८·१३३, १३·५२५, १५·३, १५·१६३. **वासनेचा अंकुरु** १६·३१४, **–संवसारा**, विस्तार, ५·५४; **वासनांतर**, इच्छेचे निरनिराळे प्रकार, ४·१३४, ५·१५४; **वासनारूप** ९·२९१, **–वेल** १५·१६६; **विषयवासना** १६·३४०; **सकल-वासनासंस्कार** ९·२९३; **सद्वासना** ७·१२४; **सुवासना** १५·१८३.

**वासिपणें**—भिणें, दचकणें. आणि रुद्रु जेया वासिपे । ११·३४३. अथवा बुद्धि वासिपे । अभिमानु विसरिजे ॥ ११·३६३. १३·३४६. **देहमृत्यू पातलेयां न वासिपे** १३·४९१; **भूतजात मज झनें वासिपो** १३·१९७; **मांडली गोठि...मोडैल वासिपैल कव्हणी उडैल**, सांगावयाची गोष्ट बिघडेल, ऐकणारे दचकतील, उपेक्षा करतील, १३·२६५; **वासिप**—भय, कां जगाचा वैरी वासिपु । अखंड जैसा ॥ १८·७५६, जसें भय हें जगाचा अखंड वैरी आहे; **वासिपु न धरिं** ११·३८२.

**वासी**—राहणारा. **वन** पहा.

**वाहणें**—नेहमींच्या अर्थी, ओघांत पडून ओघा-बरोबर जाणें, धारण करणें, मशागत करणें. जेयाचा आडदरु सदा वाहे । कृतांतु मनीं ॥

१.१०७, अश्वत्थामास उद्देशून. तैसें तंव त्रि वाहला वोहल । जंव न पवति गंगाजल । ९.४५४, ज्ञानदेवींतील–जैसे तंव चि वहाळ वोहळ। ९.४५८ हा पाठ व्याकरणदृष्ट्या ग्राह्य वाटतो. ह्मणौनि वाहिवां। घरीं वाहे।। १३.३७(२). जैसं देह वाहूनि रोमा। वाहणें नेणे।। १६.१८९(१). ३.५९, ९.३५२, ११.१०५, ११.६८६, १३.१२, १३.३००, १३.८०५, १८.४६६, १८.६०५, १८.१२७९(१), १८.१३३४, १८.१६८४. **वाहा—सोसु** का वाहा ९.४२७; **आंगीं अहंकारु वाहांत** ९.३५८, –**कर्मे वाहांतसे** ११.६८६, –**व्रतें वाहांतसे** १८.९१८; **आंगें वाहात** १८.१६४३; **उत्कंठा वाहे** २.१४७, **उणें**– १३.५३६; **उदरीं वाहिला** ६.१३७; **उरीं वाहें** ९.४७७; **चाड वाहांसी** ६.३६०, –**वाहे** ४.१९३; **चिंता वाहाति** १६.३२८; **टोपु वाहे,** खटाटोप अडकवून घेतो, १४.१७१, **डौरु**– १३.८२३, **देव्हडा**–१५.२१२, **पोटीं**– १६.१७२, **बुद्धि**–१३.३९०, **मत्सरु**– १६.२३०, **राहाटि**–१३.१११८, **विषादु**– १८.६८१, **व्यापारातें**–१८.४८६, **सरी**– १८.६४२, **सिरिं**–१३.५१०, **सिरिं वाहें** १२.२१६; **सुचावा हे (सुचा वाहे)** १८.६८४, ज्ञानदेवी, कुंटे–'शुचा वाहे' १८.६८७; **वाहे तेया फावे** १३.५८; **वोघा वोघीं वाहांतेया** १८.२७२; **वाहलें बुडिजे** १५.२२९; **पव्हिवे खाताडें वाहाति** १३.५६१; **वाहाविया,** वहाव्या, नदी अमृतें वाहाविया । १८.१६२३; **वाहावीं**—पृथिव्या भूतं वाहावीं। हे आज्ञा माझी ।। ९.२८१, **पायेवणी माथां वाहे** ९.३६८; **बुद्धि प्रेमाचिं भोजें वाहे** १३.३९०; **बुद्धी चराचर वाहिलें,** बुद्धी चराचराचे व्यापार चालविते, १३.५०; **मन आणिका वाहे** १६.३४७; **मनीं आस्था वाहिली** ९.३५०; **मन विषयांचें ध्यान वाहे** २.३३०; **जेयाचें मनसंकल्प(मन संकल्प) माझे वाहे,** जेयांचें मन माझे संकल्प वाहे असा अन्वय लावावा, ९.४४१; **मनीं शंका वाहाती** २.३२०; **वक्त्र गुरुनामाचे मंत्र वाहे** १३.४४६; **विखाचे आगर वाहांती** १८.२३३; **वेदें वोहटा वाहिला,** वेद मागें हटले, ११.६७२; **संदेहो जरि वाहांसी** १४.३२४; **वाहणी,** १४.२७७, **शीतोष्णांचिया वाहणी** ६.८५ **वाहाणि**— **माघौति वाहाणि घे,** मागें परततो, १३.२५७; **वाहाणी-णीं** ८.२२९, १०.१२२, १३.२३४, १३.८४९, १६.४४७, १८.४७८, १८.८९१, १८.१२८४; **देवांचिया वाहाणी** ९.३५१, **पश्चिमिली**–१८.१२७९(२), **पूर्वपश्चिम**– १८.३२९; **भेदूचिया वाहाणीं** १०.३००, **माझिया**– ७.१४६, ९.३३४; **रेखेची वाहाणी** ६.१८, **वसंताचिया**–१६.१६३; **वाटवाहाणी,** वाट मोकळी करणें, १६.५७; **वाहणें—रोमा वाहणें** १६.१८९ (२); **वाहाणें** १८.६३४, १८.८३४(णं), १८.१४५१; **वाहंत,** चालू असलेलें, लागवड केलेलें, **वाहंतेनि भौतिकें,** लागवड केलेल्या या शरीररूपी क्षेत्रांत, १३.१५६; **वाहांत—वाहांतें पाणीं** १५.१३२; **वाहातां—धुरीं वाहातां** १८.५०२; **वाहांतां** १८.९३४, **नीच**– १०.१८५; **वाहाति, वाटा वाहाति चि आथि** ८.१८१; **वाहांतिये वेळे,** नेत असतां, १८.१८३; **वाहांति,** वाहात असलेली, **झरी वाहांति आली** ६.२८६; **वांहांनी(वाहांतीं) यत्रें,** मारक यंत्रें, तोफा वगैरे, ९.२१२; **वाहातवणां,** प्रवास, मार्गस्थ(राजवाडे), आणि जन्मशनाचां वाहातवणां । तेविं न्हि आशेनिया न लै वि वाहणां। ७.१२६, शेकडों जन्म कर्ममार्गानें प्रवास करीत असतां तो आशेचीं पादत्राणें घालीत नाहीं; **वाह**—मार्ग, जाणें, अधोरंध्राचेनि वाहें। १८.३३३, **वाहक—हांकणारा, अश्ववाहक** १.१४०; **वाहन—गरुडा सारिखीं वाहनें** ९.३८८; **वाहान—ऐरावता सारिखें वाहान** ९.३१७; **वाहित,** लागवड, १३.३७(१); **वाहो—मशागत,** लागवड, प्रवाह, लाटा, **समुद्रीं वाहो नव्हे चि,** लाटा थांबतात, १८.४१८, **वाहो करितां,** लागवड करण्यास, १०.५४, –**ठाके,** प्रवाह थांबतो, १८.११६०; **व्हाणें—लागवड करणें,** वाहणें, या अर्थी. **व्हातां**—काइ जालें न व्हातां भूमि पेरिजे। ११.१६२, कसें झालें पहा, जमिनीची मशागत न करतां जर ती पेरली तर; **व्हाये—यया कारणें पुढुतीं। हें आधीं**

(हे आधी) न व्हाये चित्तीं । १८·१४०७, या कारणामुळें पुढेंही चिंता तूं मनांत बाळगूं नकोस; **वाहवणें**—पैं सावधपणें(ण) जैसें । वाहविलें आलसें । सुषुप्ति बैसे । घणावेंनि ॥ १४·१४१, **बिं वाहवी १३·३१; मती वाहविलां १३·३१५; मीं पाठीवरी वाहवें १०·२२९; वाट कवण वाहवी ५·१२३; वाहावणें**—समर्थु आपुला खोडा । सीसें वाहावी जैसा होडा । १८·१०५६.

**-वाहर-वाहार**—शब्दास जोडून. संकट, पीडा. वाहर—जौहरवाहर, अग्निपीडा, ११·६०, ज्ञानदेवी, कुंटे–'जोहरवाहार' ११·६०. **वाहार—संहारवाहार ११·४४९.**

**-वाहाच**—शब्दास जोडून. वरवरच. **आहाचवाहाच** ६·९९, ज्ञानदेवी–'आहाचवाहाचें,' कुंटे–'अहाचवाहाचे' ६·९९, १५·२९९, ज्ञानदेवी–'आहाचवाहाच', या संदर्भात राजवाड्यांचाच पाठ कुंटेप्रतींत आहे, १५·३३१.

**वाहाण**—वहाण. **आशेचिया वाहाणां न लै चि,** फळाशेच्या वहाणा घालीत नाहीं, ७·१२६; **वाहाणधर,** जोडे संभाळणारा, १३·११२७.

**-वाहिर**—शब्दास जोडून. वरवरच. **बाहिरिवाहिरा कारणीं १८·३०२, बाहिर पहा.**

**वाहुटली-वांहुटली**—वावटळ, वादळ. **वाहुटली**—चलला वायु वाहुटली । चेष्टे जैसा ॥ १८·६६३, ज्ञानदेवी, कुंटे–'वाहटुळी' १८·६६६. १४·२२६, १५·१८२. **वांहुटली**—तिये प्रलयचिये वांहुटली । काइ अभ्र पूरे ॥ ४·१७४. ६·२१६. **वांहु(हु)टलिचेनि बळें १३·४९०,** ज्ञानदेवी–'वाहुटळीचेनि,' कुंटे–'वाहुटोळीचेनि' १३·४९२; **आशा वांहुटली १६·३६२.**

**वि**—शब्दास जोडून. हा उपसर्ग अनेक अर्थी आलेला आहे, त्यांपैकीं कांहीं अर्थ व त्यांचीं उदाहरणें येथें दिलीं आहेत, इतर शब्द त्या त्या शब्दांपुढें पहा. (१) नकारार्थी. अभाव दाखविण्यासाठीं. **विकण १८·५०१; विघडणें** पहा; **वितृष्ण, तृष्णा** पहा; **विदेह, देह** पहा; **विफल, –ता, फल** पहा; **विमल, कांतिविमलें ११·१३९; विमुख ३·१०६, ३·१९७; वियोग, –रक्त, –रक्ति** पहा; **विरस १४·३५५; विरह** पहा; **विरागीं १७·१७५; विलग, –लग** पहा; **विश्रमणें** पहा; **विसंवाद** पहा; **विस्मरण १४·२६४; विस्मृति-ती १५·३२२, १५·४५६.** (२) आधिक्य, अनेकता, वैशिष्ट्य दाखविण्याकरतां. **विकट ११·१३९; विकडी १०·५९, विकरणें, कल्पणें, –कारणें, –काशणें, –कासणें, –कृत-ति-ती, –कोप** पहा; **विखुरणें १५·२६८; विखोंच ९·१२५; विख्यात** पहा; **विगत—विगतविषयवत्सला १८·३; विगुंतला २·३६१; विघरणें** पहा; **विचक्षण, –चरणें, –चारणें, –चित्र, –चुक,** त्या त्या शब्दापुढें पहा; **विछिन्न, अविछिन्न २·२९८; विजय, –ज्ञान, –तान, –त्पत्ति, –त्पत्ती** पहा; **विदलित, विदलितासंगलकुला १८·२; विदारणें** पहा; **विदिशा ११·३१०; विधुलणें १७·७; विनट, –नय, –नवणें** पहा; **विनाश, –न्यास** पहा; **विपरीत १·२१९; विपलणें, –पलावणें** पहा; **विभव, –भाग, –भांड, –भुटणी, –भूति** पहा; **विरम** पहा; **विरुच, –रुद्ध, विरु-रूढणें, –रोधणें** पहा; **विलय, –लास, –लिप्त** पहा; **विवंचणें, –वलणें** पहा; **विवर्जणें, –वरणें** पहा; **विवाद, –वाह, –विध, –षद,** पहा; **विशुद्ध २·१४५, ८·२०; विषम** पहा; **विसंच, –सणणें, –साणणें, –संवणें, –संभणें, –सरणें** पहा; **विस्तरणें, –स्तारणें** पहा; **विस्मय, –स्मित** पहा; **व्याकुल** पहा.

**विकट**—हिडीस, कुरूप. ११·१३९.

**विकडी**—चातुर्याचें भापण, अलंकारिक परिभाषा. १०·५९.

**विकण**—फलकट, धान्याचा कण जवळ नसलेल्या शेतकऱ्यास उद्देशून. विकणु आतें रा‍ऊ । जिया परीं ॥ १८·५०१, धान्याचीं फलकटें सुद्धां धान्य जवळ नसलेल्या शेतकऱ्याकडून वसूल करतो, ज्ञानदेवी–विकणु आतें कां रावो ।, कुंटे–'विकणुवातें करावो', 'फोल्युक्त धान्याला जसा सुपाचा वारा' असा अर्थ दिला आहे, १८·५०४.

**विकणें–वीकणें**—मोलानें देणें, अर्पण करणें, प्रसार होणें. **विकणें**—भक्तीसि मनोधर्मे । विकूनि घातलें ॥ १२·२९. तरि देव चि खाए । विकूनियां ॥ १८·५६६. **आपणपें विकावेया १७·२४५; निद्रेसि जिवें आंगें विकले १२·८२; बाहे तोडूनि**

विकिजे १३·२१९; विकूं न शके १३·२०८; **विकलेपण,** अनन्यता, हें विकलेपण साजे। प्रभे जेवि ॥ १३·६०७, सूर्याबरोबर प्रभा अनन्यतेनें असते त्यास उद्देशून; **तैसे नविकलेपणें** १६·८३, ज्ञानदेवी – 'तैसेनि विकलेपणें', कुंटे – 'तैसें निर्विकल्पपणें', कुंटे प्रतींत 'विकलेपणें, अविकलेपणें' असे ही इतर पाठ दिले आहेत, १६·८४; **विकिरा,** विक्री, खप, १३·३२०, ज्ञानदेवी, कुंटे – 'विकरा' १३·३२१. **वीकणें**— तें चर्म चि एक जें लाहे। तेणें वीकेति आववीं ॥ ९·४५०. ११·५३५, १८·२३३. **जीवें वीकला** ६·३४५; **बैलु वीकूनि** १३·२३३; **मोले(लें) वीकी** २·२५४; **वीकणें**—किंबहुना कृषि जीणें। गोधनें राखौनि वर्त्तणें। कां सवंगाची वीकणें। महर्गि वस्तु ॥ १८·८७८, वैश्याचें कर्तव्य.

**विकरणें**—क्षोभ होणें, पसरवणें, बदललेल्या रूपांत दिसणें, फोड करणें. परि ते दुर्मति। जे बहुधा असे विकरति। जेथ निरंतर रमति। अविवेकियें ॥ २·२४३, कुंटे–'येर' २·२४३. हें येकेक केती सांघावें। आतां वस्तुजात वि आघवें। मज पासौनि जाणावें। विकरलें असे ॥ ७·५१. तैसा विकारु हा मी नोहें। जन्हीं विकरलां असें ॥ ७·५८. ६·३, ९·१५३, १०·८०. **शुभाशुभीं न विकरे** ५·१०२; **विकर,** जेथें तेथें असणारे, पुष्कळ या अर्थी, ९·३२२; **ये विकरि शरीरीं,** हा पाठ विकारि असणें संभवतें, १४·१७७, ज्ञानदेवी – 'एकु चि किरु शरीरीं' १४·१७८, कुंटे – 'येकचि कीर शरीरीं' १४·१७९; **विकरविणें**— परि मनोधर्मु न लोटे। विकरविला हा ॥ २·४१.

**विकल**—दुःखी, असमर्थ. ५·५७. **विकलता**— विकलता उपजत। गात्रांसि ॥ १·१९६; **वैकल्य** ११·३६६, **देहवैकल्य**—येया देहवैकल्याचा वारा। झणें लागैल येया (यां) सकुमारां। ८·१३०.

**विकल्पणें**—संशयितवृत्तीनें कल्पना करणें, विरोधासाठीं किंवा भेदबुद्धीनें विचार करणें. संकलिपत श्रृष्टि घडी। सर्वे चि विकल्पूनि मोडी। १३·११४. **विकल्प,** विरोध, मतभेद, कुतर्क, आंगें कर्मा ढीला। जो मनें विकल्पें भरला। १३·६७६, १३·४७५, १५·२५८; **विकल्पाचें अंतिंव** ८·१४३, **–चे कांटे** ७·१६५, **–ल्पांचे कांटे** ७·१६७, **–चिया भाली** ७·१६८, **–चा वेगु** १३·६८१; **विकल्पजात** १३·४८१, **–रस** १५·९६; **कोहंविकल्प** १५·३१०; **नानाविकल्पजाल** १७·२२६; **निर्विकल्प—निर्विकल्पाचिये बरडी** ८·२१; **निर्विकल्पलावणी** १८·१६५५; **संकल्पविकल्प** १३·४८०, १६·७६, १८·७३७.

**विकार**—मनावर होणारे अनिष्ट परिणाम, क्षोभ, कामक्रोधांदिकांस उद्देशून. तैसें प्रकृति आधारें। कर्मेंद्रियें विकारें। नैष्कर्म्य हीं व्यापारें। निरंतर ॥ ३·६२, निष्कर्म स्थितीस पोहोंचलेलाही कर्मे करीत असतो. तैसें जें इये विकारिं। विकारु नव्हे अवधारिं। परि आकारु नांव भंवरी। सोनें तें सोनें ॥ १३·८९८ (१, २). ५·१३७, ७·५८, ९·२१४, १३·१२, १३·८९४(१), १३·९८५, १४·६८, १४·१५०, १४·२९२, १५·१००, १५·२५६, १५·२७१. **विकारांचीं इंधनें** ४·१२७, **–रांचें उदाणें** ८·१४१, **–रांचिया झुलुआ** ७·९५, **–रांचेनि पैसें** ७·४६, **–रांचेनि विटाळें** १३·४७७; **आठें विकारीं** १४·८८, सं. वा. श. पहा; **औपाधिकां विकारां** १५·४६५; **गुणाचा विकारु** १४·२९२; **विकारांतराची मांदी** ७·१०३; **विकारक्षोभ** १४·९३, **–भरण** १३·९६१, **–भारें** १५·१५०; **प्रकृतिविकारीं** ९·१२६; **अविकार** ४·५७, **स–** १३·१६१; **विकारी**—तेवि विकारु होऊनि तैसें। विकारी नोहे ॥ १३·८९४(२).

**विकाशणें-सणें**—फुलणें, विस्तार पावणें. **विकाशणें**—तंव नानावर्णे कमलवनें। विकाशलिं तैसिं अर्जुनें। ११·२००. १४·२९४. **विकाश**— नाना कमलीं पांडवा। विकाशु जैसा बरवा। विकाशीं यावा। परागांचा ॥ १८·३४४ (१, २), ११·३५६, १८·१३६७; **अद्वयाब्जिनीविकाशु** १६·१. **विकासणें**—मध्यमा विकासौनि। १८·१०३२. **विकास** १८·२७४, **संकोच–** १५·५२०; **विकासिनी—विश्वविकासिनी मुद्रा** १७·१.

**विकिरा**—विकणें पहा.

**विकृत-ति-ती**—**विकृत**—विकारयुक्त, विक्राळ. **विकृत आणि थोर** ११·६२२; **अविकृत,** विकाररहित, २·१४९, १३·१००१ (१).

**विकृति**—मनोविकार, विषया(यां)चां वोवरा(रां)। विकृतिसि असे॥ ७·१६४. १३·४७५. **विकृती**—**अविकृतातें विकृती** १३·१००१ (२); **विकृनीविण** ४·२१९; **अविक्रिय**, ज्याला विकार होत नाहीं असा, १५·३०५; **अविक्रिये आत्मसत्ते** १५·३४८.

**विकोप**—क्षोभ. १५·२३०.

**विक्रम**—पराक्रम. **अनंतविक्रमा** ११·५२६.

**विक्रांत**—पराक्रमी. १·९९.

**विक्षेप**—अडथळा. **विक्षेपाचीं पाणिवलें** ६·४६९.

**विख**—जहर; घातक, मारक द्रव्य. बापा विखाचिया मधुरता । झनें आवडि उपजे चित्ता । तो परिणामु न विचारितां । सेवावें ना ॥ ३·२०७. कां विख चि होउनि परते । सापा दूध ॥ १३·७२१. जैसा रसरीती मरता । राखिला विखें ॥ १८·१६१. ९·१४१, ११·४००, ११·४३४, १५·३८८, १८·५६१. **विखाचे आगर** १८·२३३; **जळतें विख** १२·६८; **अमृताचें विख करी**, सापास उद्देशून, १८·६७६; **विखें रांधौनि वाढिलें** १८·७११; **विखाग्नि**—नातरि विखाग्नीसि प्रवर्त्तला । वडवानळु ॥ ११·३५२; **विखाभरणें**—भोगिजति शब्दादिकें । विखाभरणें ॥ १५·३२८, विषयरूपी विषाच्या अलंकारांस उद्देशून, ज्ञानदेवी, कुंटे–'विषयभरणें', विषयांनीं पोषण करणें, १५·३३०. **विष** पहा.

**विखम**—वांकडें. **विखम पडे** ९·३४१. **विषम** पहा.

**विखय**—विषय. ९·३४३.

**विखार**—सर्प. हा निलेयाचा दुसरा। यया बुद्धी हातु घालिजे विखारा । ९·१४७. १५·१६९.

**विखिं-खीं-खैं**—विषयीं, संबंधीं, बाबतींत. **विखिं**—**आत्मजेचां विखिं** १२·१३१; **इये विखिं** १३·५३३, १८·१५५१, –**विखिंचा** ११·७७, –**चि विखिचें** १३·४५१; **कव्हणी विखिचे** १३·१८४; **घडतां विखिं** १५·११५, **तिये**–१८·५५८, **तेयांचां** – १८·५९४; **विषयविखिं** १३·५११, **शास्त्र**–१७·३९; **साविखिं**, सर्व बाबतींत, १६·१४४, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील–'सर्वविषीं' १६·१४५; हा पाठ ग्राह्य वाटतो; **स्त्रियेचां तरि विखिं** १३·७९५. **विखीं**—**आधवां विखीं** १६·४२९, **इये**–१३·६७, **कोण्ही हि**–१३·३५८; **धर्मविखीं** १३·२०९. **विखैं**—आतां इये चि विखैं पार्थां । ३·८५.

**विखुरणें**—पसरविणें. विखुरिले विकल्पाचे कांटे । ७·१६५. १५·२६८, १६·९९. **सांडीविखुरी गेलें**, सांडून पसरवून टाकलें, ९·३९.

**विखो–विषो**—विषय, इंद्रियांना गोचर होणाऱ्या कामक्रोधादि उत्पन्न करणाऱ्या वस्तू, चर्चेची बाबत. **विखो**—विखो पासीं हीं आलेयां आशे न रिगे । हें काइ ह्मणौनि ॥ ६·६३, इंद्रियसुखाचे विषय जवळ आले तरी ते कोणते आहेत त्यांचा आस्वाद घेण्याची इच्छा होत नाहीं, यावर ६·६२ ते ६·६५ पहा. २·३०७, १३·८७, १५·३९७. **विखो ओखटा** ५·१२६, –**भोगिला** १५·३३९, –**वोपितां**, येथें विषयांचें सेवन केलें तर, ३·२०५; **दीठिचा विखो** १८·१७१४. **विषो**—दुःख करावेया सर्वथा। विषो नाहीं ॥ २·१६३, दुःखास कारण होणारी बाबत. तैसा मानसीं विषो पोखे। रसद्वारें ॥ २·३०६. साहाजें शब्दु तरि विषो श्रवणाचा। ६·१७. ६·३०, ९·४४३, १३·२३९, १३·७०३, १४·३७, १५·१७७, १८·१३४४, १८·१४७०, १८·१६६३. **विषो जीणौनि**, विषयवासना जिंकून, ११·१७३ (१), –**दीठी सुये**, विषयभोगावर दृष्टि ठेवून, हे मिळावे म्हणून, १३·८०८, –**चि वाणिते जाले**, ईश्वराच्या लीलांचे विषय वर्णन करूं लागले, ११·१७३ (२); **प्रेमा विषो होये** १८·१३३७; **प्रकृतिविषो**, प्रकृतीचा विषय, ९·९८, **ज्ञान**–, ज्ञान हा विषय, १३·६३३.

**विखोंचणें**—टोंचणें. हें असो पर्वतांचिये हृदइंचें। पर्जन्यधारीं ने विखोंचे। ९·१२५, पर्वताच्या आंतील खनिज पदार्थ पावसानें भिजत नाहींत, यास उद्देशून.

**विख्यात**—प्रसिद्ध. हे गीता नांव विख्यात। १८·१३१४. १०·२१५. **विख्याता** १५·२०३.

**विगुंतणें**—मग्न होणें. तो विगुंतला असे आंतरीं। महासुखें ॥ २·३६१.

**विघडणें**—वियोग होणें, विकल होणें, सुटणें. तारुण्याची गांठि विघडे। ६·२६०. १८·७८२.

**आयुष्याचें सूत्र विघडतां** ७·१७७; **विघडलेयां** ९·१६९; **विघड** ६·३९०, ८·२५५; **विघडवणें—गात्रातें विघडवी** ६·२१९.

**विघरणें**—विरघळणें, वितळणें. पुष्टि लागे विवरों। कांति पाहे निसरों। १३·७५५. १८·२८४.

**विचक्षण**—जिज्ञासू, शहाणा, चिकित्सक, विचित्र. ऐसें विचारितां विचक्षण। गुंपौनि ठेले॥ ४·८४, चिकित्सक. जळिं पडिलेयां लवण। सवें जळ वि होये विचक्षण। १८·१४०४. **विचक्षणा-णां-णें** १०·२६१, ११·१५६, १७·३०६, १८·३५८, १८·८८१, १८·९३७, **विचक्षण-शिरोमणी** १८·५०८, हे संदर्भ अर्जुनास उद्देशून आहेत.

**विचंबणें**—श्रम पावणें, कष्टी होणें. तैसा आग्रहाचा पाइकु। विचंबे वायां॥ ६·४९. १८·१०४५. **विचंबणें** १८·६०६.

**विचरणें**—फिरणें. जैं यमनियम टकति। तैं इंद्रियें सैरा विचरति। १·२४८. ९·२१०, १३·६६०. **विचरणें** १३·५२६.

**विचारणें**—प्रश्न करणें, विचार करणें. तंव एया पूर्वापर बोलाचा। विचारूनि कुमरु पांडुचा। कैसा प्रश्नु हान अवसरिचा। करिता होईल॥ ४·२०९, **विचार करून.** १·६७, १·२४५, २·१३, २·१९, २·२२, २·३०, २·५२, २·९७, २·१३१, २·१३३, २·१३८, २·१७६, २·१८०, २·२०६, २·२६३, २·२६५, ३·५, ३·७७, ३·२०७, ३·२१७, ३·२२३, ४·८४, ४·१७६, ५·१, ५·१५, ५·१०८, ५·१२६, ६·१४८, ६·३७८, ११·४८३, १३·१७, १५·४३४, १६·५७, १७·५२, १७·८९, १७·३९७, १८·१४६, १८·३०९, १८·५१७, १८·५५२, १८·६२३, १८·१२८५, १८·१६२३. **विचारिजत असे** ७·१५३; **विचारिजति** ६·३९; **विचारिजो** ९·१२, ११·९३; **विचारावेया—शास्त्र विचारावेया** १७·२३१; **विचारूनु** १४·२२१ (१); **विचारें (रे)** १२·२०७, ज्ञानदेवी, कुंटे—'विचरे' १२·२०८; **विचारिता—विचार करण्याचा,** पाठिं विचारितेया वेगा। तो विवेकु **ही** ठाके मार्गा। मग अविचार ये आंगा। घडौनि जाप॥ ६·४६५ (१); **अविचारतें—विचार न** करतां, सहज घडलेलें, हें एकलांतें चराचर। अविचारतें सुंदर। प्रसवौनि थोर। थोरावली॥ १४·१०९; **विचार—प्रश्न,** कल्पना, विवेक, २·२२१, ४·१४९, ४·१६५, ७·५, १४·७२, १४·२२१ (२), १५·८०, १५·३६१; **विचाराचां आगिठां** १३·१०३१, **—डोळां** १४·२६६, **—चा दिवा** १८·१००२, **—चां देशीं** १८·३२३, **—ची भास** १४·२४८, **—चिया रसना** ७·१८८, **—ची वाट** १३·८६८, **—चा वारा** ६·३१९; **विचारासि न मिळे** ११·४८७; **विचाराचेनि हातें न पवनी** ९·१८४; **विचारक्षीरार्णव** १५·५३९; **विचारजातां** ११·१९१, **—पर** २·१२५, **—विरिं, विचारशूर पुरुषांनीं,** १४·४९; **वस्तुविचार, वस्तु-रतू पहा, सारासार—,** सारासारविचारु। मंत्रु जेहातें॥ ६·४४४; **अविचार** ६·४६५(२), १६·१२३, **स—** १५·२६६.

**विचित्र**—विलक्षण, निरनिराळे, नाना प्रकारचे. ए(ऐ)सें एक चि परि विचित्रें। आणि भयानकें तें चि बहुवक्त्रें (वक्त्रें)। ११·३३५. तेवि विचित्र विश्व पाहीं। एक चि हें॥ १४·११७. तैसें सप्तगुणि विचित्र। कर्म जें जगीं पवित्र। १८·८७१, क्षत्रियांच्या ह्या सात गुणांचें वर्णन १८·८५४ ते १८·८७० ओव्यांत पहा. १५·९८, १६·१३१, १८·३८२. **विचित्रु संकल्पु** ६·९४; **लाघविचे विचित्र विनोद** १८·७९४; **गुणभेदविचित्र** १८·५२०, ज्ञानदेवी, कुंटे—'गुणभेदचरित्र' १८·५२३; **विचित्रता—भूतांचिया विचित्रता** १८·५३६; **वैचित्र्य** ६·४०५, ज्ञानदेवी, कुंटे—'विचित्र' ६·४०६.

**विचुक**—अडखळणारें. आणि बालक बोबडां बोलीं। कां वांकुडां विचुकीं पाउलीं। ९·६.

**विजय—जय (१) पहा.** हो काज सार विजयाचें। किं तें भांडार महातेजाचें। १·१३८. १८·१६३४. **विजयाची गुढी** १४·४०६, **—सि ठावो** १८·१६३३; **विजई** ३·२७; **विजया होई** ११·४७६, **विजैयां होआवें** १८·१३८, ज्ञानदेवी, कुंटे—'विजयी' १८·१३९; **विजय-ध्वज** १२·२०, **—लक्ष्मी** १०·२३२, **—वृत्ती** १·२१०, **—श्री—मोक्षविजयश्रिये वरैतु**

१८·१०४३, **विजेश्री–विजश्रियेचां पाटीं** ७·१२, ज्ञानदेवी–'विजय श्रियेचां', कुंटे–'विजयश्रीयेच्या' ७·१२; **कीर्तिविजय** १८·१७५९, **दृष्टादृष्ट–**१८·१७७९, **भव–**१८·१०६०, **रजतम–** १४·२०२; **विजयपण** २·२२७, **–येपण** १·२४, ज्ञानदेवी, कुंटे–'विजयवृत्ति' १·२४.

**विजु-जू–वीजु**—वीज. विजु ६·२८५, १५·१११. **विजू**—आववेयां विजूंचा मेळावा कीजे। ११·२३५. **विजूं माझि** ७·५७; **कल्पांतविजूंचिया फूटी** ११·२०१; **प्रलयविजूंचीं झुंबाडें** ११·३५८. **वीजु**—वललां होये तैसा। वीजु नाहिं ॥ १४·१६९. १८·४३१. **विद्युत्–विद्यू** पहा.

**विज्ञान**—(१) प्रपंचज्ञान, प्रपंच. अर्जुना तेया नांव ज्ञान। येरु प्रपंचु हें विज्ञान। येथ सत्वबुद्धि तें अज्ञान। तीन्ही जाण ॥ ७·६, वर ७·४ व ७·५ मध्यें जें वर्णन केलें आहे तें ज्ञान, त्या खेरीज इतर ज्ञान तें विज्ञान व प्रपंचबुद्धि खरी आहे असें समजणें हें अज्ञान. मग तेया काष्टाचां ठांइं। सांघ पां बीजपण आहे काहीं। म्हणौनि विज्ञानीं मीं नाहीं। जन्हीं हें माझें ॥ ७·५५, काष्ठ बीजापासून होतें पण जसें काष्ठांत बीजपण नसतें, तसें प्रपंच हा जरी माझाच विकार आहे तरी मी त्यांत नाहीं. ७·३. **विज्ञानाचिये खोले,** प्रपंचरूपी खोलींतून गाळलें तरी जें गळत नाहीं, ८·१६, **–चां डोलां** ११·२११; **विज्ञानात्मकु भावो** ६·८८; **ज्ञानविज्ञान,** ज्ञान व विज्ञान, ९·४४; **विषयविज्ञानयंत्र,** विषयांचा अनुभव करून देणारें, ८·१४४; **विज्ञानेंसीं,** विज्ञानासहित, ७·२, ९·४२. (२) ईश्वराच्या ठिकाणीं निश्चयात्मक बुद्धि, ब्राह्मणाच्या गुणांपैकीं आठवा गुण, यावर १८·८४३ ते १८·८४५ पहा.

**विझणें–वीझणें**—मालवणें, थांबणें, शमन होणें. **विझणें**—देखैं अग्नि विझौनि जाये। मग जैं राखौंडी केवल होये। ५·२३. ८·२११, १४·२५५, १४·३०६. **निरंधन आणि विझालें** १३·२७९; **जलें ना विझे** १६·७३; **जलों विझों नेणे,** राखेस उद्देशून, १४·३५७; **विझणें**—जैसा निरंधनि विण आगी। विझणें चि उरे ॥ १३·१८३. **वीझणें**—कां वारा चि वाजे वीझे। गगनें निश्चलां असिजे। १४·३४४. १४·३९१.

**विटणें–वीटणें**—कंटाळणें, बिघडणें, नासणें, नाश होणें. **विटणें**—तरि आत्मसुखाचिया गोडिया। विटला जो विषयां। ४·१८५. १६·२८३. **विट—**कंटाळा, **विषय–विटें** ११·३१६; **अविट—**अविट नाथिली आस्थाबुद्धि। विषयसुख चि परमावधी। ४·२०. **वीटणें**—तरि आत्मयोगें आथिला। जो कर्मफलासि वीटला। ५·७१. २·४१, ९·५२, १३·४४८, १३·५७४, १३·८२२. **वीटे ना वेचे** १३·११०८, **–ना सरे** ८·२६१; **वीट** १४·३२६, १८·२१७; **अवीट**—तूं अवीट हें पाहीं। चैतन्य येक ॥ २·१६९; **न विटे, हें विटणें** किंवा **वीटणें** चें रूप असणें संभवतें, १७·२१९.

**विटंक**—घनदाट. विश्वाकारु विटंकु। १५·६२, अश्वत्थास उद्देशून.

**विटंबणें**—तिरस्कार करणें, उपहास करणें. हा ठाऊ पांडवा। पदार्थजातीं आथवा। विटंबी तो होआवा। वैराग्यचोडु ॥ १५·२३४. **विटंब** १३·४६६.

**विटालणें**—अशुद्ध होणें, अपवित्र होणें, बिघडणें. जेथ विटाललें मन। चोख कीजे ॥ १३·१७४. इंद्रियें सदा पदार्थीं। रिगतां विटाललीं होंतीं। तियें प्रत्याहारतीर्थीं। नाहाणिलिं कीर ॥ १८·९८८. ४·१०३. **विटाललें मुख,** तोंड बिघडल्यावर दूधही नकोसें होतें त्यास उद्देशून, ९·१४१; **विटालविणें—साधुवृंदें विटालविली(लीं)** ३·२४६; **विटाल**—गंगा मीनलेयां नदी। विटालु जैसा ॥ १८·४४७, दुहवेवारी जैसी। विटाल(लें) लोटे ॥ १८·६७८, वाईट वर्तनाची स्त्री आयत्या वेळींच दूर बसते त्यास उद्देशून, ज्ञानदेवी–'दुर्व्यवहारीं' कुंटे–'दुर्व्यवहारी' १८·६८१; **दीठिचा विटालु गेला** ११·२८७.

**विडा–वीडा**—पानाची पट्टी, तांबुल, पान सुपारी व दक्षणा. **विडा** १७·२७५; **विडा पाउड** १८·४६, **पाउड** पहा. **वीडा** १३·४२१.

**विडाल**—दोष (राजवाडे). तरि डिंभोपाधिकु आहे। विडालु तेथ ॥ १८·२२, त्या प्रतिपादनांत 'लेंकरूं' आहे ह्या उपाधीचा दोष लागतो, **डिंभ** पहा, ज्ञानदेवी, कुंटे–'विटाळ' १८·२१.

**विडी**—वर्तुळ, कडें. विद्युल्लतेची विडी। ६·२२४.

**विण–वीण**—शिवाय, वांचून, खेरीज. हे शब्द इतर शब्दांस जोडून किंवा सुटे आलेले आहेत. **विण**—आगा करितेन विण कर्म। तें चि तें नैष्कर्म्य। ५.६३. देखा करितेन विण अगोचरु। अव्यक्तीं हा आकारु। निफजवी जो व्यापारु। तेया नांव कर्म॥ ८.२८. दिसतेन विण दिसतें। अदृश्य जें॥ १५.७५. तपनें विण प्रकाशु। जाड्यें विण रसु। पोकली विण आशाश(काशु)। होये जैसें॥ १७.२२७ (१, २, ३). पांतेपणें विण जैसा। पांत ठाके॥ १८.९७०. ६.२४, ६.८९, ६.३३९, ६.४३०, ६.४५७, ८.२४, ८.२८, ८.२१२, ९.२९, ९.७०, ९.१७१, ९.२३२, ९.२६१, ९.३३०, ९.३६३, ९.४२९, ११.९६, ११.१९३, ११.२६८, १२.१८३, १२.२०९, १३.२३, १३.२९३, १३.२९९, १३.३०१, १३.३३९, १३.३९९, १३.५२७, १३.५३०, १३.८३५, १३.८६७, १३.९०५, १४.२५०, १५.७४, १५.८५, १५.२२६, १५.२४५, १५.४०५, १५.४९४, १५.५१२ (१, २), १६.१६, १६.२७४ (१, २), १७.२३, १७.१४२, १७.१८३, १७.२२९, १७.३४६, १७.३४९, १७.३८७, १८.७८, १८.२६२, १८.३७०, १८.४२६, १८.४२७, १८.७१८, १८.८११ (१, २, ३), १८.८५४, १८.१०८४, १८.११३४, १८.११४३, १८.१२५८, १८.१३८९, १८.१४७२, १८.१४९०, १८.१६८१, १८.१७२०. **मीपणें विण** १५.२४२; **इतर शब्दांस जोडून**—ते पाहाटेविण पाहाटविते। अमृतेंविण जिववित। योगेंविण दाविते। कैवल्य डोळां॥ ९.२०० (१, २, ३), १.५८, १.१७२, १.१८७, १.२१२, २.१९९, २.२६६, ३.२५२ (१, २), ३.२५३ (१, २), ३.२५४ (१, २), ३.२५६ (१, २), ३.२६५, ४.६७, ५.३१, ५.३९, ५.५९, ५.९६, ६.३३, ६.४४, ६.७९, ६.३३५, ६.३३८, ७.११७, ९.४२२, ९.४३२, ९.४४२, १२.६६, १३.१४०; **एणेंविण** २.३०७, **एहीं**— ३.२५७, **तुआं**— १.२३४. **वीण**—तरिषायें वीण सागरु। जळें जैसा निर्भरु। १२.१५१. **मज वीण** ९.३१०; **इतर शब्दांस जोडून**— ४.११६, ४.१९२, १०.६३, १०.१४५, १२.६०.

**विणावणि**—विणकाम. तेथ तंतुसमवायें पटीं। जेवि विणावणि दीसे॥ ९.१०५. मग तिये विणावणिचेनि आधारें। लाहाना चौकाडि(डि)यां पटत्व भरे। ९.१०६.

**विणें–वीणें**—जन्म देणें, उत्पन्न होणें. **विणं**—तरि एयांचा पहिला कुरुठा इंद्रियें। जेथौनि प्रवृत्ति कर्मातें विये। आधीं निर्दळूनि घालीं तियें। सर्वथैव॥ ३.२३३. हें असो वयसेचिये सेवटीं। जैसें येक चि विये वांझोटी। ६.१२१. **विआलीं,** हा पाठ **व्यालीं,** सर्पीत या अर्थी घ्यावा, १५.३८८, ज्ञानदेवी, कुंटे–'व्यालीं' १५.४२०, परिशिष्ट (८) पहा; **विआलें**— एणें अज्ञान सांडी(डीं) विआलें। धर्माधर्मे जें॥ १८.१३८०, **वियतां**—कां न वियतां वायुनें। वांझें आकाश रीतें। १४.७५, **वियाला-ली-लें**—इच्छा ज्ञान क्रिया। वियाली हे॥ १३.९८८, १०.९९, १०.२१८, १३.७१०, १५.४८२, १७.२४७, १८.१३८२; **विये** ६.१०३, ७.१७०, ८.२६, ८.८७, ९.२७, ९.२६४, ९.२७८, ११.७२, १३.६२३, १३.१०१९, १४.६५; **आब्रुलि जग विये** १३.९७४; **ऐसेसे संकल्प मन विये** १३.३९८; **प्राची अरुणातें विये** १८.३५४; **विये** १४.८४. **वीणें**—तिहीं योगाग्नीकिं यजिजे। तो दैवयज्ञु वीजे। ४.१२३. **वीउनि**—आपण चि वीउनि दुहिता। न मम ह्मणे पिता। १८.२३२, **वीत असे** ११.२५६, **–जाये** १८.२५२; **वीति, उत्पन्न करतात,** १८.९३; **व्याली**—तेया ब्रह्मातें व्याली। दैविकी इछा॥ ११.५०६, १४.११४; **निंदा दुरितें व्याली** १८.१३८१.

**वितंड**—(१) प्रचंड. ११.३७०. (२) मिथ्या वाद. १३.२२.

**वितान**—विस्तार. **विविधयागवितानें** १५.१८७.

**वितुलणें**—वितळणें, क्षीण होणें. वाचेचें वितुलणें। १८.१५४३. ९.२८.

**वित्त**—धन. **वित्तें मेळवीति** १६.३४५; **वित्त-काम** १८.७५५; **पुत्र वित्त कांता** १५.४५९;

पुत्र वित्त परलोकु १८.९८७; पुत्रवित्तकलत्र १८.९५३.

**वित्पत्ति-त्ती**—व्युत्पत्ति, येथें पांडित्य. **वित्पत्ति**— ९.३७४. **वित्पत्तिअहंकार** १३.७२२. **वित्पत्ती**—जेयाचिये वित्पती(त्ती) गेलें। अज्ञानवेलीं ॥ १३.८३७, त्याचें पांडित्य अज्ञानाचा वेल विस्तार आहे, ज्ञानदेवी–'व्युत्पत्ति तें', कुंटे–'व्युत्पन्नत्व' १३.८४१.

**-विद्-द्**—शब्दास जोडून. जाणणारा या अर्थी. **विद्**—**विदुदयोद्यानद्विरद**, ज्ञानाच्या अरण्यांतील हत्ती, ज्ञानाचा अभिमान नाहींसा करणारा या अर्थी, १८.७, कुंटे – 'अविद्योद्यानद्विरद', अविद्यारूप वनाचा नाश करणारा, १८.७; **आत्मविद्विलासीं**, आत्मज्ञानांत विलास करणारांनीं, १५.६५. **विद्**—**अहोरात्रविद्** ८.१५७, **आत्म**– ५.१४८, ६.१५६, **ब्रह्म**–, **ब्रह्म** (१) पहा, **वेद्**– ८.१०१; **कलाविद्पण**—एथ कलाविदपण कलां। १.३७, येथूनच कलांना कुशलता लाभली.

**विदग्ध**—(१) चतुर, पंडित. ते विदग्धा रसवृत्ती। ह्मणिपैल कथा ॥ १०.४०, ती कथा चातुर्यपूर्ण व रसयुक्त म्हणतां येईल. **मूळशास्त्रपदें विन्यासें विदग्धें वाखाणीन**, मूळ गीताशास्त्रांतील पदें विस्तारानें चातुर्यपूर्वक वर्णन करीन, १४.२९; **विशदबोधविदग्ध** १०.१, **बोध** पहा. (२) करपलेलें. शुष्कें अथवा स्निग्धें। सुपक्वें कां विदग्धें। १५.३७७.

**विद्‌लणें**—नाश करणें. **विदलितामंगलकुला** १८.२, **कुल** (३) पहा; **विदल**, हिणकस, डांक असलेलें, विदल बहू चोखा। मीनलेया वाला एका। १३.१००३, वालभर हिणकस सोनें अगदीं चोख सोन्यांत मिसळलें तर कस उतरतो यास उद्देशून.

**विंदाण**—कौशल्य, निग्रह, फसवणूक, दगा. १८.४५१. **अहंकाराचेनि विंदाणें** ७.२१, **दर्शनाचेनि**– ११.२२८; **तमाचें विंदाण** १४.१७२; **खेळतेयां विंदाणां माझि** १०.२६१; **इंद्रिआं विंदाण लागे**, इंद्रियांचा निग्रह होतो, ६.३६५; **आंवु वेगु विंदाण** १३.२७१, **आव** पहा; **विंदाणियें**, कारागिरीनें, कुशल व्यासानें असाही अर्थ घेतां येईल, १८.४४.

**विदारणें**—फाडणें, पांगापांग करणें. १.१६२, २.२००.

**विद्यमान**—सांप्रतचें. ६.४७१, १६.८६.

**विद्या**—ज्ञान, माहिती, विद्वत्ता. किं परमधाम प्रकट। हें विद्यांचें मूलपीठ। १.३०. तरि विद्यां माझि प्रस्तुतीं। अध्यात्मविद्या मीं ॥ १०.२४६(१). १३.६७१, १३.८२३, १३.९८८, १६.२१७, १८.१४७४. **विद्यांचां गावीं** ९.४७, **–चा झडझडाट** १५.१९०; **विद्येचा पसारा** १३.६५८; **विद्यांचा विश्राम** १७.३३; **विद्येचिया सांगडी** ७.८१; **विद्यारविंदप्रबोध** १०.१, **प्रबोधणें** पहा, **–गौरव** ९.२४१, **–जात**, **–जात** पहा, **–मानें**, विद्येनें व मानानें, १४.१४९, **–वयमाजें** १३.७१४, **–विनयादिकिं** १७.२०४, **–विनोदविभवें**, विद्या, विनोद व ऐश्वर्य यांमुळें, १६.२४०, **–सिंधु** २.४३; **अध्यात्मविद्या** १०.२४६(२), **ब्रह्म–**, **ब्रह्म** (१) पहा, **मंत्र**– ९.४७१, **यज्ञ**– १४.१५५, १७.१८०; **शस्त्रविद्यापारंगत** १.१०९; **सकल विद्यांचें अधिकरण** १३.१, **सकलविद्या(द्यां)चिये श्रृष्टी** १२.९; **विद्या किं वयसा** ९.४९०, **–स्तुति बहूमानें** १६.२२५; **सुविद्य** १३.७२०, **–ता** १४.३२७; **सुविद्या** १०.१३१; **अविद्या**, अज्ञान, माया, तेणें आत्मबोधें तैसें। अविद्यासिं कर्म नासे। १८.२२७, ३.२३८, ४.१२२, १४.८६, १४.९५, १५.२६०, १६.३५, १८.२६५; **अविद्येचें आंधारें** ११.१७७, **–चिया आहुती** १८.१५१६, **–चां गावीं** १८.६८७, **–चिया चिंधिया** १८.९११, **–चिया नीद्रा** १८.४००, **–चा मलु** १८.१२२६; **अविद्ये उणें आणी**, अज्ञान नाहींसें करतो, १३.१६८, **–सी जीणें नाहीं** १८.२६४; **अविद्या जेणें लाठी**, ज्यामुळें अज्ञान बळावतें, १३.११३; **अविद्यांचें दांग उमटलें** ११.२१३; **अविद्येचिये पोटीं उपजत**, जीवाचें विपरीत ज्ञान, १८.४६४; **अविद्या समूळ खाए**, संपूर्ण अज्ञान नाहींसें करतें, १५.४०७; **अविद्यागर्वे** १७.३२७, **–जात**, **–जात** पहा, **–तिमिररोखें** १८.१६४७, **रोख** पहा, **–नाश** १८.१२३७, **–विनाश** १८.१२२७.

**विद्याधर**—गंधर्वांपैकीं एक वर्ग. पितृ ऋषि विद्याधर १५·१९३; विद्याधरसमूह ११·३२६.

**विद्युत्-विद्यू**—वीज. विद्युत्-२·७८; विद्युल्लतेची विडी ६·२२४; विद्युत्स्फुरण ५·११२. विद्यू—युगांतविद्यूचां पालवीं ११·२९६.

**विद्वत्ता-विद्वांस**—विद्वत्ता, पांडित्य. विद्वत्तेचें भूत आंगीं भरे १४·१५१. विद्वांस, विद्वान या अर्थी, जो विद्वांसु डोरु वाहे १३·८२३.

**-विध**—शब्दास जोडून. प्रकार. एवंविध ११·३०७, १३·१२७, १५·३१६, येवं- ११·६८१, गुण-, शोभेस उद्देशून, १३·१०७६, नाना-, नाना पहा; पृथग्विध—तें पृथग्विध करण। कर्माचें यया कारण। तिसरें गा जाण। १८·३२८, ज्ञानेंद्रियांस उद्देशून; द्विविध, त्रिविध-ता-त्व-पण-ध्य, चतुर-, पंच-, नव-, नवविधपण, सं. वा. श. पहा.

**विंधण**—भेदणें. ११·४७३. आकाश विंधलेयां १८·६११; वर्मीं न विंधिजे १६·१४९.

**विधान**—पद्धत, धार्मिक क्रिया, वेदाज्ञा. यज्ञीचें विधान सरे। ४·१४८. ९·२६४, १५·१७७. वैदिकें विधानीं १८·८१६; मंत्रयंत्रविधान, मंत्रयंत्रादि कर्मे करणें, ३·९०; विधिविधानरहितें ४·११७; शिष्टागमनविधान, हा पाठ शिष्टागमविधान असा असावा, शिष्टांचा आचार व वेदांतील आज्ञा यांस उद्देशून, १५·१८७.

**विधि-विधी**—शास्त्राज्ञा, शास्त्रांतील नियम, कर्मे करण्याची रीत, प्रयोग इ. विधि—न लोपीति विधितें। २·२४९. विधितें पालीत। निषेधातें गालीत। मज देउनि जालीत। कर्मफलें॥ १२·७७. १३·८२७, १६·३८२. विधिची आज्ञा १६·२८५,—चेनि अर्घे १८·६९६, —चेनि दंडें १८·८३२,—ची भीड १६·४४४, —ची वाप १३·३१,—चेये वापे १३·३३, —चा वोढा वारा १७·१९०; विधिनिषेध १·२४५, १२·११६, १५·१५६; विधिबोध ७·८७; विधिमार्ग ९·३०४; विधिविधानरहितें ४·११७; विधिविवर्जित ९·१५६. विधी १७·१७८. विधीचेनि वस्त्रें हीन हिंडे १८·५४६; यथागम-विधी १६·९४; वाक्यविधी, वेदांतील आज्ञा, ४·१२८; विहितक्रियाविधी ३·११९; अविधी १८·२३९; यथाविधि-धी, यथा पहा.

**विधुळणें**—विसकटणें. अहळि तें (ते) पूजा विधुळे। १७·७, अहळि पहा.

**विध्वंसणें**—पूर्ण नाश करणें, अस्ताव्यस्त करणें. तेणें दळभार विध्वंसिला। कौरवांचा॥ १·१६१. विध्वंस—विषयविध्वंसैकवीरु १८·१७३४.

**विनट**—चिन्ह. जेणें उरीं हालासि पांपरा। तेयाचें विनट वाहासि दातारा। ११·२०५.

**विनति-विनती**—विनंति, प्रार्थना, याचना. विनति—विनतिए एकिए देंऊ। चित्त देतु॥ १५·२८०. विनतिव्याजें १४·२५. विनती ४·२१४, ११·११२, १३·४०४, १८·८५.

**विनय**—नम्रता. अखंड अगर्वता होउनि असति। तेयांते(तें) विनयो हे चि संपत्ति। ९·२२५. विनयद्रुमांचिये आरवीं ११·३३२; विद्या-विनयादिकिं १७·२०४.

**विनवणें**—प्रार्थना करणें, आर्जव करणें, विनंति करणें. हें सकळी मियां ह्मणितलें। चरणा लागौनि विनविलें। १·६३. विनउं तें थोडें ९·२३३, —लाहें १·६६; विनवावा ६·१३८, —वें ९·३०; विनवावेया लागि ११·५६५; प्रजीं ब्रह्मा विनविला ३·८७; विनविलें १·८०, ५·५, ७·१९२, ११·१५, ११·११०, ११·५६८; विनवीतु १८·२९; विनवणि—विनवणिये साठिं १२·१८; विनवणी ३·२२५, ९·२, ११·४३९.

**विनाश-विनास**—पूर्ण नाश, नायनाट. विनाश—हा विनाशाची वागुर। प्राणियांसि॥ ४·२०१, संशयास उद्देशून. अविद्याविनाश १८·१२२७, जन्म- १०·८२, रजतम- १७·३१४; अविनाश—तें अव्यक्त तूं गहन। अविनाश जी॥ ११·३०३, हा नासतां भूताभासु। एथ आत्मा अविनाशु। १३·१०६०, २·१०५, ९·२९५, १८·१२५२. विनास—सर्वोपाधिविनासें १५·४७७.

**विनियोगणें**—योजना करणें, व्यवस्था करणें. ह्मणौनि स्वधर्मे जें जें आर्जे। तें स्वधर्मे चि विनियोगिजे। मग उरे तें भोगिजे। संतोषेंसीं॥ ३·१२५. ६·२८१. विनियोगुनि १७·१७९; विनियोग—उपयोग, खर्च, समर्पण, जो

असतिये समृद्धी । विनियोगु करी ॥ ३·११९, प्रशस्ते कर्मि तिये । सद्धु(द्बु) विनियोगु आहे । १७·३७६, १७·३४६, १७·३४९, १७·३५०, १७·४०७, १८·७१२; **विनियोगाचें वर्म** १७·३४३; **सच्छदाचा विनियोगु** १७·३८२; **सविनियोगु** १७·४१०.

**विनोद**—कौतुक, करमणूक, चेष्टा. भला जाला विनोदु । कथेचा इये ॥ ४·३. कां लाघविचे विचित्र । विनोद ते ॥ १८·७९४. १८·१३६६. **विनोदवनवाटिका** ९·३१९, **वाटिका** पहा; **विद्याविनोदविभव** १६·२४०, **विद्या** पहा; **विनोदें**, कौतुकानें, मजेनें, सहज, पैं चराचर विनोदें पाहिजे । मग तेणें सुखें घरीं राहिजे । ११·५८४, ५·१७५, ६·४९४, १०·२२, १०·१४८, ११·६९७.

**विन्यास**—मांडणी, रचना, ठेवण, विस्तार. तें चि मन्हाटेनि विन्यासें । १५·५६०, **रचनेनें.** १३·६८२. **विन्यासें**, विस्तारानें, १४·२९, **सोलिवें**–, स्पष्ट खुलासा करून, १५·६६.

**विपत्ती**—वाईट स्थिति, संकट. तैसा वियोगु जेणें दुःखें । विपत्ति शोकु पोखे । १३·५८८, स्नेहामुळें वियोग, दुःख, संकट व शोक पोसले जातात. **विपत्ति होइज**, वाईट स्थिति येईल, १३·७६८.

**विपरीत**—उलट, खोटें. **विपरीत कर्म** १·२१९; **–ज्ञान** ९·१६८; **विपरीता भाग्या** ११·३८५; **विपरीतें चि जाणगेनि जें जें काहिं जाणिजतें'** मिथ्या ज्ञानानें जें जें कांहीं जाणलें जातें, १५·४४९; **विपरीतज्ञान** १५·४८८, **–दीपिका** १५·८१.

**विपलणें**—वरवर दाखवणें, निष्फळ होणें. परि विपलांति आचरौनियां । नाटकी जैसे ॥ १६·३७४, ज्ञानदेवी–'विफळाती', कुंटे–'विफळती' १६·३७६.

**विपलावणें**—वेडावून दाखविणें. देखे अक्षमें कुबुजें । किं विपलावों लागे फुंजे । १३·७५९, आंधळ्या, दुबळ्या कुब्जांना पाहून त्यांना वेडावून दाखवतो, ज्ञानदेवी, कुंटे–'विटावूं लागे' १३·७६१.

**विपाइणें**—क्वचित् मिळणें, दुर्दैवानें सांपडणें. पैं गा मनुष्यांचेया सहस्रां । माजि विपाइलेयां चि एथ धिंवसा । ७·१०. परि ऐसे भक्त विपाइले । बहुवस नाहिं ॥ ७·९९. **विपाऊ**—**प्रसंग.** तंव करणेयांचा चि विपाऊ । जरि ऐसा ही पडे ठाऊ । १३·२८६, हातांनीं कांहीं करण्याचा प्रसंग पडलाच तर.

**विपाएं-यीं-यें**—जर कां, कदाचित्, दैवयोगानें, चुकून. **विपाएं**—मग प्रार्थिला विपाएं । जरि लोभें बोलों जाए । १३·२६७. १०·७१, १३·१०९९. **विपायीं**—तें बुद्धी हीं कवलितां सांकडें । ह्मणौनि बोलीं विपायीं सांपडे । ६·३२. १८·७०७. **विपायें**—ऐसेन हीं प्राणसंकटें । जरि विपायें निगणें घटे । २·२०५. २·२२३, २·२३०, ६·१०४, ६·११६, ६·४३३, ७·८८, ८·११८, ९·९४, ११·३१३, ११·३६२, ११·३६५, ११·५३८, १२·१६१, १३·२७३, १६·१४३, १६·३९९, १७·६२, १७·१५७, १७·२९९, १७·३०६, १८·६६, १८·२४७, १८·२७६, १८·३६६, १८·४८३, १८·५६८, १८·७१८, १८·१०१४, १८·१२३१, १८·१२४५, १८·१४६५.

**विभव**—ऐश्वर्य, संपत्ति. ९·४३१, १०·२८६. **संचकाचीं विभवें** ११·४०७; **विभवश्रियेचां आगरीं** ६·४४२; **योगविभवभांडार** ६·११, **भांडार** पहा; **विद्याविनोदविभवें** १६·२४०, **विद्या** पहा. **वैभव** पहा.

**विभाग**—निरनिराळे भाग, भेद, वांटा. जें सर्वत्र सदा सम । तेथ विभाग अधमोत्तम । मतिवसें संभ्रम । विवंचिती ॥ ४·६९. ९·४०३, १०·२८९, १७·५५, १८·१८१, १८·७२९. **प्रकृतिपुरुषां विभागु** १३·९५१; **अज्ञानविभाग** १३·८५८, **गुण-कर्म**– ४·७६, **दिग्**– १६·३३४, **बाह्य**– १३·४७२, **योनि**– १३·१५८.

**विभांडणें**—युद्धांत जिंकणें, भेद पाडणें. आह्मीं दिगंतिचे भूपाल । विभांडूनि सकल । १·२१८. १३·८४, १६·१२१.

**विभावें**—विशिष्ट हेतूनें. **एणें विभावें** १३·३२८, हा अपपाठ असणें संभवतें, माडगांवकर प्रतींत 'येणें चि स्वभावें' १३·३२८, ज्ञानदेवींत 'येणें चि भावें' व कुंटे प्रतींत 'येणेंचि भावें' १३·३२९, असे पाठ आहेत.

**विभुटणी**—ताटातूट, वियोग. १६·८८.

**विभूति-ती**—अधिक प्रमाणानें ईश्वराचा अंश असणारी व्यक्ति. **विभूति**—तेथ विभूति प्रतिविभूति। प्रस्तुत अर्जुनां सांविजती। १०·४०(१). जिहिं विभूतिं समस्तां। लोकांतें व्यापूनि अससि अनंता। १०·१७०. १०·१९४, १०·१९५, १०·२३८, १०·२८२, १०·३०१. **विभूतिंचा ठाओ** ९·५३०; **सात येकि विभूति** १०·२५४, सं. वा. श. पहा; **विभूतिभेद्**—ऐसेया व्यापका मातें जाणावें। तरि विभूतिभेदीं काइ करावें। परि हें तुज योग्य न्हवे। म्हणौनि असो॥ १०·२४५; **विभूतियोगें**—ऐसें बहुवस व्यापकपण। माझे विभूतियोगें जाण। १०·२०१; **विभूतिविशेष** १०·२१९, १०·२४२; **विभूति-विस्तार** १०·२७९; **प्रतिविभूति** १०·४०(२). **विभूती**—मी माझिया विभूती। आणि विभूती अधिष्ठिलिया व्यक्ती। हें आववें योगप्रतीती। इयेंची मानी॥ १०·१०५ (१,२). १०·१०२, १०·१६८, १०·१६९, १०·१७४, १०·२४६, १०·२७८, ११·३९६. **विभूती(तीं)ची काहाणी** १०·३००; **वेगळालां विभूतीं** १०·२४३, **सिनानां**—१०·२९२.

**विमल**—निर्मळ, स्वच्छ. १·१४, १८·९२. **कांतिविमलें** ११·१३९, **कांति** पहा.

**विमुख**—पाठमोरें होणें, परत फिरणें. विमुख होईल गुरुभक्ती। ३·१०६.

**वियोग**—ताटातूट. ७·१७६, ८·१३४, १३·५८८. **वियोगु पडैल** १३·७६८; **वियोगावेगलें** ८·३१; **योगवियोग**—अथवा योगवियोग। प्रियाअप्रियाचे॥ १६·१९०; **संयोगु वियोगु** १५·२९४, **संयोगवियोगें** १३·६६३.

**विरक्त-विरगत**—आसक्तिरहित, वैराग्ययुक्त. **विरक्त**—जें अपेक्षिजे विरक्तीं। अनुभविजे संतीं। सोहंभावें पारंगतीं। रमिजे जेथ॥ १·५३. २·१७०, ५·१२७, ६·३४२, ८·१०३, १३·७०२, १५·३६. **जीवितेंसीं विरक्त** २·२१४; **विरक्तां भागा फीटलें** ५·१४६; **साभिलाषें विरक्तें** ११·१२८. **विरगत**, त्याच अर्थी, १·१८८, ६·१५०.

**विरक्ति-विरक्ती-विरगति**—अनासक्ति, वैराग्य. **विरक्ति**—परि ते व्युत्पत्ति ऐसी। विरक्ति न रिगे मानसीं। तरि सर्वात्मका नजासि। नोहे भेटि॥ १५·३३०. ६·४२०. **विरक्तिची कव्हणी परी** १५·३७, **–ज्वाला** ४·१२७, **–चिया दृष्टी** ५·११८; **विषयांवरि विरक्ति** ५·१२२. **विरक्ती**—**विरक्तीचें पाणिग्रहण** ४·१२१; **विरक्ती माल न घली** ४·१५२. **विरगति**, त्याच अर्थी. ६·१६९, १३·८०६.

**विरंगुला**—अडचण, आळस (ज्ञानदेवी) अडथळा, सायास (कुंटे). कणु वेंचां विरंगुला असे काहिं॥ १५·४३३.

**विरचणें**—रचना मोडणें. **जडाजडातें विरिचितु** ८·९५, ज्ञानदेवी, 'विरवितु', कुंटे – 'विरवितू', लीन करतो, ८·९७; **विरचता**—मोडला जागारा. नवा विरचता वडु। पृथ्वी न्हवे। १४·३७६, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'न विरवितां' असा पाठ आहे.

**विरज**—मदत, सहाय्य. पांचां पांच विरजीं। होंति मनबुद्ध्यादि सहजीं। १४·१०१, सं. वा. श. पहा. तरि हा भानु तेजें। नापेक्षी जेवि विरजें। १८·८५३. १५·४१७, १८·१५५५. **सामग्रिया विरजिया होंति** १७·३७; **विरजा**—मदतनीस, १·११७, १८·८३३; **विरजे होंति** ३·२६१; **कामां विरजा नोहे** १८·४५३; **विरजेयाचेनि संगें**, विरजणानें, ९·१०७; **अविरजीं**, न विरजलें जाणारें, **अविरजीं दूधाचें भांडें** १८·१४६६.

**विरणें-वीरणें**—विरघळणें, लीन होणें, लय पावणें. **विरणें**—तैसें सविर परि विराळें। हृदय तेयाचें॥ २·३. जंव कठिनपण कां विरे। अहंभावाचें॥ ६·१८७. तेथ मनाचें मेघांडें विरे। ६·४६६. जैसा सैंधवाचा रवा। सिंधू माझि पांडवा। विरालेयां विरावा। हें इं ठाकें॥ १४.३९० (१, २). जो अर्जुनु कृष्णि विरत होता। १५·४२७. २·१५, ६·३२१, ६·३६७, ६·३८४, ७·६३, ११·२४१, १३·६६५, १५·५०८, १५·५१५, १६·२०, १८·१३७१, १८·१५३४, १८·१५३९. **आंगें विरत** १८·२८३, **–विरे** १७·३७२, **– जीवें विरत** १०·११२; **बुद्धिची पुलिक विरे** ६·२४६; **सरे...विरे** १८·९९९; **सांडे तरि विरे** १८·१५३७; **विरवणें**—

पृथ्वी(थ्वी)तें आप विरवी। आपातें तेज जिरवी। ६.२९९. **वीरणें**—जैसा वारा का गगनीं वीरे। मग वारेपण वेगळें नुरे। ७.१११. **१३.४९४, १५.३६९. वीरे अथवा राहे ९.२५४; सरे... वीरे ७.१७२, १३.११३६.**

**विरमणें**—शमन होणें, नाहींसें होणें. आंगें मन विरमे। ६.२१२. एणें चि सत्कर्मे। अशेष हिं अज्ञान विरमे। १५.३९१. **विराम १८.१३५८.**

**विरल-विरुल**—एकादें, क्वचित् मिळणारें, दुर्लभ. **विरल**—तैसेयां विंवसेकरां बहुवसां। माझि विरला जागे॥ ७.१०. **अविरल—जगदुन्मीलनाविरला केलिप्रिया १८.४,** ज्ञानदेवी कोशांत–'जग उत्पन्न करण्याची जी निरंतर क्रीडा ती ज्यास प्रिय असा' हा अर्थ दिला आहे; कुंटेच्या १८९४ प्रतींत अविरलचा अर्थ 'व्यापक', व १९२३ प्रतींत 'निरंतर' असा दिला आहे, यावर **उन्मीलन** पहा. **विरुल**—परि प्राप्तिचां पैली तीरीं। विरुला निंगे॥ ७.१३. ८.१६.

**विरह**—ताटातूट. **विरहक्षोभ** १६.७८,–**वेडी** (डीं) १६.५; **विरही**—वियोगाचें दुःख भोगणारा, ते तनुचेनि हिं वियोगें। विरहिये नव्हति॥ ७.१७६, **विरहिणी १३.३७४, १८.९१६.**

**विराजणें**—शोभणें. **हृदयभुवनीं विराजति** १२.१५३.

**विरुं-वीरुं**—वैर, वाकडें, विरुद्ध. **विरुं**—जें वडिलां येयां चिंतावें। विरुं मनीं॥ १.२१४. १६.३१९. **वीरुं**—जें घेववि तें न मनावें। विष ही वीरुं॥ १६.४५७, शास्त्र जें घ्यावें म्हणून सांगेल तें विष असलें तरी तें प्रतिकूल समजूं नये. २.३५, १६.५७, १७.१०४, १८.६७२. **वीरुं जेयांसि आइकिजे,** वांकडेपणाची गोष्ट ऐकतांच, २.५३; **वीरूं १३.६६८, १८.४८४; वीरूं अथवा नीकें ४.१९९.**

**विरुढणें-विरूढणें**—उगवणें, पिकणें, वाढणें. **विरुढणें**—येणें फलत्यागें सांडे। तें तें कर्म न विरुढे। १२.१३४. निवटलें नुपढुडे। जळिनलें न विरुढे। १४.३५६. २.६६, २.३४६, ६.२२६, ७.३९, १०.९६, ११.२४३, १३.८३७, १८.६७३. **विरुढि**—अंकुर, कोंभ, मग नवी विरुढि फूटैल। उन्मेषाची॥ २.७९, ६.२३४, ८.२१. **विरूढणें**—तरि सर्व भूतांकुरें बीज। विरूढतसे तें मीं॥ १०.२८०. **१४.२५४, १५.१७६, १६.३१८, १८.२५१. जोन्हला विरूढलेयां १४.१२५.**

**विरुद्ध**—विपरीत परिणाम करणारें, अभद्र, गैर. तैसें प्रीती कां प्रमादें। देवेंसि बोलिलां विरुद्धें। ११.५५१. ३.२२१, १४.२२७, १६.१७१, १८.६७५. **दोन्हीं विरुद्धा,** राजस व तामस श्रद्धा सात्त्विक श्रद्धेला बाधक होतात या अर्थी, १७.८२, **भावा–** १८.८९३; **विरुद्धें गोमटीं ११.५४९; विरुद्धा अथवा भलेया १६.७७.**

**विरोधणें**—विरुद्ध जाणें. आणि भलेतिये जाती जन्मावें। मग भजिजो अथवा विरोधावें। परि भक्तां कां वैरियां होआवें। माझेयां चि॥ ९.४६८.

**विलय**—लय, शेवट. **विलइं**—**वेद्याचां विलइं,** ज्ञेयाचा लय झाला असतां, १८.११९७.

**विलसणें**—शोभणें. प्रभा सर्वत्र विलसे बिंबिं। १८.११४२. २.२८९, ८.११४, १८.८७४. **विलास**—भाग्य तेथ विलासु। सुख तेथ उल्हासु। १८.१६१८, १३.२९२; **आत्मविद्विलास** १५.६५; **इंदुवंशविलास** १८.१७८३; **जनलीलाविलास** ११.१३०, **वनलक्ष्मी–** १४.२९३; **वीर विलासे(वीरविलासें)** ११.६५३, **वीरविलासा** १५.५५३; **लास्यविलास,** **लास्य** पहा; **वाग्विलास** १३.११५४; **विषय-विलास** ९.५०४, **शिष्यशास्त्रादि–** १८.१०५८; **विलासिनी** ९.३२०, **अभिनववाग्–** १.२१, **अभिनवणें** पहा; **विलासिया** १०.१, १५.३३०.

**विलौनि**—ब्रह्मदेवाच्या एका दिवसाच्या अवधींत, येथें एका दिवसांत. विलौनि पांति उठी येकसरी। ८.१५३. **१३.७६८. वील,** ब्रह्मदेवाचा एक दिवस, ८.१५४.

**विवक्षा**—बोलण्याची इच्छा, येथें वर्णन. ११.२६७.

**विवंचणें**—विवरण करणें, फोड करून सांगणें, भेद दाखविणें. इयें भूतें जेया परीं होंति। अथवा लया हान जांति। ते मज पुढें प्रकृति। विवंचिली देवें॥ ११.७०. ४.६९, ४.७८, १०.१७३, १३.९१, १३.९३४, १५.४४४, १६.१५४, १८.३१२, १८.७६५. **विवंचना**—विचार, चिंता, निवड, भेद, कां खैरचंदन काष्टें। हे

विवंचना तंव चि घटे। जंव नेघपति येकावटें। अग्नी माझि॥ ९·४५५, ५·१५४, ७·१७, ९·४६, १३·९३८, १७·७०, १८·६२४; धृतिची विवंचना १३·१४२; विवंचनेपुरतें ६·३०९; कर्माकर्मविवंचना ४·८३, गुण– १३·१६०, प्रकृतिपुरुष– १३·१०२६.

**विवर**—छिद्र, गुहा. कां काखे सूनि वसुंधरी। जैं हिरण्याक्षु रिगाला विवरीं। ११·३५५. १८·१५७६. **मध्यमामध्यविवरें**, आज्ञाचक्राच्या मध्यभागांतून चढून, ॐकाराच्या तिसऱ्या मात्रेचाही यांत उल्लेख केला आहे, १२·५५; **व्याघ्रविवर** १३·५१३.

**विवरणें**—विस्तार करणें, स्पष्ट करून सांगणें. हृदयातें अनुभउ चि विवरी। ६·१६६. चिंतूं नये तें विवरी। १३·७७१. १·७०, २·२७४, ६·८८, ११·२९४, १५·४३५, १८·४३. **विवरीतु असे** २·८७; **विवरूनि** ५·१६३, १८·१४४४, **–रौनि** १५·३१०, **–रौनियां** ६·१५२.

**विवर्जित**—त्या शिवाय. **विधिविवर्जित** ९·१५६.

**विवळणें**—उदयास येणें, उगवणें. चाड चि निचाडां करी। ऐसी मनोरथीं इप थोरी। तेणें विवळलें जेथ आंतरीं। तेथ ढोलु आला॥ ६·१३५. ४·१२६. **विवळतिये सवळे** १६·३; **विवळ**– स्पष्ट, **विवळ करूनि** ५·१६३; **सविवळें**, स्पष्ट करून, १५·२०७.

**विवसी–विंवसी**—किळस, कंटाळा, भय, हडळ. **विवसी**—जेयाची घेति विवसी। तें जडौनि ठाके जीवेंसीं। ३·२३२. अथवा विवसी पळे मग चडे। निधान हाता॥ ११·७५. १६·४१५. **विंवसी**— जैसी मंत्रज्ञातें विंवसी। भूलवी कां॥ २·३१२. ७·९१, १३·५७२(व), १७·३०९, १८·७७५. **विंव(व)सिया**, ठेव्यावरील हडळीला दूर करण्याच्या प्रयत्नास उद्देशून, १३·५३५.

**विवस्वत**—सूर्य. ४·१५, ४·१६, ४·३६. **वैवस्वत**, सूर्य, ४·४०.

**विवाद्**—निर् या उपसर्गास जोडून, निःसंशय या अर्थी. १३·१०३२, १६·२२९. **निर्वेवादां** **न्हैल** १३·३२६.

**विवाह**—लग्न, लग्नविधि. १६·३०२, १७·१८८, १८·७९२.



**विविध**—नाना प्रकारचें, नाना प्रकारें. तिहिं विविध लोक सृजिले। १०·१००. १·९४, २·२६०, ११·३२६. **एकु ना विविधु** १३·११०५; **विविध आइकिजे** १·२६१; **विविधा अवस्था** १८·८६०, **– औत्सुक्याची दाटि** १८·१५४२, **–पूजा** १७·२४४; **वासनांतराचिया विविधा समिधा** ४·१३४; **सोमादि विविधा ओषधी** ९·२६६; **विविधें प्रबंधिं**, निरनिराळ्या विषयांवरील काव्यरचनेस उद्देशून, १३·६८; **विविधयागवितानें**, नाना प्रकारचे यज्ञविस्तार, १५·१८७; **विविधव्याधिगजरें**, नाना प्रकारच्या व्याधींच्या घोषानें, येथें गजबजाटानें, हलकल्लोळानें, १३·४९२, ज्ञानदेवी – 'वयव्याधिगजरें' १३·४९४.

**विवेक**—सारासाराचा विचार, प्रकार, वेगळेपणा, भेद. कृष्णा विवेकु एया कारणें। पूसिला तूतें॥ ३·१०. मज विवेकु तो सांगावा। मन्हाटा जी॥ ३·१७. कां विवेकु हा नेणवे। भ्रांतितें॥ ५·८९. तरि स्पर्शु आणि शब्दु। रूप रसु गंधु। हा विवेकु पंचविधु। ज्ञानेंद्रियाचा॥ १३·११७. ३·६, ३·१९५, ५·८५, ६·४१४, ६·४६५, १०·७३, १३·१०३०, १४·२९७, १४·४०३, १५·२२१, १६·१०९, १८·१०६४, १८·११२९, १८·१६१३. **विवेकाचा अंकुरु** १८·९९५, **–ओलावा** ९·१८८, **–चिये कांठिं** १५·५०४, **–चे गांव** ५·१३८, **–ची गोठी** ४·२, **–ची न्याये** ३·२४७, **–चेनि पैसें** १५·३५१, **–ची भाष** ४·२४; **विवेकें महामंत्रें** ९·२४२; **विवेकाचीं सुलक्षणें** १४·१८; **खोलें विवेकें** १५·२९९; **शुद्ध विवेक** १५·२६९; **विवेकु घोंटो** १४·४०८; **विवेकाचा तागा न लगे** ७·८८; **विवेकु मंथा केला** ४·१२९; **विवेकाचिये राणिवे बसे** ६·४६४; **विवेकु राबणी करी** १४·२०४; **विवेकाची वाणि फीटो** १३·११५५; **विवेकाचा ही सोसु तूटे** ४·१६२; **विवेका वरि** १४·२२०, **विवेकावरि** १·२२; **विवेकामृतसागर** २·३७३; **विवेककिरणसंगें** १६·८; **विवेकग्रामिचे मुली** ६·४४९; **विवेकजात** २·३२०; **विवेकतरुचें उद्यानवन** १·२८; **विवेकतीर्थतट** १८·१००५; **विवेकुदीप**

४·५३ (२); विवेकद्वेषें १८·१२७१, –बलें १८·१२५६, –मूठी १८·१०४२, –श्रवणें १८·७८०; विवेकुसाहाणें (णे) १५·२३६; विवेकसिंधुचें पार ६·११; आत्मविवेकीं १८·१२५५; कार्याकार्यविवेकीं १६·४६३, १८·७१३; कृत्याकृत्यविव(वे)कीं १६·२४७; दोषादोषविवेक १४·२०६, प्रकृतिपुरुष– १३·९५३, १३·१०२९; विवेका वेलीची (विवेकवेलीची) लावणी १२·१२, ज्ञानदेवी, कुंटे–'विवेकवल्लीची' १२·१२; विवेकवंत १·१४; विवेकिया ४·५६; विवेकियें(ये) २·१०२; विवेकी ६·१०६, १३·५२; अविवेक १·७६, १७·२१९; अविवेकाची काजली ४·५३(१),–चेनि माजें १४·२४६,–चेनि पाएं पूसूनियां १८·६२०; अविवेककुमारत्वा (अविवेक कुमारत्वा) सूकलें ४·१२१; अविवेक-महामंत्र १४·१७५; अविवेकियाचिये दीठी १५·३३८; अविवेकिये २·२४३; अविवेकी २·२५४; सविवेकमतिपाटव ९·२४१, मति-ती पहा.

**विशद–विषद**—स्पष्ट, उघड, शुद्ध. विशद— माझि आत्मचर्चा विशद । उदंड गांति ॥ ९·२०९. अक्षरां माझि विशदु । अकारु तो मीं ॥ १०·२४९. १०·२३, ११·४७५, १३·१५०, १८·४८, १८·८८, १८·७२७. नागरिं बोलिं विशदु सांघों १३·११४९; विशदें निरोपीन १६·४०; विशदबोधविदग्ध १०·१, बोध पहा; विशद-विद्यावधू-वल्लभ १४·३, वधू पहा. विषद— विषद दाविलें १७·२३९.

**विशाल**—मोठें. अकार चरणयुगुल । उकार उदर विशाल । १·१९. ९·३८५, ११·२२४, ११·३५४, ११·४७८. अपारें आणि विशालें ११·१४५; एकें न्हस्वें एकें विशालें ११·२२४.

**विशिष्ट**—विशेष प्रकारचें, विशेषलक्षणयुक्त, श्रेष्ठ. विशिष्टां ब्रनांचे फोंक । १५·१८९.

**विशेक–विशेख**—ज्ञान (राजवाडे), भेद. विशेकु १८·२७१, ज्ञानदेवी–'विवेकु' १८·२७३. विशेख—विशेष (हंस कोश). कां गेलेयां एकापकु (एका एकु) । वाढे तो शून्यविशेखु । १८·१२०६, बाकी राहिलेलें, शिल्लक, एकाएक पहा.

**विशेष**—अधिक, भेद, असामान्य प्रकाराचें, मुख्यत्वेंकरून. मग वर्णाश्रमासि उचित । जें विशेष कर्म विहित । तें ही ओलखावें निश्चित । उपेगंसीं ॥ ४·८९. हां हो गूळ साखरे मालेयाचे । बांधे एका चि रसाचे । परि पाहतां गोडियेचे । विशेष नाहिं ॥ १०·३२. ७·१५३, ८·१३४, ८·१५६, १४·३५४, १५·५६१, १७·२३८, १८·८७०, १८·१३४८. विशेष गुण ९·२३९; कृत्याकृत्य विशेष १३·४८०; सामान्य विशेष १०·२८८, –आणि विशेषा १३·३२२,–विशेष १०·२९१; विशेषें १·२२, २·२६८, ३·१५८, ६·३०, ६·१३०, ६·१६३, ६·४०३, १०·१२०, १३·८४३, १८·१७७९, कार्य– १४·२७४, क्रिया– २·२४९, पर्व– १३·८१४, पात्र– ९·३९५, भोग– १२·१९०, वर्ण– १२·७६; विशेषेंसीं १६·४६०; आर्त्तिविशेष ५·६९, क्षेत्र– १३·६, पुरुषु– ११·३०४; भाग्यविशेषिं १८·१८८; मार्गामार्गविशेषीं १६·२४७, रजो– १४·३४१; वर्णविशेषवसें ३·८८; वाद्यें-विशेषिं, वाद्य पहा; विभूतिविशेष १०·२१९, १०·२४२; निर्विशेषा, भेदरहित, गुरूस उद्देशून, १८·११; सविशेष ३·१६६, १३·४९८.

**विशेषण**—गुणनिदर्शक शब्द. जिहिं विशेषणीं विशेषिजे । तें दृश्य नव्हे रूप तूझें । १८·१२.

**विशेषणें**—भेद दाखविणें, वर्णन करणें. अर्जुना तो चि गा योगी । विशेषिजे जगीं । ३·७५. तेयांची समतादृष्टि बोले । विशेषूं काई ॥ ५·८७. १२·१४०, १८·१२. सामान्यत्वें विशेषिति, सामान्य समजतात या अर्थी, ३·१९२.

**विश्रमणें**—विसांवा घेणें, थांबणें, लय पावणें, लीन होणें. जेयाचें अहं विश्रमे । आत्मरूपिं ॥ १५·३९१. विश्राम, विसांवा, विश्रांति, समु तो सामाविला । विश्रामु विश्रांती आला । १८·१२११, १०·१३३; विद्यांचा विश्रामु १७·३३, विश्रांतिचा– १५·५१५; महदादिविश्राम-शालिका, महदादि तत्त्वांचें विश्रांतिस्थान, १४·६७; स्वानुभवविश्रामें १८·७९०.

**विश्रांति–विश्रांती**—विसांवा. विश्रांति—संभूति जेणें संभवे । विश्रांति जेथ विसंवे । १८·१३१२.

**व्यापारु**—१८·७३४, **संगु**—२·२३०; **सांडिती**—अंगिंसि दोषाइ । सांडिती मेघ ॥ १८·७३१, १८·२२५; **सांडितील** १८·२१७; **सांडितेनि अवसरें** ८·२०२; **सांडीति** १६·३; **सांडिला**—जो नवें ऐसा जाला । संगि तो कि सांडिला । म्हणौनि सुखें सुख पातला । अर्जुना ॥ ५·२१, ६·२४२, ११·६४८, १६·४३७, १७·२२५; **आंनी सांडिला** २·६९, **शुभाशुभीं**—१८·८३६, **संसारभयें**—१८·६९१; **सांडिलिया** १८·६२८, **गजबज**—१८·१०१६, **नोकलिया**—१३·२७२; **सांडिली**—जे सांडिली आहे संगती । अहंभावाची ॥ ५·५६, **उखीविखी सांडिली** १७·३९, **चाड**—११·४३७, **पातकांची अटवी**—७·१६८, **मातु**—१·१२०; **कुरोंडी सांडिली आहे** ८·१३८; **सांडिलीं** १७·१२७, १८·२१५; **पांचे कुंडें सांडिलीं** ४·१२७; **सांडिलें**—त्रिदोषीं सांडिलें शरीर । १६·४३६, २·१९७, २·२७७, ३·५८, ३·२४८, ११·६१०, १४·३४९, १५·२५८, १७·२२४ (सां), १८·१२६२, १८·१४९१; **आनंदरोप उपडूनियां सांडिलें** ३·२४८, **चौहटां**—९·४३५; **वायें स्वपतितें सा(सां)डिलें** १८·९३९; **लौकीक सांडिलें** ५·९७, **सर्पं कवच**—८·६५; **सांडिलेनि** १८·१३८४; **सांडिसि**—तूं ऐसा तैं होसी । जैं मोहाते(तें) येया सांडिसी । आणि वैराग्य मानसीं । संचरेल ॥ २·२८०; **सांडिसील** २·२०१; **सांडीन**—वांचूनि उचित कर्म प्रासंगिक । तयातें म्हणे हें सांडीन बद्धक । ६·४८; **सांडील**—तें मन आपुला स्वभाऊ । सांडील काइ ॥ ६·४१५, ३·११२, १६·४३०; **कोलिसा कालिमा सांडील** १६·२८३; **सांडुनि**—**अहंभावाचें ओझें सांडुनि** ७·९५, **आस्तिकी बुद्धि**—१८·६०, **दलें**—१५·२३५, **फलाचा संगु**—२·२६७, **स्तुति**—१४·१५; **ज्ञान जैं सांडुनि जाए** ९·३०२; **वेला सांडुनि उते** १६·३९१; **सांडुनि घाली** १८·१२३; **सांडूनि**—आंग सांडूनि छाया । आलंगिसी कां ॥ ११·६१९, २·२२५, २·३६६, ३·१७८, ३·२२७, ४·६, ५·१०४, ५·१५२, ७·४७, ९·२०६, ९·३६८, ९·३७३, १०·७१, १०·२९७, ११·३५४, १४·२१६, १४·३१०, १४·३५०, १४·३७९, १४·४०३, १६·७४, १६·७३, १७·२३९, १७·३१५, १७·४११, १८·१५७, १८·१७२, १८·२१९, १८·४८७, १८·५५४, १८·१२४४, १८·१३८२; **ताट सांडूनि** १५·३८, **निषिद्धें काम्यें**—१८·१४९८, **संकल्पविकल्पाचें लुगडें**—१८·७३७; **कल्पना सांडूनि पाइं** ९·८१; **सांडूं**—तेथ लवण जैसें जळातें । सांडूं नेणें (णे) ॥ ६·३८७, **सांडूं पाति** १·१५४, —**शके** ८·२३९; **सांडूनियां**—सर्व विषइं आस्था । सांडूनियां ॥ २·३१५, १·२२०, ३·१३१, ६·१५५, ७·१०२, ७·१५०, १२·५६, १२·२०५; **सांडूनु** ६·२९५, १३·९३, १७·२२६; **सांडे**—कि त्यजिलें कर्म सांडे । ऐसें आहे ॥ ३·५१, येणें फलत्यागें सांडे । तें तें कर्म न विरुढे । १२·१३४, ३·८२, ३·११७, ५·२५, ५·३३, ६·५८, ८·२०३, १७·१, १७·३९३, १८·१९१, १८·२२२; **सांडे तरि विरे** १८·१५३७,—**न जोडे** १८·१९१; **सांडौनि**—कणु सांडौनि उपणिला । कोंडा जैसा ॥ ९·३२९, म्हणौनि फलि लागु । सांडौनि देहिं संगु । कर्म करावि हा चांगु । निरोपु माझा ॥ १८·१७४, ४·१०७, १३·५८८, १६·१३३ (१), १८·४०२, १८·८९०; **सांडणें**—जें निपटौनि कर्म सांडिजे । तें सांडणें संन्यासु म्हणिजे । १८·९१· (२), ८·२५८, १६·६९, १८·१७७; **सांडोवा**—टाकणें, कुरवंडी (हंस कोरा), ९·३७७(१), १३·१६७; **सांडवणें**—**श्रद्धा सांडविली** ६·४३४; **सांडवीजती**, टाकवलीं जातात, स्वचेष्टा संभाषणें । सांडवीजती ॥ १८·७३८, इंद्रियांचे व्यापार टाकविले जातात, टाकावयाला लावतो या अर्थी; **संडणें**—वरील **सांडणें** च्या अर्थी, ज्ञानदेवींत व कुटे प्रतींत कांहीं ठिकाणीं ह्या क्रियापदाच्या रूपांऐवजीं **सांडणें** चीं रूपें आलेलीं आहेत; **संडणें** च्या रूपांपुढें **न** सहित आलेलीं रूपें **संडणें** किंवा **सांडणें**चीं असणें संभवतें; **संडी**—आयुष्यहीना जीवातें । देह संडी जेविं अवचितें । तेवि निदसुरें द्वितें । संडिले जे ॥ १५·२६१ (१), **शरीरातें**

संडी १५·३३२, ज्ञानदेवी, कुंटे–'सांडी' १५·३६४; संडीं १८·७३९, ज्ञानदेवी, कुंटे–'सडीं', मोकळीं, शुद्ध, १८·७४२; संडिलासि १५·५४८; संडिले १५·२६१ (२); संडिलें—सर्वां कर्लि संडिलें १५·४७६; संडुनु १५·४३३, ज्ञानदेवी, कुंटे–'झाडूनि' १५·४६६; संडूनि—अनात्मवर्गु नीर संडूनि १५·२६६, ज्ञानदेवी, कुंटे–'सांडूनि' १५·२९६; संडौनि—मोहमान संडौनि गेलें १५·२५५, ज्ञानदेवी –'सांडुनी', कुंटे–'सांडोनि' १५·२८५; संडौनु—शस्त्रें संडौनु १·२६४, ज्ञानदेवी, कुंटे–'सांडूनि' १·२६५, सोये– १५·७१; संडणें–टाकणें, उठिलेनि वैराग्यें एणें। त्रिवर्गु हा कैसा संडणें। १५·२३३, ज्ञानदेवी, कुंटे–'सांडणें' १५·२५६; न सहित आलेलीं कांहीं रूपें: न संडावा– स्वधर्मु कव्हणीं न संडावा। ३·१४३; न संडावि १८·१४८, –संडावी ९·२८१, १६·४६०, –वीं ३·११६, –संडावें ३·१५८; न संडि ५·६६, ज्ञानदेवी–'न संडीं', कुंटे–'न संडी' ५·६६; न संडिजे २·२६५, १८·१४९, १८·१५०, १८·७५०, –संडितां, विषयसंगु न संडितां ५·९६, ज्ञानदेवी, कुंटे–'न सांडितां' ५·९७, ३·१५१, ६·५१, ९·३७९, १८·३३७, –संडिसि, धीरु कहिं न सांडिसि। २·८, ज्ञानदेवी, कुंटे–'न संडिसी' २·८; न संडी— आणि विषयांची गोडी। जो जींत मेला न संडी। १३·७०१, पुढील रूपांत कांहीं ठिकाणीं सांडणें चीं रूपें ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत आलीं आहेत, २·३५७, ६·२३३, ८·१११, १२·११५ (डीं), १३·५४२, १३·८५० (डीं), १८·७५४, १८·७५६, १८·८५१, १८·१०३८; न संडीं १२·८, १३·४३५; न संडीति ७·१७८, –संडीतु १८·९०५, –संडूनि १८·५८; नोंसंडी, टाकीत नाहीं, मग नोंसंडी जन्हें नेला। तोडौनु आधा॥ ६·७९.

**सांडस**—पकड, चिमटा. कां चांचोडाचोनि सांडसें। खांडिजे पयपाणी राजहंसें। ९·४४. दाढाचां सांडसिं ११·४१०, ज्ञानदेवी–'दाढांचां', कुंटे–'दाढांचे' ११·४१५.

**साड्वल**—शाड्वल पहा. १८·४३१.

**सांत**—असणें क्रियापदाचें असत, असतां या अर्थी झालेलें रूप. सांता (पु. ए. व.), उचंबलला सांता ७·११४, गेला–८·१९६, जाला–७·१, ७·१६३, १३·६२४, नियमिला–९·२८३, सेलिला–१३·४९५, स्मरतु–८·११६; साती—कां लवणाची कुंजरी। सूदली सा(सां)ती सागरीं। १५·२८६; सांती—आली सांती ७·९०, टेंकली–७·४; सांतीं (न. अ. व.)—अकालिचीं अभ्रें जैसीं। ऊर्मीवीण आकाशीं। हारपति आपैसीं। उदैलीं सांतीं॥ ४·११६; सांते (पु. अ. व.)—चिंतीत सांते ९·३३३, जाणत–८·६७; तिये सांते, तसे असतां, पिठाचा विक्रिरा। तिये सांते॥ १३·३२०, कुंटे–'तियेसाते', त्या बरोबर, १३·३२१, दाते कोशांत या संदर्भात 'बाजार' हा अर्थ दिला आहे, यजित–९·२६२; सांतें (न. ए. व.) —सूर्ये दाखविलें सांतें। काइ एक न दिसे एथें। १७·३१७, सूर्यानें ज्यावर प्रकाश पाडला तें काय दिसणार नाहीं बरें?; पडिलें सांतें १३·१५८.

**सातरिया**—सातरें, सप्ताह. सातरिया टाकिति, सात दिवस उपोषण करतात, १७·९७.

**सातवाकड**—सात दिवस सतत पाऊस पडणें. अमृताची सातवाकडी १३·६३९.

**सातवेउली**—सात नांग्यांची इंगळी. १६·२५७.

**साद**—हांक, आवाज, गर्जना. साद हि अंतष्करणें। करवे चि ना॥ ११·५७७. १५·४५८. आकाशाचा सादु १५·३४७, आकाशा सादु घातलेयां १७·२७८.

**सांदा**—सांधा, जुळणी. केउता सांदा आकाशा। पाखाणेंसि॥ १३·१०९३. १४·३८७, १५·१३०.

**सांदुकणें–सांधुक्षणें**—पेटणें, भडकणें. सांदुकणें —वडवानलु सांदुकला १·९०; वज्राग्नीतें सांदुकिलें १४·१६१. सांधुक्षणें—तेणें सांधुक्षणें ज्वाला समृद्धा। तेथ वासनांतरचिया सामिधा। ४·१३४.

**साद्यंत**—आदि अंता सहित, सर्व, पूर्णपणें. विस्तरैल तन्हैं सांघावा। साद्यंतु चि॥ ५·१६६. १२·२२६. साद्यंत गीता १८·४३; साद्यंतां, पूर्णपणें, साद्यंतां माया निरसिली ११·६४;

साचंतें पाठिं तिये साचंते(तें)। निहाली मूर्त्तितें। ११·५१९, **साचंतपण,** व इतर संदर्भ **आदि** (१) पुढें पहा.

**साघ**—साथ, सोबत, मदत. **जेथवां ज्ञान चि साध करी** १७·६२.

**साधणें**—मिळविणें, संपादणें, कार्य सिद्धीस नेणें, ताब्यांत घेणें, मारणें. हे शस्त्रेंविण साधिति। दोरेंविण बांधिति। ३·२५३. हे मारिले ते थोडे। आणिक ही साधीन गाढे। १६·३५०. १०·२३४, १८·४५२, १८·६५३, १८·१२१८, १८·१६६२. **साधावेया**—ताब्यांत घ्यावयाला, मारावयाला, एयांतें साधावेया लागि। जें बळ बाणिजे आंगीं। ३·२६०, ४·१५८; **मृगातें साधावेया बुद्धी** ३·२११; **साधिजत असे** १५·४०, **–आहाति** ११·४१९; **न सधीति** १६·३९५; **साधक,** मुमुक्षु, जें विषयांतें साधक। त्यजीति नियमें॥ २·३०१, ६·१७२, ६·२९७, ६·४७६, ११·६०८, १२·८, १३·५३५, १८·५९७; **साधकांतें भेडसवी** ६·२१९; **साधकांचे सिद्ध जाले** ६·१५६; **साधकजन** ३·३७, **–दशा** ६·४६२; **साधन,** संपादनाचें उपकरण, जीवना मुख्य साधन। वन्हि मीं चि॥ १५·३७८, ३·१४७, ६·३२६, ६·३३७, १०·१३, १४·३९९,१६·४५, १८·१२३७, १८·१४४२; **साधनां आरंभु** १८·१४२७; **तपादि साधनें** ९·३९५, **योगादिकें – ३·९०; संसाराचें चि साधन** ७·१४४; **साधनजात** ६·४६४, **–बळें** ८·११३, **–वरि** ७·१५२, **–हातियेरु** १८·१०७७; **उचितसाधनसमृद्धि** १६·३८२; **प्रजासाधनीं** १६·३०१; **योगसाधन** ६·४२४; **वेदयज्ञादिसाधनें** ८·२६२; **साध्यसाधनप्रकारें** १८·२५४ (२); **साधना**—(१) साधनाला, साधनासाठीं या अर्थी **साधन** शब्दाचें रूप, **जें साधना अपटांतरिं ठेलें** ११·६१०; **साधना आपु नव्हे** २·१४८; **हें साधना आया नैये** २·३१०; **साधना भजावें लागे** ३·१४८; **साधना जोगें न्हवे** ११·६०६; (२) (स्त्री. ए. व.), संपादन करण्याचा मार्ग, रीत या अर्थी, **साध्यसाधना** १८·१३७६ (२); **साध्यसाधना खेंव** ६·५९ (२); **साध्यसाधनातीत** १८·११३१(२), **–दिक्** १३·९३२ (२), वरील कांहीं जागीं **साधन** शब्द असणें संभवतें; **साध्य**—साधण्यास योग्य, ६·५९ (१), १८·२५४ (१), १८·११३१ (१), १८·१३७६ (१); **सिद्धसाध्यभोजन,** तयार केलेलें व श्रम घेऊन करावयाचें भोजन, ३·३८.

**सांधणें**—**संधान** पुढें पहा.

**साधारण**—सर्वसामान्य, मध्यमप्रतीचें, साधें, नेहमींचें. नाना घनीभू(भू)त सुवर्ण। जैसें निहालितां साधारण। मग अलंकारीं बरवेपण। निवाडु दावी॥ १·४४. तैसा सामान्यत्वें पाहिजे। तरि साधारणू चि देखिजे। ३·७३. ३·१३३, ६·३३९, ८·६८, १०·२८२, ११·३४५, १८·२३५. **साधारणु आणि चांगु** १०·२८९; **साधारणें साकारें सौम्यें** ११·१९८; **असाधारण**—तेयाहीहूनि असाधारण। हें स्नेहनवळ॥ १·१९९, १·९६, १·२२२, ६·२१, ११·४२२; **असाधारण व्याप्ति** ११·३१३; **असाधारण फुगे** १६·३७६; **असाधारणें** ११·२२८, १६·३३.

**साधु**—संत पुरुष, चांगलें. तेथ हा गा सछ्छु(ब्दु)। येरिं दो प्रवुद्ध। प्रयुंजिला करी साधु। कर्मातें तेया॥ १७·३९४. १३·१००४. **साधूं, साधूंना,** ७·९०, **साधू(धूं)चा मानु** ४·५२, **– निरोपितु** १·८२; **साधुकथा**— आइकें· वाचा जेथ विसंवे। ते साधुकथा॥ ९.१८६, **–वृंद** ३·२४६ (२),**–संगें** ७·१२५, **–सेवा** ४·१६४, **– हृदयराउळीं** ५·१४१; **असाधु** १७·३९६; **साधुत्व** १७·२१६, **अ–** १७·३९३; **साध्वी**—साध्वी शांति नागविली। ३·२४६(१).

**साध्वस**—भय. **साध्वसें,** भय पावून, ११·३८.

**सान**—लहान, क्षुद्र. जैसे समुद्रा माझि बुडडे। साने दीसति॥ ११·२३८. जैसें थोर विष भूवंगीं। आंग सानें॥ १६·२५१. ८·८५, ८·२६२, १६·३२९, १७·५(नी), १८·६३ (नी). **साना....थोरु** १५·१९६; **थोर** सहित आलेले इतर संदर्भ **थोर** पुढें पहा; **साना बुडडा** ७·६७; **सानें मोठें** ७·९; **साना आवडे** ११·६६५; **सानिव—सानिवां दीसे** १५·३१२; **सानीव—आंगीं सानीव धरूनि** १·४६;

सानुले, अगदीं लहान, १३·२४८; सानेजणें—लहान होणें, परि अपाडें सानेजांती । ६·२६३, ज्ञानदेवी, कुंटे–'अपाडें सानेजती' ६·२६३.

**सान्हाउ—**कवच, चिलखत (राजवाडे), आधार. मना होये सान्हाउ । धैर्याचा ॥ ६·१६५.

**सांपडणें—**मिळणें, बंधांत पडणें, संकटांत पडणें. परि कलिकेमाझि सांपडे । कोवलिये ॥ १·२०१. ३·६५, ६·३२, ६·३४, ६·३१६, १०·७६, १३·१७९, १३·५४७, १६·२७६. **काउला टालिये सांपडे** १७·२९९; **सांपडतें—**जें जें नांवरूपा सांपडतें । १५·४४७; **सांपडला—आत्मा सांपडला असे** १८·३७५, **–ली—**जीवपंचानना सांपडली । हरिणिकुटी ॥ १३·१०६४, **–लीं** १०·१९०, ११·४३०; **सांपडलें—**सुखासि सुख जोडले । जें तेज तेजासि सांपडलें । १५·५१४, ४·१६१, **–लेनि** ११·२४५, **–लेयां—सांकडां सांपडलेयां** ११·३१९, **–लों** ११·३२४; **सांपडविणें—**जो सन्मार्ग भुलवी । मग अधर्माचां अडवीं । सूनि वाघां सांपडवीं । नरकादिकां ॥ १८·१०५०; **न सहित सांपडणेंचीं रूपें :** न संपडे गा सर्वथा । जेवि भुर्षि कणु ॥ ९·१३५, ८·१७७, ११·१४६, ११·१५४, ११·२६८, ११·६७४, १२·४२, १८·१३३५.

**सांपे-सांपें—**हल्लीं, सध्यां, प्रस्तुत. **सांपे—**आणि तूं तंव कृष्णा सांपेचा । ४·३७. **सांपें—**तो म्हणे उवाईं पडिलां सांपें । ९·५०४. ११·१६८.

**सांप्रत—**हल्लीं. **सांप्रतें** २·९७,४·१८.

**सावरें—**पाणी (हंस कोश), अंगण (राजवाडे). जेथ चंद्रु सिंपे सावरें । ९·३२१, ज्ञानदेवी, कुंटे–'सांबरें' ९·३२४.

**साबला—**पहार, भाला. 'साबळा'—'बर्ची' (हंसकोश). कवतिकें जें जल्पे । तें सावलाहुनु रूपे । १३·६६१, तें भाल्यापेक्षां जास्त टोंचतें.

**साम—**वेदऋचा, सामवेद. वेदराशिचेया सामां । आंतु बृहत्साम प्रियोत्तमा । १०·२५८. **सामवेद** १०·२०७.

**सामग्र-ग्रि-ग्री—**सहाय्य, उपकरणें, तयारी, विपुलता. **सामग्र—करणसामग्र,** इंद्रियरूपी उपकरणें, १८·७६२. **सामग्रि—सामग्रिया** १७·३७, १७·२८२; **सर्व सामग्रियेचा ठावो** १८·८६९; **अष्टांगसामग्रियेचें दीप** ६·४६१; **तपसामग्रिया निफजति** ४·१३९; **देहगेहसामग्रिया** १३·७२६. **सामग्री** ३·१६१,१८·९९०, १८·१४९०.

**सामध—**समतोल. **सामधेनिआ—**समधातपणें (राजवाडे). सामधेनिआ एं धरावें । ६·१८५, समतोल राहील असें.

**सामान्य—**सर्वसाधारण, नेहमींचा. तें हें सामान्य अन्न नोहे । ३·१३२. म्हणौनि सामान्य गा नोहे । हें सांवतां वडिलि गोठि आहे । ७·१४. **एर सामान्य** सकल, सर्व सामान्य लोक, ३·१५७, **येर सामान्य** ११·४१६; **सामान्य विशेष** १०·२८८, **– आणि विशेष** १३·३२२, **सामान्यविशेष** १०·२९१; **सामान्यज्ञान** १८·४६८; **सामान्यता—सामान्यता बोलैल,** अगदीं सामान्य आहे असें समजेल, १८·१४८८; **सामान्यत्वें पाहिजे** ३·७३, **– विशेषिति** ३·१९२; **सामान्या,** वेश्या, सामान्या भली जंव आंग । न सिवे तंव ॥ १८·२४८; **सामान्या स्त्रिया जुवारी** १७·२९५; **कां सामान्या बीक आलें** १३·६९९.

**सामुद्रिक—**ज्योतिषशास्त्रांतील हातापायांवरील शुभाशुभ चिन्हें. नाहिं गुणि सामुद्रिकें । लक्ष्मीयेसि ॥ १३·११६२.

**साम्य—**सारखेपणा, बरोबरी, ऐक्य, समान व्यवस्था. म्हणौनि आपण पां विश्व देखिजे । आणि विश्वा आपण होइजे । ऐसें साम्य चि एक उपासिजे । पांडवा गा ॥ ६·४०८. आतां पैं माझेनि येकें अंशें । जें हें जग चि व्यापलें असे । एया लागि भेदु सांडी(डीं) सरिसें । साम्यें भज ॥ १०·२९३. ६·४१६, ८·१६६, ८·१६७, ९·२४०, १०·११७, १३·१८४. **साम्याची उजरी** ६·९७, **– रिद्धि** ७·१२८, **–चिया वाढी** ७·१७४, **–चें सुवाण** १३·१७०; **मन साम्या आलें** ५·१००; **साम्या परौति जगीं प्राप्ति नाहीं** ६·४०९; **साम्यावस्था** ७·१९; **साम्यतप** १७·२३७, यावर १७·२२३ ते १७·२३६ पहा, **–बुद्धि** १४·३५६, **–सेज** १३·१०७३; **कर्मसाम्यदशा** १८·९६१; **धातुसाम्य** ६·३५१, **निःसीम–** ११·५०७,

वैषम्य– १३·८०५; साम्यता ८·२५४.

**साम्राज्य**—सार्वभौम राज्य. **सुखाचां साम्राज्यीं बैसे** ६·३६७; **आनंदसाम्राज्यीं** १६·५०; **स्वानंदसाम्राज्यींचा चक्रवर्ति** १८·१६४६.

**सायं**—संध्याकाळ. हे उत्पत्ति प्रळयो होंत। ते इयेचे सायं प्रात। १३·९९०. **सायंप्रातमध्यान्हा** १४·३३०, **–न्हीं** १३·९१८; **सायंप्रातमध्यानीं** १८·११४.

**सायास**—कष्ट, श्रम. ते सायास ही फळा आले। जें अमृत डोळां देखिलें। १८·१४६७, समुद्रमंथनास उद्देशून. ३·२४, ६·३६१, ८·२४३, १०·१७३, ११·५७२, १३·१०४३, १४·१०, १७·२४६. **सायासें**—देवकिया उदरीं वाहिला। यशोदा सायासें पाहिला। ६·१३७, ३·१७०, ९·५२१, १७·८७, १८·७४४; **सायासें सावरितु** १०·१८८, **–पुण्य आर्जिजे** २·२५३; **बहुलें सायासें करुनि** ३·२०२, **–करूनि** २·२०९; **सायासें···अनायासें** ६·४४०; **योगातिसायासें** १३·६३८.

**सायुज–सायुज्य**—चतुर्विध मुक्तींपैकीं चौथी, ईश्वराशीं ऐक्य, ब्रह्मैक्य. **सायुज**—सायुजीं सौरसु केला पूतने। ११·१००. **सायुज्य**—तेयां माझेया सायुज्याची चाड। ९·३३७. ९·३६२, ९·४६३, १४·३९८; **सायुज्याचां तटीं** १२·९२, **–पाटीं** १८·१२५१; **सायुज्यसिद्धसदन** १२·१२४, **–सिद्धिसदन** ८·२२२.

**सायें**—दुधाची साय. १४·७३.

**सार**—निष्कर्ष, तात्पर्य, अर्क, सर्वस्व. हें जें ब्रह्माचेनि नवनीतें। व्यासुप्रज्ञेचेनि हातें। मथुनि काढिलें आइतें। सार आह्मि॥ १५·५३८. २·१३३ (३), १३·४४५, १८·१४५. **उपनिषदा(दां)चें सार** १८·१७८६, **गीतार्थाचें–**६·११, **ज्ञानाचें–** १३·८४३, **तमोगुणाचें–**१७·८०, **योगाचें–** २·२७३; **लक्षणाचेया सारा**, तात्पर्याला, ६·१४०; **विजयाचें सार** १·१३८; **सारज्ञ**—**शब्दतत्त्वसारज्ञ** १३·११२३; **असार**—आवडतिये ही फळीं। असारें साळि आठोली। १८·२०२, १६·३३१, १८·९३; **सारासार**—देखैं सारासार विचारितां। भ्रांति ते नाहीं असारता। तरि सार तें स्वभावता। नित्य जाणें॥ २·१३३ (१), १·२४५, ५·१७, १०·२७३; **सारासाराचें गुंतलें** ६·३७१; **सारासारविचार** ६·४४४; **असारता** २·१३३ (२); **ससार** २·२६३.

**सारकत**—विझालेला कोळसा (राजवाडे). **सारकतु फुंकिलेयां, अग्नि प्रदीप्त होत नाहीं**, १८·६१०, ज्ञानदेवी – 'राखोंडी', कुंटे – 'राख' १८·६१३.

**सारंग**—भुंगा. १८·१६१६. परिशिष्ट (८) पहा.

**सारणें**—बाजूस करणें, चुकविणें, पुढें करणें, पुरें करणें. कां हातें सारुनि बाबुली। जळ देखिजे॥ ११·७४. ह्मणौनि जग परौतें। सारूनि पाहिजे मातें। १४·१२६. तेवि फलत्यागिं कर्माचें। सारिलें काम॥ १८·२५६, पुरें करून टाकलें. १५·४३२, १६·४६४, १८·१०६४. **एकीकडे सारी** १३·६१८; **कृत्याकृत्याचें काम सारिजे**, प्रयोजन नाहींसें करावें, १८·१५५६; **मोहिरें सारिजति**, पुढें करतात, १८·१६८; **वारि सारुनि** १८·१३३६; **वारी सारितसे** १५·४२; **सारुनि परौती केली** ११·७६.

**सारथी**—रथ हांकणारा. ११·२८३. **सारथी केलासि** ११·५३४; **सारथ्य** १·१४१, १·१४२.

**सारखीं-खें–सारिखा-खी-खें**—तुल्य, बरोबरीचा, अनुरूप. **सारखीं**—एकें अरुणोदया सारखीं। कुंकुमवर्णें॥ ११·१३३. **सारखें**—हें काइसेयासारखें बोलणें। ह्मणावें पां॥ ७·८९. **सारिखा-खी-खें**—इंद्रियरुची सारिखे। करवीति पाक नीके। ३·१२९. जैसी अमृताची चवि निवडिजे। तरि अमृता चि सारिखी ह्मणिजे। ४·१८१. हें बोलणें चि सारिखें नोहे। ५·११२, योग्य नव्हे. श्रिये सारिखिया दासी। घरीं जियेतें॥ ९·३६९. ४·११४, ५·११८, ६·४०३, ७·४०, ९·३१७, ९·३८८, १०·८०, १०·१८४, ११·२०८, ११·२३३, ११·३९७, ११·६२९, ११·६७१, १२·१९०, १३·३२, १३·८९५, १३·९६७, १४·८२, १५·४८, १६·१५५, १६·१९४, १७·६१, १७·२७१, १८·१८८, १८·९३७, १८·१०३७, १८·१०६६, १८·१४७२, १८·१७६९. **आणिकासारिखा**, इतर दगडांसारखा, २·२४०; **आह्मांसारिखेयां** ५·१६५; **एकसारिखा**, एकाच

प्रकारचा, १५·११०, **येकसारिखें** ११·३५०; **भीमार्जुनासारिखे**, बरोबरीचे, १·९७; **मजसारिखा** ९·४२१, **मनुष्या**–४·९१; **मतीसारिखे** १०·३९; **योगासारिखें** ६·३६३; **सकलांसारिखा** ३·७२; **सारिखेपणें**—जैसें कां कुडें नाणें। खरेयाचेनि सारिखेपणें। डोलयांचें हीं पाहाणें। संशइ घाली॥ ४·८५, **असारिखें**—जे असारिखें येकायेक। ९·२४८.

**सारस्वत**—साहित्य, सर्व विद्या, ब्रह्मविद्या. काइ घडेयावरि सारस्वतें। पढों सिकिजे॥ ९·८. तरि हृदयाकाश सारस्वतें अले। ९·२८. १०·६, १२·८, १३·२, १३·११५९. **सारस्वताचें गोड झाड** ११·१९; **मनचि सारस्वतें दुभे** ६·४५२.

**सारोक**—सरळ रोखाचे, सरळ आंखल्यासारखे. महाभूतांचें(चे) सारोक। सरले होंति॥ १५·९७, पांच फोंकांस उद्देशून.

**साल–साला**—(१) शाळा. कांहीं ठिकाणीं **साल** किंवा **साला** शब्द असणें संभवतें. **साल**—**टांकसाल** ७·२२, १३·९८१, **बंदि**–१८·४५६; **देहबंदिसाले**, १८·३८९; **साला**—**आंकसाला** १८·४८९, **आंकणें** पहा. (२) **साल**—छळ, वैद्यातें करीति साला। १७·१००, वैद्याचा द्वेष करतो, ज्ञानदेवी, कुंटे–'सळा' १७·१०१. (३) साल, झाडाची साल, **सि–सीनसाल** पहा.

**सालडें–सालि**—साल, सालपट. **सालडें**—**संहारवातें सालडें पडति** १५·१२६. **सालि**—(१) साल, असारें सालि आठोली। १८·२०२. (२) शाळा, घर. **शून्यसेजसालिये**, ब्रह्मरूपी शून्याच्या शय्याघरांत, १३·४३. (३) शाळू. कां सालिचा कणु ह्मणे। मीं नुगवें सालिपणें। १८·१२८०(१); **सालिचा पाटु** १८·३३६, –**चें होणें** १८·९४; **सालिपणें** १८·१२८० (२).

**सावगणी**—कापणी. १३·३९.

**सावज**—हिंस्र पशु. कुतर्कांचिं दुष्टें। सावजें दवडीं॥ १२·१४. **सावजें हातिरु धरिलें**, मगरानें गजेंद्राला धरलें त्यास उद्देशून, ९·४३८.

**सावध**—तयारींत असणें, शुद्धीवर येणें, जागृत होणें. एक एकातें ह्मणति। सावध रे॥ १·१६३. ते वज्रासनें चिमूटली। सावध होये॥ ६·२२५. २·१७, २·१८५, ८·२०९, १३·३३८, १३·५४३, १३·७०३, १७·१४, १७·११२. **सावधां मारीति** १६·३४२,–**होइजे** १३·५४६; **घूर्णितें सावधें** ११·१२६; **मरे ना सावध** ८·२२८; **सावधपणें** १४·१४१; **सावद**, सावध, ११·४५०.

**सावधान**—अवधान पहा.

**सावला-लें**—सावळा-ळें. **सावला**—मग सावला सकंकणु। बाहु पसरूनि दक्षणु। आलंगिला स्वशरणु। भगतराजु तो॥ १८·१४०९. **सावलें**—**सावलेया आंगा चंदन** १८·५८४; पुढील संदर्भ श्रीकृष्णास उद्देशून आलेले आहेत, **चौं भुजांचें सावलें** ११·२८५, **परब्रह्म हें सावलें** ११·१७१, **सावलेंनि परब्रह्में** ९·५१६.

**सावाइणें**—सहाय्यकारी होणें. या क्रियापदाचीं अनेक रूपें आलेलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिलीं आहेत. यज्ञदानादिक्रिया। ॐकारें सावाइलिया। प्रवर्त्तती॥ १७·३६४. तेथवां ॐकारु तत्कारीं। सावायिला चांगी परी। सछब्द(ब्द) कर्मी करी। जीर्णोद्धारु॥ १७·३८८. सूर्याचेनि सावायें। डोला सावाइला होए। १८·१२६५(२). **निमित्तिकें सावाइलें** १८·५८५; **सावाइ**, उत्तेजनार्थ, ११·६७२, ज्ञानदेवी–'सांहीसहित', कुंटे– 'साही-सहित', सहा शास्त्रांसहित, ११·६८२; **सावाइक**—आंधाराचें सावाइकें। लोटिजतसे॥ १८·१७०३, ज्ञानदेवींत 'मृत्युलोकाचें ऐहिक', कुंटेनीं 'संपूर्ण ऐहिक' असे अर्थ दिले आहेत; **श्लोक सूर्याचें सावाइकें खेलविलें** १८·१६४७, ज्ञानदेवी, कुंटे–'श्लोक सूर्यातें पैजा जिंके' १८·१६६९; **सावाऊ**—तें इंधन जैसें आगी। सावाऊ होये॥ ३·२६०, ८·२०९, ११·३५०(सा), १६·३२४, १७·३११, १७·३९०; **सावाओ** ६·४१५; **साव्हाऊ**—**संतोषासि साव्हाऊ** ६·१६५; **सावाय–संपत्तिचेनि सावायें** १३·७७०, १८·१२६५ (१); **सावायें विण उद्भटु**, सहाय्य नसतांही शूर, १८·८५४; **सावाया आलिं** १८·१५८; **कृपासावायें** १३·११६०; **सावाये**, मदतनीस,

सहाय्यकारी, आणि जे जे यांचेनि सावायें। ११·३८८, ज्ञानदेवी, कुंटे – 'सावायें', मदतीला या अर्थी, ११·३९३.

**साविआं–साव्हिआं**—एकाएकीं, सहज, स्वाभाविकपणें, स्वतः; या शब्दांचीं इतर अनेक रूपें आलेलीं आहेत, त्यांत अनुस्वराविषयीं धरबंद दिसून येत नाहीं. **साविआं** ६·४२९; **साविया** ५·१७४; **सावियां** ६·४२१; **सावियां**— येयावेयाचि सवे चि सावियां मोडे। ८·१०९, ६·२६४, ६·४८५, ८·२३५, ९·२११, ११·६६१; **सांवियां** ११·२५२. **साव्हिआं**— आंगें मन विरमे। साव्हिआं चि ॥ ६·२१२. **सांव्हिआं**—परि सांव्हिआं चि उंच होईल। ६·१८४, ज्ञानदेवी – 'साविया चि', कुंटे – 'सावियाचि' ६·१८४; **साव्हियां**—साव्हियां चि केणि नाहीं। ६·३४१, सहज लाभणारी.

**सावें**—(१) सर्व. **ईश्वरादिकें सावें**, 'अवघें' (राजवाडे), १६·३५७, ज्ञानदेवी, कुंटे – 'आघवें' १६·३५९. (२) सहावें. **सावें गुणरत्न**, दानास उद्देशून, १८·८६७; **सावा गुणु**, सहावा गुण, १८·८४०.

**सावेरी–सोवेरी**—'शेवरी,' 'सांवरी,' 'सावरी' असे पाठ ज्ञानदेवींत व कुंटे प्रतींत आहेत, शेरी, निवडुंग, असे अर्थ दिले आहेत. **सावेरी** —सावेरी वाढिनलेया सरला। वरि फल नाहिं आंतु पोकला। ९·१७३, हा एक प्रकारचा बांबू असावा. १८·५७३. **सोवेरी** ९·१७४, ज्ञानदेवी, कुंटे – 'सांवरी' ९·१७५.

**सावेव**—अवयवांसहित, मूर्त. ४·८८, ११·११, १३·११०, १८·६८८. **सावेव गुण** १३·९८१, – **शांती** ६·२५५. **अवयव** पहा.

**सावेसा**—स्वेच्छेनें, आग्रहपूर्वक. तरि आपुलालिया सावेसा। कां न मगावासि परेशा। ३·२६, ज्ञानदेवी, कुंटे – 'सवेसा' ३·२६. ५·१३.

**सासन–सासान**—वागण्याची रीत, शास्त्र, नियमनकर्ता. **सासन**—इया संसाराचिया अवधी। सासन जें ॥ १५·१०४, ज्ञानदेवी – 'सासनजे', कुंटे – 'सासनिजे', तयार होतो, १५·१०५. **सासनें**, आज्ञा, १५·१४६. **सासान**—तेयां वेद दीधले सासान। १७·३३६.

**सांसिनणें–सांसीनणें**—तयार करणें, भरास येणें. **सांसिनणें**—नाना सांसिनला मला। कोवलिकेचा ॥ ६·२५७. सांसिनले प्रसन्नतेचे मले। ९·४. ८·१४८, १५·६०, १८·१६४९. **बोधें सांसिनलेनि** १८·२५७; **रसभाव सांसिनले** ११·११; **वनें सांसिनलीं** ११·१९५; **वाचावेली सांसिनली** १५·१४. **सांसीनणें**—सांसीनलें दांग उठि १५·१२५.

**साहजें–साहाज–साहाजें**—सहज, आपोआप, एकाएकीं, निसर्गतः, स्वभावतःच, अर्थातच. **साहजें**—तैसें विचारिती निरसलें। तें प्रपंचूनि साहजें सांडलें। २·१३१. ९·१०५. **साहाज**— बाहिरि युगुतीची मुद्रा पडे। तंव आंतु सुख वाढे। येथ साहाज चि योगु घडे। नाभ्यासितां ॥ ६·३५३. ११·२३७, १३·१४४, १६·१८८, १८·१४००, १८·१४२२. **साहाजें**—जैसें मूलसिंचानें साहाजें। निगति शाखापल्लव ॥ १·२५. तरि उणावो साहाजें उपसाहला। प्राधुं काइ ॥ १·६५. साहाजें मलयानीलु सुंदु। तेया ही होये अमृताचा स्वादु। ४·२१७. तरि आपुली शास्ति साहाजें। आपण केली ॥ ६·७१. पवनु साहाजें गगना। मीलों चि लागे ॥ ६·४५८. १·१३, १·१७९, २·७७, २·१५१, २·१८८, २·२७१, २·२७५, २·२९५, ३·४९, ४·६२, ४·७९, ४·१३६, ४·१६२, ५·१८, ५·२७, ५·२९, ५·१०५, ५·१०७, ५·१५१, ६·२, ६·१७, ६·४२, ६·४४, ६·५०, ६·९१, ६·१०६, ६·१२८, ६·१६०, ६·१८९, ६·२२८, ६·२७९, ६·३३४, ६·३८२, ६·४८७, ७·११२, ८·१०७, ८·१११, ८·२२३, ९·२६, ९·८८, ९·२२४, ९·२६३, ९·२९५, ९·३९३, ११·४२, ११·२८७, १४·३४८, १५·१६०, १५·२९९, १५·५६२, १६·६०, १८·३५, १८·९५ (जें), १८·८७१, १८·९७४, १८·१०५३, १८·११४३. **वरि तो वामचरणु साहाजें बैसे** ६·१९४. **सहज–सहजें–सहाजें** पहा.

**साहणें–साहाणें**—सहन करणें. **साहणें**—तंव तेया षड्गुणचक्रवर्त्ती। साहवे चि ना ॥ ११·११२. **न साहणें** १३·३५० (१);

साहंता, सहन करणारा, तेथ साहंतेनि नवलें । वेपिजे ना ॥ १३·३५१, ज्ञानदेवी, कुंटे – 'साहतेनि' १३·३५२. साहाणें, या क्रियापदापुढें दिलेल्या रूपांपैकीं कांहीं रूपें साहणें चीं असणें संभवतें, कांहीं जागीं साहांणें चीं रूपें आलीं आहेत; जे शस्त्रें संडौनु साहावे । बाण एयांचे ॥ १·२६४. एथ आथि कांहिं प्रकाला । तो साहों ए वर ॥ ५·१६५. न साहाति १·१८६; साहांति ३·१९६, १८·७८४, न –, ऐसिं पांचै भूतें । न साहांति एकमेकातें । १३·१४६, ९·५०८ (सा); साहातु असे १७·१६६; साहावे—जीवा आभारु साहावे ना ८·१२८; साहावें ४·३०; साहावेया लागि १८·६३५; साहावैल १८·८१; साहिजे ११·५६३, शस्त्रा(स्त्रां)चा वरिषाॐ – २·२३२; साहिजें—जोजारु साहिजें(जे) ४·३३; साहिजैल १·२१२; साहिले ११·३५; साहील ११·४१, १८·१०४८; साहे, सहन करीत, सहन होत, ९·२३६, ११·१७२, १३·३४५, १३·५१८, १३·८८०, १६·१७६, १८·७४४, १८·९३९; न साहे—संभाविता निस्तेज । न साहे जैसें ॥ १३·५४२, १३·६६६, १३·७१७, १५·८०, १५·४४०, १६·२३३, १८·४८३, १८·११४५; तेजाचें उग्रपण न साहे ११·३१३, बोलु ही – ६·१४६, वेलु – ७·१९६; साहें ११·१६०; साहाणें १३·३४२, १८·८३७; साहांतिया १६·१८९; साहाते, सहन करणारे, ११·६३६; साउनि, सहन करून, २·२२८; सात, सहन करीत, तैसें जेयाच्यां ठांइं । न साहणें काहीं चि नाहिं । आणि सात असे(सें) ऐसें हिं । स्मरे ना जो ॥ १३·३५० (२), ज्ञानदेवी – 'साहतु असें', कुंटे – 'साहतसें' १३·३५१.

**साहस**—लवकर या अर्थी. साहसिं करी(रीं) १३·६४५, ज्ञानदेवी, कुंटे – 'सांच करीं' १३·६४७.

**साहाकारी**—मदतनीस. ११·२४.

**साहाण**—सहाण. विवेकुसाहाणें(णे) १५·२३६.

**साहास**—साहसयुक्त, पराक्रमी. ८·२३.

**साहित्य**—वाङ्मय, अलंकार. वोविया कीं होंति लेणें । साहित्यासि ॥ १०·४१. ६·१३, ६·१३३. साहित्य वाणें, भाषेंतील अलंकारास उद्देशून, १·६; साहित्य आणि शांती ४·२१५; साहित्यातें बोजावी, मराठी भाषेस उद्देशून, १३·११५१; साहित्यसोनेयांचिया खाणी १२·१२.

**साहो**—सहाय्य, आधार. स्वर्गसिंहासना साहो, बृहस्पतीस उद्देशून, १०·२०९.

**सिकणें-सीखणें**—शिकणें. सिकणें—तरि तो वेलु सिकिलेयां जाइजे । ११·१६२, तितका वेळ शिकण्यांतच जाईल. पढों सिकिजे ९·८; सिकवणें—ऐसें प्रजांतें सिकवी । चतुराननु ॥ ३·११६; नानापरी(रीं) सिकवितु असे २·२९; येकैक सिकउं काइ १८·१३५१. सीखणें—मंत्र सीखे १३·८११; सिखवणें, शिकवण, ११·६६४; सिखौं, शिकवूं, आणि सिखौं ह्मणों तरि बोलसी । तूं चि बहुत ॥ २·९२.

**सिक्ष्यापिला**—शिकविला गेला, शिकवून तयार केला गेला. जो कां तुह्मीं सिक्ष्यापिला । १·९५.

**सिखर**—शिखर. १३·६५६. शिखर पहा.

**सिंग**—शिंग. १८·१८५.

**सिघ-सीग-सीघ**—शेंडा, अग्रभाग; धान्याचें माप भरल्यावर त्यावरली निमुळती रास, शीग. सिघ—सिघेंचिं सत्कर्में । धाविनलीं संभ्रमें । ११·६०९. सीग—परि पुनरावृत्तिचेया मापा । सीग जाले ॥ ८·१६४. वाफेचिये सीगे १७·१४१. सीघ ७·७२.

**सिचडी**—कंडू (राजवाडे), येथें जिज्ञासा. १४·६०.

**सिंचणें**—शिंपडणें, शिंपणें. २·६६. सिंचन—मूलसिंचन १·२५.

**सिजणें**—शिजणें. आधणिं हरलु न सिजे । १३·४८१.

**सिठी**—सृष्टि-ष्टी पहा. घापे पटामाजि दीठी । दीसे तंतुची सैंव सिठी । ६·१००, निर्मिति.

**सिणणें-सीणणें**—शिणणें, श्रम पावणें, त्रास होणें. शीणणें पहा. सिणणें—परि निरुतें पांतां काइ सिणले । रायाचे हात ॥ ९·१०९, नगर वसविण्यांत. ९·२७७. काहाणी सिणैल ९·१८५; न सिणे–१२·१६६(णे), १३·७०३; सिणवणें—सिणवी ह्मांतारा । बहुतांतें ह्मा ॥ १३·५७३. सीणणें—ह्मणौनि स्वप्निंचिया अखरा । संतोषें सीणे ॥ ८·३४. ९·१६५, ११·१६७, ११·२१५, ११·४०१, १६·२५८, १७·२०५,

१८·१७५, १८·३६७. **सीणताति** ११·६६७; **एकीं कर्मीं सीणे** १८·२२९; **सीणलेयां हिं उणें** १८·९४०; **सीण**—तेव्हांलि लोकें गिविसावा। सीणु आपुला ॥ ३·२०३, सीणु जाये मूसीं। साणे (सीणें) जेणें॥ १६·४१५,१३·१०३७, १६·३९८, १७·१०४, १७·२०७, १८·६०५; **आमका कोणु सीणु** ९·११५; **सुखा ना सीणु नेणे** १४·३६५; **हाणिचेनि सीणे(णें)** १७·२९१; **संसारसीणें** १७·३२८; **सीनु, शीण,** १७·४१९; **सीणवणें**—व्यसन जैसें न सीणवी। ६·१२४, १८·६१७; **पाये सीणवावे** १८·९३३.

**सितणें–सीतणें**—स्पर्श करणें. **सितणें—कपोल शंके सितलें** ११·१८३; **चंद्रकरीं सितला** ११·२४४; **परिसें सितलेयां** १८·१७५०; **पाए सितले** ११·६८. **सीतणें**—जैसा चंद्रकला सीतला। सोमकांतु ॥ १·१९१, **द्रवतो.** चंद्रकिरणीं सीतला। पाखाणु जैसा ॥ १८·१५६८, **द्रवत नाहीं,** धृतराष्ट्रास उद्देशून. ७·१७५, ९·१९४, ९·४८० (**ले**), १३·४४७ (**लें**), १७·२३२, १८·१६.

**सितरणें**—फसवणें, भ्रमांत पाडणें. स्वप्न गा जेया परीं। जागतेयातें न सितरी। १४·३३९.

**सितल–सीतल**—शितळ, थंड. **सितल**—सितलाचिये भेटी। तातलां तेलिं आगि उठी। १६·२३६. **सीतल**—६·१७५, १३·२९१, १६·१५९. **सीतली आणि रसाल,** वाणीस उद्देशून, १३·२६९.

**सिंथणें**—फेंकणें, बाहेर काढणें. कुबोलाचिं सदटें, सिंथिति कांडें ॥ १६·४०२, ज्ञानदेवी–'**सुती**'. कुंटे–'**सूति**', बाण टोंचतात, १६·४०४.

**सिदोरी–सिधौरी**—शिदोरी. **सिदोरी** १८·१८३· **सिधौरी—तेजाची सिधौरी** ६·२८१. **सिधौरिया** १८·९३४.

**सिद्धणें**—फळास येणें, निष्पन्न होणें, तयार होणें. इहीं कामक्रोधलोभेंसीं। कार्यें सिद्धति तैसीं। १६·४३४. **सिद्ध**—तयार झालेला, पूर्णावस्थेस पोहोंचलेला, उपदेवांचा एक वर्ग, धर्मप्रतिष्ठा तो सिद्धु। अभयहस्तु॥ १·१३, हा अनादि नित्य सिद्धु। निरुपाधि विशुद्धु। २·१४५, जय जय सिद्धे। १२·१, पैं सिद्धु नित्यु आपैसा। अनादिपणें॥ १३·११०१, अगा वसुधेचां पोटीं। निधान सिद्ध किरीटी। वन्हि सिद्धु काष्टीं। वोहां दूध॥ १८·१२२१ (१,२), ३·४८, ६·१५६, ७·१५२, १०·१७९, १५·४३२, १८·१२२२; **सिद्धें कर्में** १२·१२८; **सिद्ध तत्त्व** ६·४७६; **सिद्धांचे मनोरथ** १३·२७८, **–चा राउ** ३·२६८, **–चा राओ** ९·५३०, **–चा राणा** १३·९६६, **–चां सिंहासनीं** ६·४४८; **सिद्धां माझि** १०·२१७; **महारिखी अथवा सिद्ध** ११·३२६; **सिद्धता** १८·६४०; **सिद्धादिक** ११·३२८; **सिद्धप्रज्ञा,** पूर्वजन्मानुरूप प्राप्त झालेली बुद्धि, ६·४५२, **–भांडार** ६·४६२, **–मंत्र** १८·९४५, **–वत** ३·४५, **–सरस्वती** १·७८, **–साध्यभोजन,** तयार केलेलें व करावयाचें जेवण, ३·३८; **अनादि सिद्ध** १०·१३५, **अनादिसिद्ध** २·१००, ४·१५०, ८·१७३, ११·२७२, ११·३०४, १५·२९१, १६·२६९, **–सिद्धा** ३·३५, **–सिद्धें** १३·९५६; **आज्ञासिद्ध,** ज्याची आज्ञा फलरूप होते असा, १६·३५३, **कर्म–** ४·७१, ४·१५५, **प्र–,** प्रसिद्ध पहा, **महा–** १८·१२३६(१),**सत्त्व–** १४·५३; **संस्कारुसिद्धा,** प्रकृतीस उद्देशून, १८·१२८१; **सायुज्यसिद्धसदन** १२·१२४; **सोहंसिद्ध** ८·२५३, **सुर–,** देव व सिद्धपुरुष, ११·१४५; **सुरसिद्धकिन्नर** ११·५०१; **स्वतःसिद्धु** ९·१६३; **सिद्धांत–** निश्चित मत, **निर्णय,** सिद्धांतु नव्हंतु सतंत। तेयाचां हातीं॥ १७·८४, ज्ञानदेवी–'**नव्हतु स्वतंत्र,**' कुंटे–'**न होत स्वतंत्र**' १७·८५, ११·५८५, १३·९०, १३·२३६, १५·४९०, १८·१२३४, १८·१२३५; **सिद्धांतकक्षा** १८·१२३६ (२), **–नवनीत** १३·१०४२, **–निर्वाणसूत्री** १३·८३२; **महासिद्धांतापासिं** १५·४०१; **वाग्ब्रह्मसिद्धांत** १५·१४०; **शास्त्रसिद्धांतु** १६·४१, १८·१५३०.

**सिद्धि–सिद्धी**—परिपूर्णता, यशप्राप्ति, योगानें मिळविलेली शक्ति. **सिद्धि**—कां तपोबळें रिद्धि। पातलेयां भ्रंशु बुद्धी। मग विरगतां सिद्धि। आठवेना ॥ १·१८८. १५·३६८. **योग्यतेची सिद्धि** १८·१००३; **सिद्धि होति** ६·२७०; **सिद्धिभुवन** १३·९३८, **–चेन्हीं** ७·१४१; **ऋद्धिसिद्धिं** २·३५९, **ऋद्धि पहा; आत्मसिद्धि**—आत्मसिद्धि-

**सियारी-सेयारी**—शहारे, कंप; 'भय, डाकीण' (राजवाडे). **सियारी—बुडणेयांची सियारी** १६·६८. **सेयारी—सेयारी आली,** भयानें शहारे आले, ११·३६४; **आशसेयाचि,** हा पाठ **आशसेयारी** असा घ्यावा, आशारूपी डाकीण, १३·५०३.

**सिर**—(१) रक्तवाहिनी शीर, घावानें पाडलेली चीर किंवा भेग. अजातशत्रुतरुवरां । सर्वांगिं देवविलिया सिरा। १३·२२८, चिकाकरतां झाडाला भेगा पाडतात त्यास उद्देशून. (२) डोकें. **सिरीं बांधलया** १६·२१८; **सिरिं वाहे** १३·५१०, **-वाहें** १२·२१६; **सिरसा**—कां मनीं सिरसा धरीं। १२·२२७; **सिरालें**—उशी, पायांचें सिरालें। मांडूं लागे ॥ १४·१८४, **मांडणें** पहा; **सिरें**—वरचा भाग, **जगदक्षराचें सिरें** ८·१५२, ज्ञानदेवी, कुंटे–'जगदाकाराचें सिरें' ८·१५४.

**सिरणें**—प्रवेश करणें, गळणें. जें आकारिं इये खोंकरे । कोंदलें असति न सिरे । कल्हणी कालीं ॥ ८·१४, जें या फुटक्या जगदाकारांत गच्च भरलें आहे तें कधींही गळून जात नाहीं, ज्ञानदेवी, कुंटे–'कोंदलें असत न खिरे' ८·१५. ८·८८, १५·३०४. **विचाराचा वारा ही जेथ सिरे** ६·३१९, **न सिरे** पाठ ग्राह्य वाटतो; **सिरों आदरी** १३·७५५; **सिरकणें—जावाई सिरके** १८·२३२.

**सिरियाणी-स्रियाणी**—**श्रियाणी** पहा. **सिरियाणी**—परि समर्थे तुवां सिरियाणीं(णी)। फेडिली ते ॥ १६·३९. **स्रियाणी** ६·१४२.

**सिवणि-सीवणि**—शिवण, सांधा. **सिवणि—जैसी शुक्तिपल्लवांची सिवणि उतटे** ६·२६६. **सीवणि—सीवणिमध्यु पीडिजे,** शिवणरेषा दाबून धरावी, ६·१९४, मूलबंधाच्या या प्रयोगावर ६·१९२ ते ६·१९९ पहा.

**सिवणें-सीवणें**—शिवणें, स्पर्श करणें, कांहीं ठिकाणीं सिंवणें व सींवणें चीं रूपें आलेलीं आहेत. **सिवणें—आत्मलिंगातें सिवणें** १८·१३६०, **स्त्रीदेह आंगें**– १७·२१०; **न सिवे** १६·१६२, १८·२४८, **-सिवे** ७·१५६; **बाण लक्ष्य सिवौनि** १५·२९२; **सिंवणें**—तो चि अग्निसंगें सिंविजे। तरि मांगल होये ॥ ७·६४, ज्ञानदेवी, कुंटे–'सिजे' ७·६५. **सीवणें—सीवे** १३·६३०; **हातें सीवे चि ना** १४·१६७; **सींवणें**—पार्था तें सुख साचें । वलिलें आहे रजाचें । झणौनि न सींव तेयाचें । आंग कहीं ॥ १८·८०२. **सींवे** १७·९२.

**सिष्ण**—उपस्थ. **सिष्णोदरीं वांटी,** उपस्थ व पोट यांच्या वांट्यास देतो, १८·५५५.

**सिसार**—अर्धशिशी. सिसाराचां रागीं लाणें। सीस चि जैसें ॥ १८·१७७.

**सिसाल-सीसाल**—मस्तकांची रांग. **सिसाल–सिसालीं,** रावणाच्या दहा मस्तकांस उद्देशून, १०·२३३, **-लें** ११·४१०, ११·४१२. **सीसाल**—व्याधिचां सीसालीं । पूजिलीं यंत्रें॥ १२·५०, व्याधिरूपी मस्तकांच्या आहुती घालून.

**सिह्‌बीर**—शिबिर. १७·२९३.

**सिहाणा**—शहाणा. एथ चातुर्य सिहाणें जालें। १·३५. ११·४६३, १८·१७२७. **सिहाणेपण**—जाणतेपण, समजूत, जात्यंधा लागें(गे) पिसें। मग ते(तें) सैरा धांवें(वे) जैसें । तूझें सिहाणेपण तैसें । दीसतसे ॥२·९३; **सिहाणेपणें**—एक जाणीनियां हारपति। सिहाणेपणें पैं ॥ १० ३३.

**सिंहासन-सींहासन**—नेहमींच्या अर्थी, प्रतिष्ठेचें पूज्य स्थान. **सिंहासन**—सिंहासन होईन आपण। वरि श्रीगुरु करिति आरोहण। १३·४२३. **सिद्धांचां सिंहासनीं** ६·४४८; **स्वर्गसिंहासना साहो** १०.२०९. **सींहासन**—जेथ अमरत्व हें चि सींहासन । ९·३१७.

**सींक**—शिंक. **जांभै सींक ढेंकरु** १८·३३९.

**सीत**—**शीत** पहा. सीत वेढावें। उष्ण पांघुरावें। १२·६५.

**सीमा**—मर्यादा, शेवटची कड. जे(जो) मज पुरुषोत्तमा। ज्ञानें भेटे सुवर्मा। तो सर्वज्ञ ते चि सीमा। भक्तिची ही ॥ १६·४८. **देहाचिये सीमे** १८·१५३८; **परम सीमा** १८·३८०, **पैली**– १६·४४०; **सकलभाग्याची सीमां(मा)** १८·८९७; **सीमा सांडे** १७·३९३; **निःसीम** २·२११, २·३६७, ८·१०, ९·३७८, १८·१५५६, **-गुण**—दे० निःसीमगुण अनंतु। दे० निःसीमतत्व सदोदितु। दे० निःसीमसाम्य

संततु। चौ हि वां(वा)चा ॥ ११·५०७(१), **–तत्व** ११·५०७ (२), **–साम्य** ११·५०७(३).

**–सील—** –शील पहा. **दानसील** १५·१२१; **सुरसाह्यें सील** हे शब्द जोडून **सुरसाह्यसील** असे एकत्र घ्यावे, १२·२३३.

**सीला—**शिळा. **सूर्यु कीं सीला** १०·१८५. **शिला–शीला** पहा.

**सींव—**मर्यादा, सीमा, अखेरची कड. तैसी वैराग्याची सींव नेदखती। जे विवेकाची भाप नेणति। ४·२४. **ज्ञेयाची सींव** १८·४६७, **मोक्षाची –** १८·८९५; **कानामनाचिये सींवे टेंकों नेंदीसि** १८.१२६८; **भीडेची सींव लंघो(घों) नेंदी** ७·१९८; **वारा ही सींवे टेंकों नेंदी** १८·३८७.

**सीस—**डोकें. जैसें शरीर आहे सावयव। परि सीस चि नाहिं ॥ ९·४३१. कां सीस खांडूनि आपुलें। पायांचां खर्ती बांधलें। ९·४९५. १८·१७७. **सीसें खोडा वाहावी** १८·१०५६; **सीसवेन्हीं बुडालेयां** ११·४९.

**सु—**शब्दास जोडून. चांगलें, सुंदर, फार, अतिशय, या अर्थी. याचे कांहीं संदर्भ त्या त्या शब्दापुढें दिले आहेत, कांहीं येथें दिले आहेत. कांहीं शब्दापूर्वी सू हा उपसर्ग लागलेला आहे. **सूक्ति—श्रीकृष्णसूक्तिसागरा** १५·७०; **सुकाल**, काल (१) पहा, **–कुमार, कुमर** पहा; **–कुल**, कुल (१) पहा, **–कृत, कृत**(१) पहा, **–कृपा**, कृपा पहा, **–क्षेत्र, क्षेत्र** पहा, **–गंध, गंध** (२) पहा, **–गम, गमणें** पहा, **–गरणि** १३·११४४, **–गुरुवां**, भरभराटीनें, थाटमाटानें, १३·८११, **–घटित, घटणें** (३) पहा, **–घोर** ११·१३९, **–घोष**, नकुलाच्या शंखाचें नांव, १·१५०, **–चित्त, चित्त** पहा, **–जन–चक्रवर्ती, जन** पहा, **–जाण** १८·१४८५, **–डंस** ५·१६०, **–तेजपणें** १·१८६, **–दर्शन, दर्शन** (१) पहा, **–दंस** १४·३९४, **–दिन-दीन, दिन** पुढें पहा, **–दिस, दिस**(१)पुढें पहा, **–द्रव्य** १७·३५७,१८·६७४, **–नयन** १३·१०६१, **–निश्चल, निश्चल** पहा, **–नील** २·७७; **इंद्रनीलसुनील** ११·१३४; **सुपकें** १७·१२५, **–पंथ** ८·२३८, **–पूजितें** ११·१२९; **प्रमेयप्रवालसुप्रभ** १·१७; **सुप्रभा** १०·२०२, **–फल, फल** पहा, **–बद्ध** ६·१८३, ६·२२५, **–बीज, बीज** पहा, **–बुद्धी, बुद्धि-द्धी** पहा; **आबालसुबोधें** १८·१७२१; **सुभग** १३·६४२, १६·१३४, १८·१०८०, **–भट** २·२१३, **सूभट** १·१३३, ४·१६४; **सुभरें, भर** पहा, **–भद्र** ९·४७७; **सुभावभजनभाजन, भजणें** पहा, **–भाषित** १३·५७७, **–भास**, चांगलें बोलणारा, १८·१७०६, **–भेदिं आखरीं**, स्पष्ट करणाऱ्या शब्दांत, १३·११५८, **–मती** १३·९१५, १८·१५१६, **–मथित, मथणें** पहा, **–मन**, (१) चांगलें मन, चांगल्या मनाचा, ९·४०,१३·११५३, (२) फूल १८·१६१६ (१,२), **–मनसा** १३·२३६, **–महिम** १७·४०८ (१), **–रेख, रेखणें** पहा, **–लक्षण, लक्षण** पहा, **–लग्न, लग्न** पहा, **–लभ, सूलभ, लाभ** पहा, **–लीन** ९·१००, **–लीनता** १३·४३; **उन्मेखसुलोचन** १३·३३८; **सुवट** ७·५४, **–वर्म** ५·६३, १७·४०८ (२), **वर्म** पहा; **सुवाॐ** ९·२८, **–वायें** १३·११४६, **–वासना, वासना** पहा, **–विद्य, –विद्यता, विद्या** पहा, **–वेख** २·११६, **–वेल, वेल** (१) पहा, **–व्यापार, व्यापारणें** पहा, **–संग, संग** पहा, **–सडा, सडणें** (२) पहा, **–सरी, सरि-री** (३) पहा, **–सेव्यता, सेवणें** पहा, **–स्नात** ११·६, **–स्वाद** ४·३, **–हड, –हाड** पहा, **–हृद** पहा.

**सुअणी—**पायरी, टप्पा, मजल. आयुष्यपंथें प्राणिगणीं। करूनि अहोरात्रांची सुअणीं। ११·४१९, ज्ञानदेवी – 'सोवाणीं', कुंटे – 'सोवाणी' ११·४२४.

**सुआड—**सोपें. **भेदाचें कवाड होतें तें फेडूनि सुआड केलें** १८·१५५८.

**सुआर—**आचारी. मी चि होईन सुआरु। वोगरीन उपहारु। १३·४२०.

**सुकणें–सूकणें—**वाळणें. **सुकणें—**एन्हविं कोंभैला उन्मेखु सुके। जरि उदास तुह्मीं ॥ ९·२५. बीज मोडे झाड होये। झाड सुकलें बिजिं माये। १७·५९. **सुकतेया अंकुरा** १३·३८०; **मज सुकतेया जी झाडा** ११·६६०. **सूकणें—**तें साजुक ही न्हवे सूकलें। भले तैसें ॥ ९·३८१, अर्पण केलेल्या पानास उद्देशून. ९·३९९, १८·४३०. **सूकणें—**यन्हविं

जाईचेया फुला फांकणें। तेया चि नांव सूकणें। १८·२५५; **न सुके, हें रूप सुकणें किंवा सूकणें चें असणें संभवतें,** पाउसें विण न सुके। समुद्र जैसा ॥ १२·२०९.

**सुख**—अनुकूल संवेदना, आनंद, समाधान. जो मनें ऐसा जाला। संगिं तो चि सांडिला। ह्मणौनि सुखें सुख पातला। अखंडीत ॥ ५·२१(१,२). ह्मणौनि विषयभोगीं जें सुख। तें साद्यंत चि जाण दुःख। ५·११९. किंवहुना सोए। जीउ-आत्मेयांची लाहे। तेथ जें होये। तेया नांव सुख ॥ १३·१३१. २·२८६, २·३४५, ३·७६, ३·१२२, ३·२०८, ३·२६६, ५·११२, ५·१३३, ५·१३६, ६·३५३, ६·३७०, ७·१४७, ७·१४९, ७·१८६, ८·५३, ८·१८३, ८·२६२, ९·५१, ९·५४, ९·३८२, ९·४०२(२), १०·११३, १०·१८४(१,२), ११·१५१, ११·५८४, ११·६७१, १२·७६, १२·१०६, १३·१२७, १३·५८८, १३·८०४, १३·१०७०, १४·१४८(१); १४·३२४, १५·५१४(१,२), १६·३३३, १६·४३५, १६·४३७, १७·२६१, १८·८१, १८·७६५, १८·७७०, १८·७९१, १८·७९५, १८·७९८, १८·८००, १८·८०४, १८·१३५४, १८·१५६९, १८·१६१५(२), १८·१६१८, १८·१६३६, १८·१७०६. **त्रिविध सुख** १८·७६४, **सुखत्रय** १८·७६९, **तामस सुख** १८·८०६, **रजाचें** – १८·८०२, **राजसें सुखें** १३·७४१; **सात्विक सुख** १८·७९०; **सुख आणि अनुभूती**—ऐसें सुख आणि अनुभूती। या भावाची मोडौनि भींती। आतैल अर्जुना कृती (अर्जुनाकृती)। सुख चि जेथ ॥ १८·२८५, **सुख किं भय** ११·४८१, ११·४८३; **सुख वरि नसुदें सुख** १८·१२०९(१,२); **सुख आणि दुःख**—असातिं दुःख निफजे। सत्कार्मिं सुख उपजे। १३·९७१, **सुख दुःख जाणणें** १२·१४९, **नरकिचें दुःख...स्वर्गा नांव सुख** ९·३११, **सुखदुःखांचीं ओसाणें** ७·७१, –**खाचां सागरीं** ९·४०२(१), यांचे इतर संदर्भ दुःख पुढें पहा; **सुखाचे अंकुर** ५·१३७, –**ची आंगी** ९·४९७; **सुखांचा आरामु** ९·५९; **सुखाची काहाणी** ९·४९६(१), –**सि चढावा** १२·१७२, –**ची जाति** १८·१५८९, –**चिक्षा जोडी** ६·३७१, –**चा थारा** ३·११०, –**चा परिमलु** ८·५६, –**चां पाउटीं** ९·५०, –**ची पाउटी** ८·२६५, –**चा प्रस्ताऊ** १८·७६८, –**चा भर्वसा** ९·४९०, –**चा रिगांवा** १८·७७८, –**ची राणिव** ८·१९२, –**ची लाखौली** ६·४९३, –**ची लीपि** ३·२४९, –**चें लोण** १८·१०६३, –**ची व्यक्ती** १८·१०४९, –**चें सांकडें** ६·१४४, –**चेनि सांघातें** ६·३८७, –**चां साम्राज्यीं** ६·३६७, –**चेनि सुरवाडें** १०·१८३, –**ची सृष्टि** ५·७४, –**चि सोय** ११·१५४, –**चा सोहला** १३·११५६; **सुखा चि दोसें** १६·११३, –**पुरतें** ११·६२६, –**लागि** १५·३८७, १८·९२०; **सुखां सारिखा** १५·४८; **सुखानुभव** ११·२४९, **स्व**–२·३६३; **सुखामृत** ९·५, –**गम** १८·१६१५(१); **सुखादि-उपचार** १७·३२; **सुखोदय** १४·१; **सुखोपायें, उपाय** पहा; **सुखोर्मी** ९·५२३; **सुखजात**, –**जात** पहा, –**ज्ञान, ज्ञान** पहा, –**निद्रा** ९·४९६ (२), –**पदें** १७·३२१, –**पाहाट** १६·२३८, –**प्रवाद** ५·११५, –**प्राप्ति** २·३४६, –**बुद्धी** ५·१२५, –**रूपां** ९·४०२ (३), –**लाभ** १८·१६०३, –**लेशें** १८·७७३, –**संपत्ती, सुख व संपत्ति,** ७·१८५; **सुखपणें** ८·२६३; **अंतःसुख** ५·१४३, **अनिर्वाच्य सुख** ६·४६७, **आंतर** – ५·१२९, **आत्म**–, **आत्मा** (१) पहा, **कीर्त्तन**– ९·२०८, **कैवल्य**– १३·४४९, **देह**– १८·६३६; **दैव-सुखसंभवी** १६·६६; **ध्यानसुख** १३·३९४, **निद्रा**– १३·७४०, **नैष्कर्म्य**– ६·४३६, ८·४६, **पर**– १६·१५९(१), **पर-मात्मसुखनिधान** ४·१५८; **फलसुख** १८·८०७, **ब्रह्म**– ९·३२४, **ब्रह्मसुखें,** हे शब्द तोडावे, ५·१४४; **भक्तिसुख** १२·१८६, **भोजन**– १८·१८५, **महा**– १·१४, २·३६१, ६·३२५, १३·३८२, –**सुखाची गोडी** ४·१०७, –**सुखाचा निमथा** ५·३२, –**चेनि भरे(रें)** १०·१०९, –**चें रूप** ६·२५६, –**चें सोइरें भाऊंड** ८·२६१, –**चा सोहला** ११·४९८; **माहासुखक्षेत्री** ६·४४७, –**सुखाची दिवाळी** ६·३८८; **मोक्षसुख** ६·११५, **योग**– ६·५१, **राज्य**–, **राजा पुढें**

पहा, विषय–, विषय (१) पहा, शांति– १२·१४१, श्रवण–, श्रवण पहा, समाधि–, समाधि पुढें पहा, संवाद– १०·१४९, सर्व सुखांची कुलवाडी ६·४४६, – सुखांसि ठाऊ १६·३५२, – सुखाचा थारा ३·११०, –सुखाची आदि १·२९, –सुखांसि पत्र ९·१, – सुखीं १८·१७७८, १८·१७८८, –सुखें सहित ३·१०१; स्वसुख-खी, स्व पहा; स्वयंसुख १४·१४८ (२), स्वप्न– ५·४७, स्वर्ग–, स्वर्ग पहा; सुखां, सुखानें, कांहीं प्रत्यवाय नसतां, १८·१६२४; सुखेंसिं, त्याच अर्थी, ९·४९३, सुखेंसीं ५·१३१, – सुरवाडिजे ६·२५; सुखि, सुख या अर्थी, सुखिचा आरंभु १८·७८५; सुखिया, सुखी, आनंदित, जो श्रद्धेवेनि संभोगें। सुखिया जाला ॥ ४·१८६, ९·३३०, १४·१९८, १५·५५९, १८·१२४२, १८·१४५९, १८·१७८०; सुखियें, याच अर्थी, १४·१५०, सदा सुखियें मानुषें १५·३८०; सुखावणें ४·१०८, १४·३१७; सुखावतु १६·१५९ (२), –वलेनि चित्तें ९·२३०.

**सुगरणि**—उत्तम स्वयंपाक करणारी. १३·११४४.

**सुगुरुवां**—भरभराटीनें, थाटमाटानें. १३·८११.

**सुचावा**—सुचावा हे १८·६८४, हा पाठ सुचा (शोक) वाहे असा घ्यावा.

**सुचित्व**—शुद्धपणा. १२·१७७. शुचि पहा.

**सुजणें–सुझणें**—सुचणें, समजणें. कांहीं ठिकाणीं सूजणें–झणें चे प्रयोग आलेले आहेत. सुजणें—सुजे १४·१५५; सूजणें—अधमोत्तम सूजे १३·८७. सुझणें—नीति सुझे । वैदिक बुझे। १३·८२९. १८·६२, १८·५२४. सूझणें—सूझे १८·१८२.

**सुटणें–सूटणें**—निघणें, मोकळें होणें, वाढणें, वर्षाव होणें. सुटणें—आपण चि वीजनि दुहिता। न मम ह्मणे पिता। किं तो सुटे येरु घेंता। जावाई सिरके॥ १८·२३२. १८·७९६. सूटणें—हें मज चि तव जालें। परि मियां नाहीं केले(लें)। ऐसें साच जेणें देखिलें। तो सूटला गा॥ ४·७७. देखें मेघौनि सूटति धारा। ६·८७. पांडू आंग सूटलें। तेया चि नांव खुंटलें। १३·७४५. ६·२४४, ९·४९२, १३·२७५, १३·४०१, १३·७५३, १५·१८२, १५·१८३, १६·३२७, १७·२५९, १७·३६३, १८·७१, १८·१६१, १८·४७८, १८·१४०६. घाणि सूटे १७·१५७; फांसाहूनि सूटला १२·१८१; लवंघा सूटे १७·१४८; वारा सूटला १६·३९३; सूटलेयां ९·१२३, ११·४७८; न सहित आलेलीं पुढील रूपें सुटणें किंवा सूटणें चीं असणें संभवतें, न सुटिजैल २·२०४; न सुटे—भांडवला न सुटे कवडी। ९·५०३, ३·११५, ११·४०८, ११·४१७, १७·१९१, १८·१३९५; सूटिका ११·४३३, १६·४४७, १७·२३; पर्जन्याची सूटिका ११·६७६; सूटिकिं जचे १८·१७५; सूटी—नाराजांची सूटी १६·२४१.

**सुडंस–सुदंस**—मर्मज्ञ. सुडंसु ५·१६०. सुदंस १४·३९४. हे दोन्ही संदर्भ अर्जुनास उद्देशून आहेत.

**सुडावणी**—ध्वनि, गजर (कुंटे), सुरवात (ज्ञानदेवी कोश). अनाहताची सुडावणी १२·५४.

**सुणें–सूणें**—(१) (ना.) कुत्रा. जैसें पोट पोसी सुणें। उघडें झांकलें न ह्मणे। १३·६७८. १३·७२८, १५·२३३, १८·५४९. सुणेयांचां ऐसें, कुत्र्यांच्या तोंडीं पडेल असें, ९·४३५. सूणा, कुत्रा, सूणे (अ. व.) १६·३४३. (२) (क्रि.) देणें, घालणें, उत्पन्न करणें, प्रसवणें, प्रवृत्त होणें. सूणें क्रियापदावर कांहीं ठिकाणीं अनुस्वार आलेला आहे. सुणें—सुआवा, भूगोलु काखे सुआवा। १०·२४०. १८·२७८. सुआवें—गगन मुठी सुआवें। मशकें केवि॥ १·७४, ७·१५२, १८·१३२; सुइं—वोडण सुइं ११·३७८, –ईं, सुईं स्नेहांजन। आपुलें तूं॥ १४·१९; सुइजे १६·९०, १६·२५८; सुए—जें कर्मभांडवला सुए। तेयाची चौगुणां येंती पाहे। १८·७४४, कर्मभांडवला शब्द तोडणें इष्ट वाटतें, विष – १६·२३१, सल – १३·१११; सुये, कां टिटिभु चांचुवेन्हीं। माप सुये सागरीं। १·६८, ३·८, १३·१००४, १६·८८, १७·२६९, अन्हांटा – १६·५६, चित्त – १३·५०७, दीठी – १४·३४६, दीठी विषो – १३·८०८, माप – १८·१०१९, व्यापारा – १८·४९८, सुकृताचा डांगोरा – १३·६५८; सुएं—प्रेम सुएं ९·३३७, –यें ८·१३०; सुनि

१८·१५४०; **सुवावें** ९·४८७; **सुवे** १८·१०१४; **सुणी,** उत्पन्न करणारी, प्रसवणारी, तेव्हां ते चि श्रद्धा होये। कर्मांची सुणी ॥ १७·६४, **सूणें—सूइजति,** आपण तरि पळति । सर्वस्वें पाप चुकविति। परि बलिवंडें सूइजति । तेया चि माझि ॥ ३·२३१, **सूयिजे**—वोडण सूयिजे जैसा घावो। न लगतां चि ॥ १३·५४५, १३·९४२; **सूए—दृष्टी फळ न सूए** १८·५८७; **सुंदर आंगिं लेणें न सूए** १८·१७१७; **सूत असे** १५·५५६; **सूनि**—कां पुढां सूनि काठिकारा । अक्षमु चाले ॥ १७·४२, ८·९१, ८·१२२, १२·२०५, १७·४२२, १८·२३९, १८·७०१, १८·१०२९, १८·१०३५, १८·१०५०; **आर्त्ति सूनि** ७·१९७(२); **काखे सूनि** ११·३५५, १२·५६, १८·७५०, १८·१४१०, **दीठि**–२·१३७, ७·१९७(१), १६·३३१, १८·६९७, **दीठी**–१८·१६५८, **दृष्टि**–२·१७१, **पुढां**–१८·१०२९, १८·१०३५, **पोटिं**–१५·३०४, **पोटीं**–१४·९९, **विष्टिचां दारिं**–१३·७३१; **सूती**—(१) (क्रि.) १२·९५, (२) (ना.) **संबंध,** येथें अभिमान, ममत्वाची सूती । घे ना जंव ॥ १४·१४५, **सूनु—मध्यमापोटीं सूनु** १६·२०, **संयमाची धाटी**–१२·४७; **सूंणें**—सकळपदार्थां नांव। सूंतसे जें॥ १८·४६७, **सूंतां**—इये लाजसि ना घोरीं। कर्मीं सूंतां॥ ३·३, १८·२४१; **सूंति—करणें तोंडें सूंति** १३·१२४, **घाये**–१७·२५८, **नवसियें**–१३·५७०; **सूंतील—दोष तोंडें सूंतील,** दोष प्रवेश करतील, १३·५८९; **सूंसि—आंगिं लेणें सूंसि** १८·२४, **पोटीं**–१३·१०५४.

**सुतणें–सूतणें**—निजणें, झोंपणें. **सुतणें**—ते आहार नव्हेति घेतले । व्याधिव्याळ सुतले । ते चेववावेया घातले । पोटा माझि ॥ १७·१४९. **सूतणें**—जैं भ्रांतिसेजे सूतला । तैं स्वप्नसुखें भूतला । ५·४७.

**सुंद**—सुगंधित. साहाजें मलयानीळु सुंदु । ४·२१७, ज्ञानदेवी, कुंटे–'मंद सुगंध' ४·२२०.

**सुंदर–सौंदर**—देखणें, शोभिवंत. **सुंदर**—लाजा कंदर्पु रिगाला शरण। तैसिं सुंदरें रूपें ॥ ११·१३७. १६·१२१, १७·३४०, १८·१४९२, १८·१७१७; **अविचारतें सुंदर** १४·१०९. **सौंदर**—१४·२०१, **–रा** १८·१६५१; **सौंदरांचिये आंगीं** १८·१६७९; **सौंदर्य,** शोभा, **माधूर्या सौंदर्य** १८·१७०४; **सौंदर्यपण—आंगिचेनि सौंदर्यपणें** १०·४३.

**सुना**—व्यर्थ, शून्य, निर्जन, ओसाड. तैसा सा(स)मारंभु सुना । गेला चि तो ॥ १७·४१५. **सुना गावीं** १८·५४९; **सुनाट—सुनाटें पदें** १८·३६७; **सुनियां—दाही दिशा सुनियां** १८·१६०६.

**सुयाण**—सुकाळ, सकाळ. जीवीं सुखावें सुयाण पाहलें। ११·३३३. १४·२१४. **सुवाण**—साम्याचें सुवाण होये । १३·१७०, सुवाण हा सुयाण चा अपपाठ असणें संभवतें, ज्ञानदेवी, कुंटे–'सुयाण' १३·१७०.

**सुयी**—शिवण्याची सुई. **दोरा सुयी** १३·१०९३.

**सुर**—देव. पैं क्षीरसागरा एवढें । अविरजीं दूधाचें भांडें । सुरां असुरां केवडें । मथितां जालें ॥ १८·१४६६ (१). **सुरांचे वृंद** १८·३४८; **यज्ञभावितीं सुरीं** ३·१०४; **सुरीं अपेक्षिजे** २·२३९; **सुरकार्य** ११·८३, **–योनि** १४·१०३, सं. वा. श. 'आठ आंगें' पहा, **–वर** ११·६७०, **–साह्यें सील** १२·२३३, **–सील** पहा; **सुरनरउरग** १३·१५८, **–सिद्धकिन्नर** ११·५०१; **असुर**—राक्षस, तामसी, कवणि ते उदार गदा । करी असुरां कैवल्याचा धोंदा । ११·५९४, १६·४२०; **सुरां असुरां** १८·१४६६ (२); **आसुर**—तमोगुणप्रधान व्यक्ति, तरि सत्य तेयां जोडे । आसुरांतें ॥ १६·२८९, १६·२७५, १६·२८७, १६·३६१, १६·३७०; **आसुर संपति** १६·२१४, **–संपत्ति** १६·४१९; **आसुरां दोखां माजि** १६·२१५; **आसुरा(रां) प्राणियां** १६·२८४; **दैवां आसुरां संपत्तिवंतां** १६·२६९; **आसुरवर्गु** १६·४६६; **आसुरिया दोष रिद्धी** १६·२७८, **–ये प्रकृतिचां तोंडीं** ९·१८३; **आसुरी** १६·२११, १६·२५४; **आसुरीं जनीं** १६·२८२, **–री संपत्ति** १६·२१३, १६·२५१, १६·२६१, १६·२६४, १६·२६६, १६·४१२, **–री सृष्टी** १६·२७३; **दैवी... आसुरी** १६·२७१.

**सुरकणें**—संकोच पावणें. १८·१५८५.

**सुरंगी**—'वाट, भुयार' (राजवाडे). तेथ येरिझारि लागि । जन्ममृत्यूंची सुरंगी । सुवाळली चांगी । संकल्पें एणें ॥ १३·४९. १८·४०६. **एक सूक्ष्मतेचिये सुरंगीं रिगति** १३·१६५.

**सुरत**—रत पहा.

**सुरफुरें**—पातळ (राजवाडे); भरपूर (ज्ञानदेवी कोश, कुंटे), हा अर्थ संदर्भांत बसतो. १५·६८.

**सुरवाडणें**—अनुकूल होणें, सुख पावणें. संदर्भानुरूप या क्रियापदाच्या इतर अनेक अर्थांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. कां सुक्षेत्रीं बीज घातलें। तें आपुल्यापरी विस्तारलें । तैसें भारतीं सुरवाडलें । अर्थजात ॥ १·४०, विस्तारानें शोभिवंत झालें. १६·२९४. **दैव सुरवाडलें** ११·१७०; **माधवी सुरवाडली** ११·३३२; **परेसीं सुरवाडिजे** १८·५१९, **सुखेंसीं** – ६·२५; **सुरवाड**, अनुकूलता, सुकाळ, सुख, तऱ्हीं स्वधर्मे चि सुरवाडु । पारत्रिकिं॥ ३·२२०, ३·२७०, ६·४४६, ११·१०७, १७·८८, १८·६३६, १८·६३७; **प्रमेयपिकाचा सुरवाडु** ९·५२८, **प्रकाशाचा** – १६·१६, **भोगाचा** – १३·७४७; **ते जीव सुरवाडा आणिजति** १७·२०५; **सुखाडु**, ९·५५, हा **सुरवाडु**चा अपपाठ वाटतो; **सुरवाडू** १८·६४१; **सुरवाडें**—आवडीप्रमाणें, अनुकूलतेप्रमाणें, पाठिं गोठि सांवसी सुरवाडें । सुखाचेनि ॥ १०·१८३, ६·४३७, १८·१७५४; **आंतरें सुरवाडें** ५·१०५, **आपुलेनि** – ३·२३, ७·१५१, **उपपत्तिचेनि** – १३·९३७, **दैवाचेन** – ५·६७, **बोधाचेनि** – ८·२५३, **मनपवनाचेनि** – ९·२१३, **संगाचेनि** – १२·२२३; **सुरवाडें देखिलें** ११·६७४, – **राहाटे** १३·९२३; **सुरुवाडेंसिं** १४·२३७; **असुरवाडी**, कष्टानें, १८·१८७, ज्ञानदेवी, कुंटे – 'असुरवाडीं' १८·१८९.

**सुवट**—सुबक, सुरेख. ना तरि रसाची चि सुवट । जैसी बीजकणिका तरि घनवट । ७·५४, ज्ञानदेवी, कुंटे – 'सुघट' ७·५५.

**सुवणें**—घालणें, पुढें करणें, सरसावणें, घेणें, धारण करणें. आगा वरिपडतां पाषाण । न सुवावें केवि ओडण। ९·४८७. १६·१०९. **पुढां सुवे** १८·१०१४, **मुठी** – १७·२८९; **मीं तेयांतें जिव्हारीं सुवें** १८·१५१३; **न सुवे**—भाग न सुवे (आं)आलिंगना। प्रेताचिया॥ १३·५१२; **सुवण** जन्म, आजि सुविद्ये सुवण जाली । १०·१३१, ज्ञानदेवी, कुंटे – 'आयुष्या उजवण' १०·१४७. **सुणें पुढें** पहा; **सुयाण–सुवाण** पहा.

**सुवर्ण**—सोनें. कां सुवर्णा होउनि आनें। लेणीं गमति भिन्नें । मग पाहिजे तंव सोनें । आघवें चि तें ॥ १५·३०१. १·४४, ८·१७२, १८·१२०१, १८·१६७०. **सोनें सुवर्णे झांकिलेयां न झंके**, सोन्यानेंच सोनें झांकलें तर तें झाकलें जात नाहीं, १८·११६९; **सुवर्णत्व**, सोनेपण, १८·१६२२, **सुवर्णवाइ**, त्याच अर्थी, ४·६३; **सुवर्णमणि** १८·१३९१, **–शुद्धी** १८·९७५, **–सूल** १८·४४१.

**सुवाउ–सुवाय**—अनुकूल वारा, चांगलें वातावरण. **सुवाउ–संवादाचा सुवाउ** ९·२८. **सुवाय**— सुवायें मेघु सांवरे । १३·११४६.

**सुवाळणें**—मांडणें. **जन्ममृत्यूंची सुरंगी सुवाळली**, मार्ग तयार केला, १३·४९, ज्ञानदेवी, कुंटे –'सुहाविली', सुशोभित केली, १३·४८.

**सुश्रूषण**—सेवा. १८·८७९.

**सुष–सूष**—सुख पहा. **सुष–संवादसुष** १५·४२४. **सूष—श्रीकृष्णसूषाचें रूपडें** ६·१२०.

**सुषुप्ति–सुषुप्ती**—गाढ झोंप. **सुपुप्ति**—पैं जागरु ना स्वप्न । स्वरूप ना अवस्थान । ते सुषुप्ति घन । जैसी होये ॥ १४·७४. सुषुप्ति बैसे । घणावौनि ॥ १४·१४१. १५·४८८. **घन अज्ञान सुषुप्ति** १५·८८, **अज्ञान घनसुषुप्ति** १५·४८३; **सुषुप्तिकाळीं** १८·४६२; **स्वप्न ना सुषुप्ति** १५·५००. **सुषुप्ती**—सुषुप्ती आणि स्वप्ना। पासौनु वहू अर्जुना । जागणें जैसें आना । बोधाचें चि ॥ १५·४९६, झोंप व स्वप्न यांपेक्षां जागृतीचा बोध निराळ्याच प्रकारचा असतो. १३·१३०, १४·१९७.

**सुषुम्ना**—इडा व पिंगळा या दोन नाड्यांमधली नाडी. १८·७८१. **सुषुम्नेपासीं राहे**, कुंडलिनीस उद्देशून, ६·२४०.

**सुहृद–सुहाड**—मित्र, मनाला आनंद देणारा. **सुहृद—द्वारकापुरसुहृदा**, (सं.) श्रीकृष्णास उद्देशून, ११·६६०. **सुहाड–सुहाडा**—(सं.), अर्जुनास उद्देशून, ९·२४०, १०·२७४, १२·४८,

कापून दिला. मातीची प्रतिमा कां असेना, पण गुरु म्हणून मानून अभ्यास केल्यावर एकलव्यानें जें यश मिळविलें व कीर्ति संपादन केली ती गुरुमहिमेमुळेंच होती. एवढ्यापुरताच हा दाखला ग्रंथांत आला आहे. १८·१७०९.

**ऐरावत**—समुद्रमंथनांतून निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक. हा हत्ती इंद्राचें वाहन म्हणून प्रसिद्ध आहे. ९·३१७, १०·११८.

**कपिल**—एक सांख्यशास्त्र प्रवर्तक व दुसरा वेदान्ती असे दोन कपिल आहेत. पहिल्याची स्मृतींत अवहेलना केली आहे, दुसऱ्याचें श्रेष्ठत्व श्रुतींतही वर्णिलें आहे. ग्रंथांत पहिल्या कपिलाचाच उल्लेख आहे. १३·९५२, **कपिलाचार्य** १०·२१७.

**कर्ण**—कुंतीला सूर्यापासून झालेला मुलगा. जन्मतांच ह्याला कुंतीनें अश्वनदींत सोडला. चर्मण्वतींतून भागीरथींत वाहत असतांना याला धृतराष्ट्राचा सारथी अधिरथ यानें पाहिलें. मुलाला घरीं आणून आपली बायको राधा हिला दिलें, या राधेनें संगोपन केलें; या कारणांमुळें याला सूतपुत्र व राधेय म्हणत. ब्राह्मणरूप घेऊन परशुरामाकडून हा धनुर्विद्या शिकला पण गुरुवंचनेमुळें ती विद्या त्याला अखेरीस फळली नाहीं. हा अर्जुनावरही ताण करणारा वीर आहे असें पाहून अंगद देशाचें राज्य देऊन याला दुर्योधनानें आपल्या पदरीं ठेवलें. द्रोणानंतर हा कौरवांचा सेनापति झाला. अश्वत्थाम्यानें व शल्यानें याचा पाणउतारा कसा केला व पुढें अर्जुनाच्या हातून हा कसा मारला गेला या कथा प्रसिद्ध आहेत. १·१०५; **सहस्रकराचा कुमरु कर्णवीरु** ११·३९४; **कर्णावरि** ११·४६७.

**कश्यप**—ब्रम्हदेवाचा मानसपुत्र, सप्तर्षींपैकीं एक. कित्येक ठिकाणीं कश्यपाऐवजीं भृगूचें किंवा मरीचीचें नांव सप्तर्षींत येतें. परशुरामाच्या अश्वमेधयज्ञांत हा अध्वर्यु होता म्हणून याला दानांत पृथ्वी मिळाली होती. याच्या अनेक स्त्रिया होत्या. १०·९०; **कश्यपादि ऋषिकुलें** ११·२५९; **मरीचिकश्यपादिया** १५·१९५.

**कंस**—उग्रसेनाचा राजपुत्र, मथुरेचा राजा, श्रीकृष्णाचा मामा. हा मल्लविद्येंत व सर्व शास्त्रांत निपुण होता. देवकीचा मुलगा आपणांस मारील या भीतीनें वसुदेव व देवकीला कारागृहांत ठेवणें व श्रीकृष्णास मारण्यासाठीं निरनिराळ्या योद्ध्यांची व पूतनेची योजना करणें, वगैरे जें कांहीं करतां येईल तें यानें केलें. शेवटीं कृष्णानेंच याला मारलें. ९·४६२, ९·४६५; **कंसा ऐसीं अचाटें महा ढेंढीं** १०·२६८.

**कालिंदी**—ही एक सूर्यकन्या श्रीकृष्णाच्या प्राप्तीकरतां यमुनाकाठीं तप करीत होती. तिचा निश्चय पाहून श्रीकृष्णानें तिला वरलें. गरुडाच्या भयानें काद्रवेय (कद्रूच्या) कुळांतला कालिया नाग यमुनेंत दडून बसला होता. त्याच्या विषानें गाई व गोप मरूं लागले. तें पाहून श्रीकृष्णानें कालियाचें मर्दन करून त्याला रमणद्वीपाकडे पाठविलें. **कालिंदियेचें हृदयशल्यु फेडिलें** १०·२६७; **दुःखकालिंदीचां तटीं** ११·३४२.

**काशीश्वर**—काशिराज. अंबा, अंबिका व अंबालिका यांचा पिता. चित्रावांच्या प्राचीन चरित्रकोशांत हा 'दुर्योधनपक्षीय' होता (पृ.१२२) असें म्हटलें आहे. मूळ गीता श्लोकांत १·५ हा पांडवपक्षीय होता असें स्पष्ट सांगितलें आहे, भीष्माशीं आलेल्या पूर्वसंबंधावरून हेंच उघड आहे. १·९९; **काशीपति** १·१५१.

**किन्नर**—देवलोकांतील गौण प्रकारचे देवगण. यांचा गंधर्वांप्रमाणें गायक वर्गांत समावेश केला जातो. ११·५०१.

**कीर्त्तिमुख**—शंकराच्या जटेंतून निघालेला एक शिवगण. याला तीन तोंडें, तीन पाय, तीन शेपट्या व सात हात होते, याची भूक कितीहि खाल्लें तरी राहीना म्हणून शंकरानें याला प्रेतें खाण्यास सांगितलें. जालंदराला मारून खाल्ल्यावरही याची भूक शमली नाहीं तेव्हां शंकरानें याला आपलें स्वतःचेंच शरीर खाण्यास सांगितलें. शरीर खाऊन झाल्यावर बाकी तोंड तेवढें राहिलें. उरलेल्या तोंडाला कीर्त्तिमुख नांव पडलें. माझ्या दर्शनाला येण्यापूर्वीं लोक तुझें दर्शन घेतील असा शंकरानें याला वर दिला. अनेक शिवालयांच्या गाभाऱ्याच्या उंबरठ्यावर सिंहाचें विक्राळ तोंड काढलेलें असतें तें या कीर्त्तिमुखाचें निदर्शक आहे. १५·४९३,

ज्ञानानें अज्ञान नाहींसें झाल्यावर ज्ञानही कीर्तिमुखाप्रमाणें लय पावतें असा या ओवीच्या पूर्वार्धाचा अर्थ आहे.

**कुंतिभोज**—याला कुंती दत्तक दिली होती, या कुंतिभोज राजाचा पुरुजित् हा मुलगा होता. पुरुजित् व कुंतिभोज या दोन व्यक्ति नसून कुंतिभोज हें पुरुजित् राजाचें कुळनांव आहे. याच्या रथाचे घोडे इंद्रधनुष्याच्या रंगाचे होते. याला द्रोणानें मारलें. १·१००.

**कुबेर**—वैवस्वत मन्वंतरांतील विश्रवा ऋषीचा हा मुलगा. ब्रह्मदेवानें याच्या सेवेला यक्ष राक्षस आणि पुष्पक विमान व लंका दिली होती. पैकीं पुष्पक विमानासह लंका रावणानें घेतली. हा सर्व प्रकारच्या धनांचा मालक असून वृद्धि व ऋद्धि याच्या शक्ति आहेत, अलका याची राजधानी आहे. १०·२०५, १६·३५५.

**कुमारी**—यशोदेच्या व देवकीच्या पूर्वसंकेताप्रमाणें कृष्णाऐवजीं देवकीकडे पाठविलेली यशोदेची मुलगी. १०·२६५.

**कूर्म**—समुद्रमंथनाला योजलेल्या मंदररवीला आधार झालेला विष्णूचा कूर्मरूपी अवतार. **मछ कूर्म**, मत्स्य व कूर्म अवतार, ११·८४; **शेषकूर्म** १·१५४.

**कृत्तिका**—नक्षत्रांपैकीं तिसरें नक्षत्र. शंकरपार्वतीला होणारा मुलगा अत्यंत उग्र होईल या भीतीनें त्यांच्या एकांताचा भंग करण्याकरतां इंद्रानें अग्नीला पाठवलें. या व्यत्ययामुळें शंकराचें अर्धें तेज स्खलन होऊन अग्नीस संभाळावें लागलें, त्यानें या सात नक्षत्रपुंजास तें दिलें, त्यांनीं तें संभाळलें म्हणून कृत्तिकांना स्कंदमाता म्हणतात. १०·२१०.

**कृप**—उत्तर पांचाल देशांतील तपस्वी शरद्वान् याचा मुलगा. शरद्वानाच्या तपाचा भंग करण्याकरतां इंद्रानें एक अप्सरा पाठविली. तिला पाहून याचें तेज गवताच्या बेटावर पडलें, त्यापासून एक मुलगा व एक मुलगी अशीं दोन अपत्यें झालीं. शंतनु राजानें कृपा करून त्यांचें पालन केलें म्हणून त्यांचीं कृप व कृपी अशीं नांवें पडलीं. कृपाचार्य शस्त्रास्त्र विद्येंत पारंगत होता. द्रोणाचार्यापूर्वी हा कौरवपांडवांचा गुरु होता. याचा कल पांडवांकडे होता. यामुळें कर्णाची व कृपाचार्याची झटापट होई. कृपी पुढें द्रोणाचार्याची पत्नी झाली. १·१०६.

**कौरव**—कुरु वंशांत जन्मलेला. या नांवाच्या अनेक संदर्भांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. १·१६८, १·१७२, १·२०७, १·२३५, २·९४, २·१८१, २·२१५. **कौरवकुलचक्रवर्त्ती** ११·१६५; **को(कौ)रवकुलीचे** ११·३८७; **कौरवदळ** १·१४५, **– नाथ** ११·४७७.

**गंगा**—ह्या पूर्वीच्या स्वर्गदेवतेच्या पोटीं अष्टवसूंनीं जन्म घेतला, पण त्यांतील सात मुलगे हिनें परत घेतले. एकच पृथ्वीवर राहील व तो निपुत्रिक राहील अशी भविष्यवाणी झाली. हाच पुढें भीष्म या नांवानें प्रसिद्धीस आला. **गंगानंदन** १·१०५, **–सुत** १·११८; भगीरथानें हिला पितरांच्या मोक्षासाठीं पृथ्वीवर आणलें तेव्हां हिला **भागीरथी** नांव पडलें. १०·२३६; ही वाहात असतां मध्यें जन्हूचा यज्ञ लागला, यज्ञसामग्री वाहून जाईल म्हणून जन्हूनें गंगा पिऊन टाकली, भगीरथाच्या विनंतीवरून जन्हूनें हिला मुक्त केली; एका कथेवरून जन्हूनें हिला कानावाटे सोडली व दुसऱ्या कथेवरून हिला जांघ फाडून मुक्त केली; जन्हूची मुलगी म्हणून हिला **जान्हवी** नांव पडलें, १०·२३६–२३७, १५·५३९. गंगा म्हणजे पवित्र नदी या अर्थीही हा शब्द ग्रंथांत आला आहे, २·२१३, २·२४१, ४·४, ५·१५३, ९·२३५, ९·३४९ (१,२), ९·४८४, ११·६७७, १२·३७, १२·१७३, १२·१७७, १३·३७१, १३·४७०, १३·५२७, १४·३९६, १५·२२९, १६·२५, १६·२०३, १७·९०, १७·१७१, १७·१९५, १७·३२२, १८·४४७, १८·७८९, १८·८३९, १८·९०५, १८·९७५, १८·१०११, १८·१०७५, १८·१०८२, १८·१०८७, १८·११३२, १८·११६१, १८·१२४६, १८·१६५४, १८·१७५१ (१,२); **गंगादि** १३·१०६९; **गंगोदक** १७·५२, **गंगाजल** ९·४५४ (१), १०·१८५, ११·४७८, **–पय** १३·२६८, १३·६०६, **–पीयूख** १६·१९४, **–यमुना** ११·६, **–यमुनाउदक** १८·५१,

—रूप ९·४५४ (२); ज्ञानगंगा ९·१८९, प्रतीति– ७·१२२, भक्तिचित्त– १८·१२१६, मति– १४·२२; वोहलागंगेची १७·३९५; गांग, गंगेचें पाणी, १८·१३१०, गांगेय आप १६·१९७.

**गणिका**—आपल्या पोपटाला 'राघोबा' म्हणून साद घालून तो शब्द त्याच्या कडून बोलविणाऱ्या वेश्येस उद्देशून, तूतें आराधितां नाइकें। होंती राउवें बोलाविति कवतिकें। तिये वैकुंठीं तुवां गणिके। सुरवाडु केला ॥ ११·१०७, ही ओवी आली आहे. हिचें स्थान, नांव वगैरे माहिती मिळत नाहीं.

**गणेश**—एक पुरातन, सुप्रसिद्ध देव. याला अगदीं जुन्या काळीं विघ्न उत्पादन करणारा देव समजत असत. हा समज जाऊन पुढें विघ्नांचा नाश करणारा सिद्धि, बुद्धि व सर्व विद्यांचा अधिपति म्हणून याची उपासना होऊं लागली; याची उपासना ही ॐकाराची उपासना समजतात. पार्वतीच्या आंगावरील उटण्यापासून झालेला हा शंकरपार्वतीचा मुलगा; पार्वती स्नानाला बसली असतां शंकरास आंत जाण्याला यानें अटकाव केला म्हणून याचा शिरच्छेद करण्यांत आला; इंद्राच्या हत्तीचें डोकें याला लावून पुनः याला सजीव केला, अशी याच्या मस्तकाची कथा आहे. शंकरावर फेंकलेल्या परशूचा वार यानें आपल्या दांतावर झेलला म्हणून याचा एक दांत तुटलेला आहे, याला सहा हात आहेत, यावर १·२–२० पहा; १०·१०८, १३·८१७; गणेंद्र १७·१; वक्रतुंड, तोंड फिरविलेलें आहे या अर्थीं, १७·४.

**गंधर्व**—देवांचे गायक. पवाडा तुवां केला। गंधर्वासिं॥ २·१०, या ओवीचा संदर्भ असा आहे, अंगारपर्ण आपल्या स्त्रियांसह जलक्रीडा करीत होता म्हणून पहारा करण्याकरितां यानें कांहीं गंधर्वांना नेमलें होतें. लाक्षागृहांतून सुटल्यावर त्या रस्त्यानें पांडव गुप्तरूपानें जात असतां गंधर्वांनीं त्यांना अडवून धरलें. समजावल्यावरही ते समजेनात म्हणून अर्जुनानें त्यांच्याशीं युद्ध केलें व अंगारपर्णाचा पराभव केला. आपला पराभव करणाऱ्या अर्जुनाला सूक्ष्मपदार्थ दिसणारी चाक्षुषीविद्या यानें दिली व एकटे जाऊं नका, धौम्यऋषीला पुरोहित करा असा यानें सल्ला दिला. अंगारपर्णानें पुढें चित्ररथ हें नांव घेतलें.

**गरुड**—कश्यप व विनता यांचा सर्वांत लहान मुलगा. हा अमृत शोधण्याकरतां गेला असतां याचें इद्राशीं युद्ध झालें. त्यांत इंद्राचा यानें पराभव केला व अमृत मिळविलें. हा शेषशायी विष्णूच्या सेवेस सदा तत्पर असतो. याचें सर्पांशीं वैर आहे; विष्णूचें वाहन म्हणून याची प्रसिद्धि आहे. ९·३०३, ९·३८८, १०·२२९, ११·३३, ११·१६७, १३·३९३.

**गायणिनाथ**—नाथसंप्रदायांतील तिसरा गुरु. आदि गुरु शंकर, नंतर (१) मत्स्येंद्रनाथ, (२) गोरखनाथ, (३) गहिनीनाथ, (४) निवृत्तिनाथ, यांचा शिष्य ज्ञानदेव अशी ही शिष्यपरंपरा होती. १८.१७३०–१७३७ पहा.

**गायत्री**—चाक्षुप मन्वंतरांत ब्रह्मदेवानें एक यज्ञ केला, त्यावेळीं शंकर, विष्णु व इतर देव आणि भृगु इत्यादि ऋषि आले होते. तेथें गायत्रीला मुद्दाम बोलावून तिला मानाचें स्थान दिलें होतें; पुढें ती नदी व मंत्ररूपानें अवतरली. ग्रंथांत हा शब्द मंत्र व छंद या अर्थीं आला आहे. कोश पहा.

**गोपी**—गोकुळांतील गोपकन्या व गोपस्त्रिया. ९·४६५.

**गोरखराय**—वर **गायणिनाथ** पहा. याला संजीवनी विद्या येत होती. १८·१७३३.

**गौतम**—अंगिरसाच्या कुळांतील दीर्घतमा व प्रद्वेषी यांचा मुलगा. ब्रह्मदेवाची मानसकन्या अहल्या याची स्त्री होती. हा मोठा तपस्वी होता; तपश्चर्येनें शंकराला प्रसन्न करून यानें शंकराच्या जटेंतून गंगेस मोकळें केलें. हा मोठा धर्मसूत्रकार होता, याच्या धर्मसूत्रांवरील मिताक्षरा टीका सुप्रसिद्ध आहे. गौतम नांवाचे इतर अनेक ऋषि होते. १५·५४५, १७·९०, १८·१६६८.

**चंडिका**—पाताळांतील शुंभनिशुंभांचे आश्रित चंड व मुंड हे एकदां एका सुंदर स्त्रीच्या मागें लागले. ह्या स्त्रीनें कालिकारूपानें यांना मारलें. या कालिकादेवीला चंडा, चंडिका, चंडी, चामुंडा,

दुर्गा अशींही नांवें आहेत. ह्यांना पार्वतीचे अवतार मानतात. नवरात्रांत हिचा उत्सव होतो. **नवचंडी** १३·८१८, **चंद्रि(ड्रि)का** १८·४४१, कोशांत **चंद्रिका** पहा; **चामुंडा** विश्वव्यापक आदिमाया शक्तिरूपानें देवांचीं संकटें निवारीत असे. ब्रह्मदेवाच्या वरानें उन्मत्त होऊन महिषासुर देवांना उपद्रव करूं लागला. देवांच्या प्रार्थनेवरून ह्या आदिमायेनें अठरा हातांचें रूप घेऊन महिषासुराला मारलें. पुढें तिचें महिषासुरमर्दिनी असें नांव पडलें. दुर्गापुजेला मेंढ्यांचे बळी देतात. १२·५३, १८·४४२, १८·१६४५.

**चंद्र**—समुद्रमंथनांतून निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक. याच्या सत्तावीस स्त्रियांचीं नांवें नक्षत्रांना दिलीं आहेत. रोहिणीवर याचें विशेष प्रेम असल्यामुळें ती त्याच्या अगदीं जवळ असते. सापत्न भावानें इतर स्त्रियांनीं दक्षाकडे तक्रार केली, बजावलें असतांही चंद्र ऐकेनासा झाला, म्हणून 'तूं क्षयी होशील' असा दक्षानें याला शाप दिला. चंद्र खंगला व त्याचा परिणाम वनस्पतींवर विशेषतः औषधी वनस्पतींवर होऊं लागला, म्हणून 'पश्चिमसमुद्रांत स्नान केल्यावर तूं पूर्ववत् होशील' असा याला उःशाप मिळाला. चंद्राला उतरत्या व चढत्या कला असणें हा या शापाचा व उःशापाचा परिणाम समजतात. ९·४९७. **कलावंत** १८·१६६६, चंद्रांत अमृत आहे व त्यामुळें तो वनस्पतींचें पोषण करतो, १५·३७१–३७२; **चंद्रामृत**, ६·२४७, ११·९६; **सतरावियेचेनि** ९·२१३, पुढें सं. वा. श. **सतरा** पहा; **चंद्रमा**, कोशांत **चंद्र** पहा; **शशी** १८·१०८१; **शीतांशु** १८·४९३, चंद्र शीतल आहे म्हणून विषदाह शमविण्याकरतां शंकरानें शशिकला मस्तकावर घेतली आहे; **सुधाकर** १८·१३. अशींही चंद्राचीं नांवें ग्रंथांत आलीं आहेत. याच्या **सोम** १८·११२ या नांवाचा अष्टवसूंपैकीं एक सोम या नांवाशीं संबंध जोडतात. अग्निपुत्र सोमानें बलिष्ठ होऊन बृहस्पतीची स्त्री तारा हिला पळविली. त्याच्यापासून झालेल्या तेजस्वी मुलाचा बाप कोण असें विचारलें असतां तिनें चंद्राचें नांव सांगितलें. त्या मुलापासून पुढें सोमवंश झाला असें एक कथानक आहे; **सोमकांत**, चंद्रकिरणांनीं हा मणि द्रवतो, १८·१३०४, **–वंश**, कुरूचा वंश, १२·२०, **–वंस** १७·३२, **–वार** १३·८१९, **–सूर्यग्रहण** १८·१०९.

**चित्ररथ**—वर गंधर्व पुढें अंगारपर्णाचें कथानक पहा. १०·२१६.

**चेकितान**—वृष्णिवंशांतील पांडवांकडचा एक राजा. हा दुर्योधनाकडून मारला गेला. १·९९.

**चैद्य**—चेदि देशाचा राजा. **शिशुपाल** पहा.

**चौरंगी**—भद्रपूरच्या भुलेश्वर राजाच्या मोठ्या राणीपासून झालेला राजपुत्र. मोठी राणी गरोदर असतांना तिला धाकट्या राणीनें राजाकडून सप्तशृंग पर्वतावरील अरण्यांत टाकविलें. तेथें तिला मुलगा झाल्यावर त्याचे हातपाय तोडवून त्याला लुलापांगळा करविला. तो 'भग्नावयव' स्थितींत असतांना तेथें मत्स्येंद्रनाथ पोहोंचले, त्यांच्या कृपादृष्टीनें तो पूर्ववत् झाला व चौरंगीनाथ या नांवानें प्रसिद्धीस आला. १८·१७३२.

**जनक**—मिथिला नगरीचा राजा. यानें पुत्रासाठीं पुत्रकामेष्टि यज्ञ केला तेव्हां दोन मुलगे व एक मुलगी सीता, अशीं तीन अपत्यें पृथ्वींतून मिळालीं. जनक आत्मज्ञानी होता व जरी राज्यकारभार पहात होता तरी तो मुक्त होता. **जनकादि** ३·१५१.

**जन्मेजय**—जनमेजय, युधिष्ठिराचा पणतु, परीक्षिताचा मुलगा. हस्तिनापुरच्या या राजानें सर्पसत्र केलें, त्यांत तक्षकाची आहुति द्यावी हाही हेतु होता, पण तक्षकानें आस्तिक ऋषीकडून अभयवर मागण्याचें कारस्थान करून सत्र थांबविलें. सत्र थांबलेलें पाहून ब्राह्मण झोपीं गेले, तें पाहून आपल्या दुष्ट राणीच्या सल्ल्यानें यानें ब्राह्मणांवर थंड पाणी शिंपडलें, तीं शस्त्रें बनून ब्राह्मण शतखंड झाले व त्यामुळें जनमेजयास कुष्टरोग झाला. हा दोष व्यासशिष्य वैशंपायनानें भारत ऐकविल्यावर गेला. १·३७, १·४८.

**जलसेन**—शेषशायी. १३·३९२. **जलसेनाचिया गवसणियां**, हा संदर्भ विष्णूच्या अवतारांस उद्देशून आलेला आहे, ११·८४.

**जगदंबा**—६·२७२, कुंडलिनीस उद्देशून; १८·१६२०, लक्ष्मीस उद्देशून.

**जयद्रथ**—सिंधुदेशाच्या वृद्धक्षत्र राजाचा हा राजकुमार. धृतराष्ट्राची कन्या दुःशला याला दिली होती. काम्यवनांत पांडव असतांना ते घरीं नाहींत असें पाहून द्रौपदीला यानें जबरीनें रथांत घालून पळविलें. धौम्यऋषीही त्याच्या मागें लागले. पांडव परत आल्यावर याचें पांडवांशीं युद्ध झालें, पण युद्धांतून हा पळून गेला. बऱ्याच वेळानें भीमार्जुनांनीं याला धरून आणलें, याचे पांच पाट काढले व द्रौपदीची क्षमा मागायला लावली, आपण पांडवांचे दास आहों असें त्याच्याकडून कबूल करवून घेतलें. यावर यानें शंकराची आराधना करून पांडवांना आपण जिंकावें असा वर मागितला. अर्जुनाखेरीज इतर पांडवांना तूं जिंकशील असा शंकरानें वर दिला. भारतीय युद्धांत चक्रव्यूहांत पकडून यानें अभिमन्यूला मारलें. अर्जुनानें दुसऱ्या दिवशीं सूर्यास्तापूर्वीं याला मारण्याचा पण केला व कृष्णानें तो कसा पुरा करविला ही कथा प्रसिद्ध आहे. ११·४६८.

**तक्षक**—कश्यप व कद्रू यांचा नागपुत्र. अर्जुनानें खांडववन अग्नीस दिलें तेव्हां तेथून पळून जातांना याच्या कांहीं कुटुंबीयांचा अर्जुनानें वध केला. हें वैर मनांत धरून यानें परीक्षिताच्या गळ्याला दंश करून त्याला मारलें. जनमेजयानें सर्पसत्र केलें, पण त्यांतूनही तो कसा वांचला तें **जन्मेजय** पुढें पहा. ११·३७२, १७·२४.

**त्रिशंकु**—निबंधन राजाचा हा दुर्वर्तनी राजपुत्र होता. राजानें याला हद्दपार केलें होतें. एका ब्राह्मण स्त्रीचा विवाहांत यानें अपहार केला, वसिष्ठाची गाय मारली, आधीं पित्याचा क्रोध होताच. या तीन पापांमुळें त्याच्या डोक्यावर तीन शंकु उठले होते. यामुळें याचें त्रिशंकु हें नांव पडलें. या पापांचें प्रायश्चित्त म्हणून यानें तपश्चर्या केली व विश्वामित्राची सेवा करून त्याची मर्जी संपादन केली व सदेह स्वर्गास जाण्याचा हट्ट धरला. विश्वामित्रानें तपोबलानें याला वर चढविलें पण इंद्रानें व देवांनीं त्याला पुनः खालीं ढकललें. विश्वामित्र याला खालीं येऊं देईना. इंद्राशिवाय नवा स्वर्ग व नवी सृष्टि मी निर्माण करीन म्हणून विश्वामित्रानें दुसरी सृष्टि करण्यास आरंभ केला. ब्रह्मदेवाला व इतर देवांनाही संकट पडलें. तेव्हां विश्वामित्राच्या प्रतिसृष्टींतील दक्षिणेकडील नव्या नक्षत्रांत त्रिशंकूला स्थान देण्यांत आलें. १८·१७६५–१७६६.

**दुर्गा**—ही आदिमायेची शक्ति सात्त्विकी, राजसी व तामसी अशी त्रिगुणात्मिका आहे. १३·८१७. **चंडिका** पहा.

**दुर्योधन**—धृतराष्ट्राच्या शंभर राजपुत्रांत सर्वांत ज्येष्ठ. याच्या जन्मकाळीं पुष्कळ अपशकुन झाले होते. हा सारथ्यांत, शस्त्रविद्येंत व गदायुद्धांत प्रवीण होता. बळरामाचा आवडता शिष्य होता. पांडवांचा हा हेवा करी म्हणून अर्धें राज्य हस्तिनापुरासह याला देऊन अर्धें राज्य पांडवांस देऊन त्यांना इंद्रप्रस्थास ठेवण्यांत आलें. लाक्षागृहाचें व द्यूतांतील कपट, द्रौपदीचा छळ व निष्फळ झालेली कृष्णशिष्टाई या कथानकांत मुख्यतः दुर्योधनाचेंच कारस्थान होतें. १·९२, १·१०१, १८·१६०९; **राया** १·१२५.

**देवकि**—देवकी. देवकाची कन्या, वसुदेवाची पत्नी. हिच्या आठ मुलांपैकीं सहांना कंसानें ठार मारलें. बळराम देवकीचा सातवा मुलगा मानला जातो. आठवा मुलगा कृष्ण, याच्या जन्माची कथा सुप्रसिद्ध आहे, वर **कुमारी** पहा. ६·१३७, १०·२६५.

**देवल**—एक ऋषि. कश्यप कुळांतील असिताचा पुत्र. हा स्मृतिकार होता. याचा धाकटा भाऊ धौम्य पांडवांचा पुरोहित होता. १०·१४२. **असित** पहा.

**द्रुपद**—पांचाल देशाचा राजा. शस्त्रास्त्रविद्येंत द्रोणाचार्यांचे वडील भरद्वाज याचे गुरु होते. राज्यारूढ झाल्यावर द्रुपदानें गुरुबंधु द्रोणाचार्यांचा उपहास केला, म्हणून द्रोणाचार्य धृतराष्ट्राकडे गेला व कौरवपांडवांना धनुर्विद्या शिकवूं लागला. पुढें तो कौरवांकडेच राहिला. द्रुपदानें केलेल्या यज्ञाच्या यज्ञकुंडांतून एक देदीप्यमान तरुण व श्यामवर्णा स्त्री बाहेर आलीं. तींच धृष्टद्युम्न व द्रौपदी. द्रुपदाचा वध द्रोणाचार्यांनें केला. १·९८; **द्रुपदकुमर**, धृष्टद्युम्न १·९४; **द्रुपदद्रौपदादि** १·१५१, हे शब्द सुटे घ्यावे.

**द्रोण**—आंगिरस गोत्रांतील भरद्वाज ऋषीचा

मुलगा. या ऋषीचें घृताची अप्सरेस पाहून स्खलन पावलेलें रेत द्रोणकलश यज्ञपात्रांत ठेवलें म्हणून द्रोण असें नांव पडलें. ऋग्वेदादि विशेषतः धनुर्विद्या आपल्या पित्याकडे हा शिकला तेव्हां द्रुपद हा याचा गुरुबंधु होता. परशुरामाकडे भिक्षेसाठीं गेला असतां, आधींच आपली सर्व संपत्ति ब्राह्मणांना दान दिल्यामुळें अस्त्रविद्येखेरीज परशुरामाकडे कांहीं देण्यासारखें राहिलें नव्हतें म्हणून याला परशुरामानें अस्त्रविद्या दिली, विशेषतः ब्रह्मास्त्र दिलें; पण गरिबी तशीच राहिली म्हणून तो गुरुबंधु द्रुपदाकडे गेला. त्यानें अपमान करून अवहेलना केली म्हणून फिरत फिरत तो कृपाचार्याकडे येऊन राहिला. एकदां खेळतां खेळतां पांडवांची विटी विहिरींत पडली ती त्यांना काढतां येईना, द्रोण जवळच होता, त्यानें दर्भाच्या काडीनें ती काढली हें भीष्माला समजलें; भीष्माला याच्या शस्त्रास्त्रविद्येचें नैपुण्य माहित होतें म्हणून त्यानें द्रोणाला कौरवपांडवांना धनुर्विद्या शिकवायला ठेवलें. याची कीर्ति ऐकून देशोदेशींचे राजपुत्र याच्याकडे ही विद्या शिकायला येत असत. याची अर्जुनावर विशेष मर्जी असे. एकदां एका नक्रानें द्रोणाचा पाय धरला, सगळे राजकुमार पळून गेले पण अर्जुनानें नक्रापासून याला सोडविलें म्हणून यानें अर्जुनाला ब्रह्मास्त्र दिलें. गोग्रहणप्रसंगीं हा विराटनगरींत गेला होता. कृष्णशिष्टाईंत यानें, भीष्मकृपादिकांनीं व कर्णानेंही दुर्योधनास बराच उपदेश केला कीं पांडवांस अर्धें राज्य द्यावें पण दुर्योधनानें तें ऐकलें नाहीं. यांत धृतराष्ट्राचें त्याला पाठबळ होतें. जयद्रथवधानंतर द्रोणाचार्यानें मशाली लावून रात्रींही युद्ध चालू ठेवलें, तें पाहून भीमानें इंद्रवर्म राजाचा अश्वत्थामा हत्ती मारला व अश्वत्थामा मेला अशी हूल उठविली; हा अश्वत्थामा माझा मुलगा काय असें सत्यवक्त्या धर्माला द्रोणाचार्यानें विचारलें; कृष्णाच्या सांगण्यावरून 'अश्वथामा मेला' व हळूच 'हत्ती' असें धर्म म्हणाला, त्यावर द्रोणाचार्यानें शस्त्र खालीं ठेवलें व ध्यानस्थ बसला; ही संधि साधून धृष्टद्युम्नानें याचें शिर कापलें. १·९३, १·१०१, १·१२३, २·२९-४४, ११·३९३, ११·४६७; मी पार्थु द्रोणाचा केला। येणें धनुर्वेदु मज दीन्हला। २·३७, भीष्मद्रोण १·२२२, २·३४, भीष्मद्रोणादिक १·१७५.

**द्रौपदीकुमर**—पांच पांडवांचे द्रौपदीला झालेले पांच कुमार. क्रमशः यांचीं नांवें—प्रतिविंध्य, सुतसोम, श्रुतकीर्ति, शतानीक, श्रुतसेन. हे सर्व महारथी म्हणजे एकेक हजार योद्ध्यांना पुरे पडणारे होते. १·१०२.

**धर्म**—(१) यम. कर्मसाक्षी धर्म १०·२२६. (२) युधिष्ठिर. हा कुन्तीला यमधर्मापासून झाला. कौरवपांडवांत सर्वांत वडील म्हणून याला धृतराष्ट्रानें यौवराज्याभिषेक केला. यानंतर दुर्योधनानें केलेला पांडवांचा हेवा व द्वेष, लाक्षागृह, इंद्रप्रस्थाची स्थापना, द्रौपदीस्वयंवर, राजसूय यज्ञ, द्यूत, नंतर सभेंत द्रौपदीची केलेली दीन अवस्था, वनवास व शिष्टाईनंतर झालेलें युद्ध ह्या घटना झाल्या. युद्धांत झालेल्या गोत्रगुरुवधामुळें हा अस्वस्थ झाला व राज्याभिषेक झाला होता तरी तीर्थयात्रेस गेला. परत आल्यावर यानें अश्वमेध केला. कांहीं वर्षें राज्य चालविल्यावर द्रौपदी व चारही भावांस घेऊन हा स्वर्गाला जाण्यास निघाला. वाटेंत एकामागून एक सर्व पतन पावले व हा एकटाच स्वर्गाला पोहोंचला. तेथें बंधुप्रीति जागृत होऊन यानें गंगेंत देह ठेवला. धर्मा अनुज १६·४६२.

**धृष्टकेतु**—शिशुपालाचा पराक्रमी राजकुमार, नंतर चेदीचा राजा. याची मुलगी रेणुमती नकुळाला दिली होती. याच्या नांवाप्रमाणेंच याचे पराक्रम द्रोणपर्वांत वर्णिले आहेत. द्रोणाचार्यानें याला मारलें. १·९९.

**धृष्टद्युम्न**—द्रुपद पहा. शस्त्र खालीं ठेवून ध्यानस्थ राहिलेल्या द्रोणाचार्यांचा यानें शिरच्छेद केला. पुढें शिबिरांत झोंपलेला असतांना अश्वत्थाम्यानें याला मारलें. १·१५२.

**ध्रुव**—उत्तानचरण पहा. हा राजा एकदां सुरुचीच्या उत्तमास मांडीवर घेऊन खेळवीत असतां ध्रुवही आपल्या बापाच्या मांडीवर चढूं लागला ११·१०३, तें पाहून मत्सरानें सुरुचीनें याला हिणवलें व रागें भरली. ध्रुवास इतकें वाईट

वाटलें कीं अढळपदासाठीं तपश्चर्या करायला तो निघून गेला. तें पाहून नारदानें याचें कौतुक करून ॐ नमो भगवते वासुदेवाय हा मंत्र दिला व तो मधुवनांत ११·१८३ जाऊन जपण्यास सांगितलें. ध्रुवानें एका पायावर उभें राहून इतकी कडक तपश्चर्या केली कीं त्याच्या आंगठ्याच्या दाबानें पृथ्वी कलली व इंद्रावर संकट आलें. ध्रुवास दर्शन देण्याची सर्व देवांनीं विष्णूस विनति केली. पुढें उभें राहिल्यावरही ध्रुव कांहीं बोलेना म्हणून विष्णूनें शंखानें त्याच्या गालास स्पर्श केला ११·१८३, त्यावर ध्रुवानें केलेलें सुंदर स्तवन भागवतांत आहे. ध्रुवानें अढळस्थान मागितल्यावर, आधीं अनेक वर्षें तूं राज्य कर मग तुला अढळपद मिळेल असा विष्णूनें वर दिला. त्याप्रमाणें राज्य करून व अनेक सत्कृत्यें करून ध्रुव सदेह स्वर्गाला गेला. त्याच्या नांवाचा तारा तोच हा ध्रुव म्हणून दाखवितात. ९·४६४, १०·१८(१), १३·४८७; **गगनिचा ध्रुवो देवो** १३·६२०; **ध्रुवपद** १०·१८ (२), ११·१०२.

**नकुल**—पांच पांडवांपैकीं माद्रीला झालेल्या दोन (जुळया) मुलांत वडील. राजसूययज्ञांत पश्चिम दिग्विजय यानें केला. हा अश्वविद्येंत कुशल होता म्हणून अज्ञातवासांत विराटाची अश्वशाला यानें पाहिली. भारतीय युद्धांत यानें दुर्योधनास जेरीस आणलें. हा अत्यंत सुंदर होता. या अहंकारामुळें द्रौपदीनंतर सहदेवापूर्वीं तो स्वर्गयानांत पडला. १·१५०.

**नटेश्वर—अर्धनारीनटेश्वर.** ९·२६९, १८·५०. अरुणाचलावर तप करीत असलेल्या पार्वतीजवळ शंकर गेला व तिला आपल्या डाव्या मांडीवर घेतलें, तेव्हां प्रेमभरानें ती इतकी एकरूप झाली कीं दोन व्यक्तींची एक व्यक्ति झाली. शिवपार्वतीचें अर्धें आंग गोरें व अर्धें तांबडें, अर्ध्या आंगांत चोळी व अर्ध्या आंगावर हार दिसूं लागले. ही कथा स्कंदपुराणांत आहे.

**नर**—चाक्षुष मन्वंतरांत दक्षकन्येस झालेल्या नरनारायण या दोन तपस्व्यांनीं इतकें दुर्घट तप केलें कीं त्यांच्या तपोभंगाकरतां इंद्रानें अप्सरा पाठविल्या. नारायण त्यांना शाप देण्यासाठीं तयार होता पण नरानें त्याचें सांत्वन केल्यावर त्यानें आपल्या मांडींतून दुसऱ्या अप्सरा निर्माण केल्या, त्यांपैकीं एक उर्वशी होती. पुढें हेच कृष्णार्जुनरूपानें अवतरले. १५·४२५.

**नवचंडी**—चंडिका पहा.

**नहुष**—पुरूरव्याचा नातू, ययाति राजाचा बाप. त्रिशिराला मारल्यावर ब्रह्महत्येचें पातक घडलें म्हणून इंद्र अत्यंत अस्वस्थ होऊन सिंहासन टाकून हिंडूं लागला. रिकाम्या इंद्रपदावर नहुषाला बसविलें पण त्याच्यानें आपलीं नित्य-नैमित्तिक पूजाअर्चादि कर्में टाकवलीं नाहींत, हीं आतां टाकून इंद्रपदाचा अधिकार घे असा उपदेश मिळाल्यावर ह्याला अहंकार चढला. बुद्धि चळली व इंद्राणीवर नजर गेली. सप्तर्षींच्या खांद्यावर पालखी ठेवून त्यांत बसून याल तर तुम्हांस वरीन असें इंद्राणीनें सांगितल्यावर त्याप्रमाणें यानें योजना केली, अत्यंत उत्सुकतेमुळें ऋषींना लवकर चला, 'सर्प सर्प', असें म्हणून पायानें टोचूं लागला. अगस्ति ऋषीनें तूंच सर्प हो असा याला शाप दिला. नहुष सर्प होऊन पडला. अगस्तीला दया येऊन तुला युधिष्ठिर सोडवील असा उःशाप दिला. पुढें अजगर होऊन यानें एकदा भीमाला धरलें असतां युधिष्ठिरानें नहुषाच्या प्रश्नांचीं उत्तरें देऊन भीमाला सोडविलें व नहुषाला मुक्ति दिली. १८·१४६९.

**नारायण**—नर पहा. १५·४२५.

**नारद**—ब्रह्मदेवाचा मानसपुत्र. यानें व्यासाला भागवत रचण्याचा उपदेश दिला. दक्षपुत्रांस प्रजोत्पत्ति करण्यापासून परावृत्त केलें म्हणून दक्षानें तूं ब्रह्मचारी राहून नेहमीं भटकत राहाशील व लोकांत भांडणें लावशील असा याला शाप दिला. याच्या नांवें अनेक कथा भागवतांत व पुराणांत आहेत. हा महान् विष्णुभक्त देवर्षि होता. शेषशायीजवळ तुंबरुसह याला स्थान मिळालें आहे. ९·४६४, १०·१३९, १०·२१६; **नारदादिकां संतां** १०·१४९.

**निवातकवच**—प्रल्हादाचा भाऊ संन्हाद् याचे हे पुत्र. इंद्रालाही अजिंक्य होते. यांचें रावणाशीं सख्य होतें. अर्जुनानें यांना मारलें. यावरून

असें दिसतें कीं नृसिंह अवतारापासून कृष्णावतारापर्यंत यांचे अनुयायी यांचीं नांवें घेऊन संघ करून राहिले होते. हे साठ ते चवऱ्याहत्तर हजार होते असें चित्राव म्हणतात. प्राचीन चरित्र-कोश पृ.३०४ पहा. **निवातकवचाचा,** २·१०, निवातकवचांचा असा पाठ घेणें इष्ट वाटतें.

**नृसिंह**—हिरण्यकशिपूला मारण्यासाठीं व प्रऱ्हादाचें रक्षण करण्यासाठीं विष्णूनें घेतलेला चौथा अवतार. ब्रह्मदेवाच्या वराला बाध न आणतां अर्धें सिंहाचें व अर्धें मनुष्याचें रूप घेऊन, खांबांतून प्रकट होऊन राजवाड्याच्या उंबऱ्यावर नृसिंहानें हिरण्यकशिपूला संध्याकाळीं नखांनीं फाडून मारलें. प्रऱ्हाद परमभागवतांपैकीं एक होता. हा राक्षस होता तरी भक्तीनें विष्णूला वश करून घेतलें होतें. ९·४४६, यावर ९·४४४–४४८ पहा.

**पांडव**—पांच पांडव १·८६, अर्जुनास उद्देशून ३·१४३; **पांडवकुल** ६·१३६, –**दल** १·१३७, –**सैन्य** १·८८.

**पार्वती**—हिमालय व मेना यांची ही कन्या. शंकरासाठीं हिनें केलेल्या तपाचें वर्णन कुमारसंभवांत आहे. हिनें अरुणाचलावर तपश्चर्या केली व पुढें हिला शंकरानें जवळ घेतल्यावर अर्धनारीनटेश्वर असें शंकर-पार्वतीचें रूप झालें. देवांना पिडणाऱ्या राक्षसांना मारण्यासाठीं हिनें अनेक रूपें घेतलीं. वर **चंडिका** पुढें **चामुंडा** पहा. शंकरानें पार्वतीला गीताशास्त्र सांगितल्याचे ग्रंथांत उल्लेख आहेत. १·७०–७१. **अंबिका** १८·१६१३; **भवानि** ११·२५८, **भवानी** १·७०.

**पुरुजित्**—**कुंतिभोज** पहा. याला द्रोणानें मारलें. **पुरुजितादि राये** १·१००.

**पूतना**—कंसानें ही आपली बहीण कृष्णाला मारण्याकरतां मथुरेला पाठवली. सुंदर स्त्रीचें रूप घेऊन व स्तनांना विष लावून हिनें बऱ्याच मुलांना मारलें. कृष्णानें हिचें कपट ओळखून विषच नव्हे तर दूध व दुधासकट हिचा प्राणही आकर्षून घेतला. १०·२६५, ११·१००, १६·२६.

**प्रऱ्हाद**—हिरण्यकशिपु व कयाधूचा मुलगा. नारदानें कयाधूस उपदेश दिला तो प्रऱ्हाद पोटांत असतांनाच त्यानें ऐकला व पुढें तो भगवद्भक्त झाला. विष्णूवरील आपली भक्ति हा सोडीना म्हणून याला विष पाजणें, भाजणें, हत्तीकडून तुडविणें, कड्यावरून लोटणें, समुद्रतळीं घालणें इत्यादि नाशाच्या योजना याच्या बापानें केल्या. इतकें होत असतांही बापाशीं वैर न करतां सौम्यपणानें प्रऱ्हाद उपदेश देतच राहिला —द्वेष्यभावादिमळीं लिंपे चि ना १०·२२७. याच्या बापाला मारल्यावर (**नृसिंह** पहा) 'आणि काय पाहिजे' असें विचारलें असतां ईश्वरभक्तीखेरीज कांहीं नको असेंच यानें उत्तर दिलें. याचा षड्रिपूंवर विजय, आपला मुलगा विरोचन याचें सुधन्व्याशीं झालेल्या भांडणांत यानें दिलेला निर्णय, आपला नातू बलि यास दिलेला उपदेश याच्या निःपक्षपाताची, व्यवहारकुशलतेची व ज्ञानाची साक्ष देतात. ९·४४७, १०·३०९; **प्रह्लाद** १०·२२७.

**बलि**—प्रऱ्हादाचा नातू, विरोचनाचा मुलगा. याचा शुक्र हा गुरु होता. विष्णूनें देवांचा त्याग केला तेव्हां तूं देवांना जिंक असा शुक्रानें उपदेश केला. त्याप्रमाणें यानें देवांना जिंकलें व इंद्राची संपत्ति लुटली. दानवांना हातीं घेऊन यानें देवांबरोबर समुद्रमंथन केलें. त्यांतून चौदा रत्नें बाहेर पडलीं. पुढें यानें देवाब्राह्मणांना त्रास दिल्यामुळें विष्णूनें बटूचें रूप घेऊन याच्या अश्वमेध यज्ञांत तीन पावलांएवढीच जमीन दानांत मागितली. दानाचें पाणी हातावर पडतांच बटूनें मोठें रूप घेतलें व दोन पावलांत ब्रह्मांड व्यापलें व तिसरें कोठें ठेवूं म्हणून विचारल्यावर बळीनें आपलें मस्तक पुढें केलें. वामनानें बळीला पाताळांत घातलें. अशी फसवणूक केल्याबद्दल पाताळांत त्याच्या दारावर द्वारपाळ म्हणून राहिला. **बलिचा दारवठेकारु** ११·१०६; **बलिबंधन** १२·२४०.

**बृहस्पति**—बृहती म्हणजे वाणी, तिचा पति अशी किंवा बृहत् म्हणजे मोठें तप करणारा अशी या नांवाची व्युत्पत्ति लावतात. हा देवांचा गुरु, **पुरोहित** १०·२०९, होता. ऋग्वेदांत याच्या

नांवाचा उल्लेख आहे. यानें धर्म, नीति व अर्थ या शास्त्रांवर ग्रंथ लिहिले असावेत ९·३२२; वाचस्पति १३·१९०.

**ब्रह्मा**—विष्णु सृष्टीचा विचार करीत असतां नाभींतून कमळ रूपानें अहंकार उत्पन्न झाला व एक अंडें उत्पन्न झालें. कमळांतून ब्रह्मा व अंड्यांतून ब्रह्मांड तयार झालें. सृष्टि-उत्पत्तीच्या वेळीं ब्रह्मदेव एकटाच असल्यामुळें गोंधळला होता. १७·३३३ पहा. यानें आपल्या अंगांतून उत्पन्न केलेली स्त्री शतरूपा इतकी सुंदर होती कीं ती जेव्हां याच्या भोंवतीं प्रदक्षिणा घालूं लागली तेव्हां याचे मानसपुत्र सभोवार बसलेले पाहून या स्त्रीकडे बघायला तो लाजला, यानें वेद केले. मरीचि, अत्रि इत्यादि याचे मानसपुत्र होते. गायत्री नेहमीं याच्या जवळ असते. यानें अनेक यज्ञ केले व तीर्थें स्थापन केलीं. याचें आयुष्य शंभर वर्षांचें आहे पण प्रत्येक दिवस कितीतरी हजार वर्षांचा आहे. एकदां कृष्णाची परीक्षा घ्यावी म्हणून यानें गोकुळांतल्या गाई व गोप अदृश्य केले, तें पाहून कृष्णानें तशाच गाई व गोप निर्माण करून कांहीं उणें भासूं दिलें नाहीं, तें पाहून ब्रह्मदेव गोंधळला. १०·२६७ पहा. **ब्रह्मा** १·१३६, १·२०३, ३·८५, ३·८७, ११·५१६, १३·९१९, १४·११०, १४·३५७, १५·३१, १६·११८, १६·३५६, १७·४०१, १८·११२६, **–दि** ९·२८८, १५·२०४, १५·२०५, **–दिक** ३·२५०, ११·४१६, १५·२०२; **ब्रह्मेश** ८·२६६, **–शान**, ब्रह्मा व शंकर, १·५५, १५·२०१, **–शांतअणगट** १५·१९७, **ब्रह्मेयाचें आयुष्य** ९·५०१, **ब्रह्मायुष** १४·१८६; **ब्रह्मदिन** ८·१६१, **–भुवन** ८·१६३; **ब्रह्मावेन्हीं** १०·२७२; **आब्रह्म**, ब्रह्मदेवापासून, १·२५५, **आब्रह्मा** १३·१०१८; **आदिब्रह्मा** १८·५२२, **हर–** ११·५७३; **चतुरानन** ३·११६, ११·२०५, ११·२५७; **धाता–त्रा** १·१०८, ११·१४६, ११·३९५, १२·९, १६·१२८, १६·२५३, १७·३३८, १८·१७६६; **प्रजापति** १७·३३२; **विरिंची** ३·१११, १०·२६७, ११·६१२; **सत्यलोकनाथ** १३·२७; **स्रष्टा** १०·२७४.

**भस्मासुर**—शंकराच्या भस्मांतून याची उत्पत्ति झाली. उग्र तप करून ज्याच्या मस्तकावर मी हात ठेवीन तो भस्म व्हावा असा वर यानें शंकराकडून मागून घेतला. या वरानें उन्मत्त होऊन यानें पुष्कळ लोकांचें भस्म केलें, तेव्हां विष्णूनें मोहिनीरूप घेऊन त्याचा हात त्याच्याच डोक्यावर धरावयाला लावून त्याचें भस्म केलें. २·३८.

**भीम**—पांडवांपैकीं दुसरा. हा अत्यंत बळवान होता व गदायुद्धांत प्रवीण होता. धृतराष्ट्राला याचीच भीति वाटत होती. जरासंधाशीं दहा दिवस झालेलें युद्ध, कीचकवध इत्यादि पराक्रम यानें केले. महाभारतांत यानें अचाट पराक्रम करून शेवटीं गदायुद्धांत दुर्योधनाला मारलें व दुःशासनाला मारून द्रौपदीची वेणी घातली. **भीमसेन** १·१४८; **भीमार्जुन** १·९७.

**भीष्म**—शंतनूस गंगेपासून झालेला. अष्टवसूंपैकीं सात वसुपुत्र गंगेनें नदींत बुडविले. आठव्याला शंतनूनें अडवून धरलें म्हणून हा निपुत्रिक होईल असा गंगेनें शाप दिला. याला वसिष्ठानें वेद व बृहस्पतीनें शास्त्रें शिकविलीं. पुढें शंतनु धीवरकन्या सत्यवतीवर मोहित होऊन दुःखी झाला, त्यासाठीं भीष्मानें केलेल्या स्वार्थत्यागाची व प्रतिज्ञेची कथा सर्वश्रुत आहे. काशिराजाच्या तीन मुली अंबा, अंबिका व अंबालिका यांना भीष्मानें त्यांच्या स्वयंवरांतून जबरीनें आणलें, अंबेनें मनानें शाल्वराजपुत्राला वरलें होतें तें कळल्यावर तिला मुक्त करून अंबिका व अंबालिका यांचा विवाह विचित्रवीर्य याच्याशीं केला. शाल्वानेंही त्याग केल्यावर भीष्माच्या वधाकरतां अंबेनें तप करून या नाहीं तर पुढल्या जन्मीं भीष्माचा वध करण्याचा वर मागून घेतला व पुढें शिखण्डी होऊन तिनें सूड घेतला, ही कथा सर्वश्रुत आहे. विचित्रवीर्य निपुत्रिक असतां वारल्यावर भीष्मानें व्यासाकडून प्रजोत्पत्ति करविली. अंबिका, अंबालिका व एक दासी यांना धृतराष्ट्र, पंडु व विदुर झाले. पुढें यांचे वंशज कौरव व पांडव या नांवांनीं ओळखले गेले. मूळचे कुरु वंशांतील म्हणून हे सर्व कौरवच होते.

भारतीय युद्धांत भीष्म दहा दिवस सेनापति म्हणून लढला. दहाव्या दिवशीं निःपांडवी पृथ्वी करीन या प्रतिज्ञेला घाबरून शिखंडीस पुढें करून अर्जुनानें भीष्मावर बाण सोडले. शरपंजरावर असतांनाही यानें पांडवांशीं सख्य करण्याचा उपदेश कौरवांना दिला. पुढें युधिष्ठिराला धर्मोपदेश केल्यावर उत्तरायणांत प्राणविसर्जन केलें. १·१०५, १·११५, ११·४६७; **भीष्मा ऐसा ब्राह्मणु** ११·३९३; **भीष्मदेव** १·१२७; **भीष्मातलिं** १·१२३; **भीष्मद्रोण** १·२२२, २·३४, **–द्रोणादिक** १·१७५.

**भृगु**—स्वायंभुव मन्वंतरांतील सप्तर्षींपैकीं एक. स्वायंभुव मनूनें केलेल्या यज्ञांत ब्रह्मा, विष्णु व महेश यांत श्रेष्ठ कोण हा वाद निघाला, व भृगूस याचा निकाल लावण्यास सांगितलें. शंकराकडे गेल्यावर नंदीनें दारांतच अटकाव केला म्हणून शंकरास तुझें तीर्थ कोणी पिणार नाहीं असा शाप दिला. ब्रह्मदेवाकडे गेल्यावर त्यानें उत्थापनही दिलें नाहीं म्हणून तुझी पूजा कोणीही करणार नाहीं असा त्याला शाप दिला. विष्णूकडे गेल्यावर निद्रित स्थितींत असतांना परीक्षेसाठीं यानें विष्णूच्या छातीवर लाथ मारली. विष्णूनें जागें होऊन शांतपणें वंदन केलें. म्हणून विष्णुच सर्वांत श्रेष्ठ असा यानें निकाल दिला. याच्या लाथेचा डाग श्रीवत्सलांछन या नांवानें सुप्रसिद्ध झाला. १०·२११, ११·१०५, कोशांत **पांपर** पहा; **वक्षस्थळाची वाखती जेयाचेया चरणरजा वोडवली** ९·४७६.

**भैरव**—काळभैरव. विष्णु व ब्रह्मा हे शंकराशीं गर्वानें वागूं लागले तेव्हां शंकराच्या क्रोधापासून भैरव झाला. आरंभीं ब्रह्मदेवाला चार तोंडें नसून पांच होतीं. शंकराची निंदा केली म्हणून काळभैरवानें याचें एक शिर नखानें उडविलें. ह्या ब्रह्महत्येचें प्रायश्चित्त म्हणून तोडलेलें शिर याच्या हातीं देऊन व याच्या मागें स्त्रीरूपानें ब्रह्महत्या लावून शंकरानें याला भिक्षा मागावयाला लावली. काशीक्षेत्रीं मात्र या ब्रह्महत्येला प्रवेश नव्हता. जेव्हां ती तेथें गेली तेव्हां भैरव या त्रासांतून मुक्त होऊन त्याच्या हातांतलें शिर गळून पडलें. याच ठिकाणीं कपालमोचन तीर्थ झालें. भैरव आठ आहेत. सं. वा. श. **आठ** पहा. यांच्या पूजेचा दिवस रविवार मानतात; यांना खिचडी वाढतात. **योगपीठिचा भैरवु** ६·४६०; **खिंचैरवाचां खापरीं**, भैरवाच्या हातांतील खापरीच्या भिक्षापात्रांत खिचडी वाढतात त्यास उद्देशून, १८·१०३४.

**भौम**—मंगळ ग्रह. याच्या उत्पत्तीच्या अनेक कथा आहेत. शंकराच्या स्वेदबिंदु, अश्रुबिंदु किंवा रक्तबिंदूपासून याची उत्पत्ति झाली अशा याच्या जन्माच्या कथा आहेत. पृथ्वीनें याला वाढविलें म्हणून याला भौम हें नांव पडलें; **भौमा नांव मंगळु**, अमंगळ ग्रहास मंगळ म्हणावें ही यांत खोंच आहे, ५·११५.

**मछ**—(१) दशावतारांपैकीं मत्स्यावतारास उद्देशून. निरनिराळ्या पुराणांत या अवताराच्या निरनिराळ्या कथा आहेत. शंखासुरानें वेद पळवून तो समुद्रांत लपला, त्याला मारून वेद परत मिळवायला विष्णूला मत्स्यरूप घ्यावें लागलें. ११·८४. (२) मत्स्येंद्रनाथ, गोरखनाथाचे गुरु. यावर १८·१७३०–१७३३ पहा. यांना '**मीन**' म्हटलें आहे, १८·१७३३.

**मदन**—कोशांत **काम** (३) पहा. १०·२२१. **कंदर्प** १६·१२६.

**मनु**—ऋग्वेदांत हा सर्व मानवांचा उत्पादक, मूळपुरुष म्हणून मानला आहे. याच्या नांवाची मनुस्मृति सुप्रसिद्ध आहे. चौदा मनूंपैकीं चार मनु मुख्य होते. सं. वा. श. **चौदा** पहा. **मनू** ४·१७,– **पुढें** १५·१२७, **–प्रति** ४·१६.

**मन्वंतर**—ब्रह्मदेवाच्या अहोरात्रीला कल्प म्हणतात. या अहोरात्राचे चौदा भाग पाडून प्रत्येक भागास मन्वंतर (म्हणजे एक मनु जाऊन दुसरा येणें) अशी संज्ञा आहे. मनूंच्या कालाची व अधिकाराची मर्यादा ठरलेली असते. चार युगांचे ७१ फेरे व आणि कांहीं वर्षें गेलीं म्हणजे एका मन्वंतराचा काळ होतो. प्रत्येक मनूला सहाय्यक म्हणून सप्तर्षि, देवतागण, एक इंद्र व अवतार नेमून दिलेले असतात. प्रजोत्पादन, प्रजारक्षण, प्रजासंवर्धन इंद्रानें व देवतागणानें करावें अशी व्यवस्था केलेली आहे. या व्यवस्थेप्रमाणें चौदा मनु व

चौद इंद्र ८·१५६, १०·१७६ कथिले आहेत. मन्वंतरें येत जात राहिलीं तरी अक्षय वृक्ष अव्ययच राहतो. यावर १५·१२०–१४२ पहा.

**मरीचि**—याचे अनेक उल्लेख आहेत. स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवानें आपल्या डोळ्यापासून उत्पन्न केलेला एक व वैवस्वत मन्वंतरांत त्यानें अग्नीपासून उत्पन्न केलेला दुसरा. व्यवहारोपयोगी अनेक ग्रंथ या धर्मशास्त्रकाराच्या नांवें आहेत. मरुद्गणांपैकीं एक असा याचा उल्लेख आला आहे, १०·२०१, **मरीचिकश्यपादिया** १५·१९५.

**मरुद्गण**—ऋग्वेदाप्रमाणें सात जणांचा एक असे एकवीस जणांचे हे देवतासंघ आहेत. पुराणांत यांची संख्या ४९ दिली आहे. हे दिति व कश्यप यांचे मुलगे होते. यांच्या सोन्याच्या रथांना ठिपके असलेले हरीण जोडलेले असतात. मेघ, पर्जन्य, वीज व सोसाट्याचे वारे यांच्याशीं यांचा निकट संबंध असतो. यांना लवकर मृत्युयोग असल्यामुळें 'मा रोदीः' अशा आश्वासनावरून मरुत् असें यांचें नांव पडलें असावें. दितीच्या गर्भाचे सात तुकडे व प्रत्येक तुकड्याचे सात सात विभाग अशा प्रकारें ४९ भागांचे हे झाले असा या देवतागणांच्या संख्येचा अर्थ दिला आहे. **मरुद्गण** १०·२०३.

**महालसा**—श्रीमहालसा, गोदावरी तीरावर एखाद्या देवीच्या देवळास उद्देशून हा संदर्भ आला असावा, १८·१७८२. कांहीं पाठांत 'श्रीमहालया' (श्रीमोहिनीराज) असें नांव आलें आहे.

**मार्कंडेय**—मृकंड ऋषीचा मुलगा. हा दीर्घायुषी कसा झाला याची कथा सुप्रसिद्ध आहे. पांडव मयसभेंत जेव्हां गेले तेव्हां व ते वनवासांत गेले असतां त्यांना भेटण्यासाठीं तो गेला होता. याला कल्पान्तींच्या वटवृक्षाचें व प्रळयाचें दर्शन झालें होतें. ११·१८६.

**मारुति**—(१) हनुमान. गोतमकन्या अंजना हिला वायूपासून झालेला मुलगा. यानें जन्मल्याबरोबर फळ म्हणून सूर्याला धरण्यासाठीं उड्डाण केलें, १०·३६, त्यावेळीं त्याच्या हनवटीवर इंद्रानें वज्र मारलें. त्यावरून हनुमत् हें नांव पडलें; मरुतपुत्र म्हणून मारुति हें नांव प्रचारांत आहे. सूर्याच्या आज्ञेनें हा सुग्रीवाचा मित्र व नंतर त्याचा मंत्री झाला. राम व सुग्रीवाची भेट झाल्यावर हा रामसेवेला लागला; हा वज्रदेही, वज्रअंग म्हणून वजरंग या नांवानें, व अत्यंत शक्तिमान म्हणून बलभीम या नांवानेंही संबोधला जातो. हा ब्रह्मचारी असून चिरंजीव आहे. एकदां अर्जुनानें यमुनेवर बाणांचा पूल बांधला. यामुळें आपल्या धनुर्विद्येचा त्याला गर्व चढला. पण मारुतीनें पुलावर पाय ठेवतांच तो कोसळला. या पराक्रमानें मारुतीला गर्वबाधा झाली. तें पाहून श्रीकृष्णानें अर्जुनाकडून पुन्हा पूल बांधवला व आपलें सुदर्शनचक्र पुलाखालीं ठेवलें. मारुतीनें पुष्कळ उड्या मारल्या तरी पूल कायमच राहिला. अशा रीतीनें मारुतीचेंही गर्वहरण झाल्यावर अर्जुनावर प्रसन्न होऊन योग्यवेळीं मदतीला येण्याचा वर मारुतीनें त्याला दिला. भारतीय युद्धांत आपल्या रथावरील ध्वजावर बसण्यासाठीं अर्जुनानें मारुतीला बोलवलें. सर्व भारतीय युद्धांत हा ध्वजावर बसून राहिला, १·१४१. (२) एका विशिष्ट स्थितींतल्या कुंडलिनीला मारुती हें नांव आहे, ६·३०१, प्राणवायु आंतून निघून गगनांत मिळतो त्यास उद्देशून आलेल्या ६·२९९ ते ६·३१० ओव्या पहा.

**यक्ष**—कुबेराचे सेवक. १०·२०५. कोश पहा.

**यम**—विवस्वत व सरण्यू यांना यम व यमी अशीं दोन मुलें होती. या दोघांचा एक संवाद आहे. यांचें राहाण्याचें स्थान तीन्ही लोकांहून अत्यंत उंच आहे. यमाला राजा मानला आहे, याचा दरबार भरतो. याचे सेवक यमदूत असून दाराशीं दोन कुत्रे आहेत. हा सर्वांच्या पापपुण्याचा हिशेब ठेवतो व मेल्यावर ज्याला त्याला योग्य तें फळ देतो. कोशांत **यमणें** पुढें **यम** (१) पहा.

**यशोदा**—नंदाची पत्नी. कृष्णाचें पालन करणारी म्हणून त्याची आई मानलेली आहे. लहानपणीं कृष्णानें एकदां माती खाल्ली म्हणून यशोदा त्याला रागें भरली. तोंड उघडून दाखव असें सांगितल्यावर एवढीशी मातीच काय पण चौदाही भुवनें आपल्या तोंडांत कशीं

आहेत हें कृष्णानें तिला दाखविलें. ६·१३७, ११·१८१–१८२.

**यादव**—हे यदूचे वंशज. ऋग्वेदकाळापासून यदु व तुर्वसु यांचीं नांवें एकत्र येतात. शुक्राच्या शापानें ययातीला म्हातारपण आलें. 'हें तूं घेऊन तुझें तारुण्य मला दे' अशी ययातीची विनंति यदूनें मान्य केली नाहीं म्हणून तुझ्या वंशजांस कधीं राज्य मिळणार नाहीं असा ययातीनें शाप दिला. यादवांना मान्यता व संपत्ति असली तरी राज्यपद नव्हतें. यांचा धंदा गुराख्यांचा व गवळ्यांचा होता. ८·२६८, ९·४६३, १०·२६४, १०·२६९.

**युधामन्यु**—पांचाल देशाचा पांडवपक्षीय महारथी. गदायुद्धांत व धनुर्विद्येंत प्रवीण. यानें द्रोणाबरोबर व दुर्योधनाबरोबर मोठें युद्ध केलें होतें. हा पांडवशिबिरांत झोंपला असतांना अश्वत्थाम्यानें याला मारलें. १·१००.

**युधिष्ठिर**—पांच पांडवांपैकीं सर्वांत श्रेष्ठ. १·१४९. **युधिष्ठिरादिक** १·२०७. याचें धर्म असें नांव होतें. **धर्मा अनुज**, अर्जुन, १६·४६२.

**रक्षस्**—कुबेराचे सेवक. हे गंधर्व व यक्षांबरोबर असतात. **रक्षोगण** ११·३२८.

**रंभा**—एक अत्यंत सुंदर अप्सरा. शुकाची तपश्चर्या भंग करण्याकरतां हिला इंद्रानें पाठवलें होतें, पण शुक अढळ राहिला. १६·१२६. शुक-रंभा संवाद सुप्रसिद्ध आहे. ही उत्तम नाचणारी होती असा ग्रंथांत उल्लेख आहे, ९·३२०, **रंभेहुनि बरविया** १८·९२४; **आरंभरंभा**, आरंभरूपी केळीचें झाड अशा अर्थीही हा शब्द घेतां येईल, ६·४६०, **आरंभणें** पहा.

**राम**—(१) सूर्यवंशी दशरथपुत्र राम. आपली वानरसेना लंकेला नेण्यासाठीं रामानें सेतु बांधवला, याचा उल्लेख ग्रंथांत आला आहे. १०·३५, १०,३७ (१,२), १०·२३१. **सूर्यवंशीं सूर्यो उदैला** १०·२३४; **रामचंद्र** १०·२३५. (२) श्रीकृष्णास उद्देशून, १०·२२६. (३) ज्ञानदेवकालीन यादव वंशांतील रामदेवराव यादव राजा, १८·१७८३.

**रावण**—पुलस्त्य कुळांतील विश्रव्य व केशिनी (कैकसी) यांचा मुलगा. यानें उग्र तप करून आपलें एकेक शिर अग्नींत हवन केल्यावर तूं मनुष्याखेरीज इतर कोणत्याही प्राण्याकडून मारला जाणार नाहींस असा ब्रह्मदेवानें याला वर दिला. यानें अनेक निंद्यकर्में केलीं होतीं. कैलासाखालीं हात सांपडणें, सीता-स्वयंवरांत उरावर शिवधनुष्य पडणें, अशा इतर कथा सर्वश्रुत आहेत. १०·३७, (१,२); **लंकेश्वर** १०·२३३.

**राहु**—कश्यपास सिंहिकेपासून झालेला असुर. समुद्रमंथनानंतर सर्व वस्तूंवर सुरासुरांचा सारखा हक्क लागू झाला होता. असुरांना अमृताचा अर्धा वांटा मिळाला तर ते अमर होतील या भीतीनें विष्णूनें अमृतकलश पळविला व देवांसाठीं राखून ठेवला. देवांच्या पंक्तीलाच अमृत वाढलें होतें. तें पाहून राहु देवांच्या पंक्तीला येऊन बसला. तो जेवत असतां चंद्र व सूर्यानें त्याला ओळखलें; त्याच्या गळ्याखालीं अमृत उतरण्यापूर्वीं विष्णूनें त्याचें शिर उडवलें; या शिराचे व धडाचे अनुक्रमें केतु व राहु झाले. जुनें वैर स्मरून हे दोघे सूर्याला व चंद्राला ग्रासतात. तींच ग्रहणें आहेत असा समज आहे. अमरत्वासाठीं राखून ठेवलेलें अमृतच राहूच्या मरणाला कारण झालें यास उद्देशून १८·१४६८. जरी सूर्याला केतूचें ग्रहण लागतें तरी केतु हा राहूचाच अंश असल्यामुळें सूर्याला **राहुग्रस्त** म्हटलें आहे, १·२६८; **राहु-मेल** १७·२७१.

**रुद्र**—ऋग्वेदांतील एक उग्र देवता. रुद्राचा रंग पिंगट आहे व त्याला जटा असतात. धनुष्य व वज्र यांचीं आयुधें आहेत. ब्रह्मदेवाच्या क्रोधापासून याची उत्पत्ति झाली अशी एक कथा आहे. शंकरालाही रुद्र हें नांव आहे १३·९२०; रुद्र आठ किंवा अकरा मानतात. **रुद्रगण** १०·२०४, ११·१४३.

**लक्ष्मी**—समुद्रमंथनांतून निघालेल्या चौदा रत्नांपैकीं एक. ही उत्पन्न होतांच देवांचें तेज वाढलें. सर्व संपत्ति, ऐश्वर्य, ऋद्धि व सिद्धि यांची हिला अधिष्ठात्री मानतात. हिला ब्रह्मदेवानें विष्णूला दिली. तेंव्हां पासून ही विष्णूजवळ असते. कृष्ण हा विष्णूचा अवतार म्हणून कृष्णाची पत्नी असे

उल्लेख ग्रंथांत आलेले आहेत. ४·८, ९·३६९, ९·३७२, ९·४७६, १०·१२२, ११·११८, १३·३९३, १३·११६२, १६·८२, १६·१६४, १८·१६१९. लक्ष्मीयेचें थोरपण ९·३७६; विचारसमुद्रांतून निघालेली नवी लक्ष्मी, गीतेस उद्देशून १५·५३९; श्रीकृष्णास उद्देशून: **लक्ष्मीयेचा नाहो** १८·१३१३, –वाल्लभ १८·१६२६, **लक्ष्मीकांत** ५·१३; इतर नांवें:—कमला १८·१६२५, जगदंबा १८·१६२०, **महालक्ष्मी**, ऐश्वर्यास उद्देशून, १६·२६; श्रियेहूनि ११·१६५. इतर संदर्भ कोशांत लक्ष्मी (१) पुढें पहा.

**वराह**—वायुरूपानें फिरत असतां प्रजापतीला पृथ्वी पाण्यांत दिसली; त्यानें वराहरूपानें तिला बाहेर काढून कोरडी केली. दुसरी एक कथा अधिक प्रचलित आहे, हिरण्याक्षानें पृथ्वीला काखेंत मारून समुद्रांत नेलें व विष्णूनें वराहरूपानें तिला बाहेर काढलें व तिची शेषाच्या मस्तकावर स्थापना केली. ११·६१–६२, ११·३५५; सूकरू, वराहावतारास उद्देशून, १३·३४७.

**वरुण**—हा पश्चिम दिशेचा, पाण्याचा व नागलोकाचा अधिपति. १०·२२३, ११·५१६.

**वसिष्ठ**—निरनिराळ्या काळीं वसिष्ठ हें निरनिराळ्या व्यक्तींचें नांव असून पुढें तें कुळनांव म्हणून प्रसिद्धीस आलें असावें. ऋग्वेदांतील सातव्या मंडळाचा हा मंत्रद्रष्टा होता. (१) उर्वशीला पाहून मित्रावरुणांपासून कमळांत किंवा कुंभांत जन्म पावला, (२) स्वायंभुव मन्वंतरांत ब्रह्मदेवाच्या दहा मानसपुत्रांपैकीं एक, अशा प्रकारच्या निरनिराळ्या कथा वसिष्ठाच्या जन्माबद्दल उपलब्ध आहेत. वसिष्ठ व सुदास, वसिष्ठ व जमदग्नि, वसिष्ठ व विश्वामित्र, व पुढें रघुकुळाच्या अनेक राजांचा हा कुळगुरु होता, यावरून वसिष्ठ हें कुळनांव असावें. याच्या नांवें कल्प, तंत्र, पुराण, यज्ञप्रकार वगैरे आहेत. यानें रामाला सांगितलेलें योगवासिष्ठ सुप्रसिद्ध आहे. विश्वामित्र राजा असतांना वसिष्ठानें आपल्या कामधेनूच्या सहाय्यानें त्याचें उत्तम आदरातिथ्य केलें, तें पाहून विश्वामित्रानें वसिष्ठाची गाय पळवली, पण कामधेनूनें शकपल्लवादि सैनिक उत्पन्न करून विश्वामित्राचा पराभव केला. पुढें विश्वामित्र ऋषि झाल्यावर ब्रह्मर्षि व राजर्षि यांचा झगडा, विशेषतः यांत श्रेष्ठ कोण हा वाद, अनेक कारणांमुळें होत असे. या वादांत सूर्य, समुद्र व मेरुपर्वत साक्षीला आणायला ब्रह्मदेवानें या दोघांना सांगितलें; विश्वामित्र ह्यांना आणायला असमर्थ ठरल्यावर वसिष्ठानें आपली छाटी पसरली व सूर्यासारखा प्रकाश पाडला, कमंडलूंतल्या पाण्याचा प्रवाह समुद्रासारखा वाहविला व आपला दंड (काठी) मेरूसारखा भार वाहण्यास समर्थ आहे असें दाखविलें, याचे संदर्भ १०·३५, १८·१७१०.

**वसुदेव**—ह्याच्या जन्माच्या वेळीं देवांनी दुंदुभी वाजवल्या, त्यावरून याचें आनकदुंदुभि असें नांव पडलें. देवकी पहा. **वसुदेवादिकां** ९·४६३, – तव, १०·२६५.

**वसु**—या नांवाच्या अनेक व्यक्ति व संघ आहेत. संघांची नांवें निरनिराळ्या ग्रंथांत निरनिराळीं दिलीं आहेत. वसु आठ आहेत: अनल, अनिल, आप, धर, ध्रुव, प्रत्यूष, प्रभास व सोम अशीं यांचीं नांवें सामान्यतः दिलीं जातात. **पावक**, अनल वसूस उद्देशून, १०·२०६, **वसु** ११·३२७.

**वायु**—एक देवता. ११·३२७, ११·५१५.

**वासुकी**—कश्यप व कद्रू पासून झालेला, सर्व सर्पांचा अधिपति. याला शंकराच्या अंगावर स्थान मिळालें आहे. १०·२२२.

**विकर्ण**—धृतराष्ट्राच्या शंभर राजकुमारांपैकीं एक. हा मोठा न्यायी होता. द्रौपदीला सभेंत आणली तेव्हां हा अन्याय होत आहे असें विदुराबरोबर हाही म्हणाला होता. हा भीमाच्या हातून मारला गेला. १·१०७.

**विद्याधर**—हे वसूंप्रमाणें देवगणांत समाविष्ट केले जातात. ग्रंथांत यांचा संघ म्हणून उल्लेख केलेला आहे. १५·१९३; **विद्याधरसमुह** ११·३२६.

**विराट**—मत्स्यदेशचा राजा. याच्या राजधानीचेंही नांव विराट होतें. पहिली राणी सुरथा, हिला दोन मुलगे व दुसरी राणी सुदेष्णा, पट्टराणी, हिचा मुलगा उत्तर होता. शमी वृक्षावर शस्त्रसंन्यास करून, नांवें व वेष बदलून पांडवांनीं विराटाचा आश्रय घेतला, त्यावेळीं त्रिगर्तांचा

राजा सुशर्मा चाल करून आला, त्याचें पारिपत्य करायला विराट राजा गेला असतां सुशर्म्याच्या चिथावणीनें कौरवांनीं गोग्रहण केलें. बृहन्नडेच्या वेषांत असतांना अर्जुनानें उत्तराचें सारथ्य केलें, पण कौरवांना पाहून उत्तर भ्याला. अर्जुनानें नंतर कौरवांचें पारिपत्य केलें. उत्तर पहा. १·९८; **विराटादिक** १·१५३.

**विश्वामित्र**—याच्या दोन प्रकारच्या जन्मकथा आहेत. (१) इषीरथाचा मुलगा कुशिक यानें इंद्रासारखा मुलगा व्हावा म्हणून तप केलें. इंद्र स्वतः मुलगा होऊन जन्मास आला तो विश्वामित्र. (२) वाल्मीकि रामायणांत प्रजापतीचा चौथा वंशज विश्वामित्र होता अशी कथा आहे. हरिश्चंद्राचा छळ व वसिष्ठाचा हेवा या बद्दलच्या याच्या कथा सुप्रसिद्ध आहेत. वर त्रिशंकु पहा. प्रतिसृष्टीस उद्देशून १०·३५; **दूजी सृष्टि** १८·१७६५.

**विश्वे**—विश्वे देव. हे धर्मऋषि व विश्वा यांचे दहा पुत्र. ११·३२७.

**विष्णु**—हें अनादि अनंत परमेश्वराचें नांव आहे. वैदिक वाङ्मयांत याचा उल्लेख येतो. ब्रह्मा, विष्णु व महेश ह्या उत्पत्ति स्थिति व लय यांच्या देवता आहेत. पृथ्वीचें पालन करणें, अवताररूपानें दुष्टांचा संहार व धर्माचें रक्षण करणें हीं याचीं कामें आहेत. विष्णूला चार हात असून शंख, चक्र, गदा व पद्म याच्या हातांत असतात. शार्ङ्ग धनुष्य याचें आहे. विष्णूचा श्रीकृष्णाशीं निकट संबंधच नव्हे पण ऐक्य होतें असें ग्रंथांतल्या संदर्भावरून दिसून येईल. ध्रुवाला अढळपद देणें, गजेंद्राला मोक्ष देणें ९·४३८ वगैरे संदर्भ आले आहेत. **विष्णु तो मध्यान्हवेळु** १४·११०; **महाविष्णू** ११·३६९, १६·१६४, **माहाविष्णु** ६·२९१; **वैकुंठ, वैकुंठपीठनायक** इत्यादि श्रीकृष्णाचीं नांवें पहा.

**वेताल**—हा रुद्रगणांपैकीं एक असून शंकराचा द्वारपाळ होता. दुर्वर्तनामुळें पार्वतीच्या शापानें पृथ्वीवर आला. हा पिशाचादिकांचा नायक आहे. कामाख्या देवीच्या उपासनेनें ह्याला देवगणत्व लाभलें. वेताल हा शब्द सर्वसाधारणपणें रुद्रगणालाही लावला आहे. **कोल्हैरिचे वेताळ** ११·४६१; **अभ्रांचा वेतालु** १७·२९७.

**शंकर**—ब्रह्मा, विष्णु व महेश या देवतांपैकीं एक. सर्वसाधारणपणें याचें संहारक रूप मानलें आहे. रुद्र, वेताळ, भूतपिशाचादि याच्या परिवारांत असतात. हा दिगंबर वृत्तीनें स्मशानांत भस्म लावून राहतो. हा अत्यंत उग्र तपस्वी आहे. कामदेवाचा वैरी आहे. आपल्या तिसऱ्या डोळ्याच्या ज्वालेनें यानें कामदेवाचें भस्म केलें. पुनः जिवंत झाल्यावर कामाला अनंग हें नांव मिळालें. समुद्रमंथनानंतर विष पिणें, किरातरूपानें अर्जुनाशीं युद्ध करणें, उपमन्यूला दुधासाठीं क्षीराब्धि देणें, त्रिपुरासुराला मारणें, वगैरे संदर्भ ग्रंथांत आले आहेत. यानेंच पार्वतीला गीतेची थोरवी सांगितली. नाथपंथाची परंपरा याच्याचपासून सुरू झाली. भारतीय युद्धांत मारुती रूपानें अर्जुनाच्या ध्वजेवर शंकर असून होता. याचीं ग्रंथांत आलेलीं नांवें व कांहीं संदर्भः—**अर्धनारी नटेश्वर** पहा; **ईशान** १३·२५; मयासुरानें लोखंड, रुपें व सोनें यांचीं तीन अभेद्य नगरें मागून घेतलीं, पण पुढें देवांना पीडल्यामुळें सर्व देवांसह शंकरानें त्याच्याशीं युद्ध केलें पण यश येईना, जेव्हां गणपतीची आराधना केली तेव्हांच यश आलें, हें रूपक १७·२ या ओवींत आलें आहे, **श्रीत्रिपुरारी** १८·१७३०; **त्र्यंबक** १३·३८७; **धूर्जटी** १०·१७; **पिनाकपाणि** ११·२०४; **मदनारि** १०·२०४; **श्रीमहादेऊ** ११·२१८, ११·२५८, **महेश** ६·१५३, ९·१४, १०·९, ११·६९, १२·२१५, **माहेशान्वयसंभूत** १८·१७८४; **शंकर**, ध्वजेवर मारुतीरूपानें, १·१४१, किरातरूपानें अर्जुनाशीं युद्ध १·२००, २·१०; **अनादिगुरुशंकर**, नाथपंथास उद्देशून, १८·१७३७; **शंभु** १·७०, ११·३९९, १७·२००, १८·१६१३, **शंभू** १०·२०५, ११·२७, ११·६६६, १६·२०३, **शंभूचें तप** ९·३७६, **—ची प्रसन्नता** ५·११; **उपमन्युचेनि मोहें** १८·१७६७; **आत्माशंभु**, शंकराला सहाय्यकारी होणाऱ्या गणेशाच्या स्मृतीस उद्देशून, १७·२ यावर त्रिपुरासुराचें कथानक वर दिलें

आहे तें पहा, चैतन्य–, १५·५४५, धैर्य–, विषप्राशनास उद्देशून, १८·७८६, शांभव १८·१७३५; शिव ६·३०१, १७·३, शिवादि १८·५२८, शिवादिकें १७·४४, शिवालय ६·१७९, शैव शक्ति १८·११२७; परमात्मशिव ६·२७३; सदाशिव १२·२१४, १४·११०; शूलपाणी ९·३६८; सर्वेश्वर १·७२, हटकेश्वर ११·३५५; हर २·१०, ९·४८२, ११·४७, हरब्रह्म ११·५७३; हरिहर ११·४, हरिहरादि ११·५५५; काम्रु कोलिसा केला १३·२६, बेलेंसिं लिंगा थांबे, शंकराला बेलाची आवड, विशेषतः सोमवार हा शंकराचा दिवस आहे, यांस उद्देशून, १३·८११.

**शारदा**—वाग्देवता, ब्रह्मदेवाची स्त्री सरस्वती. साहित्याशीं हिचा निकट संबंध आहे. १·२१, १·३१. वागीश्वरी १०·८.

**शिखंडी**—द्रुपदाचा मुलगा. पूर्वजन्मीं काशिराजाच्या तीन मुलींपैकीं एक. द्रुपद पहा. याला पुढें करून अर्जुनानें भीष्माला मारलें. १·१५२.

**शिशुपाल**—चैद्य पहा. चेदि देशाचा राजा दमघोष व वसुदेवाची बहिण श्रुतश्रुवा यांचा हा मुलगा. हा पूर्वजन्मीं हिरण्यकशिपु व रावण होता. जन्मतःच हा चतुर्भुज व त्रिनेत्र होता व गाढवासारखा आरडत असे. हा पराक्रमी होईल व ज्याच्या मांडीवर याला दिलें असतां याचे दोन हात व तिसरा डोळा गळून पडतील तोच याला मारील अशी आकाशवाणी झाली. ह्या विचित्र मुलाला पहाण्यासाठीं देशोदेशींचे राजे आले होते. कृष्णाच्या मांडीवर दिल्यावर याचे दोन हात गळून पडले व तिसरा डोळा जिरला, हें पाहून श्रुतश्रुवेनें याच्या शंभर अपराधांबद्दल याला क्षमा करण्याचें वचन कृष्णाकडून घेतलें. हा पांडवांचा व कृष्णाचा द्वेष करी. यानें अनेक अपराध केले व शेवटीं 'रुक्मिणीनें आपणांस वरलें असतां हा तिला आपली स्त्री म्हणवितो' अशी यानें कृष्णाची निर्भर्त्सना केली. ह्या शंभराव्या अपराधानंतर कृष्णानें सुदर्शनानें याचें शिर उडविलें; त्यावेळीं याच्या देहांतील तेज कृष्णदेहांत विलीन झालें. ९·४६५, ११·१०२; राजसूय यज्ञांत भीष्मानें अग्रपूजेचा मान कृष्णाला दिला म्हणून यानें भीष्माची व कृष्णाची निर्भर्त्सना केली, शतधा दुर्वाक्यसेलीं सेलिलासि ११·१०१.

**शुक**—महर्षि व्यासांचा ज्ञानी व विरक्त मुलगा. हा ब्रह्मचारी होता. सुप्रसिद्ध शुकरंभासंवादावरून हा स्त्रीजाळांत पडला नव्हता असें दिसतें. वर रंभा पहा. पण हरिवंशांत याचें लग्न झालें होतें व मुलें होतीं असे उल्लेख आहेत. सूतानें यास भागवत सांगितलें तें त्यानें परिक्षिताला सांगितलें. नारदानें वैराग्याचा उपदेश दिल्यावर कैलासावरून उडी मारून हा पंचमहाभूतांत विलीन झाला. ९·४६४. शुकीं तुळिजे कंड्पें १६·१२६; शुकदेवादिक ११·१७३.

**शेष**—कश्यप व कद्रूपासून झालेल्या नागांपैकीं एक प्रमुख नाग. हा नेहमीं पाताळांत असतो. याची एक कला क्षीरसागरांत विष्णूची शय्या म्हणून प्रसिद्ध आहे. याला सहस्र फणा आहेत. कृष्णाला गोकुळांत नेलें तेव्हां यानें आपल्या फणा कृष्णावर धरल्या होत्या. याच्या डोक्यावर पृथ्वी ठेवलेली आहे. १०·१२२. शेषाहूनि तोंडाळें बोलिकें, शेषाच्या सहस्र तोंडांस उद्देशून, ९·३६६, शेषाचे डोळे चोरिले, दोन हजार डोळे असतांही जें विश्वरूप शेष पाहूं शकला नाहीं, ११·११८; शेषाचें सेवकपण ११·१६६, शेष तुलई, शय्येस उद्देशून, १३·३९२.

**शैब्य**—पांडवांकडचा शिबि देशाचा राजा. १·९९.

**सनक**—सनक व सनत्कुमार यांचीं नांवें बहुधा एकत्र येतात. सनक, सनंदन, सनातन व सनत्कुमार हे चार विष्णूचे अवतार मानतात. हे ब्रह्मचारी असून महाज्ञानी होते. यांचा नारदाशीं संवाद झाला होता. सनकाची सनकसंहिता आहे. सनकादि १५·२०३, –दिक १·५५, ४·९, ९·३६७, ११·३४, ११·८५, ११·१००.

**सनत्कुमार**—सनक पहा. याच्या नांवें सनत्सुजातीय पर्व महाभारतांत आहे व सनत्कुमारसंहिता सनत्कुमारतंत्र इ० इतर ग्रंथही आहेत. ९·४६४.

**सहदेव**—पंडूला माद्रीपासून झालेल्या दोन मुलांपैकीं एक. याचा जन्म व उपनयन शतशृंगा (हिमालय) वर झाले. राजसूययज्ञांत व भारतीय

युद्धांतही यानें मोठे पराक्रम केले. याला अश्वपरीक्षा उत्तम असल्यामुळें हा विराटाच्या अश्वशाळेवर तंतिपाल हें नांव घेऊन राहिला होता. याच्या रथाचे घोडे तितरपक्ष्याच्या रंगाचे होते. ध्वजेवर हंसाचें चिन्ह होतें. याचें धनुष्य आश्विन व शंख मणिपुष्पक या नांवांचे होते. शकुनीला युद्धांत यानें मारलें. १·१५०.

**सात्यकि**—शिनीराजाचा नातु, सत्यकाचा राजकुमार म्हणून सात्यकि या नांवानें ग्रंथांत उल्लेख आहे. याचें गीतेंत युयुधान असें नांव आलें आहे. हा अर्जुनाकडून धनुर्विद्या शिकला. पांडव वनवासांत असतांना कौरवांना ठार करून अभिमन्यूला गादीवर बसवावें असा सल्ला यानें रामकृष्णांना दिला होता. कृष्ण शिष्टाईला जातांना यानें केलेल्या भाषणाची वाखाणणी द्रौपदीनें केली होती. श्रीकृष्णाचा रथ स्वतः जोडून यानें सारथ्य करून श्रीकृष्णास शिष्टाईला नेलें होतें. भारतीय युद्धांत गांधारांनीं याचा रथ छिन्नभिन्न केल्यावर हा अभिमन्यूच्या रथावर चढला व शकुनीच्या सैन्याची यानें वाताहात केली. द्रोणाशीं तुमुल युद्ध करून द्रोणाचीं १०१ धनुष्यें यानें तोडलीं. अभिमन्यूच्या वधाच्या दिवशीं यानें कृतवर्म्याचा व दुर्योधनाचा पराभव केला होता. धृष्टद्युम्नानें द्रोणाचा अन्याय्य रीतीनें वध केला म्हणून यानें धृष्टद्युम्नाची निर्भर्त्सना केली होती. याच्यावर कृष्णार्जुनांची विशेष प्रीति होती. याची कौरवांना दहशत फार होती. भीमार्जुनांनंतर याचेंच युयुधान हें नांव दुर्योधनानें घेतलें आहे, (गीता १·४). १·१५२.

**साध्ये**—धर्म व साध्या यांचे हे बारा मुलगे. हे यज्ञभाग घेणारे म्हणून यांना यज्ञांत मानाचें स्थान आहे. ११·३२७.

**सुदामा**—याचें भागवतांत सुदामन् किंवा श्रीदामन् नांव आहे. याचीं वाईट वस्त्रें होतीं म्हणून याला कुचैल असेंही नांव होतें. हा कृष्णाबरोबर सांदीपनीकडे शिकत असे. हा ज्ञानी व विरक्त होता व मिळेल तेवढ्यांत संतोष मानून अत्यंत गरिबींत रहात असे. आपल्या पत्नीच्या सांगण्यानें हा श्रीकृष्णास भेटावयास गेला व भेट म्हणून थोडेसे पोहे फडक्यांत बांधून नेले होते. कृष्णानें प्रेमानें वागून पोहे घेतले व त्याला तशीच रजा दिली. धन दिलें असतें तर ईश्वराचा विसर पडला असता म्हणून कृष्णानें कांहीं दिलें नाहीं, यांत आनंद मानीत परत आल्यावर सुवर्णनगरीच आपला सत्कार करायला सज्ज असलेली यानें पाहिली. ९·३९०.

**सूकर**—वर वराह पहा.

**स्कंद**—वर कृत्तिका पहा. १०·२१०. सहा कृत्तिकांनीं याला मुलगा मानून याचें संगोपन केलें म्हणून याला सहा तोंडें होतीं व षण्मुख किंवा षडानन हीं नांवें होतीं. हा देवांचा सेनापति होता व ब्रह्मचारी होता. याला स्त्रीद्वेष्टा मानतात.

**हटकेश्वर**—पाताळांतील महादेवास उद्देशून. पुढें हिरण्यक्ष पहा. ११·३५५.

**हिरण्याक्ष**—कश्यप व दिति यांचा राक्षसपुत्र. विष्णूबरोबर याचें युद्ध झालें तेव्हां विष्णूचा जय होतो असें पाहून हा पृथ्वीला काखेंत मारून समुद्रांत शिरला. विष्णूनें वराहरूप घेऊन याला मारलें. वर वराह पहा. ११·६१, ११·३५५.

**इतर कांहीं संदर्भ :—**

(१) **आगिसि आयुष्य जालें** ९·४७५(१). श्वेतकी राजानें केलेल्या यज्ञांत सतत बारा वर्षें अग्नीनें घृतधारा प्राशन केल्या. त्यामुळें आलेलें जाड्य जावें म्हणून अर्जुनाकडे खांडववन जाळण्यास मागितलें. तें जाळल्यावर अग्नि जाड्यांतून मुक्त झाला.

(२) **समुद्रें आपुलें पाणी प्रीती दीधलें** ९·४७५(२). वडवानळ समुद्रांत राहून पाणी शोषतो, त्याला शांत ठेवण्यासाठीं समुद्र आपलें पाणी एकसारखा पुरवीत रहातो.

(३) **वैरियाचिया कलेवरा विसंबसि ना** ११·१०५. संऱ्हादाचा एक पुत्र पंचजन शंखरूपानें समुद्रांत रहात असे. सांदीपनीच्या मृतपुत्रास परत आणण्याकरितां श्रीकृष्ण समुद्रांत गेला तेव्हां या राक्षसाला मारून, त्याच्या हाडाचा शंख बनवून, आपल्या जवळ ठेवला. या पांचजन्य शंखाला उद्देशून १·१४३.

# परिशिष्ट ७

## स्त्रिया, मुलें, खेळ, धंदेवाईक लोक इ०

### (अ) स्त्रियांविषयीं :—

गीतेच्या अनुरोधानें :—स्त्रियांच्या सात विभूतीं-पैकीं कीर्ति, औदार्याची संपत्ति, मेधा, धृति व क्षमा या पांच १०·२५४–१०·२५७ ओव्यांत आल्या आहेत, इतर दोन गुणांवरच्या ओव्या राजवाडे प्रतींत नाहींत, नजर चुकीनें राहिल्या असाव्या. क्षत्री वैश्य स्त्रिया कां शूद्र अंत्यादि ९·४५६. पापयोनी कां वैश्य शुद्र अंगना ९·४७०. तरि ब्राह्मण करूनि धूरे। स्त्रियादिक पैली मेरे। १६·९३. चांडाल स्त्रीमदिरेसिं, संन्यासी लाजतो यास उद्देशून, १६·१७५. स्त्रीविषिं नेमिजे, ब्रह्मचर्यास उद्देशून, १७·२०९. स्त्रीशूद्रादिकां प्राणियां १८·१४४८. स्त्रीशूद्रादिप्रतिभे। सामाविलें ॥ १८·१६७८.

### तरुण स्त्री

किं प्रथमवयसाकालीं। लावण्याची नव्हाली। प्रकटे जैसी आगली। अंगनाअंगीं ॥ १·४२. इछा कुमारी कामाचेया तारुण्या आली ७·१६१. परापरमप्रमदा १०·१. तरि माझी घरणी। अनादि तरुणी। १४·८६, अविद्येस उद्देशून. चंचलु मासा कामिनीकटाक्षु काइसा १४·१६९. मुगुतीबाला गुणकुसुमाची माला घेऊन वैराग्याला वरूं पाहते, १६·२०७. प्रमदालोचनीं अंजन १८·५८४. सर्वोपशांतिप्रमदे कांतु होउनि १८·१३११. गोरें आणि तरुणें वरि लेइलें असे भूषणें १८·१४९१. सौंदरांचिये आंगीं मोतियें शोभती कां १८·१६७९; इतर संदर्भ:—कामिनी १८·१३४७, तन्वंगी १३·४७९, तरुणांगी १५·८५, प्रमदा १३·७८४, बाला १५·४३५. कुलस्त्री-जिये(या) उत्तमे कुलिन्चिया होंति। आणि गुणलावण्यें आथि। १·१८६. कुलवधू अवेवांतें लपवी १३·२०५. जेवणारा रसज्ञ असला म्हणजे सुगरण भरपूर वाढते १३·११४४. कुलक्षयामुळें कुलस्त्रियांकडून व्यभि-चार घडतात १·२४७–२४८. कुलस्त्री माराच्या भयानें परवरीं गेली व तेथेंही तसेंच होऊं लागलें तर आपल्या नवऱ्याला उगाच टाकलें असें तिला वाटेल १८·९३९. परपुरुषें कामिली कुलवधू आंग न घली १८·१०२१.

### लग्नाविषयीं

अविवेककुमारत्वा मूकलें जेयां विरक्तीचें पाणिग्रहण जालें ४·१२१. वधुवरांचिये मीलणीं वन्ह(न्हा)डियां हिं लुगडीं लेणीं ११·३. कन्या पाहुनु म्हणिजे मना नेये ११·६३२. केलवली नोवरी १३·५५०. विरक्तिची कव्हणी परी जे एउनि मनातें वरी १५·३७. सकुलिनें आपुली कुलिंची आत्मजा दीधली १६·८२ (१). कुलें शोधूनि दोन्हि। कुमारें चि सुलक्षीं। मेलविलीं प्रजासाधनीं। हेतु जरि॥ १६·३०१. आपण चि वीउनि दुहिता। न मम म्हणे पिता। १८·२३२. दोघांचेयां आंतुलां संवादाचा(चां) बाउलां लग्न लागलें— तें पाहून संजयाला झालेला आनंद १८·१५६२. इतर संदर्भ:—१६·८२(२), १६·३०२.

### पतिपत्नी

जरी कुरूप असली तरी आपली स्त्रीच बरी ३·२१९.

आलिंगनमेलीं आपेंआपु कवली ५·१३२.

जेहाचा कुलीं चिंता। जाली ईश्वराची कांता। ६·४४५.

ज्याला आपलें सर्वस्व दिलें आहे १३·३७२, तो भेटल्यावर न म्हावें हृदय जेवि ११·५६७. काइ समर्थाची कांता। भूकेतें शोची ॥ १२·८५. माझा भक्त माझें जणूं कलत्रच आहे, तेयाचेनि काइसेनि हिं न लजें १२·८६.

तो वल्लभा मी कांतु। ऐसा पढियें॥ १२·१५६.

प्राणाची आंतौरी, शरीरांतील क्रियाशक्तीस उद्देशून, १३·१०२.

विरहिणी जैसी। वल्लभातें ॥ १३·३७४.

गुरु कांतु करुनु भुंजे। १३·३९०.

पति-पुत्रातें आलंगी, पण यांत भेद आहे. १३·४७९.
न येंति भोगुं सतियाचें(चे)। प्रेमभोग॥ १३·४८५ प्रियोत्तमाचां कंठिं। प्रमदा घे आंटी। १३·७८४. उदासु अंतौरिगुणें। आंतुडविजे। १३·१००८. विशदविद्यावधू-वल्लभा १४·३. प्रिया पुढां तरुणांगी, स्वप्नांत, १५·८५, १८·११५२, वल्लभापुढें १३·६०५, १७·२७४, १८·१०७५. बाला पतिसि रूप करी। बोलु निमालेपणें विवरी। अचर्च्यातें॥ १५·४३५. स्त्रीपुरुषयुग्में मिलति तेथ आघवें जग जन्मे १६·३०८. प्रिया आलेयां धावें १८·५८८.
बुद्धि आत्मेयां मिळे एकांतिं। प्रिया जैसी॥ १८·८३०.
धर्मपत्नी कां धांगडि, यांना पोसण्याचा त्रास जर सारखाच आहे तर धांगडीला पोसून दुर्लौकिक कां करून घ्यावा?, १८·९३६.
सांडौनि कुळें दोन्हीं। क्रिया अनुसरे कामिनी। द्वंद(द्व)त्यागें स्वचिंतनीं। पडिली तैसी॥ १८·१००७, द्वंद्वें टाकून बुद्धि आत्मचिंतनांत पडते त्यास उद्देशून.
आबुली व आमुला १३·९७२–१३·९७४.

## पतिव्रता

पतिव्रतेचें हृदय जैसें। पतीवांचौनि न स्पर्शे। १·१११.
अहेतुकेनि चित्तें। अनुष्ठा पां एयातें। पतिव्रता पतितें। जेया परीं॥ ३·९२.
लावण्यगुणयुवती आणि पतिव्रता ४·२१५.
ते पती ही हुनु काइ न वनिजे। पतिव्रता॥ ६·१२९.
प्रकुती पतिव्रते पडिला येकपत्निव्रतें ८·१८७.
पतिव्रते आलें। वृद्धाप्य कां॥ १३·२६८.
तेया अनुरागा वेधु लावी। एकपत्नीव्रत चेववी। १३·४१०.
गांवा गेलेयां वल्लभु। पतिव्रतेचा विरहक्षोभु। भलेतैसा हानिलाभु। न मनी जेवि॥ १६·७८. विरहिणी १८·९१६.
पतिचेया व्रता। अनुसरे पतिव्रता। अनायासें आत्महिता। भेटे जेवि॥ १६·४५३.
तरि येकु प्रियोत्तमु। वांचुनु वाढों नेंदी कामु। जैसा कां मनोधर्मु। पतिव्रतेचा॥ १७·१७०.
पैं आघवां चि भोगेंसिं। पतिव्रता क्रीडे प्रियेंसिं। किं तेया चि नांव जैसीं। तपें तिया केलीं॥ १८·९०३.
इतर संदर्भ :— १३·९७९, १४·३९५, १५·५४२, १८·५८३, १८·१२६०, १८·१६५२. पुढें सती पहा.

## मातेच्या उदरीं

उदरि(रिं)चा गर्भु जैसा। न देखे आपुलिये मातेची वयसा। १०·६४.
जालां जननीजठरा। वेगला मी॥ १०·१२९.
जो मातेचेया ये उदरा। तिये मातेचा संवसारा। केतुला पां॥ १२·८३.
ह्मणे पूयगर्त्ते रिगालां। मूत्ररंध्रौनि निगालां। कटारे मियां चाटिला। कुचस्वेदु॥ १३·५३८.
मातृकोदरकुहरिं। सूनि विष्टिचां दारिं। जठरिं नव मास वेर्‍हीं। उकडला जैं॥ १३·७३१. पुढें १३·७३२–७३५ पहा.
जेधवां सगर्भे वाढिलें। तेधवां चि पोटिचें घालें। १३·८४४.
तिये गर्भमेदमूमे। रक्तमूत्ररसे। बोतिवां होउनि तैसें। लाजणें जें॥ १६·१७९.
प्रकृतीपासून झालेल्या चराचर सृष्टीविषयीं, १४·८६–१४·११७.

## माता व मूल

कामधेनु ऐसी माये १·७९, ५·१०.
स्नेहालागि माये ह्मणिपे २·४२.
अपत्यातें माये उ॑संडूनि जरि जाये तरि तें कैसेनि जिये २·६१.
मातेचां कोपीं थोकलें स्नेह आथि २·८८.
एथ भीड कवणाची धरूं। तूं माये आमची॥ ३·२१.
मातेचां ठांइ अपत्या स्तन्यासि लागौनि अनवसरु नाहीं ३·२९.
माये आपुलेयाचा स्नेहो करी एथ विस्मयो काइ ४·३१.
आदिं चि चित्त मायेचें। वरि मीस जालें

पढियंतेयाचें। आतां तें अद्‌भुतपण स्नेहाचें। कवण जाणे ॥ ५·१६९.

जें अपत्य थानौनि निगे। तेयाची भूक ते मायेसी चि लागे। ८·१२.

आणि बालक बोबडां बोलीं। कां वांकुडां विचुकीं पाउलीं। चोज करूनि माउली। रिझवी जेवि ॥ ९·६.

आहो तान्हेयां(या)ची लागे झटे। तरि तेणें अधिकें चि पान्हा फुटे। रोसें प्रेम दूणावटे। पढियंतेयाचेनि ॥ ९·१८.

मीं चराचरीं माता ही होयें ९·२६९.

ललेयाचिया बालका किरीटी। गवसणी घालूनु आपलेया स्नेहाची दीठी। जैसी खेलतां पाठोवाठी। माता निहाली ॥ १०·११८.

तें जो जो खेलु दावी। तो तो सोनेयाचा करूनि ठेवी। १०·११९.

कां करविलेनि चोजें न रिझे। बालका माए ॥ ११·१७.

मीं जऱ्हीं सलगीचा चांगु। तऱ्हीं काइ आयिसांहूनि अंतरंगु। ११·३२.

बालक स्तनपानीं उपरोधी करी। तरि तेयासि जियावेया हरी। उपाऊ आणिकु असे ॥ ११·७९.

माउली बालाची योग्यता जाणे ११·९२.

विरुद्धें गोमटीं मायेचिया परी पोटीं सामावी(वीं) ११·५४९.

किं अपत्या मज चूकलेया। बुझाउनि तुवां माया। स्तन्य दीधलें ॥ ११·६५८.

मनपवनाचिं खेलणिं रिद्धीसिद्धीचिं बाललेणीं लेववीसि माये १२·६.

सतरावियेचें स्तन्य देसी। अनाहताचा हलरु गासी। समाधिबोधें निजविसी। बुझाउनि ॥ १२·७.

कां स्नेहाल माए। तान्हेयांची वास पाहे। तिये दीठी आहे। हलुवार जें ॥ १३·२५२.

संवचोर चूकवितां। दीस लागलेयां माता। १३·३३६, रागें भरत नाहीं.

माये पुढां बालका। रिगतां न पडे चि आवांका। १३·३६०.

गुरु माये करी भावबलें। मग स्तन्य उत्संगिं लोले। अंका वरि ॥ १३·३९५.

श्रीगुरु बहुतांची माए। परि एकलौती होउनि ठाए। १३·४०९.

एकलौतेया बालका। वरिपडौनि असे अंबिका। १३·५०१.

बाला उचित जाणणें होये। तरि बालपण चि कें आहे। परि साच चि एरि माए। ह्मणौनि तोपे ॥ १६·२४.

बालाचां चित्तिं स्तन्य १६·११२.

परि अहितिं कोपौनि सोफ। लालनीं मौ जैसें पुष्प। तिये मातेचें स्वरूप। जैसें होये ॥ १६·१२२. नातरि बालका दोसें। मातेचें स्नेह जैसें। १६·१६८.

जननीला विवस्त्र पाहणें १६·२१६, तिची अवज्ञा करणें, तिच्याविषयीं कामना धरणें, यांमुळें पतन होतें १८·२००.

माता चि भजावी १८·२०१.

आंगा जीवाची संपत्ति वेचून आई बाळाचें पालन करते, यांत तिला कांहीं खंत वाटत नाहीं, १८·५८६.

माये पुढौनि बालक कालें नेंतां एक, तिची पाण्याशिवाय माशासारखी अवस्था होते, १८·७८३.

आपली आई जरी कुब्जा असली तरी तिच्या प्रेमांत कांहीं बाध येत नाहीं, १८·९२३.

दुसऱ्या स्त्रिया रंभेहूनही सुंदर असल्या तरी त्या बालकाला काय करावयाच्या? १८·९२४.

अनन्यजीविता माता। बालका जैसी ॥ १८·१५०२.

गीतामाउलीसि नसे। जानेंतानें ॥ १८·१५१८, पुढें १८·१५४७ पहा.

बालकां(का)तें वोरसें। माये जेवऊं बैसे। तेव्हळिं तेया ठाकति तैसें(से)। घांस करी ॥ १८·१६७६, या विषयीं १३·९४५ पहा.

गीता निष्कपट माए। चूकौनि हींडिजे वाएं। ते माये पूतां भेटि होए। हा धर्मु तुमचा ॥ १८·१७६१.

सद्‌गुरु व आई:—७·११८, ८·५४, १५·२२३, १८·९०४, १८·१३१९ पहा.

**मायबाप**

जैं(जै)सा स्वभावो मायेबापांचा। अपत्य बोले

जऱ्हीं बोबडिया वाचा। तऱ्हीं अधिकाधिक तेयांचा। संतोखु चि आथि ।। १·६४.
देखें मातापितरें अर्चिजति । तियें सर्वस्वें तोषु पावविजति। २·३२.
जे विश्वरूपाची आलि घेतली । ते मायेबापें पुरविली । स्नेहाळपणें ।। ११·५६९.
पहिलिये बाळदशे। आई बा हें चि पिसें। १३·७०८.
ज्ञांतारपणिं जालें। माणिक एक उपाइलें। तेयाचें कां जेतुलें। मातापितरां ।। १३·७८६.
मायेबापा दावी। निदारपण ।। १३·७९४.
हा जनकु हे माता। १५·४५९.
परि नेणतें जऱ्हि होए। तऱ्हि देखौनि बापु किं माए। हरिखु कें हिं न माए। चोज करिति ।। १५·५६३.
सकळां तीर्थांचिये धूरे। जियें कां मातापितरें। तियें सेवे किर शरीरें। लोण कीजे ।। १७·२०६.
आणि बापु तूं माए। इहिं बोलिं ना स्तुति होये। तरि डिंभोपाधिकु आहे। विडाळु तेथ ।। १८·२२.
तरि घरिं मातापितरां । घडा बोला नाहिं संवसारा। एर विश्व भरी आदरां। मूर्खु जैसा ।। १८·५९२.
तेयांचिये देशिचां झाडिं। कल्पतरुतें होडीं। न जीणावें काय थोडीं। मायबापें ।। १८·१६२१.
इतर संदर्भ :— १३·२६७, १८·१६२० पहा.

## स्त्रियांविषयीं आसक्ति

स्त्रीविषइं कांहिं विचारीना १३·६७९.
स्त्रीमांसें भुलौनि ठाके १३·७०८.
मग स्त्री भोगितां थावों। वृद्धाप्यें लागे नेऊं। १३·७०९.
स्त्री वांचौनि सर्वथा जाणे ना १३·७८७, यावर १३·७८९–८०१ पहा.
वाळभाचिये रती जालें। कोढी कोण ।। १६·३०३.
उर्वसिया इंद्र सुखी १६·३०६.
दीठि सूनि असार। विषयादिक ।। १६·३३१, १६·३३२–३३४ पहा.
प्रमदाचां आलिंगनीं। होईन मीं त्रिभुवनीं। आनंदकरु ।। १६·३६०.
सर्वे बैसौनि नारी आघैलें करी १७·१५९.
कां स्त्री देखौनि कामिकु। प्रवृत्तिध री ।। १८·४७७.
स्त्रीजात जेतुकें त्वगिंद्रिय चि ऊल्लखे १८·५५८.
तामसी वृत्तीच्या लोकांच्या मतासंबंधीं, १८·५५५–५५९, यावर १३·७६७ व १६·२२५ पहा.

## स्त्रियांविषयीं अनासक्ति

साउली सरिसी चि असे। परि असो हें नेणिजे जैसें। स्त्रियेचें तैसें। लागतें जेया ।। १३·५९४.
यऱ्हविं दारां गृहपुत्रीं। नाहिं जेयाची मैत्री। तो जाण धात्री। ज्ञानाची गा ।। १३·५९८.
जाततेन प्रसंगें। स्त्रीदेह सिवणें आंगें। तेथौनि देह आवघें। अबोटी कीजे ।। १७·२१०.

**साध्वी**—साध्वी शांति नागविली। ३·२४६.

**सवत**—जिये(या) उत्तमे कुळिचिया होंति। आणि गुणलावण्यें आथि। तिया आणिकीतें न साहाति। सुतेजपणें ।। १·१८६.
वेदांतें हिं ह्मणे मज हे। सवति जाली।। १६·२३३.

**वांझ**—कां वांझेची संतती। वानों ए जैसी।। १५·७९, अशक्य बाबतीचें उदाहरण.
ते वांझेचें घर भरिं। लेंकुरुवें जैसीं।। १५·२१५, वरील उदाहरणाप्रमाणेंच.
बराच काळ जाईपर्यंत मूल न झालेल्या स्त्रीला मूल झालें तर तिला होणाऱ्या मोहाला उद्देशून, ६·१२१.

**विधवा**—जैसी भातारेंहीन वनिता। उपहति पावे सर्वथा। २·१९९. भातारेंविण १२·६६, पुढें सती पहा. कुंकुंसेंदुर केलें। कांतहीनें ।। १३·४६८.
कां वैधव्यें वेंलु नेणे(णें)। महासती जैसी ।। १६·१७६, जीवन लाजिरवाणें होतें.

**सती**—हा अग्निप्रवेशु नीच नवा। भातारेंविण करावा। तो हा योगु ।। १२·६६, निर्गुण उपासनेस उद्देशून, यावर १२·५९–७४ पहा.
न येंति भोगु सतियांचें(चे)। प्रेमभोग ।। १३·४८५, सती जाणाऱ्या स्त्रीनें घातलेलीं वस्त्रें, अलंकार मृतपतीच्या प्रेमाचें द्योतक असलें तरी ते प्रेमभोग नसतात. वोखटें मरणाऐसें

तें हिं आलें अग्निप्रवेशें। परि प्राणेश्वग दोसें। न गणी सती।। १६·१८५. जें सांडूं नेगे मरणीं। वल्लभा जैसी।। १६·३३०, जशी एखादी पतिव्रता नवरा मेला तरी त्याला टाकत नाहीं, सहगमन करते, तशी चिंता त्याला सारखी धरून राहते. कां महासतीयेचे भोग। देखे किर आघवें जग। परि ते आगि ना आंग। ना लोकु देखे।। १८·४३७, ती सती आपल्यापुढें असलेली चिता, स्वतःचें शरीर किंवा पहायला आलेले लोक यांच्याकडे पहात नाहीं.

आगींत उडी घातल्यावर सतीचे रोमांच दिसतील काय? १८·६३९.

सतिया, पतिव्रता, १६·४००.

**धाया**—दाई. परावें बाल धाया। पाहिजे जैसें।। १८·१७०, फलाशा टाकून कर्में करावीं यास उद्देशून.

**दासी**—दासि किं गोसांविणि १८·९०८. ऐसेया अंतष्करण। बाहियें येंतां तेयाची आण। न मोडी समर्था भेण। दासि जैसी।। १८·९५५, ज्याप्रमाणें दासी आपल्या मालकाची आज्ञा मोडत नाहीं त्याप्रमाणें विषयांकडे वळूं नकोस अशी त्याची आज्ञा अंतःकरण मोडत नाहीं. दासिरु, बटकूर, १८·१३९४.

**धिटा**—कोशांत धिट पहा. बाहिरि धिटे जैसी। दाटुगा पति कलासी। १३·५०४, गांवांत उद्दाम-वृत्तीनें भटकणाऱ्या स्त्रीला आडदांड नवरा जसा कोंडून ठेवतो, तसाच प्रवृत्तीला कोंडून ठेवून इंद्रियांकडे जाऊं देत नाहीं.

**मांगि**—मायेस उद्देशून, ३·२४६.

**माहारी**—चोखी अथवा माहारी। १३·४७८.

**माहेवणी**—कोश पहा.

**बाईट व हीन व्यवसायांतल्या स्त्रियांसंबंधीं**

ऐहेव आघवेनि गांवं(व)दारी। ऐहेव जेसी।। १३·८२०. कुस्त्रिया १६·३७५ पहा. दुहवेवारी, कोश पहा. धांगडि, व्यभिचारिणी, धर्मपत्नी कां धांगडि १८·९३६.

**पण्यांगना**—पण्यांगनेचें मैत्र ८·१४४; कां राहे पण्यांगना। वडीलपणें।। १३·२०४, आपल्या धंद्याला आवश्यक असें तारुण्य दाखविण्याकरतां रंगरंगोटीनें आपलें वय लपवते यास उद्देशून. हीन अंगना पडपें(पे) जिया परीं १७·२४५, कोशांत पडप पहा. दीठि ते किर बोली। पण्यांगनांची।। १८·६६९, लटकें प्रेम दाखवून, मोह पाडून कपट दाखविणारी दृष्टी.

**रेटिहाटिचें कलत्र**—१८·७९४.

**वारांगी**—वेश्या. तिच्या घरीं कोणाला प्रतिबंध नसतो, १३·६९९.

**विलासिनी**—विलासिली आंतौरिया ९·३२०.

**वेश्या**—परि बापुडा ऐसा नेणे। जें वेश्येसि सर्वस्व देणें। तें चि नागवणें। १३·७४३, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील 'वेश्येचें' पाठ अधिक समर्पक वाटतो.

**सामान्या**—सामान्या वीक आलें १३·६९९. सामान्या स्त्रिया जुवारी १७·२९५. सामान्या भली जंव आंग। न सिवे तंव।। १८·२४८.

**स्वैरस्त्री**—स्वैरस्त्री संनिधानें। होये जें सुख।। १८·८०३.

**स्वैरिणी**—कां कांताचां मानसिं। रिगौनु स्वैरिणी जैसी। राहाटे आणिकेंसिं। जावेया लागि।। १३·८०७.

**इतर कांहीं संदर्भ :**—

नविये आवडिचेनि भरें। कामिकु निज वनिता विसरे। मग पाडेंविण अनुसरे। भ्रमला जैसा।। १·१८७; सकामा वनिता न जिणवे, कामी पुरुषाला स्त्री वश होतेच असें नाहीं, ७·९३; कामिकु जैसा अंगना। आपैता कीजे।। ११·१६९, स्त्रैण पुरुषाला स्त्री आपलासा करून घेते; परदारादि करावें पडे। परि विरुद्ध ऐसें नावडे। मन सेलियेचेनि तोंडें। सैघ चारी।। १४·२२७, परस्त्रीशीं प्रसंग आला तर त्यांत निषिद्ध असें कांहीं मानीत नाहीं यास उद्देशून; १·२२०, ५·१६, ५·१३३, ९·४६१, ९·४६५, १३·५७२, १३·७६७, १३·९७६, १३·१००८, १५·७४, १५·४५९, १६·३०८, १८·२०४, १८·९५३.

**(आ) मुलांसंबंधीं :**

**मूल**—बालक या अर्थी मूल हा शब्द ग्रंथांत आढळला नाहीं, तान्हें दूधपितें मूल—याचे संदर्भ

माता व मूल पुढें परिशिष्ट ७ (अ) मध्यें वर पहा, त्यांपैकीं हे संदर्भ :—२·६१, ३·२९, ८·१२, ९·१८, ११·७९, ११·६५८, १३·३९५, विशेषतः पहा. आईशिवाय मूल जगणें कठीणच १८·३०४; अनन्यजीविता माता। बालका जैसी ॥ १८·१५०२; अगदीं लहानपणीं आईनें केलेलें संगोपन, योगसुखाचे सोहळे १२·४ ते १२·७ या ओव्यांत आले आहेत; बालक बोबडें बोलतें १·६४, ९·६, बांकडीं विचुर्की पाउलीं चालतें ९·६, याचें कौतुक - आंगा-जीवाची संपत्ति वेचून आई करते; तें खेळत असतां प्रेमाची पाखर घालून त्याला संभाळते १०·११८ व त्याचा खेळ जपून ठेवते १०·११९; अगदीं लहानपणीं बालकाच्या मनांत स्तन्यच असतें १६·११२, त्याला पक्वान्नें वेऊन काय करावयाचीं? ३·१७०; जरा मोठें झाल्यावर बरें वाईट, 'चोख मैल', न पहातां हातीं मिळेल ती वस्तु तें तोंडांत घालतें १६·२४८; एखादा खाद्य पदार्थ सांपडला तर चिवडून टाकतें १७·१५९; योग्यायोग्यतेचा विचार बालकाला नसतो, तो असता तर बालपण तें 'कें आहे' १६·२४, हें जाणून तो विचार आईच करते ११·९२; अजाणतेपणामुळें मुलाची हट्ट करण्याची व हसण्यारडण्याची वेळ ठराविक नसते म्हणून आई त्याला समजावते ११·६५८, वेळीं रागेंही भरते पण त्या रागांत प्रेम हें असतेंच २·८८; भीतीसाठीं बागुलबुवाही दाखविते १५·२१२, पुढें मात्र ही भीति रहात नाहीं १८·४०४; बालाच्या चेष्टा ५·५२ व थट्टा ९·१६ आई स्नेहपूर्ण दृष्टीनें पहाते; त्याला भूक लागलेली असली व अन्नही पुढें असलें तरी त्याला जेवतां येत नाहीं, लंवे चि तें १७·३४७, हें जाणून आई मुलाच्या तोंडांत मावतील एवढे १८·१६७६ लहान लहान घांस करून त्याला भरवते १३·९४५; केव्हां तरी बापाच्या ताटांतच बालक जेवायला बसतें व बापालाच भरवायला जातें, बापही घांस घेण्यासाठीं तोंड पुढें करतो ९·१५; मग बालपणांत ९·११८, १३·९१७ 'आई बा हें पिसें' मुलाला लागावें यांत नवल काय? १३·७०८;'एकलौत्या' आईचें १३·४०९, 'एकलौतें' मूल १३·५०१, १५·१९, तेंही उतार वयांत झालें तर कौतुक होईल तेवढें थोडेंच १३·७८६; आईच्या रूपांत उणेपण असलें तरी तिच्या प्रेमांत तें नसतें १८·९२३; आपलें मूल सुंदर दिसावें म्हणून, जरी मुलाला त्याचें कांहीं वाटत नसलें तरी, निदान आपल्याला तरी बरें दिसावें म्हणून ती त्याला वस्त्रालंकार घालते १०·५७, व बाललेणीं लेववते १२·६; मूल जरा मोठें झालें कीं गुरुजी त्याला पाटीवर अक्षरांचा धडा घालून देतात, बाल त्याप्रमाणें अक्षराखालीं अक्षरें काढतो १७·४२, हारहूर लिहावयाला शिकवितांना गुरुजी त्याचा हात धरून ओळी लिहवितात ·१३·३०७; इतकें कोडकौतुक करणारी आईच मुलाला बरी वाटते; परक्या स्त्रिया रंभेहूनही सुंदर असल्या तरी त्या बालकाला काय करावयाच्या? १८·९२४; जर कां कालवशात् बाळ गेलें १८·७८३, तर पाण्याशिवाय माशासारखी आईची प्राणांतिक अवस्था होते १८·७८३, म्हणूनच कीं काय परावें बाल धाथा। पाहिजे जैसें ॥ १८·१७०, अशी ताकीद दिली आहे.

(१) मूळ नक्षत्रावर जन्मलेलें मूल टाकणें १८·१२२, (२) नवस वेऊन चेड्यांना बालकांचा बळी देणें १७·९६, अशा प्रकारचेही संदर्भ ग्रंथांत आले आहेत.

**कुमर** व **कुमार** हे शब्द मोठ्या मुलांस किंवा राजपुत्रांस उद्देशून आले आहेत :—
कुमर १·१८१, द्रुपदकुमर १·९४, द्रौपदिकुमर १·१०२, पांडुचा कुमर ४·२०९, पांडुकुमर २·२१, २·७३, राजकुमर १·२६८.

**कुंवर**—हा शब्द पांडुकुंवर १५·४६ यांत एकदांच आलेला आढळला.

**कुमारी**—हा शब्द अगदीं लहान किंवा उपवर मुलीस उद्देशून आला आहे. ७·१६१,१०·२६५.

**बाल**—हा शब्द तरुण मुलीस उद्देशून आला आहे. १५·४३५; गुगुतिवाला १६·२०७.

**अपत्य, तान्हें, लेंक-लेंकी-लेंकरूं**—या शब्दांकरतां कोश पहा. इतर संदर्भ : ९·१९, १०·६, १३·७०९, १३·७१०, १४·१०५, १६·१६८, १८·१२९७, १८·१३१९, १८·१७००.

(इ) खेळ व करमणुकीचीं साधनें :

खेळ—१०.११९; खेळणें १२.६; देवाचां भोगायतनीं। खेळतां शंका न धरीं मनीं। ११.५४५; खेळे गुणविधा शोभा। येथ आन्हा तो बोधंश। १३.१०७३, खांबालोंवतीं खेळण्याचें हें एक रूपक आहे.

फळें करी—महाकाळेंसि फळें। कवण करी ॥ ११.४००, आट्यापाट्यांतील पाटी धरण्यांत स्पर्धा करण्याचें हें रूपक आहे; कवीं धरीं खेळे, लपंडाव खेळणें, १४.९; हाता फळी देखौनि जाये, हातावर हात मारून टाळी देऊन लगेच पळणें, ६.४२३; हातोफळिया मिळे, हातावर हात मारण्याच्या अवधींत, लगेच, मिळतें, १८.१२१; हातधरणियां सीवे १३.६३०.

चेंडू—११.५७१. जमिनीवर आदळून उडालेला चेंडू झेलून खेळणें, १६.९९, पण ओलसर जमिनीवर मारला असतां तो उसळून परत हातीं येत नाहीं, १७.२७९.

कोलु धरुं—११.५४१, हा संदर्भ विटीदांडूला किंवा दांडपट्ट्याला उद्देशून आला असावा.

भोज नाचतसे—मिरवणुकींत प्रतिवादि नाचवीत नेणें ६.१२३, हा डेंडा नाचविण्यासारखा प्रकार असावा, १८.११८१.

सरिपाडु धरुं—सोंगट्या खेळणें, ११.५४१; डाऊ पाडावा ११.५७१, या खेळांत 'मोहिरें' पुढें सरकवितात ह्याचा उल्लेख, १८.१६८.

घरकुल—मुलें घरकुल करतात व त्याला इंद्राचें अमरपुर म्हणतात, बाहुली बनवून त्याला इंद्र नांव देतात, यांचे उल्लेख ९.३७०. ओवींत पहा.

**इतर संदर्भ :—**

**आंधारिं कोलिती भवंडितां,** अंधारांत कोलीत चक्राकार फिरवून 'कोलित–कांकण' (हंस कोश) दाखविण्याचा एक मौजेचा प्रकार, १५.१३६.

**आडखला कीजे कवतिकें विंधिजे,** बाणानें निशाण मारण्याच्या खेळास उद्देशून, ११.४७३.

**करमणुकीकरतां व शोभेकरतां :—**कागदावर किंवा भिंतीवर चित्रें काढणें, यांचे उतारे:—जेथ हें संसारचित्र उमटे। तो मनोरूपु पट फाटे। ५.१५५; कां त्यजूनि भींतिमात्र। त्यजिजे आघवें चित्र। १६.१११; पडौनि ठेलेयां भींति। चित्राची कीजनसे वांधी। १८.६६१; परि अज्ञानाचां रहीं। अन्यथ.ज्ञानाचें चित्र उठी। १८.४५७; आकारचित्रें ६.९९, आनंदचित्रिंचें लेप ३.२५६, चित्रिचें पाणी हुलाळु, दोन्ही खोटींच असतात, १८.४४३, चित्रिचे सिंहाडे ११.८६९, लेपा हातिचें साज १३.५३१, अनकीं चित्रें हातानें पुसून किंवा पाण्यानें धुऊन टाकतां येत असत, हेनासि स्नवन करणें। तो चि नाशु ॥ १३.७४४, जैसें हातें चित्र पांना। होये पाणियें नीठ धूनां। १८.२२९; हीं चित्रें कागदावर काढल्यावर कागद दिसत नसे, नाना मुग्धां पद्ध लपे। दाऊनि चित्र ॥ १८.५४१.

बाहुल्या नाचविणें, साध्या पडद्यामागें राहून सूत्रधार दोऱ्यांनीं बाहुल्या नाचवून छायाचित्रें पडद्यावर पाडत असे, यास उद्देशून—स्वमायेचें आडवस्त्र। लेऊनि एकला खेळवी सूत्र। बाहिरि नटि छायाचित्र। चौरासी लक्ष ॥ १८.१२९४; याखेरीज चिंध्यांच्या बाहुल्या व लांकडाच्या बाहुल्या दोऱ्यांनीं नाचवून खेळ दाखविण्याचे प्रकार प्रचलित होते—जो अविवेचिया चिंधिया। गुंडाळूनि जीव बाउलिया। खेळवीतसे गुणियां (या)। अहंकाररज्जु ॥ १८.९११; दारुयंत्र—जैसें चेष्टे सूत्राधीन। दारुयंत्र ॥ १.८१; लाइखेडें (कोश पहा), हें अशाच प्रकारचें दोरीच्या हालचालीनें हातपाय वगैरे हालविणारें बाहुलें होतें; सूत्रधाराचा सर्व आधार दोरीवरच असे—सूत्रें विण लाईखेडें। बाऊ जैतें ॥ १३.३०१, यावर ९.३०, १५.३३३, १८.१७४७ पहा; जर कां सूत्रतंतु तुटला तर बाहुल्यांची हालचाल बंद पडे १६.१८२; असल्या बाहुल्या खांबावर दोरीनें नाचवीत; दोरी तुटली कीं बाहुली तेथेंच अडकून राहात, मग कोणीही तीं पाडावीं—हालविती दोरी तूटली। तरि तियें खांबावरिलें बाउलीं। आवडेतेणें लोटिलीं। उलथौगि(नि) पडति ॥ ११.४६२; शरीररूपी यंत्रें प्रारब्धाच्या दोरीनें कशीं हालतात त्याचें रूपक १८.१२९९ ओवींत पहा;

यावर—तूं कालयंत्रा सूत्री । तूं इये जीवकले अधिष्ठात्री । १०·१३६ पहा.

**कोल्हैरिचे असिवार** ९·१७२, **कोल्हैरिचे वेताल** ११·४६१, माती इ. चें बनविलेलें **चित्रपाल** १३·४६९, वगैरे खेळ बाजारपेठेंत विकत मिळत; **लोंगीझोंबी** ११·५४१, हा एक खेळीमेळीच्या झटापटीचा प्रकार असावा; **प्रतिमल्ल** १८·४८७, **अप्रतिमल्ल** १·११० यांचे उल्लेख ग्रंथांत आले आहेत; **जुं खेळणें** १५·४४८, हा **खेळेयां विंदाणां माझि** १०·२६१ द्यूताचा महाभारत काळापासून चालत आलेला प्रकार अजूनपर्यंत चालू आहेच.

याखेरीज प्रौढांकरतां **आराम** १८·९८ व **विनोदवनवाटिका** ९·३१९ होत्या; प्रवाशांकरतां **विश्रामशालिका** १४·६७ होत्या.

## (ई) धंदेवाईक व इतर.

ग्रंथांत कांहीं धंदेवाईक लोकांचा नांवानें उल्लेख आलेला आहे; कांहीं लोकांचा नांवानें उल्लेख आलेला नसला तरी त्यांच्या व्यवसायाचे उल्लेख आहेत.

**शेतकरी**—शेतकी करणाऱ्यांचे **कृषिवलु** १३·२०६, **कुलवाडीकारु** १३·२९ व **कुणवटु** १३·८१० या नांवांनीं उल्लेख आलेले आहेत, कोशांत **खेत** पहा. सेतकरी किंवा शेतकरी शब्द ग्रंथांत आढळला नाहीं; वैश्य जातीच्या लोकांचीं कर्तव्यें १८·८७६ ते १८·८७८ ओव्यांत सांगितलीं आहेत; तरि भूमि बीज नांगरु । या भांडवलाचा आधारु । घेउनि लाभु अपारु । मेलवणें जें ।। १८·८७७, हे लोक शेतकीचा धंदा करीत व करवीत; १३ व्या अध्यायांत क्षेत्राविषयीं निरनिराळीं मतें १३·२८ते १३·६६ या ओव्यांत सांगितलीं आहेत; कांहीं जणांच्या मतें क्षेत्र हें 'जीवाचें' आहे; व प्राण हें 'कुल' आहे १३·२८; मन 'कुलवाडिकार' आहे १३·२९; इतर कांहीं जणांच्या मतें क्षेत्र हें जीवाचें नाहीं १३·३४, जीव हा वाटेनें जाणारा 'वस्तिकर' आहे व प्राण हा त्याचा 'बलैता' आहे १३·३५; सांख्यांच्या मतें क्षेत्र ही प्रकृतीची 'वृत्ति' आहे १३·३६; क्षेत्राची मर्यादा दगड घालून आंखणें, भाजणी व वापसा करणें ६·४८८, 'इंद्रियबैलांची पेटी' जोडून क्षेत्र नांगरणें १३·३०, 'तास' पाडून ११·५७२, चाड्यानें बीं बिवड ९·५२८ पेरणें, ६·४८६–४८९, ९·३९, १२·२२९, १७·२८४, १८·५९६; पेरलेलें झांकून ठेवणें १३·२०६, लांबा उगवल्यावर ६·४४२ त्याचें रक्षण करणें, त्यासाठीं 'तणाचें बुजवणें' १३·५६८, 'तणाचा वाउला' १८·४३५ आगारावर ठेवणें, कापणी व मळणी करणें १३·४०, हीं अत्यंत परिश्रमाचीं कामें शेतकरी करी; तो 'पाटा' घेई १२·८४, त्यांत आपलें नांव नोंदवी, 'वहिवटीं नांव पूसलें' ११·४२१, यावरून तें त्यांत होतें असें दिसून येतें. जीवाच्या दहाही आउतांनीं १८·४५१, १८·५०३, कुळवाडी ३·२४१, १२·८१, १३·८१०, खेटी १३·५६४, 'अवसिपाहाटी' न पहातां, न कंटाळतां, श्रम करी; तो जाणत असे कीं, जैसा पुजुनि देउ‍ॅ पाहिजे । पेरुनि सेता जाइजे । १६·१४७; शेतावरच त्याचा उदरनिर्वाह चाले, म्हणून, प्रतिवरिषिं क्षेत्र पेरिजे । जंव जंव पीकाची वाढि देखिजे । यालागि नुमगिजे । वाहो करितां ।। १०·५४; सर्वांच्या माहितींतलें, सर्वांना कळेल असें शेतकीचें रूपक घेऊन ग्रंथकारानें अत्यंत गहन विषयाचें निरूपण लीलेनें कसें केलें आहे तें पहा; शेतकीचें किती बारकाईनें निरीक्षण केलें आहे हेंही दिसून येईल.

**कीर्तनकार व इतर**—कीर्त्तनाचेनि नडनाचें । नाशिले व्यवसाय प्रायश्चित्ताचे । ९·१९६, पुढें ९·१९७ ते ९·२१० पर्यंत आलेल्या ओव्यांवरून हे कीर्तनकार केवळ धंदेवाईक होते असें दिसत नाहीं, हे फार थोर पुरुष असावे. यांच्या शिवाय यज्ञ करणारे **याज्ञिक**, अग्निहोत्र करणारे **साग्निक** हेही होते. पुराणें मुखोद्गत करणारे **पुराणिकही** होते १३·८२६. **भाट**—अमरीं भाटां होइजे । ६·४५४, स्तुतिपाठक राजदरबारांत उच्च स्थानीं होते असें दिसतें, पण पुढें आलेल्या कांहीं संदर्भावरून—**पात्रें भाट नागारी** १७·२९५, व **गीत भाटींव** १७·२९६, हा धंदा कांहीं लोकांनीं हीन अवस्थेला नेला होता असें दिसतें.

पंडित, शिक्षक, १३·३०७ व गारी, गदई, ९·३२० यांचे उल्लेख आहेत.

**वैद्य**—'निर्वाणिची अवधी' देणारे २·८६ वैद्य व सद्वैद्य यांचे उल्लेख आहेत, १६·४२,१६·१४०.

**ज्योतिष**—भविष्य.ज्योतिषि तो जगे। तैसे(सं)चि होए ॥ १३·८२६; जोईस—ज्योतिषी, आणि पशुपक्षीं विवाहीं। जोईस कामा परौता नाहिं। १७·१८८, यावरून लग्नकार्यांत पत्रिका पहाण्याचें काम हा वर्ग करी असें दिसतें; अनुमानानें भविष्यांत काय होईल याला ही 'जोईस' शब्द योजलेला आहे; धृतराष्ट्रानें युद्धाचा निकाल काय लागेल याबद्दल आपलें मत सांगून संजयाला, मां तूझें जोईस कैसें। १८·१६११, असा प्रश्न विचारला आहे.

**पंचाक्षरी**—'पांचाखरी' या शब्दानें ह्या वर्गाचा उल्लेख आलेला आहे—जैसें ग्राहातें पांचाखरी। अनुमानी कां ॥ २·८५.

**मांत्रिक**—मंत्रज्ञ. १·१९०, २·३१२. हे मांत्रिक कित्येक वेळां चाचरून मंत्रोच्चार चुकत, कित्येक वेळां भल्या भल्या मांत्रिकांनाही हडळ चकवीत असे; पण खऱ्या मांत्रिकांना भूतबाधा होत नसे २·२३४; भूतबाधा नाहींशी करणारे, मंत्र तंत्र करणारे १३·७१४,१८·४४२ मांत्रिक होते; अभिचार, जारण, मारण इत्यादिकांचे प्रयोग करणारे **अभिचारिक** १६·३९८, **अभिचारक** ९·३५३ वगैरे कनिष्ठ प्रकारचेही लोक होते; वेदमंत्र जाणणारांचा मात्र या वर्गांत समावेश करतां येणार नाहीं, मंत्रविद्येसि माहेर। ब्राह्मण जे ॥ ९·४७१, हे फार श्रेष्ठ दर्जाचे लोक होते.

**महंत**—अत्यंत गर्विष्ठपणानें वागून, शिष्यवर्ग जमवून, मठ स्थापून, मुद्रा लावून शास्त्राभ्यासाचा आव आणणाऱ्या भोंदूस उद्देशून कांहीं ओंव्या आल्या आहेत, १६·३७६, १८·१०५६-१०५८ पहा. पाखंडी लोकांचा अनेक ठिकाणीं निर्देश आलेला आहे. जैन **मुनि**—नागिवें लुंचिति मुंडें। १३·२२, अहिंसा पाळतांना हिंसा कशी करीत तें पहा, एकिं धर्मान्विया वाहाणी। गाळूं आदरिलें पाणी। तेथ गालितेयाचिया आहलणी। जीव मेले ॥ १३·२३४.

**व्यापारी**—हल्लीं ज्या अर्थानें हा शब्द प्रचारांत आहे त्या अर्थानें हा शब्द ग्रंथांत आढळला नाहीं. व्यापारणें व त्यापुढें व्यापार हे शब्द कोशांत पहा. व्यापाराला भांडवल लागतें ७·१७३, ९·५०३; त्याचा जपून उपयोग करावा लागतो, नाहींतर भलत्याच्याच हातीं भांडवल जाऊन बुडण्याची भीति असते १६·२८१, नीट उपयोग केला तर पुढें चौपट फायदा होतो—तेयाची चौगुणी येती पाहे। १८·७४४; बाजारपेठेंत बाजूक व्यापाऱ्यांप्रमाणें किरकोळ दुकानदारी करणारेही व्यापारी होते; त्या दिवसांत हातमागाचें कापड मिळे, हें पट व तंतु यांच्या रूपकांवरून व तांथुवाचा ताणा १८·३५८ यावरून दिसून येतें; पेठेंतील दुकानांत कापडाच्या गठ्याची दोरी सोडून, घडी झाडून, उघडून, व्यापारी गिऱ्हाइकांना कापड दाखवी ६·२९२, ११·६४१—६४२, गिऱ्हाईक कापडाचें प्रमाण (माप) व रंग पाही; **वस्त्र** ७·१०१, १३·४६४, **कापड** ९·७५, **दुस-दूस**, **पट**, **माजिठें**, **लुगडें**, (हे शब्द कोशांत पहा), इत्यादि साधीं व उंची वस्त्रें मिळत. समुद्रमार्गानेंही व्यापार उदीम चाले, तो मनोरथाचां सागरीं। धर्मार्थकामाचें तारूं भरी। जेणें धैर्यबळें करी। क्रियावणिज ॥ १८·७४३; **कापडी** ६·१५३, १८·११६६, हा शब्द यात्रेकरू या अर्थी आला आहे.

**वास्तुशास्त्रज्ञ**—गरीब लोक **तण्हारें** ३·२१८ बांधीत, तर हे वास्तुशास्त्रज्ञ **धवलार** १७·८८, **धवलार** ८·६, तीन माड्यांचीं **त्रिमालिकें धवलारें** ५·११३ उठवीत, **प्रासाद** १८·३४, **भुवनें** ११·२५३, **रमणिकाचीं राजभुवनें** ११·१९४ बांधीत. याशिवाय मंदिरें, देवळें यांचे उल्लेख आहेत. या वास्तुशास्त्रज्ञांच्या हाताखालीं गवंडी असणें स्वाभाविक आहे.

**सुतार**—याचा नांवानें उल्लेख आढळला नाहीं, पण **गाडा** १३·७५३, **नाव**, कोशांत **नाव** (१) पहा, रथाचे निरनिराळे भाग जुळवून रथ बनविणारे १३·१५१, घराला **दादर** ६·२७१, १२·५५ बसविणारे, **कपाट**, दार या अर्थी, १३·६१०, **कवाड** ८·११०, **खिडकी** १२·५२, **दार** ९·३२६ व त्याखालीं **दारवठा**

१८·१४९८ बसविणारे, तसेंच कुंभाराचें चाक १८·४२४ व नांगराचा लांकडी भाग बनविणारे होते; दारुयंत्रें १·८१ वगैरे कामेंही सुतार करीत.

**चित्रकार**—हे धंदेवाईक चित्रकार कापडावर किंवा भिंतीवर अनेक प्रकारचीं चित्रें काढीत. वर ७ (इ) पहा.

**सोनार**—अलंकारवजा लहान धंद्या १·७, बाल-लेणीं १२·६ व इतर लेणीं, भूषणें १८·१४९१, मुदिया १४·१०८, केयूरें १३·१०६०, नेपुरें १५·४, जोडीं १५·५, पुरुषांनीं घालावयाचीं कंकणें १८·१४०९, स्त्रियांचीं कांकणें १४·३७५, १८·११७६, इत्यादि अलंकार बनविणारे, सोन्याचा सूत्र, महिपु व चाळुंडा १८·४४१-४४२ बनविणारे सोनार होते; यांच्या धंद्याला आवश्यक असणाऱ्या मुशी व ठसे १८·११०२, कोंदणकामासाठीं व जडावाच्या कामासाठीं १·५, ११·१३३ लागणारीं हत्यारेंही होतीं. कसवटीवर पांचिक, पन्हरें, साडपन्हरें व सोळें यांचे कस लावणें १८·९७५, कस पाहून वानी ठरविणें ६·९६, वालाच्या वजनानें सोनें तोलणें १३·१००३, शुद्ध सोन्यांत कीड, हलकी धातु, मिसळली तर सोन्याचा कस उतरतो १४·१४०, तो ओळखून अशुद्ध सोनें आगींत घालून कीडाल काढून टाकणें २·१२८, व पन्हरेयाची ६·२२४ चोखडी खोटी बनविणें ८·१७१, हीं कामें सोनार १८·५०५ करीत.

**लोहार**—या शब्दाचा उल्लेख कोठें आढळला नाहीं, तरी लोखंडी कामाचे व वस्तूंचे अनेक उल्लेख ग्रंथांत आहेतः—जैसें लोहकर्म लोखंडें। निर्वाळिजे ॥ १८·३५७, धडाडिते लोहरसिं १३·५१४, आटिंव लोहखांब १६·३७७, तिकडी सांखळ १६·४२५, शूल १८·७०८, सूल १३·७४६, पहार १७·१४२, भाली १६·२११, करवत १६·२४२, कोंत १८·६४, सूरी १३·१०६५, असीपत्र १६·२७१, करवाल १५·२३५, निरनिराळीं हातियेरें व लोहारासाठीं आवश्यक असा जोडभाता १५·३७६, धार लावण्यासाठीं साहाण १५·२३६, हे संदर्भ लोहाराच्या कामासंबंधीं आहेत. लोखंडाचे लोह, काळलोह १६·२११, तिखें १६·२४२, असे प्रकारही सांगितले आहेत.

**कुंभार**—चाकावर मातीचीं भांडीं तयार करण्याचा धंदा फार जुन्या काळापासून चालत आलेला आहे. नाना (चां)चाकिं भांडें जालें। तें कुंभारें परौतें नेलें। १८·४२४, तरी गति दिलेलें चाक फिरतच राहतें, १८·३०८; हें चाक काठीनें फिरवून वेग दिल्यावर भांड्याला आकार देणें व आकार दिल्यावर भांडें मोडून पुनः मातींत मिळवणें, भांडें भाजून पक्कें करणें यांचे निर्देश ग्रंथांत आहेत. खापर ९·४३५, गाडुवा घडा १८·५४०, घट १४·११९, घटभांड १५·४७२, –मठ १३·१०५९, घढार, मोठा रांजण, १६·३१३, · भांडघटशराव १३·८६९ ह्या मातीच्या भांड्यांचीं नांवें ग्रंथांत आलीं आहेत; कुल्लाल, कुंभार, हा शब्द मातीचीं भांडीं हीं कुल्लाल मतिचे गर्भ आहेत यांत आला आहे, ९·७३.

**धोबी**—हा शब्द ग्रंथांत आढळला नाहीं. सौंदणि १३·४६४, मळलेल्या कपड्यांचे डाग धुऊन काढते; जर कपडे स्वच्छ झाले पाहिजेत तर सवंदणि मलीन समजूं नये, १८·१४०, स्वच्छतेला कारण होणारी वस्तु अस्वच्छ मानूं नये.

**आचारी**—सुआरु १३·४२०; रांधवणी, ही स्वयंपाक करून विकत असे, २·२५४; सूपशास्त्र १३·८२७.

**माळी**—कोशांत मालि–ली (३) पहा. बनकर वर्षभर श्रम करी व वसंतऋतु येईपर्यंत फळाची वाट पाही, १०·१५३.

**नट**—कां नटलेनि लाघवें। नटु जैसा न झंकवे। १४·२८८, सोंग घेऊनही नटाचें व्यक्तिमत्त्व लपत नाहीं; मातें गांती वानिती। नाचें नटें रिझविती। १६·३५९, नटून, नाचून, सोंगें घेऊन लोकांचें मनरंजन करणाऱ्यांचा हा एक वर्ग होता. नाचणी, नाचणाऱ्या, ९·३२०, या राजदरबारीं असाव्या; काव्यनाटक १·७, हा शब्द प्राचीन संस्कृत काव्यांस व नाटकांस उद्देशून आलेला आहे.

**पारधी**—२·२११. पारधी आपलीं साधनें घेऊन

डोंगरावर शिकारीस कसे निघत तें १६·३४३ ओवींत पहा; सावज सांपडलें कीं पारधी पाश ओढी व शिकार त्यांत अडकून राही १४·१४७; जळवा(पा)रधी १४·१४६, ह्यांना **ढिवर** हा शब्द आला आहे—जैं आटावे जळचर। तैं डोहिं मिळति ढिवर । १६·३१६; **व्याध**—व्याधाचें चारा घालणें, ही दिसते तितकी जोगावणूक नसते, १३·६६८; **गोरि-री**, फांसेपारधी, गोड गाणें गाऊन पक्ष्याला आकर्षून घेतो पण उद्देश निराळाच असतो, १६·१२०, या गोरीच्या गाण्याला सावज भुलतें व सांपडतें १३·७३८.

**चाबूकस्वार—मांदुरी.** यानें तयार केलेला घोडा फार ऐटींत चालतो; घोड्याला मोठेपणाचा एवढा अभिमान वाटतो कीं तो ऐरावतालाही तुच्छ मानतो—कां मांदुरी लोकाचां घोडां(डा) । गजपति महिमे थोडा । १६·२२३.

**सारथी**—कोश पहा.

**कोल्हाटी**—परि तें करणें बहुवसा । वळघोनि करी आयासा । जीवनउपाऊ कां जैसा । कोल्हाटियाचा ॥ १८·६०३, राजस वृत्तीनें शरीराची आटापीट करून कोल्हाटी उदरनिर्वाह करतात त्यास उद्देशून.

**गोंधळी**—कोशांत **गोंदली** पहा.

**गुराखी**—कोशांत **गोवारी** पहा. जसा गुराखी दुधाची आशा न धरतां गांवांतील गाई म्हशी संभाळतो, त्याचप्रमाणें कर्मफळाचा लोभ न धरतां कर्में करावीं, १८·१७२.

**गारुडी**—सर्पाचें विष उतरविणारा. **हरिगारुडी** २·७२; भिकेपलीकडे कांहीं प्राप्ति नसतांही गारुडी सर्प खेळवतो, १८·६०५; हे लोक हातचलाखीचे खेळ व मांकडें, बोकड, सर्प, मुंगुस वगैरेंचा खेळ करीत—मर्कट गारुडियाचें। जैसें होए ॥ १३·७९१, हा संदर्भ स्त्रीलंपटास उद्देशून आलेला आहे. **नागारी**, सर्प धरणारा, १७·२९५.

**भांड**—कनिष्ठ प्रतीचा स्तुतिपाठक. जें मुख अवतरे। भांडाचां बोलीं ॥ १८·८०४, तामस सुखाला उद्देशून.

**भिल्ल—भिलांचेनि पालिवर्णे** २·३६२, हें झोपडें अगदीं दरिद्रावस्था दाखविणारें व गलिच्छपणाचें निदर्शक होतें; हे लोक वाटमारी करीत, तो साभिलाष भिल्लांचा गांदो । ह्मणौनि न ये(नये) येथें जावों। तिया वाटा ॥ १८·६७१.

**म्लेंछ**—सर्वसाधारणपणें हलक्या दर्जाच्या अनाचारी लोकांस उद्देशून हा शब्द आला आहे. कोशांत **म्लेंछ** पहा.

**कैकट**—कोश पहा.

**चांडाल**—ही एक निकृष्ट 'दोषजात' होती. कोश पहा.

**जुगारी**—कोशांत जु–जुंवार पहा. **जुं खेळणें** १५·४४८; जुगारांत गेलेलें धन पुनः मिळावें म्हणून जुगारी १७·२९५ पुनः डाव खेळावयाला येई १३·५४०; याचें **टिंवर** असे १८·६७०.

**मातंग**—चोर, वाटमारी करणारे, ३·२३६; **मातंगसइन** डायलाचें १८·५४५; **बाटवचे** ७·१६९, १२·६१, १३·५४६ हाच धंदा करीत.

**चोर**—कोशांत **चोरणें** पुढें पहा. **संवचोर**, हा संभावित चोर आधीं मैत्री दाखवून घात करी, कोशांत **संवचोर** पहा.

**इतर लोक**—दास, दासी, ह्मणियारे—यांचे संदर्भ कोशांत दास, ह्मणणें या शब्दांपुढें पहा. **वेश्या** व **सामान्या** कोशांत पहा. सैन्यांतील शिपाई ७·११, **असिदार** ९·१७२; **करी–चातुरंग** १३·१५२, हें जरी महाभारत काळांतील सैन्य असलें तरी ग्रंथकर्त्याच्या काळींही राजाच्या पदरीं सैन्य हें होतेंच, रावो तेथ कटक । १८·१६१४, राजाचे अधिकारी असत ५·१४५, १८·७९२. **द्वारपाल, छत्री, बारी, चवरघर, हडप** या सर्वांचे उल्लेख १३·४१५ ते १३·४१८ मध्यें आले आहेत. **वाहाणधाराचा** उल्लेख आला आहे १३·११२७; **ठाणांतरिया**, हा पहारा करी, १६·३३८; **ठाणौरी**, हा शब्द युद्धांत कामास आलेला या अर्थी आला आहे, १८·४३६, १८·१०५५. इतर कांहीं धंदेवाईक लोकांचे उल्लेख आलेले नाहींत म्हणून ते त्याकाळीं नव्हते असें अनुमान काढणें चुकीचें होईल; सर्व धंद्यांचीं नांवें किंवा वर्णनें आलीं पाहिजेत अशीही अपेक्षा कोणी करणार नाहीं; प्रसंगोपात्त जीं रूपकें आलीं आहेत त्यांवरून कांहीं धंद्यांचे उल्लेख आले आहेत त्यांपैकीं कांहीं वरील सदरांत दिले आहेत.

# परिशिष्ट ८

## पशुपक्षी इत्यादि

(अ) **पशु**—पशु पक्षी शूकर । व्याघ्र वृश्चिक विखार । १५·१६९. पक्ष्यांसह आलेले पशूंचे कांहीं संदर्भ पशु शब्दांपुढें कोशांत पहा. पशुपक्ष्यांस उद्देशून **वनौकें** १८·१५२१, त्यांच्या पिलांस **पिलें—पीलें** व इतर जनावरांस योजलेले शब्द **गोरू, चतुष्पदादीक** १२·९३, **ढोर, प्राणियांसि** ४·२०१, **मृग** ३·२११, ११·४३०, १३·७३८, १४·१४७, **सावज, स्वापद** इ. कोशांत दिले आहेत. कांहीं विशिष्ट पशूंचे संदर्भ येथें दिले आहेत.

**उंट**—कन्हा. अशोकाचे आगसे। चघलिले कन्हेनि जैसे। ११·४०९, उंटानें अशोकाच्या डाहाळ्यांचे शेंडे चघळावे तसे हे सर्व वीर विश्वरूपाच्या तोंडांत शिरून भरडले गेले आहेत; **कन्हेयाचा गुडगा** १३·५५६, **-खांदु** १६·२९१, म्हातारपणांत सर्व शरीर सुरकुत्या पडून काळवंडून जातें त्यास उद्देशून.

**उंदिर**—एका कणा लागि उंदिरु। असिका उसपे डोंगरु। १८·६०४, अत्यंत परिश्रम करून अगदीं थोडी फलनिष्पत्ति झाली तरी त्याचें कांहीं न मानतां फलाशेनें सारखे श्रम करणाऱ्या राजसवृत्तीस उद्देशून; पैं सोनें चोरितां उंदिरु। न ह्मणे थरुविथरु। १८·५५१, (खाद्यपदार्थाला लागून असलेलें) सोनें चोरतांना उंदीर सोन्याच्या शुद्धाशुद्धतेकडे पहात नाहीं. **मूखक**—सांघ पां सर्पफणिची साउली। ते शीतल होईल केतुली। मूखकांसि॥ ५·११६.

**कासव**—देखैं कूर्मांचिया परी। उवाइला अवयव पसरी। नातरि इछावसें आवरी। आपणपां चि॥ २·३०९; **नाग कूर्म कृकरु**—इंद्रियांचे व्यापार सांगतांना पंचप्राणांपैकीं शेवटच्या समान वायूच्या क्रियाशक्तीचे जांभई, शिंक, ढेंकर हे व्यापार आहेत, ते नाग, कूर्म व कृकर या नांवांनीं निरनिराळ्या रूपांत दिसतात, १८·३३९; कूर्मी पिलांचें पोषण नजरेनेंच करते ह्या समजास उद्देशून —आगा मुखमेलेविण। पीलेयाचें पोखण। करी जेवि निरीक्षण। कूर्मिचें॥ १३·१४०, १३·२७६, १६·१६९, १८·१३३४; कासविएचेनि तूपें राया। अगरिलें॥१५·२१७, जर कासवीला दूधच नाहीं तर त्या दुधाचें तूप असणें हेंही शक्य नाहीं, अशक्य कोटींतील उदाहरण, यावर १५·२१२-२१८ पहा.

**कुत्रा**—श्वान, सुणें सूणा. ना तरि धेनु हे श्वान। एक उरुयें एक हीन। ५·९३, ज्ञानदेवी, कुंटे—हे धेनु हें श्वान ५·९४; जंव जंव श्वान बलिया वाढे। ९·५०६, यावर कोशांत **बलिली** पुढें **बलिया** (२) पहा, १३·५२०, १३·१०९९. **सुणें**—जैसें पोट पोसी सुणें। उघडें झांकलें न ह्मणे। १३·६७८; चव्हाळ्यावर ठेवलेल्या उताऱ्यांतलें अन्न कुत्रा खातो, तें कुत्र्याच्याच उपयोगी पडतें ९·४३५; नाठाळ कुत्र्याचे कान व शेंपूट कापलीं तरी त्या जखमा ओल्या असतांनाच खोड्या करावयाला कोडगेपणानें तें पुनः त्याच घरीं परत येतें १३·७२८; ज्ञानामुळें आलेलें वैराग्य टिकतें, नाहींतर धर्मार्थकाम टाकले तर ते—जैसें वमौनियां सुणें। आतां चि गेलें॥ १५·२३३, यासारखे होतील; सुन्या गांवांत सुणें १८·५४९. **सूणा—सूणें**—पारध्याबरोबर शिकार करण्यास उपयोगी पडणारे कुत्रे १६·३४३; **ग्रामकोल**—या ग्रामकोलाचां ठाइं। जैसा मिलणी(र्णी) ठाउ नाहिं। १३·६७९.

**कोल्हा**—सिंहां(हा)सि झोबे कोल्हा। २·१६, एवढें धैर्य कोल्हा कधींच दाखवूं शकणार नाहीं, अशक्य कोटींतील उदाहरण; कीं कोल्हेयां चंदनीं। आवडि उपजे॥ ४·२२, आवड उपजत नाहीं हा उद्देश; चंद्र देखौनि पोटीं। जले कोल्हा जैसा॥ १६·२३६, मत्सरी स्वभावास उद्देशून; जैसा अग्निचा वेगु कोल्हें। चंद्रीं मानी॥ १८·३८८, देह हाच आत्मा आहे या खोट्या समजुतीसाठीं दिलेला दाखला; शेतांत गवताच्या

बुजगावण्याला पाहून हा खरोखरी राखण करणारा आहे असें समजून कोल्हा भितो त्यास उद्देशून, १८·४३५.

**गाढव**—याला गर्दभ, खर, हे शब्द योजले आहेत. मृत्यु जैसा श्रिंगारिला। गर्दभु तीर्थिं न्हाणिला। १३·४६७. **खर व खरी**—गाढवी जवळ गाढव गेला व गाढवीनें त्याच्या नाकावर दुगाण्या झाडल्या तरी तिला तो सोडीत नाहीं, १३·७०४.

**गाय—गाइ**—गाइची तृषा हरुं। व्याघ्रा विष होउनि मारुं। १२·१४६, पाणी भूतमात्रिं येकपणाची मैत्री दाखवतें यास उद्देशून; दुभत्याच्या आशेनें गाईला चारा घालतात यास उद्देशून १७·२८४; गाय चांगली आहे व दूध देणारी आहे, पण दूध काढण्याची हातोटी आंगीं असेल तेव्हांच तिचें दूध मिळतें, जेव्हां शास्त्रसंप्रदाय पाळला जातो तेव्हांच गुरुशिष्यसंबंध फळतो, १८·१४७३–१४७४; गाई दोवाड सिंग। १८·१८५, शिंग मारते म्हणून गाय वाईट आहे असें समजूनये; गाईचें तोंड अपवित्र मानतात, पण तिला कोणी टाकत नाहीं १८·२०१. **गाए**—चिखलांत रुतलेली गाय दूध देते किंवा देत नाहीं म्हणून तिला काढावी किंवा तिला काढूं नये हा विचार सहृदय माणसाला येत नाहीं, तिच्या कष्टानें कष्टी होऊन तिला बाहेर काढणेंच योग्य आहे, अहिंसा या विषयावर दिलेल्या उदाहरणांपैकीं एक उदाहरण १६·१४१. **गाय**—कोठेंही चरत असली तरी तिचें मन वासराकडे असतें, ११·६२५, १३·४८५; दुभत्याच्या आशेनें लोक गाईला बांधतात, पण दोरावांचून वत्सावरचें प्रेम तिला कसें बांधतें, तें बंधन किती बळकट आहे तें पहा, ७·११७; अनन्यगति वासराचें प्रेम जितकें गाईवर असतें तितकेंच गाईचें वासरावर असतें ७·११९; वासरुं गाईजवळ गेलें तर पान्हा फुटायला वेळ लागत नाहीं, १८·८३, म्हणून वासराचा 'भोकसा' गाईपुढें ठेवून दूध काढतात १६·३८४; **गोरुं, पशु,** या शब्दांसाठीं कोश पहा. **धेनु**—५·९३, ११·४०, १८·७७, **कामधेनु,** कोशांत **काम** (१) पहा, **गुरु**– १३·३९६, **धर्म**–
१६·३२७. **खडाणा** १३·२०४; **खुरथोडी,** कोशांत **खुर** पहा; **माल्ड** १६·१४१, **भाकड** १३·६३६, **वोढाळ** १३·५५७ हेही संदर्भ गाईसंबंधीं आले आहेत. **गांवढणें,** गांवांतील गाई व म्हशी, १८·१७२.

**वासरुं**—याला पाडस, पाडा, वच्छ, वत्स, वांसरुं असे शब्द आढळले आहेत. **पाडस**—पाडसाला दोरानें बांधून ठेवतात, तो दोर कांहीं त्याला कुरतडून तोडतां येत नाहीं ७·९२. **पाडा**—११·१०९, ११·५७०; कामधेनूचा पाडा ८·८. **वछ**—परि वछाचेनि वोरसें। दुभतें होये घरा दोसें। १८·१४५७, वत्सावरील प्रेमानें मिळणारें गाईचें दूध जसें घरांतील सर्व माणसांना मिळतें तसें अर्जुनावर असलेल्या प्रेमामुळें गीतेचा लाभ सर्वांना झाला आहे, १८·१४५७. **वत्स**—तैसें हें गीतेचें दुभतें। वत्स करूनि पार्थातें। दुभिनली पुरतें। श्रीकृष्णु गाए ॥ १८·१६६७; वत्स घालेयां वरि। धेनु न वचावी दूरि। १८·७७, असें वासराला वाटत असतें; गुरुधेनु आपण पाठिं। वत्स होए ॥ १३·३९६; कासेपासून वासराला ओढत असतांना वासराला दुःख सहन करावें लागतें, १८·७८२, सात्विक सुखावर १८·७७५–७९० पहा. **वत्सू**—सांजवणीसाठीं वासरुं पळत सुटतें १८·४७८; वासरुं पाहून गाय मोहानें 'खडपडौनि उठी', मग तिला फुटलेला पान्हा तिला आवरतां येत नाहीं, ११·४०, १८·८३; **वांसरुं**—वासराचा भोकसा गाईपुढें ठेवून दूध काढतात १६·३८४, हा संदर्भ वर आला आहे; वांसरुवां साठिं लाविलें। विरिंची पिंसें ॥ १०·२६७, परिशिष्ट (६) **ब्रह्मा** पुढें **विरिंची** पहा.

**घोडा**—याला **अश्व, घोडा, तुरंग, तुरंगम, वारु** व **वारुक** हे शब्द ग्रंथांत आढळले आहेत. जेथ गरुडाचिये जावलिचे। कांतले च्यान्ही ॥ १·१३८, असे घोडे हांकण्यासाठीं—आणि रथिचिये राहाटी। घेइजे घोडेयां साठीं। १८·१५६५, स्वतः श्रीकृष्ण **अश्ववाहक** झाला १·१४०; **मांदुरी लोकांचा घोडा** १६·२२३; किं हरिचे हे तुरंग। गीतारथिचे॥ १८·१६५३; **रूपकांत—योगतुरंग** १८·१०७०, **राजयोगतुरंग**

१८·१०४१, तुरंगमां प्रसिद्धां । माझि उच्चैश्रवा तो मीं ॥ १०·२१७, धारणावारू ९·२१५, वारूक ११·६३२, असे शब्द आले आहेत.

**बैल**—याला बैल, वसो वृष, व वृषभ हे शब्द ग्रंथांत आढळले आहेत. बैलु वीकूनि कोठा । १३·२३३; नातरि बैला वरि शास्त्र । बांधलें असे ॥ १३·५३१, हें उदाहरण दिसतें तितकें हसण्यासारखें नाहीं, आपल्या पाठीवर शास्त्रपोथ्या लादल्या आहेत ही जाणीव बैलाला नसते, तसेंच अहंकारही नसतो यास उद्देशून हें उदाहरण आलें आहे; बैलाची करी वानी । पांगुळाचेया ॥ १४·१५७, आपल्या नंदीबैलाला दावें लावून जसा पांगळा त्याच्यावर बसतो तसा सुख व ज्ञान यांचें दावें जिवाला लावून सत्वगुण आरूढ होतो; बैलासि कडवाडें १४·२३८, लग्नांत सुद्धां बैलाच्या नशिबीं हेंच; बैला तलिं वर्त्तलें । पोसणें जैसें ॥ १८·६६५, गोचिडास उद्देशून. **इंद्रियबैलांची पेटी** १३·३०. **वसो**—वसो जैसा मोकट्ठु । १३·६९६; वसू वाघाच्या अरण्यांत गेला व चरून सुरक्षित परत आला तर त्यावरून वाघाच्या अरण्यांत बैल सुरक्षित चरतात हें तात्पर्य काढणें चुकीचें होईल, हें एक अज्ञानाचें चिन्ह आहे, १३·७६२; वसोवा घातला चारु, १७·२८०, फुकट जातो. **वृषभ**—वृषभु घेउनि दीधलें । कामधेनूतें ॥ ११·५३१, मूर्खपणाचें उदाहरण; वृषगजीं वेढिला । केला राउ ॥ १४·३५९, त्याला सरंजामाकरतां बैल व हत्ती दिले किंवा त्याला राज्यपदावर बसविलें तरी तो भाळून जात नाहीं, प्रकृति हें घडवते म्हणून तो अलिप्त राहतो, हा हेतु.

**माकड**—पालेखाइर, माकड, मांकड, मर्कट व वानर हीं नांवें ग्रंथांत आढळलीं. **रानिचेयां पालेखाइरां** करून रावणाचा पराभव करविला यास उद्देशून, ११·२३. **माकड**—मग जें काहिं ते पढिनले । तें माकडें नारियल तोडिलें । ९·१७५, आसुरी वृत्तीच्या माणसाच्या शास्त्राभ्यासावर हें एक उदाहरण आहे; **मांकड**—पिंडु गरुवा मांकडु । होईल हा ॥ १३·५६७, म्हातारपणीं होणाऱ्या अवस्थेस उद्देशून. **मर्कट**—कां माजवणदान मर्कटा । ३·९, माकड आधींच चंचल वृत्तीचें, त्यांत त्याला मादक पदार्थ पाजल्यावर त्याच्या होणाऱ्या अवस्थेस उद्देशून; हाणोनि ऐसें कैं घडैल । जें मर्कटा समाधि एईल । ६·४१२, चंचलवृत्ति असलेल्या माणसाला मन ताब्यांत ठेवणें अशक्य कसें असतें याचें उदाहरण; तसेंच—जो चांचल्यें भावंड । मर्कटाचें ॥ १३·६९०; मर्कट गारुडियाचें, स्त्रीलंपटास उद्देशून, १३·७९१. **वानर**—ध्वजेवरि वानरु । १·१४१, अर्जुनाच्या रथावर शंकर मारुतीरूपानें बसला होता त्यास उद्देशून.

**मांजर**—हा शब्द ग्रंथांत आढळला नाहीं. भाटीस लांसि शब्द आला आहे; भाटी आपल्या पिलांना दांतांनीं उचलते पण तिच्या दांतांचें एक टोंकही पिलांना खुपत नाहीं—पैं मोहाचेनि सांगडें । लांसि पीलें धरी तोंडें । तेथ दातांचें आगरडें । जैसें लागे ॥ १३·२५१.

**मेंढा**—चामुंडेला मेंढे व रेडे यांचे बळी देत, यावर—प्राणशक्ती चामुंडे । प्रहारुनि संकल्पमेंढे । मनोह्यैपाचेनि मुंडें । बलि दीन्हली ॥ १२·५३.

**म्हैस**—ह्यैष, ह्यैसा, ह्यैंसि हे शब्द रेडा व म्हैस यांना योजले आहेत. मनोह्यैपाचेनि मुंडें । १२·५३, वर **मेंढा** पहा; गीतेंतील १३·११ श्लोकांतील 'अज्ञानं यदतोन्यथा' यावर टीका करतांना—कां आडवोहला पाणी आलें । ह्यैसेया(यां)चें जूझ मातलें । तैसें तारुण्याचें चढलें । भुररें जेया ॥ १३·७५४, पावसाळ्यांत ओहळांना पूर येतो पण तो जसा फार दिवस रहात नाहीं किंवा रेडे उन्मत्तपणानें झगडतात पण जसे लगेच थकतात तसेंच तारुण्याचें आहे; गीतेंतील नवव्या अध्यायाच्या शेवटच्या 'मन्मना भव' या श्लोकाचा अर्थ सांगितल्यावरही धृतराष्ट्राच्या मनावर कांहींच परिणाम झाला नाहीं हें पाहून—अहो आइकत असा अवधारा । तंव एया बोला निवातु ह्यांतारा । जैसी ह्यैसी नुठी कां पुरा । तैसा उगला चि असे ॥ ९·५१७, संजय एक सांगत असतांना याचें मन दुसरीकडेच होतें, ९·५१८ पहा; तरि कुहिलें उसिटें खातां । न मनी काहिं अनहिता । का

साजुका नासका । हंसि जैसी ॥ १७·१५३, तामसांच्या किळसवाण्या आहारास उद्देशून.

**लांडगा**—याला वृक शब्द आढळला. तें व्याघ्र वृक अडवे । तैसियां करिं ॥ १६·४०६, पाप्यांना हिंस्र पशूंच्या योनींत ईश्वर जन्माला घालतो.

**वाघ**—हा व व्याघ्र हे शब्द या हिंस्रपशूकरतां आले आहेत. वाघ—१४·३५५, १८·१०५०; वाघाचिये अडवे १३·७६२,—खोंपे १८·७०९; विषयरानिंचे वाघ, कामक्रोधांस उद्देशून, ३·२३६. व्याघ्र—व्याघ्राचें छत्र ८·१४४, कधीं-ही सुखकारक होणार नाहीं; गाइची तृषा हरुं । व्याघ्रा विष होउनि मारुं । १२·१४६, हा भेद पाणी ठेवीत नाहीं; गजबजों लागे कैसा । व्याघ्रें रुंधला मृगु जैसा । १३·१८६, गीतेंतील १३·७ 'अमानित्वमदंभित्वमहिंसा' या श्लोकावर टीका करतांना हा एक अमानित्वाचा दाखला दिला आहे, आपलें गौरवपर वर्णन ऐकल्यावर वाघानें अडवलेल्या हरणासारखी ज्ञानी माणसाची स्थिति होते, येथें 'व्याघ्रें' ऐवजीं ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'व्याधें' १३·१८७ पाठ आला आहे, तो संदर्भांत अधिक चांगला बसतो; **व्याघ्र वृक** १६·४०६, वर **लांडगा** पहा; **व्याघ्रादि तामसा योनि** १६·४१३; चांगलें अन्न मिळालें तरी तें शिळें होऊन त्याला घाण सुटेपर्यंत वाघ थांबतो यास उद्देशून, १७·१५७; इंद्रियांचें कौतुक पुरवून तीं वश होतील ही आशा करणें म्हणजे **व्याघ्रसंगु सिद्धि जाईल** ३·१९९, असें होईल; **व्याघ्रसर्पें** १२·१११, चांगदेव वाघावर बसून सर्पाचा चाबूक हातांत घेऊन आले होते या कथानकाशीं याचा संबंध जोडण्यांत येतो.

**शेळी**—**अजा** व **सेलि** हे शब्द शेळीस योजिले आहेत. कां गळां स्तन अजेचे । तैसें जियालें देख तेयाचें । ३·१४२. **सेलि** ९·१७३, १८·५७४; मन सेलियेचेनि तोंडें । सैघ चारी ॥ १४·२२७, १६·२८६; कां आयुष्य जांतिये वेळे । सेलिए सातवेउली मिळे । तैसे साई दोष सगळे । जोडति तेथें ॥ १६·२५७, ज्याचा नाशकाळ जवळ येतो त्याला आसुरी संपत्तीचे सहाही दोष (गीता १६·४) बाधतात.

**ससा**—ग्रंथांत याला शश शब्द आला आहे. शशांक, चंद्र, १६·११४; शशिविषाण, सशाला शिंग नसतें, अशक्य कोटींतील उदाहरण, १५·२१३.

**सिंह**—याला केसरी, पंचानन, शार्दूल, सिंह, सींह, सिंहाडा हे शब्द ग्रंथांत आढळले. **केसरी**—कलुषकरिकेसरी १७·४२०, कोशांत कलुष पहा; संसारगजकेसरी १०·२५७. **पंचानन**—जसा सिंह हत्तीच्या कळपाची पर्वा करीत नाहीं, तशाच प्रकारें दुर्योधनानें पांडवसैन्याची पर्वा केली नाहीं १·९२; जीवपंचानन १३·१०६४, रिपुगज—, कर्णास उद्देशून, १·१०५. **शार्दूल**—श्वापदां आंतु शार्दूल । तो माझें चि रूप ॥ १०·२२८, सर्व श्वापदांचा राजा सिंह यास उद्देशून. **सिंह**—(जंगलांतील) वाटेंत सिंह दिसला तर त्याला चुकविण्यांतच हित आहे १·२३७; सिंहाची गर्जना म्हणजे हत्तीचा युगांत २·२१५; सिंहाची गर्जना ऐकून उचललेलें पाऊल हत्ती पुढें टाकीत नाहीं १८·७३३; राजा पराधीन झाला म्हणजे, सिंहु रोगें रुंधला । १३·१००६, अशी अवस्था होते; सिंहाला मदतीसाठीं सोबत्यांची आवश्यकता भासत नाहीं, कां सिंहें न पाहिजे । जावळिया ॥ १८·८५३; आपलेंच प्रतिबिंब पाण्यांत पाहून हा आपला प्रतिस्पर्धी आहे असा समज करून घेऊन त्याला मारण्या-साठीं पाण्यांत उडी घालणाऱ्या सिंहाच्या गोष्टीचे संदर्भ :— ९·१४८, ११·५५, १५·४५४; कैं नाकिचा केंसु जोडे । सिंहाचिये ॥ १७·२४, तक्षकाच्या फण्यावरचा मणि घ्यावा व तो सिंहाच्या नाकांतील अत्यंत दुर्लभ अशा केंसांत ओवावा तरच गळ्यांत दागिना घालावा नाहीं-तर काय मोकळ्या गळ्यानेंच फिरावें? हा दाखला अर्जुनानें विचारलेल्या शास्त्रांबद्दलच्या प्रश्नावर आला आहे, त्यावर १७·२२–२९ पहा. **सिंहाडे**—उफाडति दरिये माझि सिंहाडे । तैसे दांत दीसति रागीट ॥ ११·३३९, विश्व-रूपास उद्देशून; **चित्रिंचे सिंहाडे**, दिसायला भयंकर दिसले तरी त्यांचें भय कसलें? ते सहज हातानें पुसून टाकतां येतील, ११·४६९; **सिंहाडेयाचा दरकुटा**, सिंहाच्या गुहेस उद्देशून,

१३·६०. **सींह**—जैसा सींहु गजघंटा आंतु। संचरे लीला विदारतु। तैसा हृदयातें भेदितु। वीरांचियां॥ १·१६२, पांडववीरांनीं वाजविलेल्या शंखांचा ध्वनि ऐकून कौरवसैन्याच्या झालेल्या स्थितीस उद्देशून.

**हत्ती**—ईभ, कुंजर, कुंजरी, गज, भद्रजाति, मदमुख, हातिरुं व हाथि हे शब्द हत्तीसाठीं ग्रंथांत आलेले आढळले. **ईभ-मस्तकावरि** १·१७, **भवेभकुंभभंजन** १०·५, कोशांत इभ पहा. **कुंजर**—नातरि जालें आंगधुणें। कुंजराचें॥ १३·२३२, आंग धुऊन झाल्यावर पुनः चिखलाचें पाणी हत्ती आंगावर उडवून घेतो यास उद्देशून; मातलेया कुंजरा। आगली जाली मदिरा। १६·३२३, आधींच हत्तीला माज यावा व त्यावर त्याला दारू पाजावी मग मस्तीला पारावार उरत नाहीं; **कुंजरी**—कां लवणाची कुंजरी। सूदली साती सागरीं। १५·२८६, मिठाची हत्तीण बनवून समुद्रांत घातली तर ती विरघळून जाईल व पुनः हातीं लागणार नाहीं, १५·६ या मूळश्लोकावरील टीकेंत हें रूपक आलें आहे, यावर १५·२७९–२८६ पहा. **गज**—हा मशकु हा गजु। ५·९२, अगदीं क्षुद्रप्राणी व फार मोठा प्राणी यांच्यांतील हा भेद दाखविणारें उदाहरण; **गजघंटा**, हत्तीचे कळप किंवा चिलटें क्षीरसमुद्राजवळ पाण्याकरतां गेलीं असतां क्षीरसमुद्र त्यांना पाणी पुरविणार नाहीं काय? १८·१६९०; **गजपति**, ऐरावत, १६·२२३, यावर परिशिष्ट ७ (ई) मांदुरी पहा; **आकारगज**—निहाला पां केवडा। पसरूनियां चवडा। करितसे माजिवडा। आकारगजु॥ १३·६५, हत्तीरूपी अवाढव्य चराचर सृष्टीला आपल्या चवड्यांत धरणारा सिंहरूपी काळ केवढा जबरदस्त आहे तें पहा, काळाची सत्ता दाखविणारें उदाहरण; **दिग्गजमेळावे, अष्ट दिग्गज**, सं. वा. श. पहा; **वृषगज**, राजवैभवांतील सरंजामास उद्देशून, १४·३५९; इतर गजाचे संदर्भ **गज** पुढें कोशांत पहा. **भद्रजाति**, उत्तम हत्ती, १·१३४. **मदमुख**, हत्ती कितीही मदांध झालेला असला तरि सिंहाच्या हांकेसरसा तो गर्भगळित होतो २·२१५, व उचललेलें पाऊल पुढें टाकीत नाहीं १८·७३३; **मदमुखांचिया घटा** ११·३८९. **हातिरुं**—सावजें हातिरुं धरिलें, मगरानें गजेंद्राचा पाय धरला व त्यानें धांवा केल्यावर विष्णूनें त्यास सोडविलें यास उद्देशून ९·४३८; **आंधळें हातिरुं मातलें** १३·६९७, मग तें सैरावरा पळतें यास उद्देशून. **हाथि**—हाथि हाला फुलिं। पासिवणें जेवि न घली। १३·४९५, फुलांच्या मारानें हत्तीवर कांहींच परिणाम होत नाहीं.

**हरण**—मृग, हरिण व हरिणि हे शब्द या जनावरास योजलेले आढळले. **मृग**—हरण व इतर पारध या अर्थी कोशांत **मृग** (१) पहा. **हरिण**—कां पाडिवां वाढि न मगे। अंवसा तूटि सांडूनि मागे। माझि हरिणु चंद्र आंगें। जैसा राहे॥ १६·७४, यावर कोशांत **तुटणें–तूटणें** पुढें **तूटि** पहा; **हरिणिकुटी** १३·१०६४, कोशांत **कुटी** (१) पहा.

**(आ) पक्षी**—कोशांत **आंविसालें, खंग, पक्ष–क्षी** (३,४), **पाख–पांख** व त्यांपुढें **पाखिरुं–पांखिरुं** वर **पशु** शब्दापुढें **पिलें–पीलें, वनौकें** इत्यादि संदर्भ पहा. **अजातपक्ष** ९·३३५–३३६, ११·६२४, **पक्षिया फलासि झोंबे जैसा** ३·४१, **पक्षियें फल चुंबिजे** ५·१३०; **विहंग** १२·१८१, **विहंगममतें** ३·४३, **संकल्पविहंग** ८·३३; **वेदपक्ष** १५·१८६, **चक्षुपक्षिं विण पीलुं** १३·३९९; **जीवपक्षी** १६·३, **पक्षिणी** ११·६२४, **गुरुतें पक्षिणी करी** १३·४००; इत्यादि संदर्भ पक्ष्यांसंबंधीं आले आहेत. कांहीं विशिष्ट पक्ष्यांचे संदर्भ येथें दिले आहेत.

**कावळा**—काउला, काग व वायस हे शब्द या पक्ष्याकरतां ग्रंथांत आढळले. **काउला**—पैं चंद्रोदया आरौते। जेयांचे डोळे फूटति असते। ते काउले केवि चंद्रातें। ओळखति॥ ४·२३, ज्ञानदेवी, कुंटे – 'आरौतें' ४·२४; नींबु नींबोळीं मोडौनि आला। तरि काउलेयांसि सुकाळु जाला। तैसा भक्तिहीनु वाढिनला। दोषां चि लागि॥ ९·४३४; विपायें घुणाक्षर उमडे। टालिये काउला सांपडे। तैसें तामसा पर्व पडे।

पुण्यदेशीं ॥ १७·२९९, चुकून काकतालीय न्यायानें कावळा टाळींत सांपडावा तेव्हां तामसी पुण्यकृत्य करतो, फारच विरळा या अर्थी; आगा वांती वाढलेया। साजुका कां सडिलेया। विवेकु काउलेया। नाहिं जैसा॥ १८·५५३, वांती होऊन पडलेलें किंवा मुद्दाम बळी म्हणून वाढलेलें चांगलें किंवा कुजलेलें या सर्व प्रकारच्या भक्ष्या-भक्ष्याचा विचार कावळा करीत नाहीं, सरसकट सर्व खातो. **काग—मृत्युकागासि कुरोंडी**, देहास उद्देशून, ८·१३८. **वायस—**चंद्रोदय कावळयांच्या उपयोगी पडत नाहीं ३·१९५; जैसा वायसीं चंद्रु नोलखिजे। तैसा प्राकृतीं ग्रंथु हा नेणिजे। ६·२९; कावळयाला एकच बुबुळ असतें व तो तें प्रसंगानुसार दोन्ही डोळयांत फिरवतो या समजास उद्देशून, वायसा एकें बुबुळें दोहिं कडे। डोला चालितां अपाडें। दोन्हि आथि ऐसा पडे। भ्रमु जेवि॥ १५·१३४; **चोखि होईल वायसा**, कावळा पांढरा होऊं शकत नाहीं या अर्थी, १६·२८३; पैं द्राक्षरस कां उसा। वेले तोंड सडे वायसा। १८·६७९, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील 'उसा' ऐवजीं 'आम्ररसा' १८·६८२ हा पाठ अधिक ग्राह्य वाटतो; कावळा वृद्ध असला तरी त्याला यज्ञावशेष घालीत नाहींत. १८·१४७८.

**कोकिळ—कोकिल.** एकाद्या बागेला मोठी आग लागली तर जसा कोकिळ क्षणभरही तेथें रहात नाहीं, तसा गोत्रवधाचा ताप सहन करवत नाहीं १·२३०; योगसाधनेसाठीं निवडलेल्या जागीं एकादेवेळीं कोकिळ येऊन बसला तरी चालेल ६·१७७; योगभ्रष्ट हे संतोषवनांतील कोकिळच आहेत ६·४४८; कृष्णाला कोकिळ व अर्जुनाला वसंत ऋतूचें रूपक दिलें आहे, वसंतऋतूंत कोकिळाला कंठ फुटतो यास उद्देशून, ११·११३, यावर १८·१५०९ पहा.

**गरुड—**परिशिष्ट ६ पहा. **गरुडाचिये जावलिचे**, अर्जुनाच्या रथाचे घोडे गरुडासारखे वेगवान होते १·१३८; जैसे पर्वत वज्रातें। ना तरि सर्प गरुडातें। तैसे अर्जुना हे तूतें। मानिति सदा॥ २·२१६, १५·२६५ पहा; **आंधलेया गरुडाचे पांख** ९·३०३, या पंखांत उडण्याचें कितीहि सामर्थ्य असलें तरी तें निरुपयोगीच होतें; अत्यंत भक्तीनें एक पानच अर्पण करणारानें मला—गरुडा सारिखीं वाहनें। सुरतरूचीं उद्यानें। कामधेनूचीं गोधनें। अर्पिलीं तेणें॥ ९·३८८; पक्ष्यांत गरुड ही ईश्वरविभूति सांगितली आहे १०·२२९; गरुड सदा सेवेस तत्पर असूनही विश्वरूपाबद्दल विचारूं शकत नाहीं ११·३३; हा नेहमीं विष्णूच्या सेवेस हजर असतो ११·१६७, १३·३९३; नुकतेच पंख फुटलेलें पांखरूं आकाशांत उडतें व गरुडही आकाशांत भराऱ्या मारतो, आकाश दोघांना सारखाच वाव देतें यास उद्देशून १८·१६९१; विष्णूचें वाहन व साधा गरुड पक्षी यांत फारसा भेद केलेला कांहीं संदर्भात दिसून येत नाहीं.

**गिधाड—**गिध, मृत जनावरांचें व माणसांचें मांस खाणारा पक्षी. ना तरि अरण्यीं शव सांडिजे। तें चौखेरि(रिं) गिधिं विदारिजे। २·२००; **आपदागिध** ७·८४.

**घुबड—**या पक्ष्याला डुडुल शब्द योजला आहे. याला अंधारांत दिसतें १४·२४८; इतकेंच नव्हे तर तें रात्रीला दिवस मानतें १८·३८२; सूर्यप्रकाश याला पहावत नाहीं—विश्वाचें आयुष्य सगळें। सूर्यु उदैला देखौनि सवले। पापियां फूटति डोले। डुडुलांचे॥ १६·२३७, पहिल्या दोन चरणांत क्रियापद नाहीं, म्हणून ज्ञानदेवी व कुंटे प्रतींतील 'सगळें' ऐवजीं 'उजळे' १६·२३९ पाठ ग्राह्य वाटतो; कां डोले फूटति दिवसा। डुडुलांचें(चे)॥ १८·६७९.

**चकोर—**पाणी, चंद्र व चांदणें यांची अत्यंत आवड असलेला पक्षी असा याचा उल्लेख अनेक ठिकाणीं आला आहे. कां सकर्दमु सरोवरू। अवलोकुनिया(यां) चकोरु। न सेवितु अव्हेरु। करुनि निगे॥ १·२३१; कुमुददलाच्या ताटांत शुद्ध चंद्रकिरणें जेवणारा चकोर वाळवंटांतील दगड चाटीत बसेल काय? ५·१०६; हिमांशु हा चकोरांचें खाजें आहे ६·२९; चोंच उघडून चकोर चंद्राकडे पाहतात ९·२३३, १३·३२५; तरि चंद्रबिंबौनि धारा। सूटति नव्हंति गोचरा। परि एकसरिं चकोरां। निगति दोंदें॥ १३·२७५; पूर्णचंद्राची रात्र एक युगाएवढी असली तरी पहाट व्हावी असें

चकोराला वाटेल काय? १३·६४०; चकोर नाहीं म्हणून चांदणें नसतें कीं काय? ९·२३२; चकोरां कोंवळुल फावलें ११·९६, म्हणून इतरांना तें घेऊं नका असें चंद्रानें शपथ घालून सांगितलें आहे काय? चंद्रामुळें समुद्राला भरती येते, सोमकांत पाझरतो, त्याचप्रमाणें चंद्रविकाशी कमळांचा व चकोरांचा संकोच नाहींसा होतो, १८·१३०४; चंद्र उदयाला आला कीं जन्माचें सार्थक झालें असें चकोराला वाटतें १८·१५१०; उदयाला येऊन चकोराच्या निमित्तानें कां होईना पण तापलेलीं तीन्ही भुवनें चंद्र निववतो १८·१६६६; चंद्राच्या चांदण्याचा उपभोग घेऊन चकोर तर शहाणा ठरलाच, तेंच चांदणें इतरांना आनंद देणार नाहीं काय? १८·१७२७; चतुरचकोरचंद्र १०·४, कोशांत चतुर पहा; जैसें शारदियेचिये चंद्रकळे। माजि अमृतकण कोवळे। ते वेंचिति मनें मौआळें। चकोरतलगें (गें)॥ १·५६, त्याचप्रमाणें गीतामृत श्रोत्यांनीं सेवन करावें.

**चातक**—याला चातक, बापिया, बापैया हे शब्द ग्रंथांत आढळले. हा पक्षी मेघाची वाट पहातो. पावसाचें पाणी याला फार आवडतें. **चातक**—पृथिवी निवौनि सागर। भरिजति एवडे थोर। वरिषे तेथ मिषांतर। चातकु कीजे॥ १८·१३६८, गीता सांगण्यासाठीं अर्जुनाचें निमित्त जरी असलें तरी जगांतील सर्वांना त्या ज्ञानाचा लाभ मिळाला हा भावार्थ; याच अर्थी—चातकाचिये कणवे। मेघु पाणियेंसिं धांवे। तेथ चराचर आघवें। निवालें जेवि॥ १८·१४५८; मेघ आपल्या उदारपणानें वर्षाव करून सर्व जगाचा ताप नाहींसा करतो, त्या वर्षावाच्या मानानें चातकाची तहान ती केवढी? ९·२३४; पाहा पां भरोवरी आघवी। मेघु चातकासि रिचवी। १५·२०; हा पक्षी आशेनें मेघासाठीं आकाशाकडे पहात राहतो—चातक निरालीं। लागलें जैसें॥ ११·६६९. **बापिया**—शांतरस वर्षणारी गीतेवरील ही टीका माझ्यासारख्या आर्त चातकाची तृषा हरण करील १८·१७४०-१७४१. **बापैया**—जैं मेघौनि थेंबटा पडे। तैं पारणें तेया॥ १०·१६७; बापैयाच्या तहानेकरतां मेघ वर्षतो तो सर्व जगाकरतां ही असतो ११·९५; आकाश वाहे बापैया। घरिचें पाणी॥ १८·१३३४.

**टिटवी**—टिटिभ, टिटिभुं हे शब्द या लहान पक्ष्याकरतां आले आहेत. **टिटिभ**—या पक्ष्याला मोठ्यांशीं अहंभावानें मत्सर करून कसें चालेल? —टिटिभें अशांपती। वैरी केला॥ १६·२३२, असें करणें हास्यास्पद होईल, **टिटिभुं**, याला आपल्या लहानशा चोंचेनें कितीसें पाणी भरतां येईल?—कां टिटिभुं चांचुवेन्हीं। माप सुये सागरीं। १·६८.

**पारवा**—पारिवा, पारिवी, असे शब्द ग्रंथांत आले आहेत. एकदम भरारी मारणारा पक्षी. पैं पारिवा जैसा किरीटी। चढला नभाचिये पोटीं। पारिवी देखौनि लोटी। आंग सगलें॥ १८·४८०, आकाशांत भरारी मारत असलेला पारवा पारवीला पाहून एकदम उत्साहानें आपलें सर्व आंग तिच्याकडे लोटतो, ज्ञाता किती उत्सुकतेनें ज्ञेय गांठतो याचा दाखला.

**पोपट**—याला पूंस, राउव व शुक हे शब्द योजले आहेत. **पूंस**—आहो पूंसा आपण चि पढविजे। मग बोले तंव तंव माथा तूकिजे। ११·१७; बैलु वीकूनि कोठा। पूंस लाउनि गांठा। इयें करणी(णीं) कीं चेष्टा। कायि हांसों॥ १३·२३३; पिंजऱ्यांतलें बंधन टाकणें इष्ट नाहीं म्हणून पोपट पिंजऱ्यांतच बसतो, वेदाज्ञा बंधनकारक असली तरी ती पाळणेंच इष्ट आहे यावर हें उदाहरण पहा १३·५९७; पाहे पां बंधनभावना दृढा। नलिये वरि तो बापुडा। काइ मोकलां हिं चवडां। न ठके चि पूंसा॥ १८·३९०. **राउव**—पोपटाला राघोबा या नांवानें साद घालणाऱ्या गणिकेला मोक्ष मिळाला त्यास उद्देशून, ११·१०७, कोशांत **बोलवणें** पहा. **शुक**—शुक हान षट्पद। तेयांचे नाहीं॥ ६·१७६, योगसाधनेच्या स्थानीं हे नसावे; **शुकनलिकान्याय** १३·११३१, कोशांत **नलि** पुढें **नलिका** पहा, त्यावरून या संदर्भाचा, ६·७६–७८ ओव्यांचा व वरील १८·३९० ओवीचा अर्थ उघड होईल; नलिकेवरून उडून पोपट झाडाच्या फांदीवर जसा बसतो तसा

देहअहंता टाकून गुणातीत ब्रह्मरूप होतो, यास उद्देशून १४·३०० पहा.

**बगळा**—बक शब्द योजला आहे. तुह्मीं बकाकरवि चांदिणें। चरों पाहा॥ ११·१५६, 'पाहां' पाठ ग्राह्य वाटतो, बगळ्याला चांदण्याची काय गोडी असणार? ती चकोरच जाणतो; वेगें आणि लेसां। दीठि घालूनि आविसा। जळिं बकु जैसा। सोंद॥ १३·२४६, मासा धरण्यासाठीं बगळा पाण्यांत पाय घालतो, कोशांत सोजणें पहा, मीनातें देखौनि बकु जसा झगपतो १८·४७७; बकु जैसा खुतला। मासेयांसि॥ १८·६५१; पाणी व दूध यांचें मिश्रण बगळा विभागूं शकत नाहीं १८·७१५, हें हंसच करूं शकतो.

**मोर**—मयूर व मोर हे शब्द या पक्ष्याकरतां ग्रंथांत आढळले. मयूर—योगसाधनेच्या स्थानीं—हांतु कां मयूरें हीं। तें आम्हीं(ह्मीं) न म्ह(ह्म)णों॥ ६·१७८, आम्ही नाहीं म्हणणार नाहीं; मेघें संबोखिला। मयूरु जैसा॥ १४·३१७, मेघानें साद घातलेल्या मोराला जसा आनंद होतो तसा, मेघ ही मोरांच्या सादेला वो देतो १८·१५१०. मोर—मोराचां आंगिं असोसें। पिसें आहाति डोलसें। आणि एकली दीठि नसे। तैसें तें गा॥ १३·८३३, अध्यात्मज्ञानावांचून इतर ज्ञान कसें निरुपयोगी असतें त्याचा हा एक उत्तम दाखला आहे; मेघगर्जना ऐकून मोर जसा आकाशांत कौतुकानें उडतो तसा ज्ञेयाला पाहून ज्ञाता धांव घेतो १८·४८१.

**ससाणा**—बहिरी ससाण्याला ससाणा हा शब्द अनेकवचनाच्या रूपांत ससाणे असा एकाच ठिकाणीं आढळला; दुसऱ्या संदर्भांत ससाणे हा सणाणे(णें)चा अपपाठ आहे, त्यासाठीं कोशांत सणाण पहा. पारधी डोंगरावर शिकारीसाठीं—पाशिकें पोतीं वागुरा। सूणें ससाणे काठी सोंचारा। १६·३४३, बरोबर घेऊन निघतात.

**सारस**—चक्रवाक पक्षी. योगसाधनेच्या स्थानीं—पाणिलगें हंसें। दोनि च्यारि सारसें। ६·१७७, फार नाहीं दोन चार सारस पक्षी असले तरी चालतील या अर्थी; तें सारसां हिं विघडतां। वोहांहूनि वत्स काढितां। १८·७८२, जें दुःख होतें तें वैराग्यशाली पुरुषांना भोगावें लागतें; सारस पक्षी प्रेमानें जोडप्यानें राहतात, त्यांना विरह सहन होत नाहीं या अर्थी—चक्रवाकांचिया अळांकडीं। भेदनदीचां दोहीं थडीं। अरडातें विरहवेडीं। बुद्धि बोधीं॥ १६·५, भेदरूपी नदीच्या दोन कांठांवर, द्वैतातील विसंगत-पणाच्या अडचणींत बुद्धि व बोध हे चक्र-वाकपक्षी ओरडतात, 'बुद्धि बोधीं' या पाठाचा खुलासा कोशांत बोधें पुढें केला आहे.

**हंस**—हंस व राजहंस हे शब्द या पक्ष्याकरतां ग्रंथांत आढळले. या पक्ष्यांत फारसा भेद केलेला दिसून आला नाहीं. दोन्ही प्रकारच्या पक्ष्यांच्या आंगीं तेच गुण वर्णिले आहेत; राजहंस अधिक चांगला, उच्च दर्जाचा हंस असावा, याचें चालणें अधिक ऐटदार व सुबक असावें. या दोन्ही प्रकारच्या पक्ष्यांच्या आंगीं दूध व पाणी यांचें मिश्रण निरनिराळें करण्याचा गुण सांगितला आहे. हे पक्षी रत्नें-ही खातात. हंस व राजहंस—पाणिलगें हंसें। ६·१७७, वर सारस पहा; जैसें नक्षत्राचेया आभासा। साठिं घातु केला तेया हंसा। माझि रत्नबुद्धिचिया आशा। लगौनियां॥ ९·१४५, पाण्यांत पडलेल्या नक्षत्राच्या प्रतिबिंबास रत्न समजून हंस चोंच मारतो पण पाण्यांतील दगडावर चोंच आपटते, यावर १८·७९५ पहा; शेवाळ असलेलें पाणी निवळेल म्हणून हंस वाट पहात नाहीं १३·३२४; क्षीरानिराचे झगडे राजहंस तोडतो १४·२०५; तरि सूदली दूधीं हंसें। चांचु जैसी॥ १६·१०८, दूध व पाणी निरनिराळीं करण्याकरतां; याच प्रमाणें देह व आत्मा यांनला भेद पहाणारा आत्मानात्म-विचार ज्ञानी जागृत ठेवतो १६·१०९, तसेंच उपाधींत चैतन्य गुप्तपणें असतें तें विचारपर संत जाणतात २·१२६–१२७; आत्मानात्म-वेवस्था-राजहंस १३·११३७, हे सत्पुरुष अनात्मवर्गाचें पाणी टाकून आत्मरसाचें क्षीर घेतात १५·२६६; जैसा कर्दमीं रुतला। राजहंसु॥ २·४, अर्जुनास उद्देशून; राजहंसाचें चालणें। भूतळिं चालावें कवणें। तरि आणिकिं ही कुंटेपणें। चालावें लागे॥ १८·१६९२.

## इ) इतर कृमिकीटकादि

**इंगळी**—वेडली हा शब्द इंगळीस योजला आहे. **पांचवेडळी**, पांच नांग्यांची इंगळी—हे उघडी पांचवेडळी। हे पंचधा आंगिं लागली। १३·१०६४, हा पंचभौतिक देह पांच नांग्यांच्या इंगळीसारखा पांच ठिकाणीं दंश करणारा आहे; **सातवेडळी**—सात नांग्यांची इंगळी, मरणकाळीं शेळीला डसावी १६·२५७, वर शेळी पहा.

**काजवा**—याला खद्योत शब्द ग्रंथांत आला आहे. यन्हवि काइ भानुतेजीं खद्योता। शोभा आथि॥ १·६७, सूर्यापुढें काजव्याची शोभा नाहींशी होते, म्हणूनच कीं काय—पतंगा नावडे वाति। खद्योता भानुची खंति। १६·२३२; सूर्यापुढें चंद्रही लोपतो, तेथ खद्योतु कां हुटहुटी। आपुलेनि तेजें॥ ९·३७५, तेथें काजव्यानें कशाला डौलानें मिरवावें, थोरपणाचा डौल टाकून नम्र व्हावें हा या दाखल्याचा हेतु आहे; कां उदैलेयां भास्वतु। चंद्र जैसा खद्योतु। आह्मा श्रुती तुज आंतु। तेतुला पाडु॥ १४·१३, जसे सूर्यापुढें चंद्र व काजवा तशाच गुरूपुढें श्रुति.

**कोसला**—कोशकार, कोशकीट, कोसेकीटक हे शब्द ग्रंथांत कोसल्याला आढळले. **कोशकार**—निगणेयां(या) आणि प्रवेशा। चित्त नेंदितु आविंसा। कोशकारु जैसा। जाचिनला॥ १६·२८०, ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत 'आविंसा' ऐवजीं 'आवेशा' हा पाठ आला आहे १६·२८२, अर्थ नीट लावण्यासाठीं हा पाठ ग्राह्य वाटतो. **कोशकीट**—वांछित तंव न पवति। मा रोकडी चि आशसंतति। वाढौ वाढों हौंति। कोशकीट॥ १६·३३६, 'रोकडी चि' ऐवजीं ज्ञानदेवींत 'कोरडियै चि' व कुंटेप्रतींत तसाच 'कोरडियेचि' पाठ आहे १६·३३८, हा पाठ धरून अर्थ लावावा, आशा तर सफल होत नाहीं मग नुसत्या आशेवर आशांचे थर देऊन कोशकीटा(च्या घरा)सारखे ते होतात. **कोसेकीटक**—देहाभिमान धरून देह हाच आत्मा आहे असें समजणारा आपला वैरी आपणच होतो—यन्हवि कोसेकीटकिएचिया परीं। तो आपणपेया आपण वैरी। जो आत्मबुद्धि शरीरीं। चारुस्थला॥ ६·७२.

**गोचीड**—राजवाडे प्रतींत खालीं दिलेल्या ओव्यांत गोचिडाचा नांवानें उल्लेख केलेला नाहीं; ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत या संदर्भांत हा शब्द आला आहे. पाहे पां दूध पवित्र आणि गोड। पासिं चि त्वचेचिया पदरासि आड। परि ते(तें) अव्हेरूनि ते मूड। अशुद्ध काइ नेघति॥ ९·५६, 'ते मूड' ऐवजीं ज्ञानदेवींत व कुंटे प्रतींत 'गोचिड' पाठ आहे ९·५७, गाईचें गोड दूध आंचळाजवळ असूनही ते रक्तच शोषतात यास उद्देशून; बैला तळिं वर्त्तलें। पोसणें जैसें॥ १८·६६५, ज्ञानदेवींत—बैलातळीं लागले। गोचिड जैसे॥, कुंटे प्रतींत—बैलातळीं लागलें। गोचिड जैसें॥ १८·६६८.

**पतंग**—प्रकाशावर झडप घालण्याच्या आवेशांत आग किंवा दिवा आपणांस जाळील हें पतंग जाणत नाहीं. सांघैं पतंग काइ साहांति। प्रका शातें॥ ३·१९६; पतंगा नावडे वाति। १६·२३२; जळतेया गिरिचेया आंगवखां। माझि घालिति पतंगाचिया झांका। तैसे लोक देखां। इये वदनीं पडत॥ ११·४२०; दीपाचेया झगमगा। जाळील हें पतंगा। नेणवे चि पैं गा। जिया परी॥ १३·७३९; तमोवृत्तीचे दोन दाखले—वणवा मियां आघवा। पाखें चि पूसूनु नेयावा। पतंगु इया हांवा। घाली जेवी॥ १४·१९०; कां आपण आंगें जळे। आणि नागवी जगाचे डोळे। पतंगु जैसा सळें। दीपाचेनि॥ १८·६१५, यांत पतंगावर मत्सरभाव आरोपला आहे.

**पोहोरी**—कोश पहा.

**बेडूक**—बेडुक, दर्दुर व दर्दूर हे शब्द बेडकाकरितां योजले आहेत. हा शेवाळांत व चिखलांत राहतो, बारीक जीवजंतु खातो व स्वतः सर्पाचें भक्ष्य होतो. **बेडुक**—बेडुकु सापाचां तोंडिं। जातसे सबडबुडी। तो मशकाचिया जोडी। स्मरे चि ना॥ १३·७२९, आपण मरत असतां माशा गिळण्याचें विसरत नाहीं. १३·७८२. **दर्दुर**—कां सेवाळा दोसें दर्दुर। समुद्रु डहुळी॥ १८·६०४; कां कमळकंदा आणि दर्दुरीं। नांदणुक तरि येका चि घरीं। परि पराग

सेविजे भ्रमरीं। एरीं चिखलू चि उरे॥ ९.५७. दर्दूर—विषयकर्दमींचे दर्दूर ५.१२१; मकरंदकणाचा चारा। घालुं जांतां दर्दूरा। वायां धाडा मग सारंगधरा। कोपा कवणां॥ ११.१५८.

**भुंगा**—याला अलि-ली, द्विरेफ, भवर, भंवर, भृंग, भ्रमर, भ्रमरी, षट्पद, षड्पद असे शब्द योजलेले आढळले. **अलि**—बोधमदामृत मुनी। अलि सेविति॥ १.१६; **अलिउल** कोश पहा. **अली**—विकासें रवितें उपजवी। द्रुति अलीं करवि भोगवी। १८.२७४. **द्विरेफ**—ज्ञाना युझ द्विरेफु १४.२८४, या अपपाठासाठीं कोशांत अंबु पहा. **भवर**—भुंगा हलुवारपणानें फुलांवर बसतो १३.२४७, यावर १.५९ पहा; कां भवरें चि केला मला। १८.४८९, ज्ञातेपणानें कर्ता हीन दशेला कसा पोहोंचतो याचें उदाहरण; (सुकृततरूच्या) फुलांवर हलुवारपणें (वैराग्यानें) पाय ठेवणाऱ्या भुंग्यास उद्देशून १८.८९८. **भंवर**—भंवरु फुलाचिये वाहाणी। १८.४७८, धांवतो; **जीवभंवर** १८.१२९२ (२), पुढें **षट्पद** पहा. **भृंग**—गीता कमलिचे भृंग, गीतेंतील श्लोकांस उद्देशून, १८.१६५३; **जीवभृंग**, जीवरूपी भुंगे असलेल्या नील-कमलांनीं तुझी पुजा केली गेली आहे, १७.६. **भ्रमर**—जैसें भ्रमर परागु नेति। परि कमलदलें नेला नेणति। १.५९, हलुवारपणास उद्देशून; परागांचा आस्वाद भ्रमर घेतात, वेडकांना चिखलच उरतो, ९.५७; शेवंतीचा सुगंध भ्रमर-च जाणतो १५.५६१; भ्रमर लांकूड पोखरूं शकतो पण प्राण गेला तरी **कमलदल चिरूं नेणे** १.२०१-२०२; **भ्रमरपण** कसें असतें त्यावर १८.७१६ पहा; **चिद्भ्रमर**, लिंगरूपी देहाच्या कमळांत कष्टी होणाऱ्या चिद्रूपी भुंग्याची सुटका करणारा गुरुरूपी सूर्य, १६.४; भाग्यवान संतरूपी भुंग्यांनीं ज्यांचा सुगंध घेतला तीं श्लोकरूपी कमळें १८.१६४९. **भ्रमरी**—नदगंधकेसरी(रीं)। भ्रमरी जैसी॥ १३.७८०, प्रेमांत गुंतून जाते. **षट्पद**—शुक हान षट्पद हे योगसाधनेच्या ठिकाणीं नसावे ६.१७६; **इंद्रिय-षट्पदाचारी** १८.१२९२ (१), दृश्य जगाच्या सरोवरांत विषयरूपी कमळें उमललीं असतां पांच इंद्रियें व मन या सहा पायांचा जीवरूपी भुंगा त्या कमळांचा आस्वाद घेतो, ईश्वर हाच सूर्य तीं कमळें उमलवितो. **षड्पद**—जे फुलीं लागले षड्पद। काई फुलें चि होंतु॥ १५.२९१, ही अर्जुनाची शंका आहे, देवाशीं ऐक्य पावणारे पुरुष मूळचे एक तर स्वरूपापासून भिन्न किंवा अभिन्न असावे, जर भिन्न असते तर ऐक्य पावल्यावर ते परत येणार नाहींत, व जर अभिन्न असते तर फुलांत गुंग झालेले भ्रमर फुलेंच होऊन असतील पण तसें होत नाहीं.

**मगर**—याला सकर हा शब्द व मकर नांव नसलेला दुसरा एक संदर्भ ग्रंथांत आढळला. **मकरतोंडा मागिलीकडे होतासि**, मगराचें तोंड असलेल्या रथाच्या मधल्या दांड्यामागें सारथी म्हणून बसला होतास, ११.२८८. **सावज, मगर**, ९.४३८, वर हत्ती पुढें हातिरु पहा.

**मधमाशी**—मधुकरि, मधुमक्षिका हे दोन शब्द ग्रंथांत आढळले. मधुरसादोषें। मधुकरि जचें(चे) जैसें। गृहसंगोपन तैसें। करी जो गा॥ १३.७८५, अज्ञान्याच्या प्रवृत्तीचा दाखला; कां मधुविषिं मधुमक्षिका। लोभिणि जैसी॥ १३.५०१.

**माशी**—मशक, मासि, मासी हे शब्द माशीला योजले आहेत. **मशक**—बेडूक स्वतः सापाच्या तोंडीं पडला असतां माशा खाण्याचें विसरत नाहीं, वर बेडूक १३.७२९ पहा; त्यावर आणि हें एक उदाहरण—मशकु गुंपला सेंबुडीं। १३.७८२. **मासि**—दर्दुरु सापें गीलिजतु उभा। तो मासिया वेंटाली जीभा। ९.५०९, कसल्या लोभानें प्राणी आपली हांव वाढवितात तें पहा; अन्न तें न सुटे तोंडा। मासियेचेया॥ १७.१९१, सर्व प्रकारच्या अन्नावर माशी बसते, तमोगुणी पुरुष शास्त्रदृष्ट्या योग्यायोग्याचा विचार करीत नाहीं; नातरि आंगें नरु कुष्ठिया। मासियां कोपे॥ १८.१३५. **मासी**—साकरेचिये रासी। बैसली नुडे मासी। १३.७८१, अज्ञानी पुरुष अशाच प्रकारची दृढ आस्था घरावर

ठेवतो; जन्ममृत्यूंच्या फेऱ्यांत, या कालाग्नींत लोण्याच्या उंडीसारखे आपण पडत आहोंत, चिरस्थायी असें कांहींच नाहीं—मासी पांख पाखडी। तंव हे सरे॥ १३·१०९८; कां जींत मेलें न विचारी। बैसतां मासी॥ १८·५५२; अशा प्रकारची ही माशी—मासी आपणेयातें गिळवी। परि पुढिलातें वांती सीणवी। १८·६१७.

**मुंगी**—पिपीलिका व मुंगी हे शब्द ग्रंथांत या किडी-करतां योजले आहेत. पिपीलिका—मज लागौनि पिपीलिकावेऱ्हीं। १०·१०३, कां आकाशीं गंधर्वनगर। भूतलिं पिपीलिका बांधलें घर। ११·२३९. मुंगी—मज लागूनि मुंगी वेऱ्हीं ११·६८०; मनोगत ओळखे। मुंगियेचें॥ ६·२६९, योगाची सिद्धि मिळाल्यावर; जरि मुंगी मेरु उल्लांडी। ७·९२; मुंगिये मेरु नोलांडवे। १३·२५९; जो मुंगिये लागौनि ब्रह्मावेऱ्हीं। नीयमीतु असे॥ १०·२७२; जैसें तृणबीज बळें। मुंगियेचेनि॥ १३·६८३, मुंगीसारख्या क्षुद्र जीवाच्या शक्तीनें जसें गवताचें बीं हालतें तसा थोड्याशा लाभासाठीं तो अज्ञानी निश्चया-पासून ढळतो, 'बळें' ऐवजीं 'चळे' ज्ञानदेवी, 'ढळे' कुंटे १३·६८५ असे पाठ आले आहेत; अरुण (सूर्याचा सारथी) सूर्याजवळ आहे म्हणून तो सूर्याला पाहतो, मा भूतलिं चि नेदखे। मुंगी काई॥ १८·१६९८, तर पृथ्वी-वरील मुंगीसारख्या क्षुद्र जीवाला सूर्य दिसत नाहीं कीं काय? गीतेचा लाभ लहानमोठ्या सर्वांना सारखा होतो या अर्थी हा दाखला दिला आहे.

**मुरकुट**—चिलट. मशक हा शब्द वर माशी पुढें दिलेल्या संदर्भांत माशी या अर्थी व खालीं दिलेल्या संदर्भांत चिलट या अर्थी योजला असावा, माशी पहा. मशक—गगन मुठी सुआवें। मशकें केवि॥ १·७४; हा मशकु हा गजु। ५·९२; जो मशका लागौनि ब्रह्मावेऱ्हीं। ग्रासी तो मीं॥ १०·२५०; मशका सिंधु नुतरवे। १३·२५९. मुरकुट—आणि जेया सिंधुतटा। पाणियां येंति गजघंटा। तरि काइ मुरकुटां। वारिजतसे॥ १८·१६९०, हत्ती पहा.

**वाळवी**—उल्लिंबा, वोलिंबा हे शब्द वाळवीला योजले आहेत. उल्लिंबा, एका लहानशा कणाकरतां—पाताळ लंघीति उल्लिंबे। १८·६०६. वोलिंबा—देखें वोलिंबा इंगळ न चरे। तेजिं तिमिर जेविं न सिरे। ८·८८, विस्तवाला वाळवी लागत नाहीं, स्वरूपतेजांत अज्ञानरूपी अंधकार शिरूं शकत नाहीं.

**विंचू**—किंबहुना जें पेंव। विंचुवांचें॥ ८·१४३, शरीरास उद्देशून, यावर ८·१३८-१४९ पहा; नांगिया आपुलिया। विंचू करी गुतकुलिया। तरि साच बोलिया। बोलति ते॥ १६·२८८, विंचू नांगी मारील, 'गुतकुलिया' कधींच करणार नाहीं, त्याचप्रमाणें आसुरवृत्तीचे लोक खरें कधींच बोलणार नाहींत. वृश्चिक १५·१६९.

**सरडा**—सरड हा शब्द योजला आहे. जैसें बाबुलियेचें खोड। गिरबडूनि जाति सरड। तैसें पिचडिं तोंड। सरांडेल॥ १३·५६०, जसें बाभळीच्या झाडाचें खोड सरडा खरडून टाकतो त्याप्रमाणें म्हातारपणीं तोंडांतील थुंकीनें तोंड बरबटून जाईल; मातलेया सरडा। पुडुतिं बूढ पुडुतीं सेंडा। हिंडणवारा कोरडा। तैसा जेया॥ १३·६८८, माजलेला सरडा झाडाच्या बुडापासून शेंड्यापर्यंत, पुनः शेंड्याकडून बुडापर्यंत रिकाम्या खेपा घालतो, त्याप्रमाणें त्याचें (अज्ञान्याचें) भटकणें निरर्थक असतें; कां कांटिये वरिला सरडा। व्योम नीच॥ १६·२२३, वरील उदाहरणासारखें हेंही एक मौजेचें उदाहरण आहे, कुंपणाच्या टोकावर चढलेल्या सरड्याला आकाश ठेंगणें वाटतें.

**सर्प**—याला अजगर, आर, उरग, कालियाणा, कीडरूं, नाग, पन्नग, फणि, फोडसें, भुजंग, भूवंग, विखार, व्याल, सर्प, साप इत्यादि शब्द योजलेले आढळले. अजगर—न करवे उसिसी। अजगराची॥ १३·५१४. आर—कां आरें धारणु गीळिला। १३·७२३. उरग—कोश पहा. कालियाणा—कां कालियाणा धुधुवांतु। देखौनि न पसरवे हातु। १८·७०९, फूत्कार टाकणाऱ्या सर्पाजवळ जातां येत नाहीं. कीडरूं—सर्प कापडाचा असावा व त्यावर पाय पडावा, पण सर्पेच डसला असा खोटा समज करून घेऊन

खरोखरच विषाचे झटके यावे यास उद्देशून, ११·५४, यावर ११·४६० पहा. **नाग**— नागाचें पिलें । कुंकुमें न्हालें । ६·२२२, कुंडलिनीच्या शक्तीस उद्देशून; नाइटेयां भेण । न मोडी नागाची आण । १३·७९९, अशी शपथ मोडली असतां नायटा होतो या भीतीस उद्देशून; नागपंचमीच्या दिवशीं नागाची पूजा करणारे, देवदेवांना भजणाऱ्यांच्या उदाहरणांपैकीं एक १३·८१६; **नागिणीकडे खेळवणें** १८·६४, यावर ३·१९९ पहा; **नाग कूर्म कृकरु**, यांचे जांभई, शिंक व ढेंकर असे व्यापार होतात, १८·३३९. **पन्नग** ११·२५९. **फणि**—सांवें महाफणि दर्दूरें । गीलिजे काय ।। २·१५; **मोहफणिग्रसितु**, अर्जुनास उद्देशून, २·७४. **फोडसें**— गुणियांसि नांगवे । फोडसें जेवि ।। १३·७२४, फोडसें चावलें असतां मांत्रिकाला त्याचें विष उतरवितां येत नाहीं यास उद्देशून. **भुजंग**— नहुष भुजंग झाला त्यास उद्देशून १८·१४६९, परिशिष्ट (६) नहुष पहा. **भूवंग**—हे ज्ञाननिधीचे भूवंग । ३·२३६, ज्ञानरूपी ठेव्यावर काम व क्रोध राखणदार म्हणून बसलेले आहेत, ते कोणालाही ज्ञान मिळूं देत नाहींत. **विखार**— १५·१६९, नीलमण्यांचा सर समजून ९·१४७. **व्याल**—जैसा नखाग्रिं व्यालु लागे। तो शिखांत पावे वेगें । १·२५५; जैसी चंदनाची मूळी । गिंवसूनि घेपे व्यालीं। ३·२५५, चंदन व सर्प यांवर १०·७८ व १८·७७५ पहा; दूधाचें काळकूट । होये व्यालां।। १६·२३८, यावर १८·६७६ पहा; व्याला कां हारा । वरिपडा जालेयां नरा। १८·४८५, अनुक्रमें भय व हर्ष वाटतात; स्वातीच्या पाण्याचें शिंपल्यांत मोती होतें, सर्पाच्या तोंडीं त्याचें विष बनतें १५·३८८; **व्यालाकार** १८·११८२; **व्यालशंका**—दोरास उद्देशून १८·२२६; **पातालव्याल** ११·३५७; **विषयव्याल** १२·२; **व्याधिव्याल**, रोगांस उद्देशून, १७·१४९. **सर्प**—ना तरि सर्प गरुडातें । २·२१६, जसा भितो तसे कौरव अर्जुनाला भीत होते; **सर्पेंसीं खेळों एईल** ३·१९९, यावर १८·६४ पहा; **सर्पें कवच सांडिलें** ८·६५, सर्प कांत टाकतो, यावर १४·३१० पहा; भिकेपलीकडे कांहीं मिळत नाहीं, तरी गारुडी सर्पासारखा भयंकर प्राणी जवळ ठेवतो १८·६०५; सर्पामुळें चंदनवृक्ष वाईट ठरतो १७·२२४, १८·७७५, पण चंदनाचें झाड पेटलें असतां तें टाकून सर्प जातो १०·७८; नां तरि उकलतेयां सापांचा वेढे। जैसें चंदना खेंव देणें घडे। ११·७५; सर्प व दोरी यांवरः—सर्पत्व ८·२४६, १५·२२८, १५·२७८, १८·२२६, १८·३८५, १८·११८२; सर्पाकार १८·१३८३; सर्प व नीलमण्यांचा सर ९·१४७, १५·३८७; सर्प व माळाः—सर्पपण ९·७२, सर्पबुद्धि १३·११३२, **सर्पाभास** १५·५२७; कां आपुलां गरळज्वाळीं । जाळीं तेयां आंगाचि पेंदळीं । ते सर्प चि करीं बिळीं । निरुंधलां ।। १६·४०८, तमोवृत्तीच्या लोकांना सर्पयोनींत टाकून केलेलें शासन, बिळांतच कोंडून त्यांच्याच विषज्वालेंत त्यांना भाजत ठेवतों; **सर्पांगना**—सोन्याच्या ठेव्यावर बसते, १८·१४९२; **सर्प घर**—कां सर्प घरा आंतु। अवचटें देवो गेला स्वस्थु । १३·७६३, 'देवो गेला' ऐवजीं 'ठेवा आणिला' असा पाठ ज्ञानदेवी व कुंटे प्रतींत आहे; **सर्पफणिची साउली**, उंदरांना कधींच सुखकारक होणार नाहीं, ५·११६; **काळसर्प**—तो ग्रसिला महामोहें । काळसर्पें ।। २·७०, अर्जुनास उद्देशून; **काळसर्पाचें मार्दवं(व)** ८·१४६; **मनसर्पाची (मन सर्पाची) सृष्टी** १६·२४१; **व्याघ्रसर्प** १२·१११; **अतिकृतकंदर्पसर्पदर्प** १८·८, यावर **अति** (२) पहा. **साप**—दर्दुरु सापें गीळिजतु उभा। ९·५०९; **कापडाचा सांप** ११·४६०, वर **कीडरु** ११·५४ पहा; वैर जन्मांतरिचें। सापा मनौनि न वचे । १३·५३६, यावर १८·७५६ पहा; कां विख चि होउनि परते । सापा दूध ।। १३·७२१, यावर १६·२३८ पहा; वेडुकु सापाचां तोंडिं । १३·७२९, तसेंच १३·५८७ पहा; **सापां होउनि भाटिं असणें**, राखणदार म्हणून, १३·७८३.

**(ई) मासे**—यांना जलचर, मछ, मासली, मासा, मीन, यादस, सफर असे शब्द ग्रंथांत आढळले.

मगर खेरीज इतर जलचरांचा नांवानें केलेला उल्लेख आढळला नाहीं. जलचर, कोशांत चरणें (१) पुढें याचे संदर्भ पहा. मछ १३·३८०. मासली—गुरुस्नेहसलीलीं । आपण होये मासली। १३·३९७. देहजळीं होइजे । मासली जैसी ॥ १४·३४८. मासा—अल्पोदकिचा मासा । नाटे ऐसिया आशा । न वचे चि कां जैसा । अगाधा डोहा ॥ १३·७३७, १४·१६९, १६·३००, १८·६५१. मीन—अथवा मीना गलु घांटे । ७·९१, अथवा माशालाच गळ गिळतां येईल, अगदीं अशक्य कोटींतील उदाहरण; ३·२०८, ५·११७, १३·७३८, १४·१४६, १६·२२४, १८·९२५; मद्मीन ७·८१; माहामीन ७·७०. यादस १०·२२३. सफर—कोश पहा. मकर—मकरतोंडा मागिलीकडे ११·२८८; मगर, विषयमगर ७·८२.

# परिशिष्ट ९

## झाडें, फुलें व फळें

(अ) झाडें, रोपें, वेली इत्यादि

कोशांत झाड, तरु, द्रुम-द्रुम, रुख-रुंख, रूख-रूंख, रोप, वृक्ष, वेल-लि-ली (२), शाखा व त्यापुढें शाखि पहा; त्याचप्रमाणें अंकुरणें व त्यापुढें अंकुर, आठोली, कंद (१), कांदा, खांदि, खोड, डिर-रि-री, पत्र (१), पल्लव, पारंब, पालव-वी (२), पाला, बल्ब, बाबुलि-ली, बावन, बिं-बीं, बीज, बूड-ढ, बेचें, बोंड, मुल-मूल (१), मुळी (१), साल-ला (३), सालडें, सालि (१) व (३) पहा.

अशोक—अशोकाचे आगसे । चवलिले कन्हेनि जैसे । ११·४०९, जसे उंटानें उभ्या उभ्या सहज लीलेनें अशोकाच्या डाहाळ्यांवरचे कोवळे शेंडे चघळावे तसे हे सर्व वीर विश्वरूपाच्या तोंडांत गेले आहेत.

अश्वत्थ—(१) पिंपळ, पवित्र मानलेलें झाड. याचे कांहीं औषधी गुण आहेत, याच्या समिधा होमांत घालतात. अश्वत्थु तो मीं ॥ १०·२१५, वृक्षांतील विभूतीस उद्देशून. (२) गीतेंत पंधराव्या अध्यायांत वर्णन केलेला काल्पनिक वृक्ष. यावर चराचर सृष्टीचें रूपक बसविलें आहे; निराकार ब्रह्माचा मायेशीं संबंध जडल्यावर जो 'संसाररूपी' वृक्ष तयार होतो तो हा अश्वत्थ, याचें मूळ वर असून याच्या शाखा खालीं आहेत; हा क्षणोक्षणीं बदलत असतो, आज आहे तसा तो उद्यां नसतो (अ+श्वः+स्थ), यावर १५·४७-६५, १५·७२-२४४ ओव्या पहा; भवाश्वत्थ १५·२४१.

आंबा—पुढें (इ) फळें या सदरांत आंबा पहा.

ऊस—याला इक्षु व उस-उंस-ऊंस हे शब्द योजले आहेत. इक्षु—इक्षुदंड, नातरि इक्षुदंडु । पालितेया गोडु । गालितेया ही तो चि पाडु । येकु चि गा ॥ १२·१९९; इक्षुरस—जालें इक्षुरसाचें डाल । तन्हि लवण देणें किडाल । १५·४२४, प्रमाणांत घातलें तर मिठानें अन्नाला रुची येते, पण गुळांत तें गोडी मारतें; नाना प्रभा व्यापे प्रकाशु । गोडिया इक्षुरसु । १८·५०६; इक्षुवृद्धि—रिगे मन्वंतर मनू पुढें । वंशा वरि वंशाचे(चें) मांडें(डे) । जैसी इक्षु-वृद्धि कांडेनकांडें । जींके जेवि ॥ १५·१२७. उस—पैं द्राक्षरस कां उसा । १८·६७९, कावळ्याला आवडत नाहींत, 'उसा'ऐवजीं 'आम्ररसा' पाठ अधिक ग्राह्य वाटतो. उंस—कां कोडी एके उंसीं । एकु चि रसु ॥ १३·९१४; ऊस जसा वाढत जातो तशी त्याची गोडीही वाढत जाते १६·२७७; पाणी विषांत मारक, मिर्‍यांत तिखट व उसांत गोड होतें १७·६८; उंसाचीं कणिसें १८·५७३, निरुपयोगी अस-तात. ऊंस—उसाची साखर बनविल्यावर पुनः साखरेचा ऊस बनवितां येत नाहीं ८·१९८, यावर ८·१९४-२०१ पहा; गोडी उसाच्या

रूपांत मूर्त होते १४·२८०; कां ऊंसाचें कांडें ऊंसा । वाढी हेतू ॥ १८·३६१.

**कनक**—धोत्रा. कोशांत कनक (२) पहा.

**केळ**—कदलि, केलि हे शब्द योजले आहेत. ना तरि कदलिचा गाभा । बूंथि सांडूनु उभा । कां अवेवु चि नभा । निवडला तो ॥ ६·२९५, केळीच्या गाभ्याचीं सोपटीं काढून आंतील पोकळीच उभी करावी किंवा आकाशालाच अवयवांचे आकार द्यावे, योगी इतका हलका बनूं शकतो कीं तो जणुं वायूचाच बनला असावा असें दिसतें; कर्पूरकदलिचीं गर्भपूटें । उकलति कर्पुराचेनि कोंधाटें । पुलिका गलति तेवि थेंबटें । नेत्रौनि पडति ॥ ११·२४६, कापूरकेळीचीं सोपटीं उकलून त्यांतून जसे कापराचे कण गळावे तसे आनंदाश्रु गळत होते. केलि—कोशांत केलि (१) पहा.

**खैर**—याला खदिर व खैर हे शब्द योजले आहेत. **खदिरांगाराचे डोंगर**, खैराच्या निखाऱ्यांतील प्रखर उष्णतेस उद्देशून, १६·३७१; **खदिरांगार खोलें भरिलें** ९·१४८; **खैरचंदन** ९·४५५.

**चंदन**—चंदन व बावन हे शब्द योजले आहेत. चंदनाचे गुण, सुवास व थंडपणा हे प्रसिद्ध आहेत, ९·४८०-४८३, १५·३, १८·१७१० ह्या ओव्या पहा; चंदनाचा सुगंध ६·४६१, ९·३८७, १८·११६, १८·८५०, १८·११४४, १८·१७२२; चंदनाला स्पर्श करून आलेला वारा ९·४८०; मलयपर्वतावरील वारा १३·२८९; चंदनाचा शीतलपणा ९·४८३, १३·२९०, १७·५३; चंदनाची उटी १८·५८४; **चंदनपिंजरी** ११·२१९; चंदन व कोल्हा ४·२२; चंदन व सर्प ३·२५५, १०·७८, ११·७५, १७·२२४, १८·७७५; **चंदनाचे खोडे**, हे चंदनाचे जरी असले तरी इतर खोड्यांइतकेच त्रासदायक होतात, १८·८९४; चंदन पेटला तर १०·७८, १७·५३; **चंदनतरूचीं फूलें** १०·१८६; **खैरचंदन** ९·४५५; **सज्जनवनचंदन** १०·३. **बावन**—कोशांत बावन (२) पहा.

**चुत—चूत**—आंब्याचें झाड. पुढें **आंबा** पहा.

**तमाल**—या झाडाचीं पानें आधीं हिरवीं नंतर निळसर, काळसर होतात. तमालश्याम, श्रीकृष्णाच्या सावळ्या रंगास उद्देशून, १७·३४.

**तुळस**—तुळशीच्या संरक्षणाकरतां व शोभेकरतां वृंदावन बांधतात, त्यांत फळाफुलाची किंवा छायेची अपेक्षा नसते—प्रतिपाळु तरि याचा। चौपाटी कीजे तुलसिचा। परि फलफूलछायेचा। आश्रयो नाहिं ॥ १७·१८२, या विरुद्ध कामेप्सूची रीत पहा—कां तुलसीचेया झाडा। दूगैनि घाली सींतोडा। द्राक्षीचेया तरि बुढा। दूध चि लाविजे ॥ १८·५९३.

**दूर्वा**—हा शब्द हरळीला योजला आहे. जी दूर्वेचा हीरु। आंगें चि तंव अमरु। वरि आला महापूरु। पीयुषाचा ॥ १४·२८, हरळीची मुळी स्वभावतःच अमर आहे व तिच्यावर जर अमृताचा पूर आला तर तिच्या अमरत्वाबद्दल कसली शंका उरेल ? गुरूनें वर्षविलेल्या बोधामृतास उद्देशून; **दूर्वांदल**—परि गीता ईश्वरु भोला। ले व्यासोक्तिकुसुममाला। परि माझेया दूर्वांदला। ना न ह्मणे ॥ १८·१६८९, गीता ही शंकरासारखी भोळी आहे, ती व्यासवचनांच्या (संस्कृत भाषेंतील) फुलांची माळ धारण करते, माझ्या दुर्वेला (मराठी टीकेला) ती नाहीं म्हणणार नाहीं.

**द्राक्षी**—द्राक्षांची वेल. **द्राक्षलता**—कि श्लोकाक्षरद्राक्षलता। मांडौ जाली आहे गीता। संसारपथश्रांता। विसांवावेया ॥ १८·१६४८, श्लोकांचीं अक्षरें हींच द्राक्षें, अशा द्राक्षांच्या वेलींची गीता ही मांडव झाली आहे. **द्राक्षि—द्राक्षी**—द्राक्षांची वेल. हिच्या मुळांत दूध घातलें तर फळें फारच गोड होतात या समजास उद्देशून, जेधवां द्राक्षि दूध घातलें। तेधवां वायां गेलें गमलें। परि फलपाकिं दूणावलें। देखिलें जेविं ॥ १५·५५८, असें दूध घालून फळें गोड होतात हें अनुभवसिद्ध आहे असें या ओवीवरून दिसतें, यावर १८·५९३ पहा.

**निंब**—याला नींब असाही शब्द आला आहे. **निंब**—जैं सुखा लागि आपणपेयां। निंब चि आथि धनंजया। तें(तैं) कडुवटपण तेया। भोगिजे ना ॥ १८·९२०, जर निंब (परिणामाच्या दृष्टीनें) सुखकारक होतो तर त्याचा

कडवटपणा सहन केला पाहिजे ना ? 'भोगिजे ना' ऐवजीं 'उभगिजे ना' असा पाठ ज्ञानदेवींत व 'उब्रगिजे ना' असा पाठ कुंटे प्रतींत आहे, १८·९२४. **नींब**—रोगु जाये दूधें ओगरें। तरि नींबु कां पियावा॥ ४·२२०; नींबु नींबोळीं मोडौनि आला। तरि काउळेयांसि सुकाळु जाला। ९·४३४, निंबाच्या झाडाला झाड मोडेल इतका निंबोळयांचा बहर आला तर त्या सुबत्तेचा फायदा (केवळ) कावळयांनाच होतो, भक्तिहीन मनुष्य अशाच पापाकरतां जगतो.

**निर्गुंडी**—हिला **गंगावती** शब्द योजला आहे. या वनस्पतीच्या साधी व कात्री अशा दोन जाती आहेत, हिला वणई म्हणतात. कोशांत **गंगावती** पहा.

**पिंपळ**—पिंपल. १५·११४, १५·११५; पिंपरुवांचेया आशा। न सिंपिजे पिंपलु जैसा। तैसिया फलनिराशा। कीजति कर्मे॥ १८·१७१; **मागवेलि वाचेचा पिंपलिं बांधे** १३·६५७, यावर कोशांत **मागवेलि** पहा. **पिंपलावडाचिया परी**, पिंपळाच्या किंवा वडाच्या झाडासारखा हा संसारवृक्ष फोफावतो यास उद्देशून, १५·५८.

**बाभूळ**—बाबुल. काइ सुरतरु ह्मणौनि बाबुल। सेविलें करी॥ ९·१४६, कल्पवृक्ष म्हणून बाभळीचा आश्रय घेतला तर इच्छित फळ मिळेल काय ? **बाबुलें(ले)चें खोड** १३·५६०, परिशिष्ट (८) **सरडा** पहा.

**बोरांटी**—बोरीचें झाड. आणि गोवि केलेयां जवलि। झगटलियां आंग फाली। फलें आंतु पोली। बोरांटी जैसी॥ १८·६५२; पुढें **शेवंती** पहा.

**भेंड**—भेंडाचा वृक्ष. कोरडा ना वोला। उपेगा आथि गेला। तो वाढौनि मोडला। भेंडु जैसा॥ १८·५७२, भेंडाचा वृक्ष वाळलेला किंवा ताज असला तरी त्याचा कांहीं उपयोग होत नाहीं; तो वाढतो व मोडतो, तामस ज्ञानाचें उदाहरण.

**भोपळ्याची वेल**—हिला **तुंबिणी** शब्द योजला आहे. पैं नानाप्रयोजनशीलें। दीर्घें वक्रें वर्तुलें। होंति येकिचियें(ये) फलें। तुंबिणिये॥ १३·१०५५, अनेक कारणांमुळें निरनिराळ्या आकाराचे भोपळे वेलीवर वाढतात पण ते एकाच वेलीचीं फळें आहेत, आकार निराळे पण वस्तु एकच या अर्थी.

**वड**—या झाडास **वट** असाही शब्द योजला आहे. **वट**—सविस्तर वटत्व जैसें। बीज कणिके (बीजकणिके) माझि असे। आणि बीजकणु वसे। वटीं जेवि॥ ९·४०६, १६·१३०. **वड**—गाभे वनें (गाभेवनें) वडु झांकवे। १०·६९, (वडाच्या) सूक्ष्म अंकुरांनीं वडाचें विस्तीर्ण झाड झांकलें जावें असें विपरीत होणार नाहीं. **पिंपलावडाचिया परी**, या वृक्षांच्या पारंब्यांत डहाळ्या फुटतात, १५·५८.

**सावेरी**—शेवरी. कोशांत **सावेरी–सोवेरी** पहा.

**सूर्यकांत**—यास आदित्याचें झाडें असें ग्रंथांत म्हटलें आहे, १८·८६२.

**हिंवर**—हींवर. एक विस्तीर्ण कांटेरी झाड. दाते कोश पहा. कोशांत **हींवर** पहा.

**(आ) फुलें.**

**कमळ**—कमळास अनेक नांवें आलीं आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिलीं आहेत; चंद्रविकासी व सूर्यविकासी कमळांचे अनेक उल्लेख आले आहेत. दहा व त्याहून अधिक पाकळ्यांचीं कमळें, योगांतील कमळरूपी चक्रें यांचेही निर्देश आले आहेत. कमळ हा शब्द सुवास, कोमलता, सौंदर्य इ. गुणनिदर्शक म्हणून आला आहे. अनेक ठिकाणीं कमळ हा शब्द सूर्यविकासी कमळ या अर्थी योजला आहे. **अब्जिनी**—ते सरोवरीं कां बरवी। अब्जिनी जैसी॥ १८·२७४; **अद्वयाअब्जिनीविकाशु**, अद्वयरूपी कमळाचा विकास करविणारा, गुरुरूपी सूर्य, १६·१; **योगाब्जिनीसरोवरू**, योगरूपी कमळांचें सरोवर, गोरक्षनाथांस उद्देशून, १८·१७३४; **इंदीवर**–१३·३६१; **उत्पल**—**नीलोत्पल** ११·५९०, १७·६; **रातोत्पल** ६·२६५; **कमल**—कां सोमकांतु सोमें पाल्हाले। सूर्यें फाकति कमलें। १८·११२, ११·६५, १३·२४७, १४·२९४, १४·३७२, १६·३६५, १८·३४४, १८·४३०, १८·६१४; **गीता कमलिचे भृंग**, **गीताकमलिचे** असा पाठ घ्यावा, गीतेंतील श्लोक या अर्थी, १८·१६५३; **कमलकंद** ९·५७, **–कलिका** १०·१११, **–कोश** १४·३११, **–गर्भाकारें**

कोशांत आकारणें पहा, ६·२८०, —जन्मा, ब्रह्मदेव, ३·८७, —दळ १·५९, ९·२०२, १३·२५३; भारतकमलपराग, महाभारतरूपी कमळांतला पराग, गीतेस उद्देशून, १·५०; कमलवन ११·२००, १८·६१४, १८·७३२, १८·१३६७; कमलत्व १४·१२३; करकमल, हातांतील कमळ, १२·२२१, लिंगदेह—, लिंगदेहरूपी कमळ, १६·४, लीला—, लीलेनें खेळण्यासाठीं हातांत घेतलेलें कमळ, १३·२८४, शिर—, मस्तक हेंच कमळ, ६·२०२; हृदयकमल(ला)राम, हृदयरूपी कमळाला आनंदविणारा, श्रीकृष्णास उद्देशून, ३·२३४; कमलिनी १३·३४०; कल्हार, कोश पहा; कुमुद—चंद्रविकासी कमळ, परि कुमुद कैसें सूके। कैसें तें कमल फांके। यें दा(दो)न्हीं रवी न देखे। जिया परीं ॥ १८·४३०, ६·१३४, १४·३४२; कुमुदचकोरां, कमळें व चकोर पक्ष्यांचा, १८·१३०४; कुमुददल, कमळाची पाकळी, ५·१०६; स्वयंबोध कुमुदचंद्र, १८·७२७, हे शब्द एकत्र घ्यावे, कोशांत बोध पहा; कुमुदिनी, चंद्रविकासी कमळ, १·६०; स्वबोधकुमुदिनीचंद्र १८·५१७, कोशांत चंद्र पहा; दशदल, दहा पाकळ्यांचें कमळ, १५·५३७. पद्म—आणि पाणी होये भलेतेतुकें। परि तें जीर्णोनि पद्म फांके। १८·८५९, कमळाचा कांदा कितीही खोल पाण्यांत असला तरी त्यांतून कमळ पाण्यावर येऊन उमलतें; पद्मासन, योगांतील एक साधें आसन, ८·९१; पद्मकर, कमळासारखा हात, १०·९; पद्मखंड, कमळाची पाकळी, १४·२०३, —दळ १५·११२, —पत्र, कमळाचें पान, ३·७१; गुरुपदपद्मपराग १५·१७; निगमपद्माचें पराग, वेदरूपी कमळांतील पराग, श्रीकृष्णास उद्देशून, १७·४६; विषयपद्म, इंद्रियभोगरूपी कमळ, १८·४६०; पद्मिनी—पद्मिनी रविकिरण। लाहे मग लाजे कवण। १८·१६; राजिव—आतां सूर्यासि जीवें। अनुसरलीं राजिवें। परि तो त्यें न सिवे। सौरभ्य जैसें ॥ १६·१६२.

**चाफा**—याला चंपक, चांपा अशीं नांवें आलीं आहेत. कनकचंपकाचा कळा, योगसाधनेनें होणाऱ्या योग्याच्या शरीराच्या कोवळेपणास उद्देशून, ६·२५७, यावर ६·२५३-२६० पहा; चांपाचा पौळीं पूजिला १८·८५०; चा(चां)पेगोरिं, विश्वरूपांतील अनेक प्रकारच्या शरीरांस उद्देशून, ११·१३५, यावर ११·१२४-१४० पहा.

**जाई**—जाईचें फूल. यऱ्हविं जाईचेया फुला फांकणें। तेया चि नांव सुकणें। १८·२५५, हीं फुलें पूर्णपणें उमलल्यावर फार वेळ टिकत नाहींत यास उद्देशून.

**जुई**—जुईची वेल. जुइ—हा प्रकृती माझि उभा। परि जुइं जैसा वोथंबा। प्रकृति पृथ्वी नभा। तेतुला पाडू ॥ १३·१०१६, जुईच्या वेलीला जसा आधार देणारा दांडा उभा करतात तसाच प्रकृतीला पुरुष आधार होतो, वास्तविक वेलीचा व दांड्याचा कांहीं निकट संबंध नसतो, पण दांड्याशिवाय वेल उभी राहूं शकत नाहीं हें तात्पर्य, पृथ्वी व आकाश यांमध्यें जितकें अंतर असतें तितकें अंतर प्रकृति व पुरुष यांत आहे.

**धोत्रा**—याला कनक शब्द आला आहे. कनका आणि कापुसा। १३·१०९६, फूल पांढरें असतें यास उद्देशून. पुढें फळांत धोत्रा पहा.

**पारिजात**—प्राजक्त. कल्पद्रुमु हान पारिजातु। गुणें चंदनु पैं विख्यातु। १०·२१५. तैसे पहिले आणि सरते। श्लोक न ह्मणावे गीते। जूनि(निं) नविं पारिजातें। असति काइ ॥ १८·१६५९.

**मोगरें**—नाना गुंफिलीं कां मोकळीं। उणीं न्हंवति परिमळीं। वसंतागमिचिं वाटोळीं। मोगरिं जैसिं ॥ १८·१७१९, हा संदर्भ बटमोगऱ्यांस उद्देशून असावा.

**शेवंती**—सेवंति. सेवंतिए अरसिकां हिं। आंग पांतां विशेषु नाहिं। १५·५६१, अरसिकांनीं शेवंतीच्या फुलाकडे पाहिलें तर त्यांना त्या फुलांत कांहीं वैशिष्ट्य दिसत नाहीं; या पाठाऐवजीं शाळिग्राम, गोपाळाश्रम, निरंजन रघुनाथादि पोथ्यांतील 'आरिसि कांहिं' बोरांटी या अर्थी आलेला पाठ 'जाणों नेणों' १५·५६०, 'घड न्यून' १५·५६२, या मागच्या व पुढच्या विरोधात्मक शब्दांच्या संदर्भावरून अधिक समर्पक वाटतो. सेवंते हीयारी(रीं)। नोहंति फुलें ॥

१६·१२५, यावर कोशांत **हीयारी** पहा; गाई दोवाड सिंग। सेवंतिये अडव आंग। १८·१८५, शेवंतीला कांटे असतात या अडचणीस उद्देशून.

**(इ) फळें, मुळें इत्यादि.**

**आंबा**—चुत; चूत असे शब्द आंब्याच्या झाडास उद्देशून आले आहेत. **चुतफल**—जैसें एकें चि चुतफलें। इंद्रियां वेगळवेगळें। रसें वर्णें परिमळें। भेटिजे स्पर्शें।। १८·४७०; लता पीके आघवी। तंव चूतु बांधे पाल्वी। १८·१२३.

**आवळा**—आवला. करतला वरि वाटुला। डोलत देखिजे जेवि आवला। तैसें ज्ञानें डोलां। आह्मि दाविलें तुज।। १३·६५०; **तलहातिचा आवला** १४·२६६.

**कविठ**—जैसें कविट घातलें। वडवानलीं।। ११·४२८, यावर ११·४२२-४३४ पहा.

**कांदा**—कोशांत कंद (१) व **कांदा** पहा.

**केळें**—केलें. केलें गोडें होंति साखरेंसीं। १८·७९३, कोशांत केलि (१) पहा, केलें हा एकवचनी शब्द आहे म्हणून होंति या अनेकवचनी क्रियापदाचा बाध येतो, याकरतां ज्ञानदेवींतील पाठ दिला आहे, शाळिग्राम प्रतींत 'केलें गोडें साकरेंसि' असा पाठ आहे, 'होंति' हा शब्द नाहीं.

**भोपळा**—याला **दूधिया** हा शब्द योजला आहे. भोपळ्याच्या एकाच वेलीला निरनिराळ्या आकाराचे भोपळे लागतात, त्यावर १३·१०५५ पहा; कडू दूधिया माखिला। गुळें जैसा।। १३·४६७, कितीही गूळ घातला तरी कडू भोपळा तोंडांत घालवत नाहीं यास उद्देशून; मनोरथांचा धारसां। वाहवणें जेयाचेया मानसा। पुरीं पडला जैसा। दूधिया कां।। १३·६८६. वर **तुंबिणी** पहा.

**द्राक्ष**—द्राक्षें कच्चीं असतांना आंबट व तुरट लागतात पण तीं पिकल्यावर गोड होतात, पैं कोलिता ही हूनु बहुवसें। द्राक्षाचें हिरवेपण असे। तें परिपाकीं कां जैसें। माधुर्य होए।। १८·७८७; **द्राक्षरस** १८·६७९; द्राक्षाच्या वेलीला दूध घातलें तर द्राक्षें गोड होतात या व इतर संदर्भांकरतां वर **द्राक्षी** पहा.

**धोत्रा**—याला **कनक** शब्द आला आहे. कनकाचेया फला। आंतु माजु बाहिरी मैला। १८·६५५.

**नारळ**—याला **नारियल** हा शब्द आला आहे. मग जें काहिं ते पढिनले। तें माकडें नारियल तोडिलें। ९·२७५.

**निंबोळी**—याला निंबोलि, **नींबोली** हे शब्द योजले आहेत. निंबोलि—कां निंबोलियेचें पीक। वरि गोड आंतु विष। तैसें राजस देख। क्रियाफल।। १४·२६१, निंबोळी दिसायला चांगली असली तरी आंत कडू असते यास उद्देशून, यावर १३·६६९ पहा. **नींबोली** करतां वर **निंब** पहा.

**पडवळ**—पडवल. पन्नदलेंसिं इसालें। भांडताति हे डोळे। ते होतील पडवलें। पीकलीं तैसीं।। १३·५५८.

**पिंपर**—पिंपळाच्या झाडाचें फळ. पिंपरुवांचेया आशा। न सिंपिजे पिंपलु जैसा। १८·१७१.

**मिरें**—जैसें जीवन चि उदक। परि विषिं होये मारक। कां मिरियां माजि तीख। उंसिं गोड।। १७·६८, पाणी जीवनाधार आहे, पण संसर्गानें त्याच्या आंगीं तामस, राजस व सात्त्विक गुण कसे येतात तें पहा.

**राई**—हिला **मह्रुरी** हाही शब्द योजला आहे, तो कोशांतच **रिचवणें** पुढें पहा. **राई**—राई रायिपण बीजीं। सांटौनि आंग त्यजी। १४·२५४.

**लसूण**—लसणातें न संडी गंधि। कां अपथ्यशीलातें व्याधि। १८·७५४.

**हरडा**—याला **हिरडा** हा शब्द योजला आहे. निंबु जिव्हे कडुवटु। हिरडा पहिलें तूरटु। १८·१८४, सत्कर्में अशींच आरंभीं कडू व तुरट असतात पण परिणामीं हितकारक होतात.

**कणिस**—कोश पहा.

**तिळ**—तिल. वालुवे तिलां घाणा। गालणें एक।। १८·९३७.

**नागवेल**—**नागवल्लिका**. कां न फलतां हिं सार्थका। जैसिया नागवल्लिका। तैसिया करी नित्यादिका। क्रिया जो गा।। १८·६२९, ही वेल फळली नाहीं तरी तिचीं पानें विड्याकरतां उपयोगी पडतात.

**पारका**—कोश पहा.

**फुटाणे**—११·२१२.

**बेल**—शंकरास अर्पण करण्याचें पान. पाठिं सोम-

वारु पावे। आणि बेलेंसिं लिंगा धांवे। १३·८११.

**लांबा**—भाताचें रोप. कोश पहा.

**शाक**—कोश पहा.

**हिंग**—हींगु त्रासला पां घाणीं (णी)। तरि सुगंधत्व कैंचें आणी। १८·२१९.

**धान्यांच्या कांहीं जाती**—धान्याला योजलेला सस्य शब्द कोशांत पहा.

**जोंधळा**—जोन्हला १४·१२५.

**तांदूळ**—तांदुल ९·३०, १५·२३.

**हुरडा**—११·३१९.

# परिशिष्ट १०

## संख्यावाचक शब्द

**एक–येक**—हे शब्द सुटे किंवा इतर शब्दांसह ग्रंथांत आले आहेत. कोशांत दिलेल्या कांहीं संदर्भांवरून त्यांचे अर्थ सहज कळण्यासारखे आहेत. बहुतेक सर्व अर्थ हल्लीं प्रचारांत आहेत, त्यांपैकीं कांहीं येथें दिले आहेत. एक—कित्येक, २·१७३, एक आत्मसुख, केवळ, २·२५९, एक चि, एवढें एक, २·२५०, एकच वस्तु, १५·२४३, एक निश्चित, जें निश्चित असेल तेवढेंच, ३·३१, ऐहिक ही एक धड नाहीं, तें सुद्धां, ४·१५३, चैतन्य एक, जें अद्वितीय आहे तें, २·१७७, जें एक, जें एकुलतें एक होतें तें, १८·७८३, तैसें एक, तशा प्रकारचें एक विशिष्ट, ६·१६३, पृथ समर्थु एक(कु), कोणी एक समर्थ, २·९६, एक ही करणें नाहीं, मुळीं कांहींच, ९·११२, एक...एक—हें तें, ५·९३, एक...एक—कोणी कोणी, १८·४५, एक दोनि १·१०४, एकदोनि, कांहीं थोडेसे, ६·२३१, येकि उजू येकि अव्हांटा ८·२३६; पहिला—(क्र. वा.) ३·२६३,४·१३२, ७·१०६, १८·८५४; पहिलें, (१) आधीं असलेलें, तैसें मी पहिलें, १०·९९, (२) आधीं, १३·२२६; पेली, पहिली, १५·१२८; प्रथम, प्रथमिं, पहिल्या अध्यायांत, १०·२३, १०·८१; प्रथम दशे, आरंभीं, ११·२४३, प्रथमदशेचिये, बाळपणांत, १०·२६८, प्रथमवयसाकालीं १·४२; कोशांत वहिला-ली-लें पहा.

**दोन**—

उभय—उभयातीत १८·१२०५, उभयबंध २·२७७, ११·५३७, उभयबुद्धि, जीवत्व व विश्व या दोन कल्पना, १५·४८१, उभयता ३·२२४, उभयथा, बाहेर आशारूपी नेत्ररोगानें व आंत अविवेकानें, ७·१३७, उभय–भोगुत्रासु १३·५२२, –योग १४·८१, –संग १४·९०; दु—दुखंड १३·३४५, दुपाउली(लीं), दोन पावलांत, जवळच, ८·६९, दुपाहारी(रीं) १७·१५४, दुपुरुखीं १५·४३८; दुसरा—दुसरां क्षणीं १७·१६३, दुसरें, देहरूपानें आपण दुसरा कोणी तरी आहों या कल्पनेनें, १८·१२९८; दुज–दूज, दुण–दूण, दु-दूसरा-री-रें कोश पहा; दू—दोन, दूथडी, ९·६१;

दो—येरिं दो, ॐ तत्सत् यांत सत्कार हा इतर दोन, ॐकार व तत्कार यांपेक्षां, १७·३९४;

दों—येकां दों ११·३९, दों आखरीं, थोडक्यांत, १८·१२३८, दों ठांइं १६·३०७, दोंवा(बा)हीं, दोन बाजूंस, दुतर्फा, ६·२६३, दों भागीं, (१) कुरुक्षेत्रावर दोन बाजूंस, ११·६५१, (२) श्रीकृष्ण स्वतः व सेवक या नात्यानें, १२·१८६, दों भुजीं ११·२८५, दों वरि दोनि भुजा, १२·२२२.

दोघां, प्रलयवन्हि व महावात, १·११८, दोघांचें १८·१५७९, दोघां तव, इच्छा व द्वेष यांमुळें, ७·१६२, दोघी चि या कवतिकिणी १६·६०, दोघे १८·८२५; दोघै, कृष्णार्जुन, दोघै एकपणें पाहीं। नांदत आहाति॥ १८·१५७७, १८·१५८२; दोनि, दोन निरनिराळे, ते चि अविद्येची जवनीक फीटे। आणि भेदभावाची अवधि तूटे। मग ह्मणों जरि येक होउनि आटे। तरि दोनि काय होंति॥

## तीन—

ह्मणौनि तिहिं गुणिं । बुद्धि केली त्रिगुणीं । धृतिसि ही वाटणी । तैसी चि असे ॥ १८·६११, **तिहिं गुणिं**, कर्मफळास उद्देशून, १८·८०९, **तिहिं गुणाचें** १८·८१३; जिये आत्मप्रवृत्तिचां इहीं । गुणिं सत्वादिकीं तिहीं । कर्मे चौघां चौ ठाइं । वांटिलीं वर्णा ॥ १८·८२२; ह्मणौनि तिहिं गुणिं । बांधलासि तूं कोदंडपाणी । १८.१२८४, या चरणांतील ' तिहिं गुणिं ' चा अर्थ ' शौर्य तेज दक्ष्यता ' १८·१२८२ या तीन गुणांनीं असा न घेतां, क्षत्रियाच्या तिहिं गुणिं–त्या गुणांनीं–असा घ्यावा, गीता श्लोक १८·४३ पहा; **तीहीं देवां**, ब्रह्मा विष्णु महेश यांस, १०·१३४; **तिहींचें बिंब** १६·४२२; **तिहिं भागिं**, पृथ्विपाताल-स्वर्गिं, १५·४७०; **तिहिं लोकां आंतु**, भीष्माच्या सिंहनादास उद्देशून, १·१२६, **तिहिं-हीं लोकिं-कीं**, कोशांत लोक पहा; **तिहिं वयसिं**, बाल, तरुण व वृद्ध, या अवस्थांत शरीर एकच असतें, १३·९१७; **तिहिं वर्णांचां चि कानिं लागला**, वेदाध्ययनाचा अधिकार द्विजांनाच असतो यास उद्देशून, १८·१४४७; **तिहींची दूण**, कफ, वात व पित्त या तीन विकारांच्या दुप्पट असे सहा दोष आहेत, १६·२५३, गीता श्लोक १६·४ पहा; **तिहींतें हीं न लेखी**, मिताहाराविषयीं, यावर १८·१०१८-१९ पहा;

**तिघां-तिनि**—तिघांना तीन नांवें, १८·१२७३, यावर १८·१२७२ पहा;

**तिन्हि-न्हीं-न्हीं**—हे तिन्ही एकवटले । तेथ शब्दब्रह्म कवळलें । १·२०, ॐकारास उद्देशून, यावर १·१९ पहा; **श्रद्धेचीं तिन्हीं रूपें** १७·७५; परि सणु सुहृदु संपति । यें तिन्हि येके मिळति । जैं भाग्य धरी उन्नती। आपुलां विधिं ॥ १७·२६८;

**तिसरी**—(क्र. वा.) १८·७४५;

**तीघ**—**तीघ श्रष्टी**—सत्त्व रज तम गुण, १३·३८; हाणि हाणि नोहे तीघ । हे चि हाणी ॥ १६·४२६, काम, क्रोध व लोभ हे तिघे मूर्तिमंत हानी करणारे आहेत;

**तीघां वन्हि पांती पांतां**—तीन अग्नि, प्रलयाग्नि, विद्युदग्नि, वडवाग्नि यांची पंगत (एकत्र आलेले) पहातां, १६·२५२;

**तीजा**—(क्र. वा.) ७·१०६, आर्त्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यांपैकीं तिसरा; **तीजा गुणु**, ज्ञानयोग, १६·८३, क्षत्रियांचा गुण १८·८५७; **तीजा पुरुखु** १५·४४०; **तीजें**—प्रतिबंध करणारें तिसरें, जगाच्या कल्पनेस उद्देशून, १८·१३५५; जें दोहिं माजि तीजें असे । तें दोन्हि सांडितां चि दीसे । १७·३१३, रजतम टाकून तिसरा गुण सत्त्व, यास उद्देशून; **तीजा सत्कारु** १७·३३९; **तीजेया गुणाचे(चें) रूप** १८·८३५;

**तीनि**—**तीनि कवडे** १४·२३३; **तीनि**—तीन प्रकारच्या धृतींस उद्देशून, १८·७२९, **तीनि वेळा**, सकाळ, दुपार व संध्याकाळ, ११·४९०;

**तीन्ही**—ज्ञान, विज्ञान व अज्ञान ७·६, ११·४९०, १३·९६१, १३·९६६, १४·३०८, १६·४३१, **त्यागिचे तीन्ही प्रकार** १८·१४५, **वेदांचे तीन्ही भाग** १८·१४२३, **तीन्ही भेद**, बुद्धीचे, १८·७२७, **तीन्ही लोक**, कोशांत लोक पहा;

**तीन्हीं**—आदि, मध्य व अंत, विश्वरूपास उद्देशून, ११·२७६-२७७; **तीन्हीं अवस्था**, वैराग्य, विवेक व प्रतीति, १८·९९८, **–आखरें** १७·३५१ पहा, **–इयें**, आदि, स्थिति व अंत, २·१५५, **–कांडें**, कर्म, उपासना व ज्ञान, १८·१४२४, **–गांठी**, इडा, पिंगळा व सुषुम्ना, ६·२४४, **–गुण** १४·२६६, **–दानें** १७·३०७, १७·३१२, **–भुवनें**, स्वर्ग, पृथ्वी व पाताळ, ११·३१४, १८·१६६६, **–ऋग्वेदादि** १७·२२१, **–लोक** १८·१२९१, कोशांत लोक पहा, **–निजनिजें सामर्थ्यें**, तीनही गुण आपापल्या सामर्थ्यानें, १४·२७८; **तीन्हीं अंतरीं उठीति**, काम, क्रोध व लोभ, १६·४२५; **तीन्हीं उठिलीं**, ॐकारांत अ, उ व म हीं अक्षरें उपजतां क्षणींच तीन वेदांना घेऊन आलीं, ९·२७५-२७६.

**तीहीं**—**तीहीं काळांची गणना** १४·३३०.

**तृतीय**—(क्र. वा.) **तृतीय नेत्र** ११·२९९, **–निष्कर्ष** १५·४९५ पहा; **त्रय**—**त्रया** १८·४५९; **–त्रय**, शब्दास जोडून, **अवस्थात्रय**, जागृति, सुषुप्ति व स्वप्न, १८·३१८, १८·१२९१, **कर्म–**, सात्त्विक, राजस व तामस, १८·७६३;

**त्रिमालिकें**, तीन माळ्यांचीं घरें, ५·११३; **त्रिरूप**, तैसें तिहिं गुणीं तप। तेथ जालें असे त्रिरूप। १७·१९६; **त्रिवर्ग—त्रिवर्गाचा अणुआरु**, धर्मार्थकाम यांचा बारीक चुरा, १८·३६, **त्रिवर्गोपायें नांदे**, धर्मार्थकाम या उपायानें स्वर्ग व संसार या दोन घरांत सुखानें नांदतो, १८·७४२;

**त्रिविध**—सत्त्वरजतमाचें, १८·५२२; **त्रिविध अहंकार** १५·९४, **– आहार** १७·१२२, **–उपद्रव**, आधिभौतिक, आधिदैविक व आध्यात्मिक १३·३४३, **– कर्त्ता** १८·६२६, **–कर्म** १८·५८२, कर्माला त्रिविध प्रवृत्ति, ज्ञाता, ज्ञान व ज्ञेय, १८·४८२; **त्रिविध तप** १७·१९९, १७·२३९, **–त्याग** १८·१४४, **–(त्यागाचा) निवाडा** १८·१४४, **–दान** १७·२६३-२६४, **–धृति** १८·७६३, **–धृती** १८·७२८, **–फल**, कर्माचें, १८·२३१-२३६, १८·२३८, १८·२४६, १८·२५८, **–बुध्दी** १८·७६०, **–व्यापार** १७·१२२, **–श्रद्धा** १७·८१, **–सर्वक्रिया प्रवृत्ति** १८·४७४, **–सुख** १८·७६४, १८·७६८; **त्रिविधमलकट**, कायिक, वाचिक व मानसिक दोष, १५·५४८; **त्रिविधता** सत्त्व, रज व तमामुळें जीवास होणारी, १७·१२१, १८·६२५; **त्रिविधत्व** १७·२३७, **त्रिविधपण** १७·७३, १८·५२१, **त्रिविध्य** १७·२३८; **त्रिवेणी**, गंगा, यमुना व सरस्वती (गीता), ११·७; **त्रिशुद्धि-ध्दी**, कोश पहा;

**त्री—त्रिजगती** ५·८५, १०·११०, १४·८, १८·१४६१, १८·१७७०;

**त्रै—त्रैधातुक**, कफ, वात व पित्ताचा देह, ११·६८९;

**त्रैलोक-क्य**—कोशांत लोक पहा.

**औट—**

कोशांत आउठ पहा.

**चार—**

**चतुर्—**शब्दास जोडून, **चतुरंग**, चार अंगें असलेलें, पायदळ, अश्वदळ, रथावर व हत्तीवर असलेल्या सैन्यास उद्देशून, ९·२१५; **चतुरंगाचिया संपदा** ११·४५७, **चातुरंग**, पुढें पहा; **चतुरानन**, ब्रह्मदेव, ३·११६, **–नाचिये वाचे** ११·२०५, **चतुराश्रम**, ब्रह्मचर्य, गृहस्थ, वानप्रस्थ व संन्यास, चतुराश्रमवशें। पुरुषु चतुर्धा दीसे। १८·६२६; **चतुर्दश भुवनें, चौदा** पहा; **चतुर्दिक्षु**, चार बाजूंना, चतुर्दिक्षु वारा। न ल्हाये निगों बाहिरा। १३·४११, वारा कितीहि वाहूं लागला तरी चार दिशांच्या बाहेर जाऊं शकत नाहीं; **चतुर्थ**, ब्रह्म हें सत्त्व रज व तम या गुणांना पुरून त्यांच्या पलीकडे जाणारें चौथें आहे, १४·२२२; **चतुर्थी**, चौथ्या वृत्तीनें, आर्त्त, जिज्ञासु व अर्थार्थी यांपलीकडच्या चौथ्या भक्तितत्त्वांत भागवत(भक्त) रहातात, १४·२६८; **चतुर्धा-ध्दा**, कोशांत **–धा** पहा; **चतुःपथ**, चव्हाटा, **संवादचतुःपथिचे गणेश** १०·१०८; **चतुर्भुज** ६·३२४, ११·८३, ११·५८७, **–रूप** ११·५८४; **चतुर्वर्ण**, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या जाती, १५·१५५, १८·८१४, **–व्यवस्था** १८·८२०; **चतुर्विध**, चार प्रकारचें, **–धें अन्नें** १५·३७७, **चतुर्विध चिन्ह**, अंतःकरणाचें, १८·४९५, **–धु ठसा**, उद्भिज, अंडज, स्वेदज व जारज अशी चार प्रकारची सजीव सृष्टि, ७·२३; **चतुर्विध मज भजले**, आर्त्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी, ७·१०५; **चतुर्व्यांजें** १३·९४५, पुढें **चौं ठाइं** पहा; **चतुष्पद**, चार पायांचें जनावर, **चतुष्पदादीक आघवे**, येथें गजेंद्रास उद्देशून, १२·९३; **चतुष्टय**, चारांचा समुदाय, **चित्त-चतुष्टय**, चित्त, मन, बुद्धि व अहंकार, १५·९६, यावर १५·९१-९६ पहा;

**चहुं—धर्मादिक चहुं आंतु**, धर्मार्थकाममोक्ष या चार पुरुषार्थांत, १६·४३०, **चहुं युगांचीं डाळें**, कृत, त्रेता, द्वापार व कलि या चार युगांचीं सुकीं सालपटें पडून जातात व पुनः कृतयुगास आरंभ होतो यास उद्देशून, १५·१२८;

**चहूं—चहूं इहीं**, गीतेंत १२ ते १५ अध्यायांत ज्ञानकांड सांगितलें आहे त्यास उद्देशून, १८·१४३९, कोशांत **कांड** (४) पहा; **चहूं कडूनि**, चारही बाजूंनीं, येथें सर्व बाजूंनीं या अर्थी, २·२०४, **–कडे**, त्याच अर्थी, ७·८३, ९·४८८, **– दिशीं**, त्याच अर्थी,

६·४१४; चहू(हूं) वर्णीं, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र या चार वर्णांत कर्मांची विभागणी केली आहे यास उद्देशून, ४·७९; **चातुरंग**, वर चतुरंग पहा, करी-चातुरंग-समाजें। सेना नांव निफजे। १३·१५२, **चातुरंगपरिवार** ११·३९२; **चोबारा**, चव्हाटा, १०·२६१, पुढें **चौबारा** पहा; **चोहट**—चव्हाटा, **चोहटांचेया बली** १·२५०, यां खेलतेयां विंदाणां। माझि द्यूत मीं विचक्षणा। ह्मणौनि चोहटां चोबारा कवणां। वारुं नैये॥ १०·२६१, छळ करणाऱ्या कारस्थानांत द्यूत हीच जर ईश्वरविभूति आहे तर तें खेळणें चव्हाट्यावर कसें थांबवितां येईल, येथें चोहटा व चोबारा ही द्विरुक्ति वाटते, ज्ञानदेवींत 'चौहटां चोरी परि कवणा' व कुंटे प्रतींत 'चोहटां चोरी परि कवणा' असे पाठ आहेत १०·२८४, पुढें **चौहट** पहा;

**चौ-चौं**—चार या अर्थी. **चौ—इहीं चौ हीं वर्णीं** १८·८२४; **चौ ही वां(वा)चा**, परा, पश्यंती, मध्यमा व वैखरी या चार वाणींस उद्देशून, ११·५०७; **चौं ठांइं**—आतां चौं ठांइं न करुं। १३·९४८, एका ब्रह्माचे चार विभाग, एक क्षेत्र एक ज्ञान। एक ज्ञेय एक अज्ञान। १६·९४६, असे केले होते, ते सर्व एकच आहेत असें सांगून न संपवितां, ब्रह्माचे आत्मा (पुरुष) व अनात्मा (प्रकृति) असे विभाग पाडून सांगतों; कर्में चौघां चौं ठांइं। वांटिलीं वर्णां॥ १८·८२२; **चौं हीं पुरुषार्थां** १८·८६४; **चौं भुजांचें सावळें**, श्रीकृष्णाच्या चतुर्भुज रूपास उद्देशून, ११·२८५; **चौंपासिं अगारें घेउनु**, चारही बाजूस अंकुर घेऊन, १५·९१; **चौंहिं शास्त्रें अर्थें देशें काळें** १७·२८; **चौहींकडे** ११·२६२, **चौंहींकडे** ११·३८६, सर्व बाजूंनीं; **चौक—नवद्वाराचां चौकीं** १२·५२, येथें मध्यभाग असा अर्थ घ्यावा, ज्ञानदेवी, कुंटे–'चौचकीं', कपाटांत, आवारांत, १२·५२; **चौकडि**—चार युगें, **सहस्र चौकडिया** ८·१५४ लाहाना चौकडिं(डि)यां पटत्व भरे। ९·१०६, आडव्या उभ्या धाग्यांच्या विणीनें बनविलेल्या कापडास उद्देशून; **चौखुरी**, चारही खूर बांधून, जखडून, चाखुरी दहात्म। मानीयातें॥ १४·१७६, देह हाच आत्मा आहे असें मानणाऱ्याला तम जखडून बांधतें; **चौगुण**—कोशांत गुण (३) पहा;

**चौघां**—ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र यांना, १८·८२२;

**चौथा**—(क. वा.) ज्ञान्यास उद्देशून, ७·१०६, शुक्लपक्षास उद्देशून ८·२२१, शूद्रास उद्देशून १८·८१७, १८·८१८, ब्राह्मणाच्या गुणास उद्देशून १८·८३७, क्षत्रियाच्या गुणास उद्देशून १८·८६१; **चौथेयाचां ठांइं**, ज्ञान्याच्या ठिकाणीं, ७·१०८; **चौथि**, गणेशचतुर्थी, १३·८१७; **चौथी**, धर्मार्थकाममोक्षांपैकीं चौथी पुरुषार्थसिद्धि, १२·२१७; **चौथी भक्ति**, आर्त्त, जिज्ञासु, अर्थार्थी व ज्ञानी यांपैकीं क्रमानें चौथी, १८·११०५; **चौथें कर्म कारण** १८·३४१;

**चौपाटी**—चौपाटी कीजे तुलसिचा। १७·१८२, तुळशीच्या रक्षणाकरतां चौकोनी वृंदावन करतात त्यास उद्देशून; **चौपाहारी**, कोशांत पाहार पहा; **चौफल**, चौकोनी, १३·८९३, १५·३०७, **चौफलणें**, चौरंगासारखें चौकोनी करणें, आतां हृदय हें आपुलें। चौफलौनि भलें। १५·१, आपलें शुद्ध अंतःकरण चौरंगासारखें करून;

**चौबारा**—चव्हाटा, **वाचेचां चौबारां** १६·४२१, कोशांत **चोबार** पहा; **चौहट**—चव्हाटा, **भक्तिचां चौहटां** ९·४१२; **भावभवनिचा चौहटा** १८·१५८८; **मनाचां चौहटां** ८·१८२; **वेदांचा चौहटा** ९·२७२; **चौहटां बोबाइलेयां** १६·२१७, –सांडिलें, चव्हाट्यावर ठेवलेलें, ९·४३५;

**चौह्मेरि(रिं)**, चारही बाजूंनीं, २·२००, ज्ञानदेवी, कुंटे–'चौमेरीं' २·२००;

**च्या–रि–री–न्हि–न्ही—**

**च्यारि चि आंगुळें** ६·१९५; **दोनि च्यारि सारसें** ६·१७७; **च्यारी भाऊ**, प्राणाचे चार भाऊ, अपान, व्यान, उदान व समान, १३·२९; **च्यान्हि उठिति**, स्वेदज, जारज, उद्भिज्ज व मणिज उद्भवतात, १५·१४७; **च्यान्ही**, अर्जुनाच्या रथाचे चार घोडे,

१·१३८, – आघाट, स्वेदज, जारज, उद्भिज्ज व मणिज सृष्टि, १३·४६, – पदें, गीतेंतील श्लोकांचे चारही चरण, १८·५३, – भूतें, प्रलयांत आकाश हें इतर चार महाभूतांना, पृथ्वी, आप, तेज व वायु यांना गिळून उरतें त्यास उद्देशून, १८·११३०; **च्यारि–च्यार्‍ही मनू**, चौदा मनूंपैकीं चार मुख्य, स्वायंभुव, स्वारोचिष, वैवस्वत व सावर्णि, १०·९१, १०·९९, पुढें **चौदा मनु** पहा; **च्यार्‍ही मास**, पावसाळ्याचे, ११·५७२, **च्यार्‍ही वर्ण**, ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य व शूद्र, ४·७६, १८·८१५, १८·८२१;
**तुरिया–तुर्या**—(क्र. वा.) चौथी अवस्था, जागृति सुषुप्ति, स्वप्न व समाधि यांपैकीं चौथी, **तुरियेचें लावण्य** ६·३२०; **तुर्येचें माजिघर** १३.१०६८.

## पांच—

**पंच—पंचाग्नि**, तपस्वी चार बाजूंस चार अग्नि पेटवून वर सूर्याचा ताप सहन करून तप करतो त्यास उद्देशून, १७·२५४; **पंचात्मक —पंचात्मकें आकारें**, पंचमहाभूतांच्या आकारांत व्यक्त होणारी प्रकृति, ९·१०६, त्याच अर्थी—तो पंचात्मिकीं सांकडे। ६·४००; **पंचानन**, सिंह, ९·२०४, **जीव–** १३·१०६४; **पंचायतनिचें**, पंचमहाभूतांच्या घरांतील, शरीरांतील अधिदैवास उद्देशून, ८·३५;
**पंचकारण—पंचकारणदलवाडें** १८·३०३; **देहादिपंचकारण** १८·४२७; **पंचकारणक**—एवं पंचकारणका कर्मा। पांच ही हेतु हे सुवर्मा। १८.३७५; **अनादि पंचक्रोशक्षेत्र** १८·१७८२; **पंचप्राणमन**, प्राण, अपान, व्यान, उदान व समान हे पांच प्राण व मन, ९·२११; **पंचभौतिक**, पांच महाभूतांचें, १३·४८९;
**पंचवटिका**—पांच वाटा, **पंचवटिकांची बांधी**, पांच वाटा असलेल्या शरीरास उद्देशून, १३·४७; **पंचहेतुमिळणीं** १८·३११;
**पंचत्व**—मरण, येथें नकार, १३·११०७;
**पंचधा**—कोशांत –धा पहा;
**पंचक**—पांचांचा समुदाय, **प्रभूतांचें पंचक** ११·२५६, **कारण–** १८·२९६, **महाभूत–** १३·७३;

**पंचम**—(क्र. वा.), पांचवा–वी–वें, **पंचम**, संगीतांतील, १८·८३८; **पंचमालाप** ४·३, ११·९४; **पंचमी**, नागपंचमीस उद्देशून, १३·८१६; **पंचविध**—तरि शब्दस्पर्शु। रूपगंध-रसु। हा पंचविध आभासु। ज्ञेयाचा जो॥ १८·४६९; बाहीरि त्वचा श्रवण। चक्षु रसना घ्राण। हें पंचविध जाण। ज्ञानेंद्रिय गा॥ १८·४९६; ज्ञानेंद्रियाचे पांच विषय, १३·११७; कर्मांचीं पांच कारणें, १८·३५०; **पांच—पांच पांच मिलौनियां** ८·३०, पंचमहाभूतें, पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश हीं १३·७७ एकमेकांत मिळून व्यक्त रूप बनतें अशा रीतीनें बनलेल्या शरीराला अधिभूत म्हणतात, यावर ८·२९-३१ पहा; शरीर हें अस्थि, चर्म, स्नायु, शोणित व शुक्ल या **पांचाचा बांधा** आहे १३·१०६, वास्तविक हें **पांचाचें जाळें** आहे १३·१०९७, **हाच पांच मेळावा** ३·२०३, पांचमेळावेयाची वोखटी। दारुण हे॥ १३·१०६३, हींच पंचमहाभूतें **पांचां पांच विरजीं होंति**, एकमेकांना सहाय्यकारक होतात १४·१०१; पंचमहाभूतांचा अहंकाराशीं संबंध जडला, **पांचां हिं गांठि पडे** १३·८२ कीं देह बनतो; **पांचांचे जे विशेष गुण** ९·२३९, शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध आहेत, त्यांचा बोध अनुक्रमें श्रवण, त्वचा, नयन, रसन व घ्राण हे करून घेतात, पुढें १३·९८-९९ पहा; या ज्ञान-करणांनीं बुद्धि सुखदुःख जाणते; पांच कर्मेंद्रियें १३·१००-१०१; कोणतेंही कार्य घडतें तें **पांचें(चैं) कारणीं** घडतें, त्याला **पांच हेतु** आहेत, या **पंचकारणदलवाड्याच्या** धांदलींत आत्मा हा निरपेक्ष साक्षी असतो १८·३०२-३०४, हे पांच हेतु गीतेंतील १८·१४ व १५ श्लोकांत दिले आहेत—(१) अधिष्ठान, देह, १८·३१४, (२) कर्ता, जीव, प्रकृतीच्या आधारानें जीव कर्ता होतो व आपण कर्ता आहों असें मानतो, १८·३१९, (३) इंद्रियें व्यापार करतात १८·३२८, (४) निरनिराळे व्यवहार, आचार, वायुक्रिया वगैरे, १८·३४१, (५) दैव, याला ग्रंथांत, तें देववृंद बरवें। कर्मकारण पांचवें। १८·३४९, असें म्हटलें आहे, यावर १८·३४१ ते १८·३७५ पहा;

**पांचवनेया ज्वाला**, प्रलयानल, विद्युदनल, वडवानल, शिवनेत्रानल, द्वादशादित्यानल, ११·३००; **पांचवेउळी**, पांच नांग्यांची इंगळी, १३·१०६४; **पांचपीसें**, पंचमहाभूतें, १८·१८; **पांचभूतिक**, पंचमहाभूतांचें बनलेलें शरीर, ५·५३, **–भूतिकें** १३·४७, **–भौतिक** ७·२५, १५·४४७; **पा(पां)च विषय** १३·१२०; **पांचें(चैं) दाउं** १८·३५१;

**पांचै-पांचै कारणें** १८·४२८, वर **पांच हेतु** पहा, **–कुंडें**, पांच इंद्रियें, ४·१२७, **–खवलें**, पंचमहाभूतांच्या खपल्या, ८·६१, **–खाणी**, पंच भूतात्मक शरीर, १८·४५१, **–दोष**, पांच तामसवृत्तीचे दोष, निद्रा, शोक, विषाद, मद व भय, १८·७५८, **–द्वारीं** १३·१०२, **–पालव**, पांच पदर, अंतःकरण, मन, बुद्धि, अहंकार व चित्त, ११·६३, १३·३६५, **–प्रकार**, वाचा, कर, चरण, अधोद्वार व अपायु हीं पांच कर्मेंद्रियें, १३·१००, **–फोंक**, पृथ्वी, आप, तेज, वायु व आकाश या डहाळया, १५·९७, **–भूतें** १३·१४६, **–मुखिं**, श्रवण, नयन, त्वचा, घ्राण व रसन या पांच ज्ञानकरणांनीं बुद्धि सुखदुःख जाणते, १३·९८–९९;

**पांच पांडव**, कोशांत **धर्म** (२) पहा, **भीम**, भीमसेन १·१२०, १·१४८, **भीमार्जुनासारिखे** १·९७, **अर्जुन**, परिशिष्ट (६) पहा, **नकुल** १·१५० व **सहदेव** १·१५०;

**पांचसात**, थोड्याशा, १०·२७८; **पांचवां (वा)** १८·८३८; **पांचवां(वा) गुणेंद्र** १८·८६४, **–वें** १८·३४९; **पांचिक**, हिणकस धातु मिसळल्यावर सोळा किंवा पंधरा कसावरून पांच कसापर्यंत उतरविलेलें सोनें, १३·१००३, १४·१४०, १८·१२४८.

## सहा—

**षट्—षट्कर्मं**, ब्राह्मणाचें, इज्या (यजन), याजन, अध्ययन, अध्यापन, दान व परिग्रह, ६·४७२, १६·९५; क्षत्रियांचे गुण यावर पुढें **सात** पहा; वैश्याचीं कर्में—कणवृत्ति, प्रतिग्रह, कृषि, वाणिज्य, गोरक्षा व याचना, यावर १८·८७६-८७८ पहा; **षट्पद**, भुंगा, ६·१७६;

**षड्—षड्गुण**, यश, श्री, औदार्य, ज्ञान, वैराग्य व ऐश्वर्य, **षड्गुणा(णां)चा राणा** १४·३२०, **षड्गुणाधिकरण** २·२९०, **षड्गुणचक्रवर्त्ती** ११·११२, हे सर्व संदर्भ श्रीकृष्णास उद्देशून आले आहेत; **षड्दर्शनें**—सांख्य, योग, वैशेषिक, न्याय, पूर्वमीमांसा व उत्तरमीमांसा यांचे अनुक्रमें कपिल, पतंजलि, कणाद, जैमिनि व व्यास हे प्रणेते होते, १·१०; **षड्रस**—कटु, अम्ल, मधुर, लवण, तिक्त व कषाय, १८·१००१; **षड्रिपु**—काम, क्रोध, लोभ, मोह, मद व मत्सर यांचे निरनिराळ्या ठिकाणीं उल्लेख आले आहेत;

**षड—षडरितू**, वसंत, ग्रीष्म, वर्षा, शरत्, हेमंत व शिशिर, १४·३६१;

**षष्ट**—सहावें, **मनःषष्टां इंद्रियांनें**, पांच इंद्रियें व मन, १५·३३५; **षष्टिचा**, सहाव्या अध्यायाचा, ६·१०; **षष्टम—षष्टमामाझि**, सहाव्या अध्यायांत, १०·२५;

**सा**—सहा, **सा मास**, दक्षिणायनाचे सहा महिने ८·२३१; **सां मासां** ८·२१८; **सामास** ८·२२२, हे उत्तरायणाचे सहा महिने; **सावां**, सहावा, १८·८४०; **साई गुण**—जन्म, जरा, मरण, व्याधि, वार्धक्य, कलुष हे देहाचे **साई गुण** १४·३१३; **साई दोष**, अज्ञान व इतर पांच मिळून अज्ञानाचे सहा दोष, १६·२५०, १६·२५७, १६·४२१, गीतेंतील १६·४ श्लोक व त्यावरील टीका १६·२११-२५० पहा, **दंभ** १६·२११-२२१, **दर्प** १६·२२२-२२७, **अभिमान** १६·२२८-२३४, **क्रोध** १६·२३५-२४०, **पारुष्य** १६·२४१-२४३, व **अज्ञान** १६·२४४-२५०; **साई दोषांगिं** १६·२५१; **साहिं दोषां** १६·२६६, **–दोषिं** १६·२५४, हे संदर्भ वरील आसुरी संपत्तीच्या सहा दोषांसंबंधीं आहेत; **साहीं इंद्रियें**, पांच इंद्रियें व मन, **मनादि साहीं इंद्रियें** १५·३२०, वर **मनःषष्टां** १५·३३५ पहा; **साही पदर** ६·२४४, योगशास्त्राप्रमाणें कुंडलिनीच्या आड येणारे पडदे, हे योगशास्त्रांत सहा व हठयोगांत आठ कल्पिले आहेत, कोशांत **चक्र** (४) पहा, येथें त्यांपैकीं पहिलीं पांच चक्रें व सातवें अज्ञ मिळून सहांचा उल्लेख केला असावा; **सावें**, सहावें या अर्थीं, १८·८६७.

**सात—**

**सप्त—सप्तगुणिं**, क्षत्रियांचे सात गुण, १८·८७१, **इयां सातां** १८·८७२, गीतेंत १८·४३ श्लोकांत हे दिले आहेत, त्यावरील टीका पहा—(१) **शौर्य** १८·८५४, (२) **तेज** १८·८५५-८५७, (३) **धीरु**, धैर्य, १८·८५७-८५८, (४) **दक्षत्व** १८·८५९-८६१, (५) **जूझ** १८·८६१-८६४, (६) **दान** १८·८६५-८६७, (७) **ईश्वरभाव** १८·८६८-८६९, **सप्तगुणार्णव**—सात समुद्रांनीं वेष्टिलेल्या पृथ्वीसारखे क्षत्रियांचे हे वरील गुण आहेत, १८·८७३; पुढें सात सिंधु पहा;

**सप्ततल—सप्ततल आड लावणें** ६·११४, येथें सप्ततल चा अर्थ नीट लागत नाहीं, ज्ञानदेवींत व कुंटे प्रतींत 'सपातळ' ६·११४, पडदा या अर्थी दिलेला पाठ ग्राह्य वाटतो; **सप्तधातु**, शरीरांतील सात धातु—रस, रक्त, मांस, मेद, अस्थि, मज्जा व शुक्र (सुश्रुत), ६·२३५; **सप्तप्रश्नसिद्धि**, पुढें सात ही पदें पहा, १०·२८; **सप्तरिखी** १०·९९, **–रिषि** १०·९०, **–रुषीं** १८·८७०, कश्यप, अत्रि, भारद्वाज, विश्वामित्र, गौतम, जमदग्नि व वसिष्ठ, हे सात ऋषि ध्रुव नक्षत्राच्या सभोंवार फिरत असतात, क्षत्रियांच्या सात गुणांस उद्देशून हें रूपक आलें आहे; **सप्तशती**, गीतेंतील सातशें श्लोक, १८·१६४५; **सात—सात ही पदें**, ब्रह्म, अध्यात्म, कर्म, अधिभूत, अधिदैव, अधियज्ञ व प्रयाणकाळीं होणारें ईश्वरस्मरण हीं सात पदें, ७·१९२; **सात येकि विभूति**, गीतेंतील १०·३४ श्लोकांत स्त्रियांच्या सात विभूति सांगितल्या आहेत, त्यांपैकीं 'कीर्ति, औदार्याची संपत्ति, मेधा, धृति व क्षमा' या पांच विभूति टीकेंतील १०·२५५-२५६ ओव्यांत आल्या आहेत, वाक् व स्मृति या दोन विभूतींवरील ओव्या राजवाडे प्रतींत नाहींत, त्या गहाळ झाल्या असाव्या;

**सातें वोघीं**, गंगेच्या सात ओघांस उद्देशून, १८·८७४, नलिनी, पावनी, ह्रदिनी या तीन पश्चिमवाहिन्या, सिंधुवास, भेदकाया, सुचक्षणी व सीता या उत्तरवाहिन्या;

**सात शक्ती**, गीतेंतील १०·३४ श्लोकांत सांगितलेल्या स्त्रियांच्या **सात विभूति**, १०·२५७; **सात सागर**, ११·५६, १८·१७५६, **सात सिंधु**, ११·६४८, हे संदर्भ पौराणिक सात समुद्रांस उद्देशून आले आहेत, क्षारोदक, इक्षुरसोदक, सुरोदक, घृतोदक, दधिमंडोदक, शुद्धोदक व क्षीरोदक; **सातवाकड** व **सातवेडली** हे शब्द कोशांत पहा; **सात से (सें)** १८·१६५१, **सातां शतांचा** १८·१६४१, **सनें सात** १८·१६४०, **सें सात** १८·१६४३, १८·१६५६, **सातेंसतीं** १०·३०, हे संदर्भ गीतेंतील सातशें श्लोकांस उद्देशून आले आहेत;

**सातवा**—(क्र. वा.) १८·८४३.

**आठ—**

**अष्ट—अष्टांग, अष्टांगु योगु**, आठ अंगें असलेला हठयोग, ९·४१८, योगाचीं आठ अंगें—यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि; **अष्टांगादि संकटीं**, हठयोगाचीं अष्टांगें संपादण्याच्या संकटांत, ११·६६७; **अष्टांगसामग्रियेचें दीप**, हठयोगाचीं आठ अंगें दाखविणारा दिवा, ६·४६१; **अष्टांगें**—पैं जेयाचेनि अंगसंगें। इये प्रकृतीतव अष्टांगें। जन्म पाविजतसे जगें। तो पिता मीं गा॥ ९·२६८, प्रकृतीचीं आठ अंगें—आप तेज गगन। मही मारुतु मन। बुद्धि अहंकारु हे भिन्न। आठै भाग॥ ७·१८; **अष्टधा भिन्न**, प्रकृतीस उद्देशून, ७·१६, ७·१७, १५·४५१; **अष्टभेदव्यक्ति**, प्रकृतीचे दोन भाग, एक अष्टभेदानें व्यक्तरूपांत आलेली व दुसरी जीवरूपा, ९·९७; **अष्टदल**, आठ सात्त्विक भाव दाखविणारें आठ पाकळ्यांचें कमळ, १५·६, हे आठ सात्त्विक भाव पुढें दिले आहेत; **दिग्गज, दिग्गजमेळावे**, आठ दिशांस सावरून धरणाऱ्या हत्तींचे मेळावे, १३·६३, हे आठ दिग्गज, ऐरावत, पुंडरीक, वामन, कुमुद, अंजन, सार्वभौम, सुप्रतीक व पुष्पदंत, आठ दिशांस असतात; **अष्टमहासिद्धि**—कोशांत सिद्धि-द्धी पहा, महाभारतांतील अनुशासनपर्वांत (१) अणिमा, शरीर सूक्ष्म करणें, (२) महिमा, शरीर मोठें करणें, (३) लघिमा, शरीर हलकें करणें, (४)

गरिमा, शरीर जड करणें, (५) ईशिता, सर्व चराचरांत ईश्वरभाव ठेवणें, (६) प्राकाश्य, ऐहिक व पारलौकिक स्थळें पहाणें, (७) वशिता, विषय भोगून इंद्रियांवर स्वामित्व ठेवणें व (८) प्राप्ति, सर्व प्राण्यांचा देवतांशीं संबंध घडविणें, अशा आठ महासिद्धि दिल्या आहेत; **अष्टम—अष्टमाध्याइं** १०·२८; **आठ—आठांची साम्यावस्था** ७·१८-१९ पहा; **आठ अंगें,** सुरयोनींच्या आठ प्रकारांस उद्देशून, १४·१०३, किन्नर, चारण, यक्ष, विद्याधर, गंधर्व, सिद्ध, योगी व मुनि (तुलसीशब्दप्रकाश); **आठ पाहार,** कोशांत **पाहार** पहा; **आठां हिं भावां** ११·२४५, **सात्विकां आठां,** आठ सात्विक भावांस उद्देशून, १८·१५८८, स्तंभ, स्वेद, रोमांच, लय, ऐश्वर्य, वेपथु, अश्रु व वैवर्ण्य (प्रतापरुद्र), यावर ११·२४१-२४७ व १८·१५८४-१५८८ पहा; **आठ भैरव**—असितांग, रुरु, चंड, क्रोध, उन्मत्त, कुपति, भीषण व संहार हे आठ भैरव, पर्यायानें कांहींच्या ऐवजीं ताम्रचूड, चंद्रचूड व कपाल अशींही नांवें आहेत, आदित्यवारिं वाढी। भैरवां भरीं॥ १३·८१८, वरील भैरवांस उद्देशून; **आठ रस**—शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स व रौद्र (काव्यप्रकाश); **आठां रसांची ओलावणी** ४·२१०, कोशांत **ओलणें** पुढें पहा; **आठ लोकपाल**—इंद्र, अग्नि, यम, निर्ऋति, वरुण, वायु, कुबेर व ईशान (शिव), यांना दिक्पति असेंही नांव आहे, यावर १०·२०० पहा; **आठ वसु**—आप्, ध्रुव, सोम, धर (धन), अनिल, अनल (पावक), प्रत्यूष व प्रभास, आठां वसूंमाझारि। पावकु तो मीं अवधारीं। १०·२०६; **आठें विकारीं**—महद्ब्रह्म आपल्या उदरांत प्राकृत आठ विकारांनीं जगद्रूप गर्भाची वाढ करतें, १४·८८, हे आठ विकार म्हणजे प्रकृतीचीं आठ अंगें, **आठै भाग** ७·१८ पहा; **आठवें**—(क्र. वा.) **गुण जें आठवें** १८·८४५.

## नऊ—

**नव**—हा शब्द इतर शब्दांस जोडून किंवा सुटा आला आहे; **नव गुण,** ब्राह्मणाच्या नऊ गुणांस उद्देशून, १८·८५१, गीतेंतील १८·४२ श्लोकांत नऊ गुण सांगितले आहेत—(१) **शम** १८·८३१, (२) **दम** १८·८३२-८३३, (३) **तप** १८·८३४-८३५, (४) **शौच,** अंतर्बाह्य शुद्धतेस उद्देशून, १८·८३६, (५) **क्षमा** १८·८३८, (६) **आर्जव,** सरळपणा, १८·८३९-८४०, (७) **ज्ञान** १८·८४१-८४२, (८) **विज्ञान** १८·८४३-८४५, (९) **आस्तिक्य** १८·८४५-८४७; **नवगुणरत्नाकर,** नऊ गुणांचा समुद्र, १८·८४९, **ग्रहगण** ११·२५४, रवि, चंद्र, मंगळ, बुध, गुरु, शुक्र, शनि, राहु व केतु या नऊ ग्रहांस उद्देशून; **नवचंडी,** नवचंडिका—शैलपुत्री, ब्रह्मचारिणी, चंद्रघंटा, कूष्मांडा, स्कंदमाता, कात्यायनी, कालरात्री, महागौरी व सिद्धिदा, पार्वतीच्या या नऊ रूपांस उद्देशून, १३·८१८; **नवज्वर**—नऊ दिवसांचा ताप, वोखदाचेनि नावें अमृतें। जैसा नवज्वरु आवुथे। १३·७२१, नवज्वर झालेल्या रोग्याला औषध म्हणून दूध दिलें तर ताप भडकतो यास उद्देशून; **नवद्वाराचां चौकीं** १२·५२, **नवै द्वारें श्रवति** १३·७३०, **नवद्वारें देहीं** ५·७५, हे संदर्भ शरीराच्या नऊ द्वारांस—दोन डोळे, दोन कान, दोन नाकपुड्या, तोंड, गुद व उपस्थ यांना उद्देशून आले आहेत; **नव मास,** गर्भांतील नऊ महिने, १३·७३१; **नवां रत्नांचा हारु** १८·८४९, हीं नऊ रत्नें—माणिक, मोती, पोवळें, पाच, पुष्कराज, नीळ (शनि), हिरा, गोमेद व वैडूर्य; **नवां रसां अनुव्रत** १८·३३०, नवरसां भरविं सागर। १२·११, **नवरसिं वरिखैन** १३·११६३, **नवरसदीपिचा** १०·७, **नवरससुधाब्धी** १·२९, हे सर्व संदर्भ वर दिलेल्या आठ रसांस व शांत रसास उद्देशून आले आहेत, शांत हा नववा रस मानला आहे; **नवविध** १८·३३०; **वायुचें नवविधपण** ६·२४३, हा संदर्भ वायूच्या नऊ क्रियांसबंधीं आहे, त्या अशा: प्राण—हे पांच आहेत—प्राण (अन्नप्रवेश), अपान (मलमूत्रोत्सर्ग), व्यान (पचन), उदान (भाषण) व समान (डोळा मिटणें व उघडणें), उपप्राणही पांच आहेत—नाग, कूर्म, कृकल, देवदत्त, धनंजय,

यांचे जांभई, शिंक, ढेंकर, उचकी, आंग मोडणें, हे व्यापार आहेत; या देहांत प्राण हा मुख्य असून तो इतर नऊ प्राणांची पेंढी बांधून त्यांची उंडी मध्यमेंत टाकतो, १८·७३६;

**नवम**—(क्र. वा.), **नवमाध्यायीं** १६·६०; **नवमी**—नवमीतें मांडी। आणि बैसे नवचंडी। १३·८१८, आश्विन शुद्ध १ ते ९ या नवरात्रांत नवचंडीची स्थापना करणें, तिची आराधना करणें व सप्तशतीचें नऊ वेळां पारायण करणें यांस उद्देशून;

**नववा**—(क्र. वा.) १८·८४५, १८·८४७.

## दहा—

**दश**—**दशदलांचें**—उपनिषदां सोरभ्य। दशदलांचें॥ १५·५३७, दहा पाकळ्या असलेल्या कमळाचें रूपक दहा उपनिषदांवर बसविलें आहे, **दशोपनिषदें** १·१८, हीं दहा उपनिषदें—ईश, केन, कठ, प्रश्न, मुण्ड, माण्डूक्य, तैत्तिरीय, ऐतरेय, छान्दोग्य व बृहदारण्यक; **दशक**—**इंद्रियांचा दशकु**, दहा इंद्रियांचा समुदाय, १३·७३, (१) प्रचारांत तोंड, ब्रह्मरंध्र, दोन नाकपुड्या, दोन कान, दोन डोळे, शिस्न व गुदद्वार असा हा इंद्रियांचा दशक मानतात, (२) ग्रंथांत पांच ज्ञानेंद्रियें व पांच कर्मेंद्रियें मिळून दहा असा इंद्रियांचा दशक सांगितला आहे—तरि श्रवण नयन। त्वचा घ्राण रसन। इयें जाणें ज्ञान। करणें पांचै॥ १३·९८, अथवा, बाहीरि त्वचा श्रवण। चक्षु रसना घ्राण। हें पंचविध जाण। ज्ञानेंद्रिय गा॥ १८·४९६, मग वाचा आणि कर। चरण अधोद्वार। अपायु हे प्रकार। पांचै आणिक॥ १३·१००, श्रोत्रं त्वक् चक्षुषी जिह्वा नासिका चैव पञ्चमी। पायूपस्थं हस्तपादं वाक्चैव दशमी स्मृता॥ २·९० मनुस्मृति; **महातेजाचा दशक**—तेविं चि हे(द)शकु मेळविजे। महातेजाचा॥ ११·२३५, कुंटेनीं दशकाचा अर्थ दश संख्यारूप आवरणाग्नि असा दिला आहे, दश अग्नीच्या कळा—धूम्रार्चि, उष्णाई, ज्वालिनी, जलनी, स्फुलिंगी, अतिस्मना, हव्यवाहिनी, कव्यवाहिनी, नीलरक्त व रुद्रायणी अशा मुळे यांच्या सं. वा. दुर्बोध शब्दार्थांच्या कोशांत दिल्या आहेत.

**दशधा**—वायुतत्व दशधा। एक चि जालें॥ १३·१०६, पांच प्राण व पांच उपप्राण असे वायूचे दहा विभाग नऊ पुढें वायूचें नवविधपण यांत दिले आहेत; **विश्वे देव**, वसु हान साध्ये विश्वे। ११·३२७, आठ वसू व दहा विश्वेदेव यांस उद्देशून, वसु, सत्य, क्रतु, दक्ष, काल, काम, धृति, कुरु, पुरूरवा व माद्रय असे दहा, धर्म ऋषि व विश्वा यांचे दहा पुत्र—क्रतु, दक्ष, वसु, सत्य, कालकाम, मुनि, कुरज, मनुज, बीज आणि रोचमत्, (चित्राव—प्राचीन चरित्र कोश पृ. ५४३.)

**दाहि-हिं-ही-हीं**—दाहिं इंद्रियांचां गावि नेणिजे। ५·५५, इंद्रियांचा दाहिं हातिं १८·३१५; **दाही इंद्रियें** ९·३४३, १३·३६५, १६·१८४, **दाहीं इंद्रियांचिया वाटा** ८·१८१; **चक्षुरादिकें दाही** १८·४९८, **तियें दाही** १८·५००, **दाही करणें** १३·१०३, **दाही रिगति** १८·७३५, या सर्वांसाठीं वर दशक (२) पहा; **दाही दिशा पांगुरणें**, शंकराच्या दिगंबरत्वास व सर्वसंगपरित्यागास उद्देशून, १३·२६; **दाही दिशा सुनियां मानी** १८·१६०६, **दाहिं दिशिं** १५·६९, या दाही दिशा—पूर्व, पश्चिम, दक्षिण, उत्तर, आग्नेयी, नैर्ऋत्य, वायव्य, ईशान्य, ऊर्ध्व व अधस्; **दाही विषय** १३·१२१, पुढें छत्तीस पहा; **दाहीक** १८·९५१, हा पाठ देहादिक असा घ्यावा, ज्ञानदेवी, कुंटे–'देहादिक' १८·९५६; **दाहें**—दहाही, **दाहें आउतीं**, दहा इंद्रियांना उद्देशून, १८·४५१, –**चक्षुरादिकिं इंद्रियपीठीं** १८·३४८, –**दिशीं** १६·३२६, –**द्वारीं**, दहाही इंद्रियांच्या दारांत, १६·९०, –**भागीं**, दहा प्रकारच्या वायूंस उद्देशून, १३·१०७.

## अकरा—

**अकरा क्षौणी**, कौरवांचें अकरा अक्षौहिणी सैन्य, ११·२३, कोशांत **अक्षौहिणी, क्षोणी, क्षौणी** पहा; **अकरा भाव** १०·८९, ईश्वराच्या मानस संभूतीचे सात महर्षि व चार मनु, ऐसे हे अकरा। माझां मनीं झाले धनुर्धरा। १०·९२, हे सात महर्षि सात पुढें दिलेल्या

सप्तर्षींहून कांहींसे निराळे आहेत, ते असे— मरीचि, अत्रि, अंगिरस्, पुलस्ति, पुलह, क्रतु व वसिष्ठ, भागवतधर्मांतील चक्रव्यूहमताप्रमाणें चार मनूंचा, वासुदेव, संकर्षण, प्रद्युम्न व अनिरुद्ध यांचा येथें समावेश केला असावा; अकरा राजांची ही सर्व प्रजा झाली, १०.८९-१०१; **अकरा हीं राजां** १०.९५;

**अकरावें**—(क्र. वा.) इंद्रियांमाझि अकरावें । मन तें मीं जाणावें । १०.२०८, दहा इंद्रियें व अकरावें मन, बुद्धीन्द्रियाणि पञ्चैषां श्रोत्रादीन्यनुपूर्वशः । कर्मेन्द्रियाणि पञ्चैषां पाय्वादीनि प्रचक्षते ॥ एकादशं मनो ज्ञेयं स्वगुणेनोभयात्मकम् । यस्मिञ्जिते जितावेतौ भवतः पञ्चकौ गणौ ॥ २.९१–९२ मनुस्मृति;

**एकादश**, अकरा, **एकादशीं**, अकराव्या अध्यायांत, ११.१; **एकादशिचां** दिसिं, एकादशीस, १३.८१६.

## बारा—

**द्वादश—द्वादशादित्य**—निरनिराळ्या ग्रंथांत या बारा सूर्यांचीं निरनिराळीं नांवें दिलीं आहेत, हे बारा सूर्य बारा महिन्यांचे निदर्शक मानले जातात :—(१) मित्र, रवि, सूर्य, भानु, खग, पूषा, हिरण्यगर्भ, मरीचि, आदित्य, सविता, अर्क व भास्कर, (२) विवस्वान्, अर्यमा, पूषा, त्वष्टा, सविता, भग, धाता, विधाता, वरुण, मित्र, शक्र व उरुक्रम (भागवत), (३) सूर्यवंशावळींत (२) पुढें दिलेल्या नांवांपैकीं आठ आहेत, विवस्वान्, सविता, विधाता व उरुक्रम या चारांऐवजीं विष्णु, विश्वावसु, अंशुमान् व अतितेज अशीं चार नांवें आहेत;

**बारा—बारा अंगुळें** ६.२३६, **शके बारा शतें बारोत्तरें** १८.१७९२, ही ओवी ग्रंथसमाप्तीनंतर कोणीं तरी केली आहे, राजवाडे प्रतींत ती आहे, शके १२१२ त ग्रंथ संपूर्ण झाल्याचा हा दाखला देतात; **बारा राशी**—मेष, वृषभ, मिथुन, कर्क, सिंह, कन्या, तूळ, वृश्चिक, धनु, मकर, कुंभ व मीन; **बारावा**—(क्र. वा.) **बारावा अध्याउ** १८.१४३८,–**गुणु** १८.१४३७;

**बारै वाटिं**—या बारा वाटा कोणत्या याचा समाधानकारक उलगडा झाला नाहीं, चार दिशांचे चार विभाग पाडून आठ दिशा होतात, पूर्वोत्तर दिशामध्यें दोन भाग न पाडतां तीन भाग पाडले, तर चार दिशांचे बारा विभाग, बारा वाटा, असा कसा तरी अर्थ लावतां येईल, तैसें आत्मभ्रांति सारिं । वस्तु विखुरली बारैं वाटिं । १५.२६८, आत्मभाव देहादि अनात्मवस्तूंच्या अनेक वाटांनीं पसरला आहे.

## तेरा—

**त्रयोदश**—(क्र. वा.) **त्रयोदशीं**, तेराव्या अध्यायांत, १४.३२.

## चौदा—

**चतुर्दश—चतुर्दश भुवनें** ११.२६०, सात लोक—भूर्लोक, भुवर्लोक स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक, सत्यलोक व सात पाताळें —अतळ, वितळ, सुतळ, महातळ, तळातळ पाताळ व रसातळ, मिळून चौदा भुवनें;

**चाउदस**—चतुर्दशी, चाउदसिं ह्मणे माए । तूझा त्रिवो दुर्गे ॥ १३.८१७, पौष शु. चतुर्दशी, शाकंभरी अमावास्येचा येथें निर्देश केला आहे; पुनिवेहूनि चाउदसीं । जेतुलें उणेपण शशी । १८.१०८१;

**चौदा—चौदा भुवनें**, वर **चतुर्दश** पहा, ३.२४२, ११.१८२, ११.३१२;

**चौदा मनु**—स्वायंभुव, स्वारोचिष, उत्तम, तामस, रैवत, चाक्षुप, वैवस्वत, अर्कसावर्णि, दक्षसावर्णि, ब्रह्मसावर्णि, धर्मसावर्णि, रुद्रसावर्णि, देवसावर्णि व इंद्रसावर्णि, शेवटच्या दोन नांवांऐवजीं प्राचीन चरित्रकोशांत रौच्य व भौत्य अशीं नांवें दिलीं आहेत, चौदाआंतु मुदल । स्वयंभु मुख्य वडिल । च्यारि मनु ॥ १०.९१;

**चौदावा**—(क्र. वा.) **चौदावेया अध्यायासि** १४.३७.

## पंधरा—

कोशांत **पंध-पन्ह-रें** पहा. **पन्हरा**—पंधरावा अध्याय, १८.३९ (१, २); **पन्हरें**, कोश पहा; **साडपन्हरां** १५.५३३; **साडपंधरेया**

१०·१५, या संदर्भांतील पंधरा व साडेपंधरा हे सोनें कसाला लावल्यावर सोन्याचा दर्जा दाखविणारे कसाचे आंकडे होते, पुढें ते त्या त्या दर्जाच्या सोन्याचा दर या अर्थी प्रचारांत आले असावे, पुढें सोलावा पहा.

## सोळा—

**षोडश**—(क्र. वा.), सोळावा, **षोडशीं**, सोळाव्या अध्यायांत, १८·१४४२, **षोडशाध्याइं** १७·२१; **सोलावा**, (क्र. वा.) सोळावा, **सोलावां अध्या॰** १८·४०; कां सुवर्णशुद्धी कसु। सोलां(ला). वां जैसा॥ १८·९७५, शुद्ध सोन्याच्या कसाचा आंकडा सोळा होता, येथें सोलावां हा शब्द कसास लावला आहे, दरास लावलेला नाहीं, वर पंधरा पहा; **सोलावें अध्यायपद** १६·६२.

## सतरा—

**सतरावा**—(क्र. वा.), **सतरावां अध्या॰** १८·५९; **सतरावी**, जीवनकला, **सतरावियेचेनि पानियेडें** ९·२१३, **–चें स्तन्य** १२·७, या संदर्भांत जीवनकलेला सतरावी म्हणण्याचें कारण लिंगदेहांतील पांच ज्ञानेंद्रियें, पांच कर्मेंद्रियें, पांच प्राण व सोळावें मन यांचें ती साहाय्य घेते, यावर ९·२११-२१७ पहा; **आनंद-चंद्रिची सतरावी** १५·५३९, चंद्राच्या सोळा कला असतात पण व्योमचक्रांतील चंद्रामृताची जीवनकला ही सतरावी कला आहे, असें कल्पिलें आहे; **सत्राविये़चें पाणीं** १२·५४; **सप्तदश**—(क्र. वा.), सतरावा, १८·४०.

## अठरा—

**अठरा भराडे**—अठरा गोसावी, आपण भराडा होए। गुरुतें लिंगा॥ १३·३८९, हा संदर्भ गोसाव्यांच्या अठरा आखाड्यांस उद्देशून आला आहे, हे अठरा प्रकार–अघोरी, अरण्य, अवधूत, आनंद, आश्रम, इंद्र, उदासी, कानफाट्या, कालवेला, गोदड, गोरखपंथी, नंगागिरी, निरंजनी, निर्वाणी, पुरी, भराडी, राउळ, सरभंगी, यांपैकीं कांहीं नांवांऐवजीं, निर्वानी, डवरा, बन, भरती अशीं नांवें दिलीं जातात; **अठरा ज्ञानपदें** १३·८४७, **अठरा ज्ञानलक्षणें** १३·६४८, हीं पदें गीतेंत १३·७-११ श्लोकांत आलीं आहेत, त्यांचीं लक्षणें १३·१८४-६३० ओव्यांत दिलीं आहेत, श्लोक १३·७—(१) अमानित्व १३·१८४-२००, (२) अदंभित्व १३·२०१-२१५, (३) अहिंसा १३·२१६-३३२, (४) क्षांति, क्षमा, १३·३३८-३५३, (५) आर्जव, सरळपणा, १३·३५४-३६७, (६) आचार्योपासना, गुरुभक्ति, १३·३६८-४५८, (७) शुचित्व १३·४६०-४८२, (८) स्थैर्य १३·४८३-४९९, (९) आत्मविनिग्रह १३·५००-५१०; श्लोक १३·८—(१०) वैराग्य १३·५११-५२२, (११) अनहंकार १३·५२३-५३३, (१२) जन्म, मृत्यु, जरा, व्याधि या दुःखांपासून अलिप्त राहणें १३·५३४-५९०; श्लोक १३·९—(१३) 'असक्ति' १३·५९१-५९३, (१४) पुत्रदारगृहाविषयीं अनासक्ति १३·५९४-५९८, (१५) इष्टानिष्टोपपत्तींत समचित्तत्व १३·५९९-६०१; श्लोक १३·१०—(१६)अनन्यभक्ति १३·६०२-६०९, (१७) निर्जन जागीं राहणें १३·६१०-६१२; श्लोक १३·११—(१८) सतत अध्यात्माचा अभ्यास १३·६१४-६३०; **अठरावां अध्या॰** १८·३३, १८·८३; **अध्यायां अठरांचें लेख** १८·५७; **अष्टादश**—अठरावा अध्याय, १८·४१, १८·४३, **–शो** १८·७३; **अष्टादश पुराणें** १·५, तीं हीं—(१) मत्स्यपुराण, (२) मार्कंडेय–, (३) भविष्य–, (४) भागवत–, (५) ब्रह्मांड–, (६) गरुड–, (७) लिंग–, (८) पद्म–, (९) वामन–, (१०) अग्नि–, (११) कूर्म–, (१२) स्कंद–, (१३) नारद–, (१४) वराह–, (१५) ब्रह्मवैवर्तक–, (१६) वायु–, (१७) ब्रह्म–, (१८) वाल्मीक–.

## वीस—

**विस**—**विस ही विश्वे** ६·४१६, विश्वा किंवा विस्वा हा कोणत्याही प्रमाणाचा विसावा भाग, वीस ही भागांनीं, सर्व भागांनीं, सर्व प्रकारांनीं, सर्वतोपरी, येथें कधीं ही, असा अर्थ घ्यावा, कोशांत **विश्वा** (१) पहा; **विसें ठांइं**—लहान लहान उंड्या करून त्यांचे अनेक घांस निरनिराळे मांडणें, १३·९४५.

**एकवीस—**

तैं एकविसां स्वर्गा ही मीठी । पातालासि दे जे(जे)वि ॥ ११·४०६, येथें पातालासि ऐवजीं पातालासिं, पाताळासह याअर्थी पाठ असणें संभवतें; पाताळासकट असा अर्थ घेतला तर चौदा भुवनापुढें दिलेले सात लोक, सात पाताळें व सात द्वीपें मिळून एकवीस स्वर्ग असा अर्थ लावतां येईल, हीं सात द्वीपें—जंबु, प्लक्ष, शाल्मली, कुश, क्रौंच, शाक व पुष्कर; जर एकवीस स्वर्ग पाताळांत गेले असा अर्थ लावला तर शिवनिबंधांत दिलेले एकवीस स्वर्ग घ्यावे, ते हे आहेत :—ज्योति, शीत, विमळ, अभियागता, प्रकाशविख्यात, सदोदित रम्य, सहज, सिद्ध, आनंद, दिव्य, एकांत, अमळ, तृप्ति, निर्मळ, प्रेम, निज, लय, अंत, नित्य, अति व शिव. (मुळे, पृ. १२६).

**चोवीस—**

**चोविस पंचविसावें** १४·२२२, हें चोवीसां हिं तत्वांचें । कुटुंबघर वसतिचें । तूटे बंधमोक्षाचें । गूंतलें एथ ॥ १८·३१७, **तत्वाचां चौविसीं मापीं** १८·५११, हे तीनही संदर्भ देहास उद्देशून आले आहेत; सांख्यमतें प्रकृतींत चोवीस तत्त्वें आहेत—मूळ अव्यक्त, अनादि, स्वयंभू अशी प्रकृति १, महत् १, अहंकार १, सूक्ष्म तन्मात्रा ५, ज्ञानेंद्रियें ५, कर्मेंद्रियें ५, महाभूतें ५, व मन १ मिळून २४.

**पंचवीस—**

**पंचविसां(सा)वां पुरुषु,** पंचविसावें तत्त्व, १०·१३४; सांख्यमतें वर दिलेलीं चोवीस तत्त्वें व पंचविसावें ब्रह्म, हें—तिहिं पुरोनि स्वभावें । चतुर्थ जें ॥ १४·२२२, तीन गुणांपलीकडचें चौथें आहे.

**सव्वीस—**

**सविस—सविसें गुणज्योतीं** १६·२०८, **—ब्रह्मगुणि(णिं)** १६·२०५, गीतेच्या १६·१ ते १६·३ श्लोकांत सांगितलेले दैवगुण :— श्लोक १६·१—(१) अभय १६·६७-७२, (२) सत्त्वसंशुद्धि १६·७३-७९, (३) ज्ञानयोग १६·८०-८३, (४) दान १६·८४-८६, (५) दम १६·८७-९२, (६) यज्ञ १६·९२-९८, (७) स्वाध्याय १६·९९-१०४, (८) तप १६·१०४-१११, (९) आर्जव १६·११२; श्लोक १६·२—(१०) अहिंसा १६·११३, (११) सत्य १६·११४-१२३, (१२) अक्रोध १६·१२४-१२९, (१३) त्याग १६·१३०-१३४, (१४) शांति १६·१३५-१३९, (१५) अपैशुन्य १६·१४०-१५२, (१६) दया १६·१५३-१६१, (१७) अलौल्य १६·१६२-१६६, (१८) मार्दव १६·१६७-१७३, (१९) ऱ्ही, लाज, १६·१७४-१८३, (२०) अचापल्य १६·१८४; श्लोक १६·३— (२१) तेज १६·१८५-१८८, (२२) क्षमा १६·१८९, (२३) धृति, धीर, १६·१९०-१९३ व १६·१९६, (२४) शौच, शुचित्व, १६·१९४-१९५, (२५) अद्रोह १६·१९७-२०२, (२६) अतिमानितेचा अभाव १६·२०३-२१०.

**सत्तावीस—**

सत्तावीस नक्षत्रें :—अश्विनी, भरणी, कृत्तिका, रोहिणी, मृगशिरा, आर्द्रा, पुनर्वसु, पुष्य, आश्लेषा, मघा, पूर्वा, उत्तरा, हस्त, चित्रा, स्वाती, विशाखा, अनुराधा, ज्येष्ठा, मूळ, पूर्वाषाढा, उत्तराषाढा, श्रवण, धनिष्ठा, शततारका, पूर्वाभाद्रपदा, उत्तराभाद्रपदा व रेवती.

**छत्तीस—**

**सतिस—**पैं अष्टधा भिन्न ऐसें । जें दाविलें प्रकृतिमीसें । जें क्षेत्रद्वारें सतिसें । भागिं केलें ॥ १५·४५१, क्षेत्राचीं छत्तीस तत्त्वें १३·७७—१५० ओव्यांत पहा; **यां सतिसां सतिसांचा मेळावा** १३·१४९, **सत्तिसां सत्ततिसां(सा)वें** १४·२२२, **सतीस हीं तत्वें** १३·१५५, **सतीस भेद** १३·१५०, **सतीस ही वानी भेद** १३·१०३२ क्षेत्राचीं हीं छत्तीस तत्त्वें, गीता श्लोक १३·५—(५) महाभूतें—पृथ्वी, आप, तेज, वायु व व्योम १३-७७, (१)

अहंकार १३·७८-८२,(१) बुद्धि १३·८३-८९, (१) अव्यक्त १३·९०-९७, (५) ज्ञानेंद्रियें—श्रवण, नयन, त्वचा, घ्राण व रसन १३·९८, (५) कर्मेंद्रियें १३·१००-१०१, (१) मन १३·१०३-१०४, (१०) इंद्रियविषय—'शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध' हे पांच १३·११७, मग स्वर वर्ण विसर्गु। अथवा स्वीकारु त्यागु। चं(च)क्रमण उत्सर्गु। मलमूत्रांचा॥ १३·११९, बोलणें, चालणें, घेणें, देणें, मलमूत्रांचा त्याग हे पांच, ऐसे हे दाही विषय १३·१२१, श्लोक १३·६—

(१) इच्छा १३·१२१-१२५, (१) द्वेष १३·१२६,

(१) सुख १३·१२७-१३१, (१) दुःख १३·१३२,

(१) चेतना १३·१३४-१४२,

(१) धृति १३·१४३-१४८,

(१) संघात १३·१४९, एकूण ३६.

**सदतीस—**

**सत्ततिसांवें—सत्तिसां सत्ततिसांवं, सदतिसावें** ब्रह्म, १४·२२२; **सततीसांवा पुरुषु-विशेषु** ११·३०४.

**बावन—**

आगा बावना वर्णा परौता। कोण्हीं मंत्रु आहे पांडुसुता। कां बावना हिं नुच्चारितां। जीउ आथि॥ १८·३७१, हे बावन वर्ण म्हणजे सोळा स्वर, क्, च्, ट्, त्, प्, या वर्गांचीं पंचवीस व्यंजनें व दुसरीं हीं अकरा व्यंजनें य् र् ल् व् श् स् ह् ळ् क्ष् व ज्ञ, (१६+२५+११) मिळून बावन वर्ण. ए ऐवजीं ये व ओ ऐवजीं ॐ, वो, असे लेखनपर्याय आले आहेत; राजवाडे प्रतींत ळ ऐवजीं ल आहे, कांहीं ठिकाणीं ळ आहेत ते मुद्रण दोष असावे; ळ ऐवजीं ल घालणें हें राजवाड्यांना उपलब्ध झालेल्या प्रतीच्या लेखकाचें वैशिष्ट्य होतें, यादवकालीन मराठींत व त्या पूर्वींही ळ अक्षर होतें.

**शंभर—**

शत, सत हे शब्द शंभर, विपुलता किंवा आधिक्य दाखविण्यासाठीं ग्रंथांत योजले आहेत. **शत—शत एक जन्मां**, अनेक या अर्थीं, १५·३१; **शतें सात**, गीतेंतील सातशें श्लोकांस उद्देशून, १८·१६८३, **सातां शतांचा** १८·१६४१, **सातें शतें** १८·५७, **सप्तशती–मंत्रप्रतिपाद्य भगवती** १८·१६४५; गीतेंत सातशें श्लोक आहेत, राजवाडे प्रतींत सातशें एक छापले आहेत, १३·१ ते १३·४ पहा, १३·४ हा आंकडा दोन श्लोकांपुढें आला आहे, राजवाडे प्रतींतला १३·१ श्लोक लो. टिळकांच्या गीतारहस्यांत व भां. ओ. रि. इं. च्या महाभारतांत नाहीं; **शतकूट**, फार बारीक चुरा, १·१४७, **–क्रतूं**, शंभर यज्ञ करणारांनीं, ९·३०९, **–जर्जरें**, फार जीर्ण, ९·४८६, **–धा**, अनेक प्रकारांनीं, ११·१०१, **–मख** १५·३०, **–मखोत्तीर्णकर**, इंद्र, १०·२२०, **–वृद्ध**, फार वृद्ध, १३·५८३, **–वेऱ्हीं** ९·३०७; **वरिखशताचां कोडीं** ६·४६३, कोशांत कोडिडी पहा; **जन्मशत**, अनेक जन्म, ७·१२६, ९·२०५, **–मापें** १३·३३; **श्येय**, शंभर, १२·२५, कोशांत श्येय पहा; **सत—सतें** सात १८·१६४०, **सातेंसतीं (सातें सतीं)** १०·३०, **सें सात** १८·१६४३, १८·१६५६, **सात से(सें)** १८·१६५१, हे संदर्भ गीतेच्या श्लोकांस उद्देशून आले आहेत.

**सहस्र—**

एक हजार किंवा पुष्कळ या अर्थीं हा शब्द आला आहे. जैं चौकडिया सहस्रु जाये। तैं(तैं) ठाये ठाउ वीतु होये। आणि तैसेनि सहस्रें भरियें पाहे। राति जेथ॥ ८·१५४, ब्रह्मदेवाच्या एका अहोरात्रास उद्देशून, ब्रह्मदेवाच्या अहोरात्राचे १४ भाग कल्पिले आहेत, या प्रत्येक भागास मन्वंतर म्हणतात, चतुर्युगाच्या एकाहत्तर फेऱ्या व आणि कांहीं वर्षें गेलीं म्हणजे एक मन्वंतर पुरें होतें, यावर ८·१५३-१६३ पहा; बैसो सहस्रा एका ची(चि) पांती। अवधानाची॥ १३·३७०; **सहस्रावधी युगें निमावि** ८·१६१; **सहस्रदळाचा मेघु** १८·१०३३;

सहस्राच २·३०४; सहस्रां-माझि, अनेक माणसांपैकीं, ७·१०, सहस्र वरि, अनेक, ११·११७, सहस्रवेरी ९·५८, सहस्र वेन्हीं ११·२३४, ११·५२३, –वेन्हीं १२·९१; सहस्र शीर्ष याचे, हे शब्द एकत्र घ्यावे, शेषाचे, ११·२६५; घटसहस्र १३·९१३, जन्म– ६·१४६, ६·४६३, १०·२३८, तप– १७·४१२, युग– ८·१६२.

**लक्ष—**

शतसहस्र किंवा अनेक. पातां प्रसवतियां योनी(नीं)चे। लक्ष ही दीसति ॥ ८·२५; **एकें लक्षें** १०·२९, **सवा लक्षु भारत** १८·१६४०, महाभारतांत इतके श्लोक आहेत या समजास उद्देशून; **चौरासी लक्ष**—८४ लाख योनींस उद्देशून, ७·२४, १४·१०६, १५·१४८ (चौ), १८·१२९४, चौऱ्याऐंशीं योनींबद्दल अनेक मतें आहेत त्यांपैकीं एक—२० लक्ष स्थावर, ९ लक्ष जलचर, ११ लक्ष कीटक, १० लक्ष पक्षी, ३० लक्ष पशु, ४ लक्ष मानवदेहधारी, एकूण ८४ लक्ष; **लक्षवरि**, लक्षावधि, ७·११; **लाखौली** कोश पहा.

**कोटी—**

**कोटि, कोडि-डी** असे शब्द कोटी किंवा पुष्कळ, अनेक या अर्थी ग्रंथांत आले आहेत. **सूर्य-कोटितेजसा** ११·६९; **कोडि-डी**, कोश पहा.

**अक्षौहिणी—**

विविध सैन्यांचे आंकडे कोशांत **अक्षौहिणी** पुढें दिले आहेत, १·१२२; **अक्षौणी**, विपुलता, १६·१६३; **क्षोणी-क्षौणी** हे शब्द अक्षौहिणी किंवा विपुलता या अर्थींही आले आहेत ते कोशांत पहा.

# परिशिष्ट ११

## संकीर्ण

### (१) सूर्य, चंद्र, ग्रहण इ०

**सूर्य**—स्थिर असतो, आणि उदोअस्तूचेनि प्रमाणें। जैसें न चलतां सूर्या चालणें। ४·९८, जैसा नचलतेनि रवी। लोकु चले ॥ ८·१८५, कोशांत **चलणें** पहा; सूर्य चालतो या लोकदृष्टीस उद्देशून—मियां चालविला सूर्यु चाले। ९·२८२; सूर्याच्या तापानें पाण्याची वाफ होऊन पाऊस पडतो व पुनः सूर्य वाफेच्या रूपानें पाणी आकर्षून घेतो यास उद्देशून—जैसा वरिखौनि भूतळिं। आपुला रसु अंशुमाली। मागुता आणी रश्मिजाळिं। बिंबासि चि ॥ १५·२६७; सूर्यप्रकाशानें नक्षत्रें लोपतात, सूर्यविकासी कमळें उमलतात, मृगजळ दिसतें इत्यादि संदर्भांकरतां कोशांत **गभस्ति, सविता, सूर्य** पहा.

**चंद्र**—चंद्रामुळें समुद्राला भरती येते १८·१३०४, तो अमृताचा चालता सरोवर आहे १५·३७१, या अमृतानें वनस्पतींत औषधी गुण येतात १५·३७२, याच्यावर हरणाचा आकार दिसतो १६·७४, याच्या किरणांनीं चंद्रविकासी कमळें उमलतात, चंद्रकांत मणी द्रवतो; चकोर चंद्र-किरणांचें सेवन करतो याचे अनेक संदर्भ कोशांत **चंद्र** पुढें पहा; चंद्रसूर्याचीं बिंबें अमावास्येला एकासमोर एक येतात (भेटतात) यास उद्देशून —नातरि अंवसेचां दिसीं। भेटलीं दोन्हीं बिंबें जैसीं। ११·५·

**ग्रहण**—सूर्य व चंद्र ग्रहण, **रवि-चंद्रा राहु-मेळु** १७·२७१, कां रवि राहुग्रस्तु। प्रभाहीनु ॥ १·२६८, **सोमसूर्यग्रहणें** १८·१०९, मग राहूनि उगलिली। प्रभा चंद्रें आलंगिली। १८·१००६.

**केतु**—धूमकेतु, उदैलें केतुचें जैसें। विश्वा अनिष्टा चि दोसें। ते जन्मति ते तैसे। लोकां आड ॥ १६·३१७; **मंगळ** या त्रासदायक ग्रहास उद्देशून

– ना तरि भौमा नांव मंगलु। ५·११५, कां ग्रहां माझि इंगलु। तेयातें ह्मणिजे मंगलु। १८·७४८, इतर ग्रहांस उद्देशून :—क्रूरग्रहांची जैसी। मांदी मिळे येकी राशी। १६·२५५, कां कुमुहूर्ति दुर्योग। एकवटति॥ १६·२५६; **मृगजळ**—रोहिणीतें ह्मणिजे जळु। ५·११५, मृगजळ थोडा वेळ टिकतें, तें दिसतें तसें नसतें, विषय याच प्रकारचे असतात त्यास उद्देशून, २·१२१; **राशिनांव**, मुलाची जन्मरास जशी असेल त्याप्रमाणें त्याचें नांव ठेवतात त्यास उद्देशून, १७·१५; मूळनक्षत्रावर जन्मलेल्या मुलाचा त्याग करावा, (शांति वगैरे केल्याशिवाय त्याचें तोंड आईबापांनीं पाहूं नये यास उद्देशून,) १८·१२२; स्वातीच्या पाण्यानें शिंपल्यांत मोत्यें बनतात, १५·३८८, १८·१६७९.

(२) **प्रांत व नगरें**—कोशांत क्षेत्र, देश, प्रदेश, प्रांत, नगर-री, पुर-पूर(१), पुरि पुढें पहा.

**कुरुक्षेत्र**—कुरु प्रांत, कुरु रणक्षेत्र, १·८५, ८·२६९, ११·६५१, १७·२७०; **कुरुनायक**, धृतराष्ट्र, १८·१६३८, **–राजा**, धृतराष्ट्र, १८·१५७१.

**कैकट**—कीकट देश, धर्मकृत्यास अपवित्र, १७·२९३.

**चैद्य**—चेदि देशाचा राजा, ९·४६२.

**मरुत देस**, मारवाड, १८·१५९.

**महाराष्ट्रमंडल**—१८·१७८१.

**अमरावती**—९·३१७, ११·३८२, **अमरपुरें** ९·३७०.

**गंधर्वनगर**—कोशांत गंधर्व पहा.

**कासी**—काशी, १२·१७४, १७·२७०; **काशीश्वर** १·९९, **–पति** १·१५१.

**गोकुल**—गोकुळ, १०·२६५, १०·२६७, ११·३४.

**द्वारका**—१५·४५, १८·३६७; **द्वारकानाथ** १५·४१४, **–पुरसुहडा** ११·६६०.

**प्रयाग**—तीर्थ,संगमस्थान,६·३५७,१०·१०८, ११·६, ११·१०; **प्रयागवट** १०·१६.

**लंका**—लंकेश्वर, रावण, १०·२३३, ११·२३.

**विराट**—विराट देशाचा राजा, १·९८, १·१५३.

**हस्तिनापुर**—११·२३१.

(३) **डोंगर, पर्वत व नद्या**—कोशांत डोंगर, पर्वत, नद-दी, पाडि-डी, व पुरवणींत गिरी शब्द पहा.

**मंदर**—मंदराचल,कोशांत अचल पहा; **मंदराकार** १८·१६९७; **मंदार**—**मेरुमंदार** १·१५५.

**मलय**—मलयानील ४·२१७, १३·२८९.

**मेरु**—उंचपणा, मध्यवर्त्ति स्थान, स्थैर्य व सोनें याविषयीं प्रसिद्ध, १·१३९, ५·१९, ६·९२, ६·३६८, ७·९२, १०·२०६, ११·२१७, ११·२३९, ११·६६५, १२·२०२, १३·२५९, १३·३४७,१३·६१९, १३·१०१७, १४·१६३, १४·३३७, १५·४६९; **सत्वसोनेयांचा मेरु** १८·८७२; **मेरुमंदार** १·१५५; **महामेरु** १८·१७६०.

**सुवेल**—लंकेच्या उत्तरेकडील पर्वत, १०·२३३, कोशांत वेल (१) पुढें दिलेल्या सुवेलींचा अर्थ सुवेल पर्वतावर असा घ्यावा.

**हिमालय**—हिमाचल १४·३८२, **हिमवंत** १०·२१४, १२·१७५, १४·३३२, १४·३७३, **हेमवंत** १३·३४६.

**कालिंदी**—यमुना, **कालिंदियेचें हृदयशल्य** १०·२६७; **दुःखकालिंदीचां तटीं** ११·३४२, पुढें यमुना पहा.

**गंगा**—गंगा नदी व सर्वसाधारणपणें इतर पवित्र नद्यांचीं जान्हवी, भागीरथी इ. नांवें परिशिष्ट (६) त पहा.

**गोदावरी**—**गोदावरिचां कुळीं** १८·१७८१.

**त्रिवेणी**—तीन नद्या, गंगा, यमुना व सरस्वती, ११·७.

**यमुना**—गंगायमुनाउदक १८·५१, **गंगेयमुनेचे** ओघ ११·६.

**सरस्वती**—त्रिवेणीपैकीं एक, **गीतासरस्वती** ११·७.

(४) **सण व व्रतें**—यांचे संदर्भ तपणें, पर्व (१) पुजणें-पूजणें, प्रायश्चित्त, यज्ञ, यष्टि, याग, व्रत, सण, हवन, होत्र, होम इ. शब्दांपुढें कोशांत पहा. कांहीं नांवें येथें दिलीं आहेत :—

दिवालि-ली—कोश पहा.

**नागपंचमी**—तेतुला चि नागांसि। पंचमीसि ॥ १३·८१६.

**पाडवा**—प्रतिपदा, १६·७४; **गुढिया उभिति** ९·५०७, इतर उत्सवांच्या दिवशींही गुढी उभारतात त्यास उद्देशून.

**सटवी**—तेवि चि सटिवियेचिये राती। न विसंभिजे जेवि वाती। १८·८३४, षष्ठीपूजनानंतर रात्र जागवतात त्यास उद्देशून.

**होळी**—करुनु अपारां धातूंची होली। १२·५०, होळी सणास उद्देशून.

**अग्निहोत्र**—**अग्निहोत्रादि यजनें** १७·४४.

**इष्टापूर्त-र्त्त**—१३·५२३, १४·१६७, १८·९९; **इष्टि**—पशुयाग, १३·२२२.

**उचितदेव**—यांसाठीं केलेलें यजन, हवन इत्यादिकांवर १७·३५७-३६० पहा; **एकांगुष्टिं** तप १७·४१२; **कृच्छ्रादि व्रतें** १६·९१, **एकांतरा कृच्छ्रीं** १७·३६१, कोशांत कृच्छ्र पहा; **गान्हाणें** घालणें १७·३२८; **चांद्रायण** १७·३६१; **जन्मव्रती** १४·२६८; जीववध, बळी देऊन भुतांना वश करणें, १७·७९, चेड्यांना बाळकांचे **बळी देणें** १७·९६, मारक मंत्रप्रयोग, अभिचारादि प्रयोग करणें, १६·३५८, १६·३९६, १६·३९८, १६·३९९; **पितृपक्ष** १६·१०६, **श्राद्ध** १७·१८४; **प्रायश्चित्त**—गंगेचेनि लाविलीं तटें। ऐसी(सीं) प्रायश्चित्तें धोवटें। १८·१०११; **मालें मार्गेन** १४·३१, **ब्रह्मचर्यादि व्रतें** २·१७१; **भूमिदान** १७·४४; **यथागमविधी यजन**, वेदोक्त यज्ञ करणें, १६·९४, **यज्ञयागांचे** बरेवाईट विनियोग ९·२३८-२४२, १६·३८०–३८६, १७·३६२, १८·३५७; विहीर खणवणें, बाग लावणें, जमीन इनाम देणें, १७·४४, १८·९८, १८·७८०; **शिवमुष्टिगंड**, कोशांत गंड पहा; **सातरिया**, सात दिवसांचें उपोषण, १७·९७; **सिंहस्थ पर्वणी** १८·१६५४; इतर कांहीं संदर्भ—नांवानें फळ ठेवणें ११·६८७; **पोफल घालणें**, पैजेची सुपारी ठेवणें, १३·२१; **हाड रोवणें**, वाळीत टाकणें, १६·३१३; पायाळू दैववान असतो व अंजन घातलें तर त्याला गुप्तधन व हरवलेल्या वस्तु दिसतात, ६·४५६, १५·३४; मंत्रानें सर्पविष उतरविण्याचे संदर्भ परिशिष्ट (८) **सर्प** पुढें पहा, **दृष्टीसवें चि विष फेडी, हें सामर्थ्य** हरिगारुडींत होतें २·७२; ठेव्यावर हडळ बसून राखण करते, तिला मंत्रानें घालविल्याशिवाय धन मिळत नाहीं, ११·७५.

(५) **रत्नें**—कोशांत **मणि-णी** (१), **रत्न** पहा; परिशिष्ट (११) त नऊ पुढें **नवां रत्नांचा हारु** १८·८४९ पहा; **इंद्रनील**, नीळ किंवा शनि, ११·१३४, ११·५९०; **कौस्तुभ** ९·३८५; **चंद्रकांत** ९·२९, **सूर्य**– १४·२९४, **सोम**–, कोशांत कांत (२) पहा, हे मणि चंद्राच्या व सूर्याच्या प्रकाशांत द्रवतात; **चिंतामणि-णी–रत्न**, कोशांत चिंतामणि-णी पहा; **प्रवाल**, **प्रमेय–प्रवालसुप्रभ**, १·१७, सुप्रभ शब्द तोडणें इष्ट वाटतें, (१) तेजस्वी तत्त्वार्थरूप पोवळें, **प्रवालचा** अर्थ पोवळें असा घेण्याकरतां **प्रमेय रत्न** १·५ या शब्दानें पुष्टि येते, (२) **प्रवालचा** अर्थ पालवी असाही घेतां येईल, गीतेंतील १५·२ श्लोकांत आलेल्या विपयप्रवालाः या शब्दावर टीका करतांना ग्रंथकारानें **प्रवालचा** अर्थ **वेलु पालों** १५·१४४, **विषयपल्लव** १५·१६० असा दिला आहे, प्रमेयरूप टवटवीत पालवी असा अर्थ घेतां येईल; **मरगज**, पाच, ११·५९१; **माणिक** ११·१३३, १४·१२२, १७·२४, **माणिकुलेयांचियां कणियां** ६·२६४, **माणिक एक उपाइलें**, १३·७८६, हा संदर्भ माणिकरत्नासारख्या मुलास उद्देशून आला आहे; **मोति-ती** ९·१७५, १८·३१२, १८·७१८, १८·१७१८, **मोतियें नावरति संपुटें** ६·२६६, शिंपलींत मोत्यें मावेनाशीं होऊन शिंपली उघडते त्यास उद्देशून, **मोतियां भिंग देणें** १०·१४, मोत्याला उजाळा देण्याचे **निरर्थक कष्ट करणें**, मोति फोडुनु सांधितां चांग। किं तैसें चि भलें ॥ १८·२०, अर्थ उघड आहे, स्वातीच्या पाण्यानें मोती बनतें १५·३८८, १८·१६७९, **मोतियांची कडियाली** ९·५२४; **मुक्ताफल** ७·६३, १५·३६३, १६·२०९, मुक्ताफल भलेतैसें।

होये परि मुख नसे। तंव गुणु प्रवेशे। तेथ काइ ॥ १८·१४८१; **स्फटिक** ११·१३४, कोशांत हा शब्द पहा; **हिरा—हीरा** १०·७६, **हीरेयांची पांती** ६·२६३, **ही रान भीजे,** हा पाठ **हीरा न भीजे** असा घ्यावा १३·४८१; **परिस—** कोशांत **परिस** (१) पहा.

(६) **धातु**—कोशांत **धातु, नाणें** पहा. **कथिल,** १८·७७१; **तांबें—ताम्र, तप्तता(ता)म्रतांबडीं** ११·१३६; **पारा—पारज,** कां कैलासु पारजें ढवरिला। ११·२१८; **पितळ—पितल, पितलेची गंधिकालिक** ४·६३; **रुपें**—कोशांत **रूपें** पहा; **लोखंड—आयस** १८·१७५०, **लोखंड** १३·८९२, १८·३५७, **लोह** १·७७, ८·१९९, ९·४६०, ११·४२१, १३·८९२, १३·१०१०, १३·१११७(१, २), १५·१७२, १६·२४५, **लोहाचे चणे** १२·७०, **लोहकर्मे** १८·३५७, **–खांब** १६·३७७, **–घृष्टी** १८·२८, **लोहापरिसाची घृष्टि** १७·३९५, **लोहरस** १३·५१४, **काल लोह** १६·११७, **काल–** १६·२११; **लोहत्व** १८·१७५०; **तिख–तीख** कोश पहा; **भ्र(भ्रा)मक, लोहचुंबक,** १३·१३९, संसर्गें चेतविजे लोहें। परि लोह चि भ्रामक नोहे। १३·१११७. **सोनें**—कोशांत **कनक** (१), **खोट,** पुढें **खोटि, पंध-पन्ह-रें, पांचिक, भांगार, सकें–सार्के, सुवर्ण, सोनें, सोलें, हेम** (१) पहा, सोन्याशीं संबंध असलेले **कस** (१), **कसवटणी–कसवटी, कीड, गंडी, तुकणें, पुट** (१), **मूस** (१), **वानि-नी, वाल, वोरकल** इ. शब्द कोशांत पहा; सोनें कसास लावून वानी ठरवीत, पण परिसाचा स्पर्श होऊन बनलेलें सोनें शुद्धच असणार म्हणून— काइ परिसाचिये कसवटी। वानिया जाणें(णे) ॥ ६·९६; सोनें कसास लावल्यावर चांगल्या दर्जाच्या सोन्याचे पंधरा, साडेपंधरा व सोळा असे कसाचे आंकडे ठरवीत, हलक्या प्रकारच्या हिणकस सोन्याला पांचिक म्हणत; परिशिष्ट (११) **पंधरा व सोळा** पहा; सोनें तोलण्यासाठीं त्या काळींही वालाचा उपयोग करीत, १२·२५, १३·१००३; सोनें तापवून त्याची लगड बनवीत किंवा दागिने घडवीत, अलंकारांना चकाकी आणण्याकरतां पुटें देत १०·५५, १३·१०३१; सोन्यांत हलकी धातु घातल्यावर व त्यामुळें वजन वाढल्यावर सोन्याची वानी अर्थात् पडे, सोळा कसावरून पांच कसावर सोनें उतरवितां येई, १३·१००३, १४·१४०, १५·३०९, १७·५४, १८·१५६, १८·६३८; **कीड,** लाख व हीन धातु घालविण्यासाठीं— कीड आगिठां पडे। मल तूट वानीं चढे। १८·१२०; मुशींत सोनें तापवून मेण वगैरे काढून टाकीत ६·२४९, १८·११०३; लेणीं बनविण्याकरतां ठसे वापरीत; सोन्याच्या नाण्याचे संदर्भ कोशांत **नाणें** पुढें दिले आहेत; **लोही,** ही सोन्याची पुतळी, होती ९·५८; **किमया**—ना तरि जें धातुवादिया हीं न जोडे। तें लोहीं चि पन्हरें सांपडे। जरि दैवयोगें चडे। परिसु हाता ॥ ६·३४, परिसानें लोखंडाचें सोनें होतें हें ग्राह्य मानलें आहे, पण धातुवादी लोखंडाचें सोनें किमयेनें बनविण्याचा प्रयत्न करीत हें या संदर्भावरून दिसून येतें; त्याचप्रमाणें रसायनानें पुटें देऊन—कां कथिलाचें कीजे रूपें। रसभावनीं ॥ १८·७७१, असले प्रयोगही त्याकाळीं चालू होते.

(७) **अलंकार**—कोशांत **अलंकरणें, खेवणें, भूषण, लेणें** (ना.) पहा. **एकावलि,** एकसरी माळ, हार, १३·५२९, १८·५५; **कंकण,** हें पुरुषांनीं उजव्या हातांत घालावयाचें असे, मग सावला सकंकणु। बाहु पसरूनि दक्षणु। १८·१४०९; **कांकण,** सोन्याच्या कांकणांचे उल्लेख, १४·३७५, १८·११७६; **कडियाली,** गोल कडें, ११·३१२, **मोतियांची कडियाली,** आंगावर आलेल्या घामास उद्देशून, ९·५२४; **कर्णभूषणें** १४·१८; **केयूर, केयूरादिकें सोनेयांचा कसु** १३·१०६०, हीं बाहुभूषणें सोन्याचीं होतीं; **टीक—** सोन्याची टिकली, गळ्यांतील दागिना, पार्थी सोनयां टीक। सोनां चि लागली देख। १४·३८०, १७·३४५; **नव गुण टिकलग,** नऊ रत्नांचा जडावाचा अलंकार, १८·८५१; **वोडंबरिचे अलंकार** ९·१७२; **दूसरा,** दोन

सरी माळ, **निलेयाचा दूसरा** १५·३८७; **नेपुरें** १५·४; **मुदिया**, आंगठ्या, १४·१०८, **मेखला**, कमरपट्टा, कंबरेस बांधावयाचा शेला असाही अर्थ घेतां येईल, १·९; **सरी**, गळयांत घालावयाची सोन्याची सरी, ६·२८६; **हार**, १८·८४९, कोशांत **हार** (१) पहा.

(८) **आउतें, हत्यारें**—कोशांत आउत, आयुध, शस्त्र, हातियर-हातियेर-हातीयेर पहा. **अंकुश** १·११; **कटार**, कट्यार, ४·२२०; **करवत** १६·२४२; **करवाल**, तरवार, १५·२३५, कोशांत खांडें पहा; **कातरी**, कातर, १८·८२१; **कातिया**, कोयती, १७·९५; **कुऱ्हाडी**, कुऱ्हाड, १५·४९; **कोंत**, भाला, १८·६४, **भाली**, **काळलोहाची भाली** १६·२११; **खुरपें**, कोश पहा; **खोंचारा**, भाला, **सोंचारा** हा **खोंचाराचा** अपपाठ आहे, १६·३४३; **गदा**, प्राचीन आयुध, ११·२९१, ११·५९४; **धनुख-ष-ष्य-स्**, कोश पहा; **कोदंड**, अर्जुनाचें धनुष्य, ३·१८६, **शार्ङ्ग**, श्रीकृष्णाचें धनुष्य, यांकरतां परिशिष्ट (६) खालीं दिलेलीं अर्जुनाचीं व श्रीकृष्णाचीं नांवें पहा; **नांगर** १८·८७७; **नाराज**, बाण, १६·२४१, कोशांत **बाण** पहा; **परशु** १·११; **मोगर**, मुद्गर (कुंटे), ११·३९०; **वज्र**, इंद्राचें आयुध, २·४१, २·२१६, १०·२२०; **शूल, सूल, हे** शब्द कोशांत पहा; **सबल** १७·१४२; **साबल** १३·६६१; **कवच**—वज्रकवच २·२३२, **वज्रांगी**, चिलखत, ९·४७३, १८·१०४१; **वोडण**, ढाल, १३·५४५.

(९) **खाद्य पदार्थ**—पीठ, **कणिक**—कणिकेतें जैसें पाणी । तैसें मीठ बांधियातें आणीं(णी) । १७·१३९; काकवी, **मालें, गूळ साखरें मालेयाचे बांधे** १०·३२; गुळ, **गूळ** १०·३२, १३·४६७, १३·८९६, १८·१०४, १८·९२६; **तिल, वालुवे तिलां घाणा** १८·९३७; **दूध** ३·२२१, ४·२२०, ९·३८, ९·५६, ९·१०७, १०·१७, **दूधा मेळउनि पाणी** १३·८४९, दुधाची साय १४·७३, **दूधपण** ८·२००; **क्षीर**—आगा क्षीराचिये दशे । घृत चि क्षीराकारें असे । परि क्षीर चि नव्हे जैसें । कपिध्वजा ॥ १३·८९७, **क्षीररस** १६·३८४, **गोक्षीर** २·१८४; **दधि**—जैसें दूध मुराले स्वभावें । तरि तें चि दधि ॥ ९·६३, ८·१६८, १४·२८०, **दध्याकार** १४·३७३, **दधिकडसणी** २·१२९, **दधिजल**, यांचें मिश्रण, १८·९३७; **ताक** १५·४३१, १८·४१२, १८·१३९७; **लोणी**—तरि ताकाचे अंश फेडणें । यया चि नांव लोणीं काढणें । १५·४३१, १६·१२४, १८·१३९७, **लोणियांची उंडी** १३·१०९८; **तूप**—८·२००, १८·९२५, **तेलातूपाचेया घठारा** १६·३९३; **आज्य** ९·२६६, **घृत** १३·८९७, १४·३७५, १६·१२६, **अज्ञान**–९·२३९; **तेल**—१६·२३६, १६·३७१-१६·३९३, **तेल ना पेंडि** १७·४१६; **पोहे**, **पहुवा**, ९·३९०; **साकर–साखर**, साकरेचिये रासी । बैसली मुंड मासी । १३·७८१, १४·३७१, **साखर** ४·२१६, ८·१९८, १०·३२, १८·७९३, **शर्करा** ३·२२१; **राई**—राई रायिपण बीजीं । सांटोनि आंग त्यजी । १४·२५४, **राईतें** १७·१४६, **महुरीं** १७·१४५; **मिरें**—कां मिरियांमाजि तीख । उंसि गोड ॥ १७·६८; **लसूण**-लसणातें न संडी गंधि । १८·७५४; **मीठ**—१३·७४८, १६·७१, १६·२४६, १७·१३९, १७·३७२, १८·५२९, **लवण** २·३, २·१५, ५·३५, ६·३८७, १५·२८६, १८·१६, १८·६७२, १८·७७२, १८·९८०, १८·१२०२, १८·१२४४, १८·१३४१, १८·१४०४, **लवणकण** ९·४५७, १३·९१४, **सैंधव** १८·१३७१, **–वाचा घोंटु** ९·१२३, **–वाचा रवा** १४·३९०;

**रांधणें व स्वयंपाक**—पुरवणींत **अन्न**, कोशांत **खाणें, जेवणें** (१), **बोनें, भोजन, रससोए–य–रसोय, रांधणें, वाढणें** (२), **ओगरणें, ओगरणें व वोगरणें** पहा. **स्वयंपाकघर**—रांधवण वोलि पुढें । पन्हिवे वाहाति खाताडें । १३·५६१, स्वयंपाकघरापुढें सांडपाणी, खरकटें वगैरे वाहत असे यास उद्देशून; रांधण्याचे कष्ट १८·१४१, १८·१८५;

**पक्वान्नें**—गोडें नव्हति पक्वान्नें । तरि कां फावती

रसने। १८·१६८१; खाजें, घारी, परगुणें हे शब्द कोशांत पहा; मोदक १·११; साधा आहार—दूधभात ५·११, शाकांचा पाहुणेर १६·२२, बुद्धिचेनि शाकें ६·२८२; काचरी १३·५५४; कांजी २·३६३, ९·१५०, १६·१२४, १८·६१०; खिचट १४·२७१, १६·२४९, खीच ८·१४२, १८·१०३४; चुरमुरीं द्रव्यें १७·१४५; चणे १२·७०, फुटाणे ११·२१२; आहार—सात्त्विक, राजस व तामस, कोशांत आहार पहा; आहारिं मीति १८·१०१९, मोटकें अशन १८·१०२०.

भांड-डें—माती किंवा धातूचें पात्र, कोश पहा; कलशि, घागर, १३·११३९; भाणें, वाढलेलें ताट, ८·१४१, १८·१४९, १८·७८२, ताट ६·२२, ८·१९३, १३·४२२, १५·३८; पाणियांचें पात्र १७·१४८; वाटी १०·१७, १८·१६७१; हांडी १६·३६६; खापरांत वाढणें १८·१०३४; अतिथीचा बरवर पाहुणचार करून त्याला जेवायला बसवलें नाहीं तर त्या सुक्या पाहुणचाराचा काय उपयोग ? १३·६३५; चांगला जेवणारा असला व सढळ हातानें वाढणारी असली तर स्वयंपाक भरपूर असावा, १३·६४२; स्वयंपाक करून विकणाऱ्या खाणावळवालीस उद्देशून, २·२५४; आचारी, सुआर, १३·४२०; जेवणांत विषप्रयोग १३·७४०, १५·३८, १८·७११, १८·१४९३; मिष्टान्नांत काळकूट २·२५१; पोटांत विष गेलें तर तें ओकून टाकावें १८·१०६; प्रवासांत शिदोरी—वाहांतिये वेळे जड। सिदोरी जैसी ॥ १८·१८३, सिधौरि ६·२८१, शिला कां सिधौरिया, १८·९३४; निरनिराळ्या चवींस उद्देशून: आंबट—अम्ल १७·१३८, आंबड १८·२४३; कडू १३·४६७, १६·११५, १८·८०१, कडुवट १७·१३८, १८·१८४, कडवटपण २·८९, कडुवालेपण १८·१३८४; क्षारता १७·३७२; गोड ६·१७३, ९·३८, ९·५६, १२·१९९, १४·२६१, १४·२८०, १७·१२९, गोड आंबड मिळे, ही चव दोन्हीं चवींहून चांगली असते, १८·२४३, गोडिये १०·३२, गोडिरें १८·८०१, गोडिस १७·१२५, —सेपण १३·११५१, गोडी १३·८९६, १८·५०६, १८·८३९; मधुर—कोशांत महुर (१) व महुलले पहा; विड्याविषयीं—नागवल्लिका १८·६२९, चूना १७·१३८, सुपारी, पोफल, १३·२१, तांबोल १३·५६२, विडा १७·२७५, वीडा १३·४२१, उगाल १३·४१८, कोशांत उगलणें पहा.

(१०) रोग व व्याधि—कोशांत हे शब्द व औखद, ओखद, वोखद, पथ्य पहा. त्रिदोष १६·४३६, कफवातपित्त, ही देहधातूंची त्रिकुटी रोगांस कारण होते, ११·६८९, १३·१०६३, परिहरोनि कफवात। जैं देहीं आटोपे पित्त। तैं करी संतप्त। देह जेविं ॥ १४·१९५; कवल, काविळ, कोशांत कवल (२) पहा; कुष्ट १६·१७७, कुष्ठिया १८·१३५, कोढियाचें खेंव ८·१४६, कोढी १३·७०३; कृमिदोष, जंतादि विकार, या विकारांत दूधसाखर वर्ज्य असतात, ३·२२१; क्षयव्याधि १३·१७५, क्षयरोगी ९·४९७; जर, ताप, १६·३६३, ज्वर ११·४२३, कालज्वर ४·१९८, १८·६०१, धातुगत–१३·८१, नव–१३·७२१, विषमवात ८·२११; तिमिर—नेत्ररोग, या रोगांत एका ऐवजीं दोन वस्तु दिसतात, १८·१११७, १८·१५२२, १८·१७७४, इतर संदर्भ कोशांत तिमिर पुढें पहा; नाइटा १३·७९९; निगल, डोळ्यांवरचा पडदा, १३·७५७;

पांडुरोग—५·११८, पांडू आंग सूटलें। १३·७४५; महामारी ११·४५०; महारोगी ३·१२३; मुरकुंडी व वेंगडी, हातापायास होणारे रोग, १३·५६९; वैद्य—रोगांवर औषधें, मुळ्या, रसायनें देई; रोगाचें निदान अर्थात् रोग्याला करतां येत नाहीं ११·९०, तें वैद्यच करतो, पण परीक्षा नीट झाली तर औषध गुणकारी होईल नाहींतर, जें औखद व्याधी अनोलख। तें घेतलेयां परते चि विष। १८·१३१; पथ्यादिक पाळलें तर—नाना पथ्येंसि औखद लाहे। तरि रोगें दाटिला ही जिये। १८·७०३; दिसायला असाध्य व्याधीवर वैद्य निर्वाणीचें अमृतासारखें औषध देतो २·८६, पण जर—नातरि आयुष्य पुरलें आहे।

